ओंकार ट्रस्ट

# कल्याणी २००४

परमहंस परिव्राजकाचार्य

## श्री वासुदेवानंद सरस्वती(टेंबे)स्वामी महाराज विशेषांक



॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा ॥



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७



।। श्रीराम ।।

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. रेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक – श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक – डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य – डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख – ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे – श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण – श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे – श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या -पारितोषिके देत आहे –

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/– ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/– ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/– खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वतः मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करुन घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी – श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)
'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी,
पुणे ४११ ०३७.
टेलिफोन क्रमांक : २४२१००४७
मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८०ग खाली आयकर सवलत




ओंकार ट्रस्ट २००४ चा **"प. प श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे २९. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.


टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** आहे.
(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.


**मुखपृष्ठ संकल्पना**
श्री. अभय व सौ. अंजली पुरंदरे

**अक्षरजुळणी**
प्रतिमा ऑफसेट, पुणे २९.

**प्रोसेसिंग**
**चित्रभारती प्रोसेसर,** सदाशिव पेठ, पुणे.

**छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे २९. फोन : २५४६०२१६

***स्वामीमहाराजांचा मुखपृष्ठावरील फोटो कै. श्री. जि. सि. दीक्षित यांनी काढलेला असून श्री. प्रकाशराव दीक्षित यांच्या सौजन्याने***

# वाटचाल २००३-२००४

श्रीसमर्थ रामदासस्वामी व स्वामी विवेकानंद आदी थोर सत्पुरुषांची शिकवण व तत्त्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा दि. २६.७.१९९१ रोजी करण्यात आली. संस्था सार्वजनिक न्यास म्हणून नोंदविण्यात आली आहे. संस्थेची मुख्य उद्दिष्टे अशी आहेत - १) संस्कार वर्ग व बालवाचनालय, २) दवाखाना व प्रसूतिगृह, ३) ध्यान धारणा व ४) अध्यात्मिक जनजागरण.

गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे १ एकर जागा घेतली असून त्या ठिकाणी ऑपरेशन थिएटरसह ६ खाटांचे प्रसूतिगृह 'राधाबाई हर्डीकर प्रसूतिगृह' या नावाने कार्यरत आहे. दररोज दवाखानापण चालू आहे. या ग्रामीण भागात वैद्यकीय सेवा उपलब्ध नाहीत. डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली ८ नेत्र चिकीत्सा शिबीरे आयोजित केली असून गरजूंना मोफत चष्मे व औषधे देण्यात आली. दिनदयाळ हॉस्पिटल मार्फत एक कॅन्सर चिकीत्सा शिबीर घेण्यात आले.



सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तीला / संस्थेला १९९७ पासून दरवर्षी 'वसुंधरा पुरस्कार' देण्यात येतो. मराठी-इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प गेले ५ वर्षे श्री. नानासाहेब लामे यांच्या मार्गदर्शनाखाली ३५ शाळांतून राबविण्यात आला.

## २००३-२००४ मधील कार्यवृत्त

कल्याणीच्या 'स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती' (परांडा) विशेषांकाचे उद्घाटन डॉ. सुरेश गरसोळे यांचे शुभहस्ते करण्यात आले. नेत्ररोगतज्ञ डॉ. पारस शहा यांना २००३ चा 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' प्रदान करण्यात आला.

मा. श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची वाल्मिकी रामायण या विषयावर ५ दिवस प्रवचने झाली. तसेच श्री. वसंतराव गोडबोले यांचे प्रवचन आयोजित करण्यात आले होते.

कर्वे स्त्री शिक्षण संस्थेमध्ये श्री. ज्ञानेश पुरंदरे यांचे १) विद्यार्थी गुण, २) आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांच्यावर भाषणे झाली. तसेच श्री. वाय. के. कुलकर्णी यांचे स्त्रीशक्ती या विषयावर भाषण झाले.

निंबाळकरवाडी, मांगडेवाडी (कात्रज) तसेच कर्वे स्त्री शिक्षण संस्था (हिंगणे) या ठिकाणी निबंध स्पर्धा घेण्यात आल्या.

श्री टेंबे स्वामी तथा वासुदेवानंद सरस्वती यांच्यावर ह.भ.प. श्री. मोरेश्वर जोशी चऱ्होलीकर यांचे कीर्तन प्रेमनगर व नित्यानंद हॉल, सिंहगड रस्ता या ठिकाणी संपन्न झाली.

गीतापरिवारातर्फे हनुमान जयंती साजरी करण्यात आली. हनुमानचालीसाचे पठण करण्यासाठी संस्कार वर्गातील मुला-मुलींनी भाग घेतला.

कल्याणीच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी स्वरुपानंद विशेषांकाला मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट अध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला.

इंजिनिअरिंग, मेडिकल, आर्किटेक्टला प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थीनीस 'कै. नलिनी विष्णू जोगळेकर' या नावाची रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती गेली ४ वर्षे देण्यात आली आहे. इ. १० वी च्या मार्च २००३ साली झालेल्या शालांत परीक्षेमध्ये पुण्यातून संस्कृत या विषयामध्ये पहिली आलेली चि. निशिता नंदकुमार बेके हिला कै. श्री. का. ल. आठल्ये यांच्या स्मरणार्थ रु. २५०/- ची शिष्यवृत्ती प्रदान करण्यात आली.

सन २००० साली नवरात्रीच्या पहिल्या दिवशी २ मुलगे व १ मुलगी दत्तक घेतली असून त्यांच्या बरोबर २ महिला गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे राहात आहेत. त्यांच्या रहाण्यासाठी १६०० स्क्वे. फुटांचे बांधकाम रुपये सहा लाख खर्च करून पूर्ण करण्यात आले.

# श्री टेंबे स्वामी यांची शिष्य परंपरा


श्री गांडा महाराज


श्री सीताराम महाराज टेंबे


श्री दीक्षीत महाराज


श्री श्रीरंग अवधूत महाराज


श्री गुळवणी महाराज


श्री नाना महाराज तराणेकर



श्री टेंबे स्वामी यांचे जन्मस्थान (जुनी वास्तु)



श्री टेंबे स्वामी यांचे जन्मस्थान (नवीन वास्तु)



श्री टेंबे स्वामी



श्री टेंबे स्वामी यांचे देवघर

श्री टेंबे स्वामींच्या पादुका
(नरसोबाची वाडी)





# संपादकीय

संतचरित्र व संतसाहित्य म्हणजे परिस स्पर्श आहे. जीवनरूपी लोखंडास त्याचा स्पर्श झाला की माणसाचे जीवन सुवर्णमय म्हणजेच तेजस्वी बनते. सज्जनांचे संरक्षण, दुर्जनांचे निर्दालन व धर्मस्थापनेसाठी सत्‌धर्माचरण हेच सत्पुरुषांच्या जीवनाचे ध्येय असते. त्यामुळे त्यासाठीच ते आपले आचार व विचार स्वतःच्या साहित्याद्वारे समाजापुढे कायम स्वरूपी ठेवून समाज प्रबोधनाचे कार्य करीत असतात आणि स्वनियोजित कार्य पूर्ण झाले की निजधामास परत जातात. ही संत परंपरा अखंड चालू असते. यामध्ये अनेक संप्रदायातील विभूती अंतर्भूत असतात. त्यांचे वाङ्मय हे त्यांच्या संप्रदायाच्या तत्त्व प्रणालीतून निर्माण झालेले असते.

भारत भूमीतील प्रमुख संप्रदायांपैकी दत्त संप्रदायामध्ये अनेक श्रेष्ठ विभूती होऊन गेल्या आहेत. त्यातील प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांचे नाव अग्रक्रमाने घेतले जाते. या अंकाद्वारे त्यांचे चरित्र व त्यांचे साहित्य यांचे दर्शन वाचकांना देण्याचा लाभ ओंकार न्यासाला होत आहे हे आमचे सद्‌भाग्य आहे असे आम्ही समजतो.

श्रीस्वामी महाराजांचा कालखंड १८५४ ते १९१४ असा आहे. या साठ वर्षांच्या आयुर्मर्यादेमध्ये त्यांनी दत्तसंप्रदायाची मौलीक सेवा करून भारतभर त्याचा प्रसार केला. अनवाणी भारत भ्रमण करून श्री समर्थांचे प्रमाणेच त्यांनी समाजाला सद्धर्माचरणासाठी उद्युक्त केले.

त्यांचे साहित्य संस्कृत व मराठी भाषेत गद्य-पद्यात्मक असून विपुल प्रमाणात आहे. सिद्धहस्त लेखकांच्या लेखणीतून सुलभ झालेली त्यांची तत्त्वप्रणाली आम्ही वाचकांच्या पुढे सादर केली आहे. त्यांच्या ज्ञानातून स्फुरलेले सर्व वाङ्मय आजही आर्त जिज्ञासूंना मार्गदर्शक असे आहे. गद्य व पद्य मिळून त्यांचे अंदाजे ३२ ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत. आणखी पण काही अप्रकाशित वाङ्मय उपलब्ध असण्याची शक्यता आहे.

शास्त्रावर दृढ श्रद्धा, आचारधर्म पाळण्यावर कटाक्ष, अयाचित वृत्ती अंगीकारून, आदर्श संसार करून परमार्थामध्ये परमोच्च स्थान गाठणाऱ्या प. पू. श्रीटेंबेस्वामी महाराज यांचे चरणी हे १३ वे गुलाब पुष्प समर्पित करताना न्यासाला अतिशय आनंद होत आहे. श्रीस्वामींची २००३ ते २००४ ह्या वर्षामध्ये १५० वी जयंती आहे. आणि याच वर्षामध्ये आम्ही त्यांचेवर अंक प्रकाशित करू शकलो हे आम्ही आमचे परम भाग्य समजतो. त्यांनी समाजाला सात दिव्य संदेश दिले आहेत ते असे १) वृत्ती स्थिरावली पाहिजे. २) वासना मेली पाहिजे. ३) एकाग्रता वाढली पाहिजे. ४) देहाध्यास विरमला पाहिजे. ५) आत्मध्यास वाढला पाहिजे. ६) मनात उर्मी येताच ती मुळासकट टाकली पाहिजे. ७) सम्यक दृष्टी बनली पाहिजे. या संदेशानुसार माणसाने आयुष्य व्यतीत केले तर नराचा नारायण होण्यास वेळ लागणार नाही.

श्री प. प. वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांची वेबसाईट www.shrivasudevanandsaraswati.com डॉ. वा. व्यं. देशमुख यांनी उपलब्ध करून दिली आहे.

विचारवंत साधक लेखक हे आमच्या अंकाचे मुख्य मानकरी आहेत. त्यांचे बहुमोल लिखाण कोणतीही अपेक्षा न ठेवता ते आम्हाला देतात त्यामुळेच सर्वांना आवडणारा असा हा अंक आम्ही वाचकांच्या समोर ठेवू शकतो याची आम्हाला पूर्ण जाणीव आहे. त्यांचे ऋण आम्ही कधीही फेडू शकणार नाही याची जाणीव असली तरी औपचारिक शिष्टाचार म्हणून आम्ही त्यांचे आभार मानीत आहोत.

त्याचप्रमाणे अंक काढण्यासाठी आर्थिक सहाय्य करणाऱ्या जाहिरातदारांचेपण आम्ही ऋणी आहोत. लेखक, जाहिरातदार, अंक काढणेसाठी हस्ते परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे पुनःश्च आभार मानल्याशिवाय राहावत नाही.

त्याचप्रमाणे कै. जी. श्री. दीक्षित, चित्रकार यांनी काढलेले श्रीस्वामी महाराजांचे मुखपृष्ठावर छापलेले चित्र त्यांचे चिरंजीव श्री. प्रकाश दीक्षित यांनी उपलब्ध करून दिल्याबद्दल आम्ही त्यांचे शतशः आभारी आहोत.

वाचकांचा प्रतिसाद व हितचिंतकांच्या सदिच्छा या बळावर ओंकार न्यासाची वाटचाल प्रगतीपथाच्या दिशेने चालू आहे.

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

— सौ. रजनी काळे

# अनुक्रमणिका

# श्री वासुदेवानंद सरस्वती वंदना

चिदानंद आनंद विद्वद्विभूति
यति लोककल्याणव्रती विरक्ति
मृत्युंजयाचे जया योगदान
श्रीदत्तसान्निध्य यश वर्धमान
'श्रीवासुदेव-गुरुराज' वंदू
चरित्र बोधामृत तीर्थी नांदू ।।
ॐ
'टेंबे' कुली माणगावी । माणिक जणू लाभले दैवी
'गणेशभट-रमाबाई'सी । दत्तकृपेची पुण्याई ।।
पुत्र 'वासुदेव' जन्मला । पितामह गुरु त्याला
शैशवीच देवभाषेची । संथा परिपाठ लाभला ।।
रुपावलि-समासचक्र-अमरकोश-अष्टाध्यायी
मुखोद्गत वेदाध्याय । - तपी व्रती तो निग्रही ।।
विवाह झाला, वृत्ति चालवी । परि अलिप्त 'विषया' विषयी
दत्तभक्ति एक ओढ । सज्जनांची लाभे जोड ।।
होई देवाशी संवाद । दत्तमूर्तिचा प्रसाद
'वाडी' क्षेत्री जाणे येणे । माणगावी मुख्य ठाणे ।।
माणगावी दत्तस्थान । झाले जागृत देवस्थान
तरी देवेच्छा म्हणून । सुरू केले तीर्थाटन ।।
यात्रेमध्ये आले विघ्न । 'महामारी' यात्रा भग्न
पत्नी झाली स्वर्गवासी - वासु होईल संन्यासी ।।
संन्यासाचा ध्यास होता - गंडांतरे गेली मागुता
कार्य व्हावयाचे थोर, हेच जगण्याचे कारण ।।
'अनाश्रमी न तिष्ठेत' । गोविंदस्वामी आदेशिती स्वप्नात
दंडग्रहण विधीसाठी । आले उज्जयिनी क्षेत्रात ।।
नारायणानंद सरस्वती - संन्यासदीक्षा 'दंड' देती ।
'वासुदेवानंद सरस्वती' - नामाभिधान गुरुमुखे ।।
धर्मप्रसार भरतखंडी । अनवाणी यात्रा पुढती
उज्जयिनी ते गरुडेश्वर - तेवीस चातुर्मास कीर्ती ।।
देह घडवावा कष्टांनी । ठरावे 'आदर्श' स्वावलंबनी
नित्य भिक्षान्न सेवनी । सुख आळस त्यागावे ।।
जपजाप्य पूजा ध्यान । वाउगा जाऊ नेदी क्षण
देहधारणा योगासने । शिकवावे इंद्रियास वळण ।।
लोकजागरणी यात्रा । परि मुक्काम तीन रात्रींपुरता
असंग्रह-अपरिग्रह । परिचितांमाजी अनभिज्ञता ।।
दत्तसंप्रदाय थोर । बुद्धिमंतांचे माहेर
'वासुदेव - वाङ्मय' अपार । भांडार जणू विद्येचे ।।
थोर देणे प्रतिभेचे । रूपलावण्य रचनांचे
मंत्र सुप्त शब्दवेचे । लोककल्याणसाधक ।।
वेदतुल्य तंत्रमयता । तशीच सुस्पष्ट मंत्रगर्भता
'ऋतुंभरा विद्या' प्राप्ता । वेदवाणी प्रवर्तिता ।।
केनोपनिषदी उमाख्यन, शिरोळचे भोजनपात्राख्यान
एकाच 'कुमारशिक्षे'त गुंफून । सगुण समन्वय साधला ।।
शब्द वैदिक, अर्थ पौराणिक । साधू जाणे बुद्धिमंतचि एक ।
प्रज्ञा प्रतिभा - भाषा प्रभुत्व । दिव्यत्वाविण न लाभे ।।
जनसामान्यांचा आग्रह । गुरुस्तवने भक्तिगान
साधक वाचकांसाठी खाण । उदंड पद्य रचनांची ।।
बारा खंड ग्रंथ झाले । अद्वैत, अनुभूती भान न सुटले
ज्ञान - भक्ति - कर्म समन्वये । 'योगमार्ग' ही विशद केले ।।
किती करावे गुणगान ? - त्यास्तव व्यासादिकचि खूण
देह परोपकाराकारणी - नित्य भाविका पर्वणी ।।
दत्तमहाराज कवीश्वर - त्यांनी सेवा केली थोर
तेरा खंडांचे वाङ्मय - जपले 'वासुदेव - स्मृति - मंदिर !'
दत्तसंप्रदाय थोर, किती शतके झाली पार
खूण आजही घरोघर, 'गुरुदेवदत्त' गजराची ।।
झाले बहु, होतील बहु, भक्तमेरुमणि हेचि एक
'वासुदेवानंदसरस्वती' सिद्धीबुद्धीचे नायक ।।
वासुदेवानंदसरस्वती - दत्तरूप वेदमूर्ती
वर्षे दीडशे लोटुनही अलोट हा भक्तिभाव ।।
साधक - मनीची भावफुले, आर्त स्वर नेत्र ओले,
हृदयींच्या पंचारती, प्रेमे ओवाळू आरती ।।
हेच दान द्यावे देवा । बोध विसर न व्हावा
गुरुदत्तचरणांसी लीन । व्हावे काया वाचा मन ।।
।। श्री दत्तात्रेयार्पणमस्तु ।।

सौ. शैला सुहास पटवर्धन
एम्. ए. बी. एड्.

## ॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा ॥




**“ श्रीदत्तनामजपयंत्र ”**

यंत्र संकल्पना, निर्मिती व हस्ताक्षरांकन

वसंत गोडबोले

२२४, शनिवार पेठ (नेने घाट) पुणे-३०



# श्रीटेंबे स्वामी यांचे जीवनवृत्त

**डॉ. हे. वि. इनामदार**

*एम.ए. एल. एल. बी. पीएच.डी. - 'संत नामदेव' या विषयावर, सेवानिवृत्त प्राचार्य एस.एन.डी.टी. २५ पुस्तके प्रकाशित, विद्यापीठ पातळीवर उत्कृष्ट शिक्षक म्हणून राज्य विद्यापीठ मार्गदर्शक अध्यापक, माजी अध्यक्ष गीता धर्म मंडळ, पुणे.*

आपल्या धर्म-संप्रदायांनी भारतीय संस्कृतीचे संरक्षण आणि संवर्धन केले. महानुभाव, नाथ, वारकरी, दत्त आणि समर्थ हे या भूमीतील प्रमुख संप्रदाय होत. त्यांपैकी दत्त संप्रदायात अनेक आत्मानुभवी श्रेष्ठ सत्पुरुष होऊन गेले. विशुद्ध उपासना, लोकोद्धाराची तळमळ व आत्मसाक्षात्कार यांमुळे त्यातील श्रेष्ठ सज्जनांनी भक्तभाविकांना सन्मार्गाचे दर्शन घडविले.

## दत्तभक्तांची परंपरा

दत्तोपासकांची प्रभावळ मोठी आहे. अक्कलकोट स्वामी, श्रीएकनाथ, कवीश्वर दत्तमहाराज, गजानन महाराज (शेगांव) गुळवणी महाराज, गोदावरी माता, जनार्दन स्वामी, दयानंद सरस्वती, निरंजन माधव, पाचलेगावकर महाराज बाळेकुंद्रीकर पंतमहाराज, माणिक प्रभू, विष्णुबाबा ब्रह्मचारी, श्रीपाद श्रीवल्लभ, प्रभृती थोर दत्तभक्तांनी या संप्रदायात मोठे योगदान केले आहे. त्या सर्वांच्या श्रेय-नामावलीत **'श्री वासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी'** या नाममुद्रेला महत्त्वाचे स्थान आहे. त्यांच्या जीवनयात्रेचा संक्षेपाने वेध घेणे उपयुक्त आणि उद्‌बोधक ठरेल.

## जन्म व बालपण

'वासुदेव गणेश टेंबे' असे स्वामींचे पूर्ण नाव आहे. 'वासुदेवानंद सरस्वती' या नावानेही टेंबे स्वामी ओळखले जातात. रत्नागिरी जिल्ह्यातील माणगाव येथे श्रावण वद्य पंचमी, शके १७७६ या तिथीला त्यांचा जन्म झाला. गुजरात राज्यातील 'गरूडेश्वर' येथे आषाढ शुक्ल प्रतिपदा, शके १८३६ या तिथीला ते दत्तस्वरूपात विलीन झाले. इ. स. १८५४ ते १९१४ असे साठ वर्षांचे आयुष्य त्यांना लाभले. आपल्या या सहा दशकांच्या आयुर्मर्यादेत स्वामींनी दत्त संप्रदायाची मौलिक सेवा बजावली.

माणगाव हे स्वामींचे जन्मग्राम सावंतवाडीपासून आठ मैल अंतरावर आहे. गावापासून मैलभर अंतरावर 'निर्मला' ही नदी आहे. येथील मुख्य देवता यक्षिणी असून, तिचे स्थान गावात मध्यभागी आहे.

हरिभट्ट टेंबे हे स्वामींचे आजोबा याज्ञिकी उत्तम प्रकारे करीत असत. वेदमूर्ती सीताराम भट कोणकर यांच्याकडे त्यांना आश्रय मिळाला. आपली पत्नी, काशी नावाची मुलगी व गणेश हा मुलगा यांच्यासह त्यांनी माणगावी वास्तव्य केले.

हरिभट्ट यांना एकूण चार मुलगे व तीन मुली होत्या. त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव गणेश भट हे स्वामींचे पिताजी व रमाबाई या माता होत्या. श्रीदत्तप्रभूंच्या चिंतनाकडे गणेशभटांची प्रवृत्ती होती. संसाराकडे त्यांचे लक्ष कमी होते.

वासुदेव (म्हणजे श्री टेंबे स्वामी) लहानपणी यक्षिणीच्या देवळातील खाजगी शाळेत शिकले. घरी आजोबांनी बाल वासुदेवाला हळूहळू रूपावली, समासचक्र, अमरकोश, अष्टाध्यायी व नित्यस्तोत्र-पाठ यांची संथा दिली. वासुदेवाची बुद्धी तीव्र होती. त्यामुळे त्याचे पाठान्तर लगेच होत असे.

हरिभट्ट यांनी वासुदेव या आपल्या नातवाची मुंज त्याच्या वयाच्या आठव्या वर्षी केली. त्यानंतर संध्या-वंदन, गुरुचरित्र-वाचन व वेदाध्ययन हा वासुदेवाचा दिनक्रम सुरू झाला.

यथावकाश नेमस्त आचरण व तेजस्वी अध्ययन यांमुळे बाल वासुदेवावर लोकांची श्रद्धा बसली. स्थानिक व पंचक्रोशीतील लोक त्याला घरी बोलावून त्याची संभावना करीत असत. त्यामुळे वासुदेवांकडून प्रपंचाला थोडीफार मदत होऊ लागली. 'मला लग्न करायचे नाही' असे वासुदेवाने घरात सांगितले होते. पण आपल्या गुरुच्या आदेशामुळे तो लग्नाला तयार झाला. रांगणागड येथील बाबाजीपंत गोडे यांची मुलगी 'बायो' हिच्या बरोबर वासुदेवाचा विवाह झाला. त्यावेळी त्याचे वय एकवीस वर्षांचे होते.

माणगावात संसाराला पुरेसा पैसा मिळत नव्हता. त्यामुळे गोव्यातील 'पेडणे' या गावी वासुदेव जाऊन राहिला. तिथे त्याने नीळंभट पद्ये यांच्याकडे सहा महिने ज्योतिषाचा अभ्यास केला. सर्व अध्ययन सदाचाराने केल्यामुळे वासुदेवास वेदमंत्र चांगल्या प्रकारे सिद्ध झाले होते. या मंत्रांच्या बळावर काही असाधारण गोष्टी त्यास सहजसाध्य झाल्या होत्या.

## दत्तोपासना आणि मंत्रोपदेश

वासुदेवाने गृहस्थाश्रमाचे काटेकोर पालन केले. पण संसारात त्याचे मन रमले नाही. श्रीदत्ताचा त्याला दृष्टान्त झाला. त्याप्रमाणे तो नरसोबाची वाडी येथे गेला. तिथे गोविंदस्वामी या सत्पुरुषाने त्याला मार्गदर्शन केले. त्याप्रमाणे वासुदेवाने दत्तोपासना सुरू केली. या उपासनेचे फल म्हणून त्याला दत्तात्रेयाचे साक्षात्कार होऊ लागले. प्रत्यक्ष श्रीदत्ताने वासुदेवाला मंत्रोपदेश दिला. इ. स. १८८२ मध्ये त्याने चांद्रायण हे व्रत केले; आणि माणगावला दत्तमंदिर उभारले. या मंदिरातील दत्तमूर्ती सात बोटे उंचीची, द्विभुज व सिद्धासन घातलेली आहे.

तीर्थयात्रा करत असताना १८९१ मध्ये वासुदेव स्वामींच्या पत्नीचे निधन झाले. तिच्या निधनानंतर तेराव्या दिवशी त्याने संन्यास घेतला. तीर्थयात्रा करताना विविध ठिकाणी प्रवचनांच्याद्वारे स्वामी जनतेत धर्मजागृती करीत असत. अनेक ठिकाणी त्यांनी दत्तमूर्तीची प्रतिष्ठापना केली; आणि दत्तोपासनेचा प्रचार केला.

## चरित्रातील अलौकिक गोष्टी

सामान्य लोकांना कृतीत आणण्यास अशक्य अशा काही अपूर्व गोष्टी टेंबे स्वामींच्या हातून झाल्या, याचे उल्लेख त्यांच्या चरित्रात आढळून येतात. त्यातील काही वेचक गोष्टींचा निर्देश करता येईल.

● माणगावपासून एका जवळच्या ठिकाणी स्वामी एका गृहस्थाबरोबर मंत्रपुष्पासाठी जात होते. वाटेत एक साप त्यांना दिसला. बरोबरच्या गृहस्थाच्या विनंतीवरून स्वामींनी हातात माती घेऊन तिच्यावर मंत्रप्रयोग केला. ती माती सापाच्या सभोवती टाकून ते पुढे गेले. दुसऱ्या दिवशी त्यांनी जाऊन पाहिले, तर साप तिथेच दमून पडला होता. स्वामींनी दुसऱ्या मंत्राने त्याचा प्रतिबंध दूर करताच तो साप वेगाने निघून गेला.

● सावंतवाडीतील रामभाऊ सबनीस या सरकारी अधिकाऱ्यावर काही आरोप येऊन, त्यांना कामावरून काढून टाकण्यात आले. ते स्वामींकडे आले. "तुम्ही योगिनी मंत्राचा जप करा. आजपासून ८२ दिवसांनी तुमचे काम होईल." असे स्वामींनी त्यांना सांगितले. त्याप्रमाणे सबनीसांनी निष्ठेने जप केला. त्यानंतर स्वामींनी सांगितलेल्या दिवशीच सबनीसांना कामावर घेण्याचा हुकूम आला.

● नरसोबाची वाडी येथे चैत्री अमावस्येला उत्सव होता. स्वामी आपल्या आईबरोबर देवाजवळच्या धर्मशाळेत उतरले. ती धर्मशाळा मोडकळीस आली होती. तिथून लवकर हलावे, असे स्वामींना पहाटे स्वप्न पडले. त्याप्रमाणे स्वामी आईसह सामान घेऊन बाहेर आले. तेवढ्यात ती जागा एकदम पडली. तिची भिंत कोसळली.

● माणगावी पहिल्या गुरुद्वादशीला असंख्य मंडळी प्रसादासाठी जमली होती. ऐन वेळी पाऊस पडू लागला. ते पावसाचे संकट दूर करण्याची विनंती लोकांनी केल्यावर स्वामी म्हणाले, "तुमच्यासारखा तो पाऊसही प्रसादाकरिता आला आहे. एक नैवेद्य वाढून त्याला दाखवा म्हणजे तो जाईल." त्याप्रमाणे लोकांनी पावसाला नैवेद्य दाखवून त्याची प्रार्थना केली. त्याबरोबर पाऊस पडण्याचा थांबला.

● नारोपंत या भक्ताने आपल्या घरच्या गाईचे दूध देवासाठी आणले होते. गर्दी असल्यामुळे आत न जाता, ते बाहेरच एका बाजूस उभे राहिले. नैवेद्याची वेळ येताच स्वामी म्हणाले, "आज नारोपंतांकडील दूध नैवेद्यास हवे." बाहेर चौकशी केली, तर खरोखरच नारोपंत दूध घेऊन आल्याचे समजले. नंतर ते दूध देवास समर्पण करण्यात आले.

● स्वामी वारंवार नरसोबाच्या वाडीस जात असत. तिथे सकाळी दत्तपादुकांना पाणी घालण्याचा त्यांचा नेम कधीच चुकत नसे. पुजारी मंडळींनी त्यांचा हा नेम मोडण्याचे ठरवले. पहाटेच पूजा लवकर करण्याचा त्यांनी बेत केला. त्या रात्री स्वप्नात देवांनी स्वामींना सांगितले. "तुम्ही लवकर उठून पाणी घालावे." स्वामींनी त्याप्रमाणे केले. तेव्हा पुजारी मंडळींना पश्चात्ताप झाला.

● माणगावास असलेल्या नदीचे नाव 'निर्मला' हे स्वामींनीच ठेवलेले आहे. एक दिव्य स्त्री त्यांच्यापुढे प्रगट झाली. "तुम्ही माझे नामकरण केले पाहिजे" असे ती म्हणाली. त्यावर "आम्ही तुझे नाव 'निर्मला' असे ठेवले आहे." असे सांगून, स्वामींनी तिला नमस्कार केला. लगेच ती स्त्री अदृश्य झाली. ते कळल्यावर गावकरी मंडळी भजन करीत स्वामींना सामोरी आली.

● एकदा नारोपंत यांच्या गुडघ्याला सूज आली. पाय दुखू लागला. स्वामींनी त्यांना विचारले, "श्रीदत्त मूर्तीच्या गुडघ्याला तुमचा कधी धक्का लागला होता काय ?" तेव्हा स्नानासाठी मूर्ती खाली घेताना मूर्तीच्या पायास घंगाळ लागल्याचे समजले. स्वामी म्हणाले, "नारोपंत, देवांच्या सर्व अंगाला तूप लावून, ऊन पाण्याने स्नान घाला." नारोपंतांनी तसे करताच त्यांचा पाय बरा झाला.

## चमत्कारांचा अन्वयार्थ

श्रीटेंबे स्वामी यांच्या जीवनात अशा अनेक चमत्कार-कथा घडल्या आहेत. साधुजनांनी केलेल्या अद्‌भुत चमत्कारासंबंधीच्या कथा त्यांच्या जीवन वृत्तांतून आढळतात. या कथा त्यांच्या अनुयायांत प्रचलित असतात. ज्ञानदेवांनी मातीची भिंत चालवली; आणि रेड्याच्या मुखाने वेद बोलविले. चांगदेव वाघावर बसून आले; आणि त्यांनी सर्पाचा चाबूक केला. नामदेवांनी दगडाच्या मूर्तीकडून प्रसाद ग्रहण करविला; आणि मेलेली गाय जिवंत केली. एकनाथांनी स्वर्गातील पितर जेवविले; आणि पाषाणाच्या नंदीकडून कडबा खावविला. तुकारामांचे अभंग इंद्रायणीच्या उदकात तेरा दिवस सुरक्षित राहिले; आणि तुकोबा स्वतः सदेह वैकुंठास गेले. या सर्व चमत्कारांवर भक्तभाविकांचा विश्वास असतो.

संत एकनाथांनी सिद्धींचे वर्णन केले आहे. (एकनाथी भागवत : अध्याय दुसरा) योग्याला प्राप्त होणाऱ्या अमानुष सामर्थ्याचे खुलासेवार वर्णन ज्ञानदेवांनी केले आहे. (ज्ञानेश्वरी अध्याय पंधरा, ओव्या ५२५ ते ५५७) ईश्वर आपल्या एकनिष्ठ भक्तासाठी प्रसंगविशेषी अलौकिक चमत्कार करून दाखवितो, अशी समजूत जगातील बहुतेक सर्व धर्मांच्या लोकांमध्ये प्रचलित आहे.

योगशास्त्राची साक्ष चमत्कारांच्या शक्यतेस पोषक अशीच आहे. ही साक्ष पाहिली, तर अतीत व अनागत घटनांचे ज्ञान समाधिस्थ सिद्ध पुरुषास कसे होते, ते समजते.

आत्मसाक्षात्कार झाला म्हणजे दिव्य श्रुती, दिव्य स्पर्श, दिव्य दृष्टी, दिव्य रुची व दिव्य गंध यांचा अनुभव येतो. सिद्धींचे अधिष्ठान आत्मशक्तीत आहे. आत्मा हा सर्वज्ञ, सर्वव्यापी व सर्वसमर्थ आहे. त्याच्याशी तादात्म्य झाले की, आपण त्याच्या सर्वज्ञत्व-गुणांत अंशभागी होऊ शकतो. स्वप्नात, मोहनिद्रेत किंवा समाधीच्या अवस्थेत आपली इंद्रिये स्थगित असताना, गत किंवा अनागत घटनांचे जे ज्ञान होते, ते या अवस्थांत आत्मशक्तीशी होणाऱ्या तादात्म्यामुळे होते. स्वप्नात, स्वप्न संचारात किंवा मनोमूर्च्छा (ट्रान्स) असताना ज्या प्रकाशाच्या साहाय्याने आपण पाहतो, आणि डोळे उघडे असल्याप्रमाणे व्यवहार करतो, तो प्रकाश आपण म्हणजे आपल्याच आत्म्याने निर्माण केलेला असतो की नाही ? आत्मा व त्याचाच एक लहानसा आविष्कार जो लिंगदेह, त्याच्या स्वयंभू प्रकाशित्वामुळेच आपण जागृतीशिवाय इतर गोष्टी वरील अवस्थांतही पाहू, वागू शकतो.

त्रिकालाचे ज्ञान होणे हा चित्ताचा किंवा आत्मशक्तीचा धर्म आहे. समाधीच्या स्थितीत इंद्रियातीत ज्ञान तर होतेच, पण ते स्थलकाल निरपेक्षही असते.

स्थूल जगत् एवढीच काही सृष्टी नाही. सूक्ष्म इंद्रियांनी स्वप्नात दिसणारी किंवा अंतर्ज्ञानाने अथवा अतींद्रिय दृष्टीने दिसणारी सूक्ष्म आत्मिक सृष्टीही आहे. झोपेत स्थूल देह सोडून, सूक्ष्म देहाने आपण हवे तेथे जाऊ शकतो. तिथे आपण अनेक घटना-प्रसंग विलक्षण स्वरूपात पाहू शकतो. त्रयस्थ आत्म्यांशी आपले बोलणे-चालणे होते. आपल्या चित्तावर त्यांचे

संस्कार होतात.

श्रीशंकराचार्य, श्री. अरविंद, ॲनी बेझन्ट, प्रभृती विचारवंतांनी चमत्कारांविषयी केलेली तत्त्वचर्चा वर दिली आहे. त्यांचे विवेचन बारकाईने वाचले, म्हणजे योगविद्या विशारदांचा असाधारण अधिकार लक्षात येतो. योगविद्येत प्रवीण असलेल्या व्यक्तीला दैवी सामर्थ्य प्राप्त होते. त्याचा देह सोन्याचा झाला, तरी वायूचे लाघव त्याच्या अंगी येते. तो समुद्रापलीकडील पाहू शकतो. मुंगीचेही मनोगत त्याला ओळखता येते. 'बालपणीच सर्वज्ञता वरी तयातें ।' असे ज्ञानदेवांनी म्हटले आहे.

## स्वामींची भ्रमण-यात्रा

श्रीटेंबे स्वामी यांनी समर्थ रामदासांप्रमाणे सर्वदूर भ्रमण केले. उज्जयिनी, हरिद्वार, हिमालय, (इंदूर संस्थानातील) पेटलाद, तिलकवाडा, द्वारका, चिखलदा, सावंतवाडी, महतपूर, सारंगपूर, आलोट भेलशा, जालवण, ब्रह्मावर्त, हुशंगाबाद, शिरोळ, नरसी-बामणी, वाशीम, कारंजा, प्रयाग, बढवाई, भुसावळ, तंजावर, पवनी, उमरावती, कोल्हापूर, हावनूर, कुरूगड्डी, गरूडेश्वर, बडोदे अशी किती म्हणून स्थाने सांगावीत ? अशा अनेक ठिकाणी स्वामींनी प्रवास केला. तिथल्या लोकांच्या गाठीभेटी घडल्या. आपल्या आत्मिक सामर्थ्याने स्वामींनी लोकांच्या अडीअडचणी दूर केल्या. ठिकठिकाणच्या जनतेच्या मनात दत्तभक्तीचे बीजारोपण केले. त्यांच्या या प्रचंड परिश्रमातून दत्त संप्रदायाचे संवर्धन झाले.

तीर्थयात्रा करताना स्वामीजी विविध ठिकाणी राहात असत. त्या त्या स्थानी पुराण - प्रवचनांच्या द्वारे ते समाजात धर्मजागृती करीत असत. तसेच दत्तमूर्तीची प्रतिष्ठापना करून, दत्तोपासनेचा प्रचार करीत असत. आपल्या या वाटचालीतच त्यांनी उपासनेला प्रेरक अशी विपुल ग्रंथरचनाही केली. सात्त्विक वृत्ती, वेदोक्त आचार आणि धार्मिक विचार यांच्याद्वारे त्यांनी आपल्या तीर्थयात्रेत स्वतःचा उदात्त आदर्श समाजापुढे ठेवला.

या भ्रमणामागे स्वामींना प्रत्यक्ष श्रीदत्तांची प्रेरणा होती. भरतखंडात पायीच संचार करून सर्व लोकांना धर्माचा उपदेश करावा; व दत्त संप्रदायाची स्थापना करावी, असा श्रीदत्तप्रभूंचा दृष्टान्त स्वामींना झाला होता. तो आदेश त्यांनी अखेरपर्यंत कसोशीने पाळला.

## सदाचाराचे स्वाध्याय

श्रीटेंबे स्वामींची दिनचर्या नेमस्त होती. ते पहाटे उठत असत. प्रातः कर्मे उरकत असत. त्यांचे स्नान नेहमी त्रिकाल होत असे. दंडतर्पण व प्रणवजप झाल्यावर दत्तमूर्तीस स्नान घालून ते भस्म लावत असत. ते स्वतः संन्यासी असल्यामुळे फुले व तुळशी तोडत नसत. पण कोणी आणून दिल्यास फुले व तुळशी यांचे उपचार मूर्तीस करत असत. एरवी भस्मावरच भागवावे लागे. कोणी विद्यार्थी असल्यास त्याला वेद व शास्त्र यांचा पाठ ते देत असत. दुपारी पुन्हा स्नानादि नित्यकर्म झाल्यावर भिक्षा आणून, ते सर्व अन्न एकत्र करून खात असत. तीनच घरी भिक्षा घ्यायची, असा स्वामींचा नियम होता.

दुपारी एखादा जिज्ञासू साधक, शास्त्रीय विषय शिकण्यासाठी आल्यावर, ते त्याचे समाधान करीत. सायंकाळी अनुष्ठान झाल्यावर ते पुराण सांगत असत.

टेंबे स्वामींची वृत्ती संग्रही नव्हती. दोन छाट्या, चार लंगोट्या, एक दंड, एक कमंडलू, एक धाबळी, उपनिषदाची पोथी, पंचायतनाचा संपुष्ट, पाणी काढण्याची दोरी व दोन दत्तमूर्ती, एवढाच 'सरंजाम' त्यांच्याबरोबर असे. ते इतरांकडून सेवा घेत नसत. कपडे स्वतः धूत असत. अनवाणी प्रवास करीत असत. शास्त्रीय नियमांचे कडकपणाने पालन करीत असत. अशा उदात्त आचरणामुळे त्यांच्या उपदेशाचा जनतेवर प्रभाव पडत असे. 'आधी केले; मग सांगितले', असे स्वामींचे वर्तन असे.

चातुर्मासानिमित्त एखाद्या तीर्थक्षेत्रात स्वामींचा मुक्काम थोडा लांबत असे. मात्र इतर वेळी तीन दिवसांपेक्षा कोठेही ते अधिक काळ थांबत नसत.

अनासक्ती व मनोनिग्रह हे स्वामींचे गुणविशेष लक्षणीय होते. द्वारकेस श्रीशंकराचार्यांच्या शारदा मठात स्वामींचा मुक्काम होता. स्वामींनी शंकराचार्यांच्या गादीचा स्वीकार करावा, अशी तिथल्या ग्रामस्थांनी स्वामींना आग्रहाची विनंती केली. पण 'आपण हे काम पत्करणार नाही' असे स्वामींनी स्पष्ट शब्दांत लोकांना सांगितले.

बदरीनारायणाच्या दर्शनास जात असताना वाटेत एक मोठा कडा तुटलेला पाहून, स्वामी तिथेच थबकले. पुढे जाण्यात धोका आहे, असे लोकांनी त्यांना सांगितले. त्यावर स्वामी म्हणाले, "देह पडला तरी हरकत नाही. नरनारायणांचे दर्शन झाल्याशिवाय आपण मागे फिरणार नाही." स्वामी निर्धाराने पुढे गेले, तेव्हा त्या दोन पुरुषांच्या ठिकाणी स्वामींना नरनारायणांचे दर्शन झाले. परमेश्वरी कसोटीस स्वामी पुरेपूर उतरले.

स्वामींचा व्यासंग मोठा होता. ज्योतिष, याज्ञिक, वेदान्त व योग यांच्या अभ्यासाकरिता अनेक लोक तीर्थयात्रेत त्यांच्याकडे येत असत. भक्तभाविकांची स्वामींवर उत्कट निष्ठा होती. या संदर्भात एक घटना नमूद करण्यासारखी आहे. पोलगाव-सावंतवाडी येथे राहणारे श्री. गणेश सातवळेकर हे वाडीस महाराजांचे दर्शनाकरिता आले. महाराजांच्या संगतीचा लाभ व्हावा म्हणून त्यांनी काही दिवस वाडीत मुक्काम केला. उपनिषद पाठाचे वेळी, शेवटी महाराजांचे पायांवर मस्तक ठेवण्यास मिळावे अशी त्यांची इच्छा होती. पण महाराज कुणालाच शिवून घेत नसत. त्यामुळे सातवळेकरांची ती इच्छा बरेच दिवस पूर्ण होऊ शकली नाही. मात्र एकदा त्यांनी धीर करून महाराजांना विनंती केली. त्या दिवशी स्वामी महाराजांनी होकार दिला. सातवळेकरांना त्यामुळे धन्यता वाटली. त्यांनी द्विसाहस्त्री गुरुचरित्राची एक प्रत लिहून काढली; व ती प्रत महाराजांना अर्पण केली. त्यावर स्वामी महाराजांनी वेळ काढून सातवळेकरांना गुरुचरित्र समजावून सांगितले. त्यांनी स्वामींना विचारले, "आपल्याला पुनर्जन्म आहे काय ?" त्यावर स्वामी म्हणाले, "होय, हा तर अरुणोदय आहे."

## टेंबे स्वामींचे महानिर्वाण

आपला अखेरचा दिवस जवळ आला आहे, हे स्वामींना अंतर्ज्ञानाने समजले होते. त्यांच्या अतिसार रोगाने उचल खाल्ली. शरीर क्षीण होत चालले. भक्तांनी त्यांना औषध घेण्याची विनंती केली. पण स्वामी म्हणाले, "हा देह सोडून लवकरच जायचे आहे. औषधाचे कारण नाही. शंकराचार्य बत्तीस वर्षेच राहिले. त्या मानाने हे शरीर जास्त टिकले."

शेवटच्या दिवशीही स्वामींनी नित्य कर्म साधण्याचा प्रयत्न केला. पण आचमनाचे पाणीच हातात राहीना. ते पाहून 'देवाची इच्छा !' असे ते म्हणाले. 'अमावस्या संपल्यावर हा स्थूल देह सोडायचा आहे', असे त्यांनी लोकांना सांगितले. प्रतिपदा लागताच ते सिद्धासन घालून, पश्चिमेकडे, देवासमोर मुख ठेवून बसले. त्यांनी त्राटक केले. श्वास निरोध केला; दीर्घ

प्रणवोच्चार केला, देहाचे विसर्जन केले; आणि ते ब्रह्मरूपात विलीन झाले.

त्यावेळी आषाढ शुद्ध प्रतिपदा, मंगळवार, आर्द्रा नक्षत्र, उत्तरायण होते. रात्री सुमारे अकरा वाजण्याचा समय होता. सर्वांना गुरुमाऊलीच्या चिरवियोगाने अपार दुःख झाले.

दुसऱ्या दिवशी सकाळी स्वामींच्या देहावर सर्वांनी पवमान, पुरुषसूक्त व रुद्र या मंत्रांनी अभिषेक केला. षोडशोपचारे पूजा केली. बेल, तुळशी व फुले यांच्या माळा स्वामींच्या गळ्यात घातल्या. त्यांचा देह पुष्पासनावर बसवून वाजत गाजत तो देह नर्मदा-तीरावर नेला. तिथेही पूजा केली. नैवेद्य, फल, तांबूल व दक्षिणा समर्पण केली. दंडाचे तीन तुकडे करून ते मांडीवर ठेवले. कमंडलूस मध्ये छिद्र पाडून, तो देहाच्या कमरेस बांधला. ते परमपवित्र शरीर शेवटी नर्मदा मातेच्या जलात सोडून दिले. नंतर सर्व मंडळी श्रीगुरुंचे मंगलस्मरण करीत परत आली.

अशा प्रकारे, श्रीवासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी या महामानवाचे महानिर्वाण झाले !

*'तव स्मरण संतत स्फुरणदायी आम्हा घडो ।*
*त्वदीय गुणकीर्तन-ध्वनि सुरम्य कानीं पडो ॥'*

अशीच टेंबे स्वामींच्या चरणांशी तुमची-आमची प्रार्थना आहे.

**डॉ. हे. वि. इनामदार**
६०/१५ भारती निवास, एरंडवणा कॉलनी, पुणे ४११००४.

**मुहूर्त निमिष क्षणोक्षण । हरिचरणी सुखावल्या मन ।**
**इतर व्यापार तेणे सुखे जाण । सहजे आपण ओसरती ॥**



# प. पू. वासुदेवानन्द सरस्वती जीवन आणि कार्य...

स. भ. श्री. सुनील चिंचोलकर

*बी.कॉम. १२ वर्षे सज्जनगड येथे व्यवस्थापक. १८ पुस्तके प्रकाशित, महाराष्ट्र व बाहेर ज्ञानेश्वरी, दासबोध, गीता वगैरेंवर अखंड प्रवचने, समर्थ व्यासपीठ, सज्जनगड, ओंकारन्यास पुरस्कार प्राप्त.*

## समर्थ संप्रदाय आणि दत्त संप्रदाय

पुण्यातील प. पू. वरदानंदभारती ह्यांनी संन्यास घेतला, तरी परिवारातील मंडळी त्यांना अप्पा किंवा अनंतराव आठवले ह्या नावानेच ओळखतात. त्याचप्रमाणे टेंबे स्वामींनी जीवनाच्या सायंकाळी संन्यास दीक्षा घेऊन वासुदेवानन्द सरस्वती हे नाव धारण केले असले तरी बरेच लोक टेंबे स्वामी ह्या नावानेच त्यांना ओळखतात. म्हणून प्रस्तुत लेखात त्यांचा नामोल्लेख टेंबे स्वामी ह्या नावानेच केला गेला आहे.

टेंबे स्वामी म्हणजे दत्तसंप्रदाय. ह्या दत्तसंप्रदायाचा समर्थ संप्रदायाशी खूप घनिष्ट संबंध आहे. खुद्द टेंबे स्वामी समर्थ संप्रदायी होते. त्यांनी उज्जैनच्या नारायणानंद सरस्वती यांच्याकडून संन्यास दीक्षा घेतली. हे नारायणानंद लाड कारंजा येथील नरसिंह सरस्वती याच्या वंशातील होते. ते समर्थ सांप्रदायी होते. आजही त्यांची समाधी चाफळ येथे पाहावयास मिळते. आपल्या गुरुच्या स्मरणार्थ टेंबे स्वामी दासनवमी उत्सव साजरा करीत असत. एका दासनवमी उत्सवात स्वामींनी स्वतः दासबोध पारायण करून समर्थांवर प्रवचने केली होती. दुर्दैवाने त्यांची ती अमृतवाणी आज उपलब्ध नाही. समर्थ रामदास स्वामींना माहूरगड येथे श्री दत्त गुरुंनी मलंगाच्या वेशात दर्शन दिले होते. त्या वेळी दत्तगुरुंनी त्यांना दिलेल्या पादुका आणि कुबडी आजही सज्जनगडावर आहे. कुबडी शेजघरात आहे. तर पादुका समर्थ समाधीच्या पाठीमागे पितळी पेटीत ठेवल्या आहेत. दत्तात्रयाने दिलेल्या या पादुका समर्थ समाधीचे अधिष्ठान असून कधीही गडावरून हलविल्या जात नाहीत. दासबोध ग्रंथाचे लेखन करताना समर्थांनी दत्तप्रणीत गुरुगीता आणि अवधूत गीता अभ्यासली होती. ह्याचा स्पष्ट उल्लेख दासबोधातील पहिल्याच समासात आहे. सातव्या दशकात ज्ञानमार्गाचे विवेचन करताना समर्थांनी दत्तात्रेयांनी गोरक्षनाथास केलेला उपदेश संदर्भासाठी वापरला आहे. (७.७.४४) समर्थांनी दत्तात्रेयाची भूपाळी आणि आरतीदेखील रचली आहे. विसाव्या शतकात ज्या श्रीधर स्वामींनी सज्जनगड, चाफळ आणि शिवथरघळ ह्या स्थानांचा जीर्णोद्धार करून समर्थ संप्रदायात नवचैतन्य निर्माण केले. ते श्रीधर स्वामी दत्तसंप्रदायी होते. त्यांच्या मातापित्यांनी गाणगापूर येथे दत्तगुरुंची अनेक वर्षे सेवा केली. श्रीधर स्वामींचा जन्मदेखील दत्तजयंतीला झाला. स्वामींनी उभे केलेले दत्तमंदिर आजही सज्जनगडावर अशोक वनात पहायला मिळते.

## संक्षिप्त जीवन

वासुदेवानन्द सरस्वती ह्यांचा कालखंड सन १८५४-१९१४ हा साठ वर्षांचा आहे. कोकणातील सावंतवाडी संस्थानच्या अखत्यारित माणगाव नामक चिमुकल्या गावात त्यांचा जन्म झाला. त्यांचे वडील गणेशभट्ट आणि आई रमाबाई हे दोघे जण दत्तोपासक होते. गणेश भट्टांनी गाणगापूरला अनेक वर्षे दत्ताची उपासना केली. त्यांचे वैराग्य येवढे प्रखर होते की गाणगापूरलाच संन्यास घेण्याची त्यांची इच्छा होती. पण दत्तगुरुंना रमाबाईच्या पोटी जन्म घ्यावयाचा होता. म्हणून त्यांनी दृष्टांत देऊन गणेश भट्टांना घरी परत पाठविले. रमाबाईना खूप आनंद झाला. १८५४ साली श्रावण वद्य पंचमीला दत्तगुरु स्वामींच्या रूपाने अवतिर्ण झाले. ह्यांचे नाव वासुदेव ठेवण्यात आले. आजोबा हरिभट्ट ह्यांच्या मार्गदर्शनाखाली वासुदेवाचे शिक्षण सुरू झाले. कुशाग्र बुद्धी, विलक्षण स्मरणशक्ती आणि मनाची एकाग्रता ह्यामुळे वासुदेव आजोबांचा लाडका झाला. आठव्या वर्षी त्यांचा उपनयन संस्कार झाला. बाराव्या वर्षापर्यंत ऋग्वेद संहितेचे अध्ययन पूर्ण झाले. त्यांनी ज्योतिषशास्त्राचा देखील लहानपणीच अभ्यास केला. वासुदेवाचे वैराग्य आणि कडक आचार ही ईश्वरी देणगी होती. लहानपणी ते त्रिकाल संध्या करीत. पायात जोडा वापरत नसत. सर्वत्र पायी प्रवास करीत.

एकवीसाव्या वर्षी वासुदेवाचा विवाह झाला. त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाई एक अधिकारी विदुषीबाई होत्या. त्यांची साधनेला बसताना समाधी लागत असे. त्या पतीप्रमाणेच वैराग्यशाली होत्या. अन्नपूर्णाबाईना झालेला मुलगा लहानपणीच मरण पावल्यावर स्वामींनी आपल्या पत्नीस केलेला उपदेश त्यांचा आध्यात्मिक अधिकार दाखवितो. आपली माता आणि आपली पत्नी ह्या दोघींना स्वामींनी केलेला स्त्रीधर्माचा उपदेश आजही अवघ्या नारीजातीला पथप्रदर्शक ठरेल.

टेंबे स्वामींना नरसोबावाडी येथे प्रत्यक्ष दत्तगुरुंनी संन्यासाच्या वेशात दर्शन दिले व मंत्रोपदेश केला. वाडी येथील मुक्कामात त्यांनी दत्तगुरुंची मनोभावे उपासना केली. माणगावला परतल्यावर आपल्या घरात त्यांनी दत्तमूर्तीची स्थापना केली. कोरड्या भिक्षेवर निर्वाह करून ते पूर्ण वेळ दत्तोपासनेत मग्न होते. याच काळात त्यांनी उपनिषदांचा आणि संत कबीरांच्या दोह्यांचा अभ्यास केला. त्यांनी दाखविलेला नैवेद्य दत्तगुरु ग्रहण करीत असत. ही सेवा अखंड सात वर्षे चालू होती. माणगाव येथेच त्यांनी 'गुरुचरित्राचे' संस्कृत भाषांतर केले. दत्तगुरुंनी त्यांना माणगाव सोडण्याचा आदेश देताच स्वामी आपल्या पत्नीसह घरातून बाहेर पडले. प्रवासात त्यांनी अपरिग्रहाचे व्रतपालन केले. त्यांची पत्नी प्रवासातच मरण पावली. आपल्या पतीच्या चरणावर मस्तक ठेवून अतिशय शांतपणे दत्तगुरुंचे चिंतन करीत अन्नपूर्णाबाईनी देह ठेवला. त्यांच्या मृत्यूच्या तेराव्या दिवशी

समर्थसंप्रदायात ज्याप्रमाणे भ्रमंतीला महत्त्व आहे त्याप्रमाणे दत्तसंप्रदायात भिक्षेच्या निमित्त्याने सर्वत्र भ्रमण करावे ह्याला फार महत्त्व आहे. त्या काळी स्वामींनी उज्जैन, ब्रह्मावर्त, बद्रीकेदार, गंगोत्री, हरिद्वार, द्वारका, चिखलदरा, मेहतपूर, नरसी, तंजावर, पवनी, गरुडेश्वर अशा सर्व ठिकाणी प्रवास केला. प्रवासात दोन छाट्या, दोन लंगोट्या व एक कमंडलू एवढेच सामान ते बाळगत. १९१४ साली स्वामींचा चातुर्मास गरुडेश्वर येथे झाला. त्याचठिकाणी त्यांनी समाधी घेतली. आज गरुडेश्वराला स्वामींच्या पादुकांचे विशाल मंदिर असून तेथे स्वामींचे भक्त मोठ्या श्रद्धेने पूजा अर्चा करीत असतात.

### स्वामींचे कार्य

विसाव्या शतकात दत्तसंप्रदायाला उर्जितावस्था प्राप्त करून देणारे अनेक महापुरुष होऊन गेलेत. अक्कलकोटचे स्वामी समर्थ, दिगंबरदास महाराज, शंकर महाराज, टेंबे स्वामी ह्या मंडळींनी आजीवन समाजात दत्तभक्तीचा प्रचार केला. दीक्षित स्वामी, रंगावधूत महाराज, पूर्णानंदस्वामी, गुळवणी महाराज हे अधिकारी संत टेंबे स्वामींचेच शिष्य होते. स्वामींच्या पश्चात ह्या सर्वांनी दत्त संप्रदाय भारतभर पसरविला. टेंबे स्वामींचे वाङ्मय विपूल आहे. संस्कृत 'गुरुचरित्र' दत्तपुराण, दत्तमहात्म्य, कुमारशिक्षा, त्रिशती गुरुचरित्र काव्य असे मौलिक ग्रंथ त्यांनी लिहिले. दत्तसंप्रदायात ह्या ग्रंथांना खूप महत्त्व आहे. ३५०० संस्कृत श्लोकांचा दत्तपुराण हा ग्रंथ तर भारतीय संस्कृतीचा ज्ञानकोषच म्हणावा लागेल. हा ग्रंथ सामान्य जनांना कळणार नाही म्हणून स्वामींनी ५५१३ ओव्यांचे दत्तमहात्म्य मराठी टेंबे स्वामीकृत दत्तत्रेयाचे सगुण वर्णन अत्यंत बहारिचे आहे. श्रीदत्तत्रेयांचे चरित्र, त्यांचे चोवीस गुरु, नवविधा भक्ती ज्ञानकांड आणि उपासनाकांड यांचे स्वामींनी केलेले विवेचन स्वानुभवाचे आहे. दत्तमहात्म्यातील मदालसा प्रकरण वाचल्यावर एखाधा विषयी मनुष्य सुद्धा वैराग्यशाली होईल. स्वामींनी रचलेली विविध स्तोत्रे आणि पदे दत्तसंप्रदायात नित्योपासनेचे स्थान ग्रहण करून आहेत. अशा प्रकारे चंदनासारखा देह झिजवून स्वामींनी साठाव्या वर्षी समाधी घेतली. स्वामींनी औषधोपचार करून किंवा योगबलाने देह टिकवला असता परंतु अंतरीचे तीव्र वैराग्य त्यांना देहममत्व धारण करून देईना. दत्तसंप्रदायावर स्वामींचे अपार ऋण आहे. त्यांचे चरणी आदरपूर्वक श्रद्धांजली.

**स. म. श्री. सुनील चिंचोलकर**
अजिंक्यनगर, बी विंग, वृशाली हॉटेल लेन, हिंगणे खुर्द,
सिंहगड रस्ता, पुणे ४११०५१.

---

**अति सुलभ जे दत्त नाम । न पडे ज्या किमपि दाम ।**
**निज जिव्हा हे साधन । नाम घेता नोहे दीन ।**
**दत्त दत्त उच्चारिता । दत्त भेटे भोळ्या भक्ता ।**
**महात्म्य दत्त नामाचे । हो अगम्य वेद वाचे ।**
**वासुदेव म्हणे दत्त । नामे भक्त होती मुक्त ।**

---



# अध्यात्म मार्गातील महान दत्तोपासक वासुदेवानंद सरस्वती ऊर्फ टेंबे स्वामी

**श्री. पंडित हिंगे**

*प्रसिद्ध ज्योतिषी, कवी, पत्रकार. ३ पुस्तके प्रकाशित. ५ पुस्तके व १ कवितासंग्रह प्रकाशनाच्या मार्गावर.*

सध्याच्या धकाधकीच्या जीवनात व्यक्तिला अनेक प्रकारे विवंचना असून दुःख देखील होत असते. तरुण आणि वृद्ध या व्यक्तींचे विचार जुळत नाहीत, आपल्याला झालेले त्रास आपल्या तरुण मुलांना होऊ नयेत म्हणून, वृद्ध मंडळी मात्र आपल्या अनुभवातून सल्ले देत असतात, तथापि तरुणांना ते पटत नाही. ज्या व्यक्तिला जीवनातील अशा विविध प्रकारे होणाऱ्या दुःखातून मुक्तता पाहिजे असते, सुख, आनंद याची आवश्यकता असते आणि मनःशांती आवश्यक असते. अशा व्यक्तिंनी आपला ओढा अध्यात्माकडे नेणे निश्चित आवश्यक असते, शिवाय अंतःकरण पूर्वक गुरुभक्तिचा अभ्यास केला तरी देखील निश्चितपणे मतःशांती मिळते.

## चिरंतन शांती देणारा गुरुभक्ति योग

खरे आणि शाश्वत असे सुख गुरुसेवेच्या योगात आणि आश्रयात मिळते. नाशवंत अशा बाह्य आणि अशाश्वत पदार्थ यापासून मिळत नाही. मनुष्य जेव्हा गरुभक्तियोगाचा आश्रय घेतो त्याचवेळी त्याचे खरे जीवन सुरू होते. भक्तियोगाचा अभ्यास केला, तर पृथ्वी लोक आणि स्वर्ग लोकांतही चिरंतन सुख प्राप्त होते. गुरुभक्तियोग हा अभ्यास करणाऱ्या व्यक्तिंचे दृष्टीने विचार करता त्यांना अखंड आणि शाश्वत असे सुख मिळवून देतो. माणसाचे मन हेच या संसाराचे आणि त्यातील सुख दुःख प्रक्रियाचे मूळ आहे. मन हेच बंधन आणि मोक्ष तसेच सुख दुःखाचे मूळ आहे. तेव्हा या मनाला गुरुभक्ति द्वाराच काबूत राखता येते. गुरुभक्तियोग हा मनुष्याला अमरत्व, शाश्वत सुख, मुक्ति, पूर्णता आणि अतूट आनंद व चिरंतन शांती देऊ शकतो.

## सर्व योगांचा राजा "गुरुभक्तियोग"

गुरुभक्तियोगाच्या मुख्य सिद्धान्ताचा विचार करता गुरु आणि ईश्वर हे एकच आहेत. म्हणूनच गुरुजवळ संपूर्ण आत्मसमर्पण करणे आवश्यक असते. आत्मसमर्पण करणे हीच गुरुभक्तियोगाची सर्वोच्च पायरी आहे. गुरुभक्तियोग अभ्यासात गुरुसेवा हीच सर्वस्व आहे. या शिवाय गुरुकृपा ही गुरुभक्तियोगाचे अंतिम ध्येय असून गुरुभक्तियोगाचा अभ्यास करायचा असेल तर विषयी जीवनाचा त्याग केलाच पाहिजे. जीवनातील परमशांतीचा मार्ग गुरुभक्तियोगाचे अभ्यासापासूनच सुरू होतो. मनुष्याला त्याच्या जीवनात ज्या ज्या सिद्धी प्राप्त होतात, संन्यास मार्ग मिळतो, विषयांचा त्याग करण्याची बुद्धी होते, हे सारेच गुरुभक्तियोगाचे अभ्यासाने प्राप्त होते. गुरुभक्तियोग, गुरुसेवा योग, गुरुशरणयोग हे सारे एकच आहे. या शिवाय गुरुभक्तियोग हा सर्व योगांचा राजा आहे. तसेच परमेश्वरज्ञानासाठी सर्वात सरळ मार्ग गुरुभक्तियोगाचा आहे.

## गुरुभक्ति हे अमृतच

गुरुभक्तियोगाचा मार्ग सर्वात शीघ्र गतीचा, सर्वात सोपा, भयरहित असा मार्ग आहे. या जन्मात तर गुरुभक्तियोग द्वाराच ईश्वराचे ज्ञान होते. गुरुभक्तियोग हे अध्यात्मिक आणि मानसिक आत्मविकासाचे शास्त्रच आहे. गुरुभक्तियोगाचा प्रमुख हेतुच असा आहे की माणसाला विषयांच्या बंधनापासून मुक्त करून त्यास शाश्वत सुख आणि दैवी शक्तीच्या मूळस्थितीची प्राप्ती करून देणे होय. गुरुभक्तियोग माणसाला दुःख, म्हातारपण, आजार, विविध व्याधीपासून मुक्त करतो. तरुण बनवितो. आणि शाश्वत सुखाची गोडी देतो. त्याच प्रमाणे गुरुभक्तियोग मनाच्या शक्तिवर विजय प्राप्त करण्याच्या संबंधात शक्ति देणारे विज्ञान तसेच कलाच आहे. आध्यात्मिक मार्गात प्रगती देणारे गुरुभक्ति हे अमृत आहे.

## मनुष्य प्रकृतीचे तीन गुण

कोणत्याही फलाची अपेक्षा न धरता शुद्ध हृदयाने केलेल्या गुरुभक्तिमुळे मुक्ति प्राप्त होते. जो गुरूची सेवा करतो त्याला सर्व गुणांची प्राप्ती होते. कोणत्याही प्रकारच्या तहानेची अपेक्षा न ठेवता, भक्तिभावपूर्वक केलेल्या गुरुभक्तिमुळे त्याची तुमच्यावर कृपा होते. गुरुसेवा योगाचा अर्थच गुरूची निस्वार्थपणे सेवा होय. गुरुसेवा तुमचे हृदय विशाल बनविते, सर्व विघ्ने दूर जातात. आणि हृदयाचे शुद्धीसाठी ही मात्रा योग्य असा परिणाम घडविणारी सेवा आहे. दररोज पहाटे ४ ते ६ या वेळात गुरूच्या स्वरूपाचे योग्य ध्यान केल्यास गुरुकृपेचा निश्चितपणे चांगला अनुभव मिळू शकतो. गुरू हे सर्व सद्गुणांची खाण आहे. गुरूच्या जवळ वास केल्याने सर्व संशय, भय, चिंता आणि दुःख दूर होते. गुरुसमान असलेल्या संत, महात्मा यांचा सदैव सत्संग कसा मिळेल यासाठी प्रयत्नशील राहिल्याने मनःशांती, सुख, समाधान, अज्ञानाचा नाश याची प्राप्ती होते. मनुष्याच्या प्रकृतीचे तीन गुण आहेत. १. सत्व गुण २. रजोगुण ३. तमोगुण ! हे होय.

क्रोध, लोभ, असत्य, क्रूरता, याचना, दंभवृत्ती, भांडण, भ्रम, निराशा, शोक, दुःख, निद्रा, भय आणि आळस हे सर्व तमोगुण आहेत. अनेक जन्मातहि ते जात नाहीत. तथापि श्रद्धेने केलेल्या गुरुभक्तिमुळे सर्व दुर्गुणांचा नाश होतो. गुरुच्या वचनात राहणे व ईश्वरावर श्रद्धा ठेवणे, हाच खरा सत्त्वगुण आहे. प्रत्येक मनुष्याला त्याच्या जन्मकुंडलीवरून

कितीप्रमाणात त्याला अध्यात्माकडे वळता येईल हे पाहणे देखील तेवढेच महत्त्वाचे ठरते.

### अध्यात्मासाठी आवश्यक ग्रहयोग

जन्मकुंडलीत गुरू, शनि, केतू हे अध्यात्माच्या दृष्टीने शुभ फल देणारे ग्रह आहेत. केतू ज्या स्थानी कुंडलीत विराजमान असतो त्या स्थानाबद्दल ऐहिकदृष्टीने चांगली फळे मिळत नाहीत, कारण तो खरा तर परमार्थाची तृष्णा वाढविणारा असतो. जन्मलग्न कुंडलीत लग्न अगर चंद्राच्या नवमांशात पंचम, नवम् अगर व्ययस्थानी असून गुरूची त्यावर दृष्टी असेल, तर मात्र ती व्यक्ति निम्भितपणे अध्यात्माकडे वळू लागेल हे निश्चित. अध्यात्म मार्गातील संन्यास व्रत विरक्ती, अंतर्ज्ञानी तसेच ईश्वरभक्ति ह्या मार्गाकडे वळताना देखील कुंडलीमध्ये अध्यात्म मार्गातील महत्त्वाचे योग असतील तरी देखील त्यांचा उपयोग अध्यात्माकडे जाण्यास निश्चित होऊ शकेल. केतू ग्रह लग्नाच्या नवमात असून चंद्राच्या पंचमात असेल आणि त्यावर गुरूची पूर्ण दृष्टी असेल तर त्या व्यक्तिला निश्चितपणे अध्यात्म विद्येची प्राप्ती होऊ शकेल.

### व्यक्ति ईश्वरभक्त केव्हा बनते?

जन्मकुंडलीतील पंचमस्थान, दशमस्थान मधील ग्रह तसेच लग्न, नवम आणि दशमस्थान बलवान असेल तर ती व्यक्ति धर्मशास्त्र, चार वेद यामध्ये उत्तम पारंगत होऊन अंतर्ज्ञानी बनेल. जन्मलग्न कुंडलीत दशमस्थानी चार ग्रह असतील अथवा तीन ग्रह उच्च अगर स्वगृहीचे असून ते शुभवर्गात असतील, दशमाधिपति बलवान असेल तर मात्र ही व्यक्ति संन्यास घेऊ शकेल. मेष वृश्चिक, धनु-मकर कुंभ-मीन यापैकी लग्न असून भाग्यस्थानी गुरू असता व्यक्ति धार्मिक बनते आणि पंचमेश व्ययेश यांचा शुभ योग झाला तर ती ईश्वर भक्तिकडे वळते.

### अध्यात्म प्रगतीस आवश्यक योग

अध्यात्मिक प्रगतीच्या दृष्टीने विचार करता जन्म कुंडलीत पूर्ण चंद्र (पौर्णिमेचा चंद्र) चतुर्थ पंचम, भाग्य अथवा दशमात असून त्यावर गुरूची पूर्ण दृष्टी असेल तर मात्र मनुष्य त्रिकालज्ञानी होतो. भाग्यस्थान स्वामी व्ययात (१२ वे स्थानी असेल) आणि व्ययस्थान स्वामी उच्च राशीत असून अष्टमात असेल तर व्यक्तिची धार्मिक प्रगती उत्तम प्रकारे होते. हर्शल सारखा ग्रह जर रवि, चंद्र, बुध अगर गुरू यांच्या बरोबर युतीयोग, लाभयोग अगर नवपंचम योग करीत असेल तर मात्र ती व्यक्ति बुद्धीच्या शक्तीवर भूत, भविष्य उत्तम प्रकारे जाणते. कुंडलीमध्ये चार स्थानापैकी धर्म, मोक्ष व त्रिकोणस्थाने (१,५,९ व ४,८,१२) अध्यात्मिक प्रगतीसाठी अत्यंत उपयोगी पडतात. धनु, मकर, कुंभ व मीन ह्या अध्यात्मिक राशी आहेत. त्या अनुक्रमे ९, १०, ११, १२ स्थानी असल्यानेच त्यांना महत्त्व प्राप्त झालेले आहे.

### साधनेसाठी पोषक ग्रहयोग

जन्मकुंडलीतील स्थान विचारांना देखील अनन्यसाधारण महत्त्व आहे. पंचमस्थानावरून पूर्वसुकृत, धर्मशास्त्र, मंत्रशास्त्र, प्रगती विचार तर नवमस्थानावरून (याला भाग्य स्थान म्हणतात.) धार्मिक आचार, विचार, दानधर्म, धर्मश्रद्धा पाहिले जाते. ही दोन्ही स्थाने पूर्व पुण्यस्थाने आहेत. दशम स्थानावरून कृती, तपाचरण, तर व्यय स्थानावरून परलोक प्राप्ती, सद्गती, ईश्वरोपासना विचार केला जातो. परमार्थिक कुंडल्यात नवम, द्वादश ही स्थाने तसेच धनु, मीन राशी आणि गुरू, नेपच्युन हे ग्रह सुद्धा अत्यंत महत्त्वाचे ठरतात. शनि, केतू महत्त्वाची भूमिका बजावतात तर रवि आत्माकारक, चंद्र-मनकारक, बुध बुद्धीकारक आणि जन्मलग्न बिंदू हे चार घटक देखील राशी, ग्रह, स्थाने यांच्याशी संबंधित असावे लागतात. स्थितप्रज्ञ वृत्तीसाठी तूळ रास, तसेच लग्न, लग्नेश चंद्र, रवि वा बुध या राशीत असणे परमार्थाला निश्चितपणे पोषक असते. निसर्गताच या राशीचे व्यक्तिचे जीवन समतोल असते. जन्मकुंडलीतील १२ वे स्थान मोक्ष स्थान दर्शक असल्याने ते शुद्धच असावे लागते. चतुर्थ / अष्टम स्थानातील ग्रहांचा या स्थानाशी शुभ संबंध लागतो. कुंडलीतील बारावे स्थान बलवान, शुद्ध असल्याशिवाय मुक्ती अशक्यच असते. गरू, शनी शुद्ध स्वरूपात असता विवेकयुक्त वैराग्य निश्चितपणे देतात. चंद्र-शुक्र भक्तीसाठी तर मंगळ, बुध योगाभ्यासासाठी अनुकूल असतात. पंचमस्थानचा गुरू शुद्ध ज्ञान देतो. पंचमस्थान शुद्ध असता ते मात्र नित्योपासना व साधनेस पोषक ठरतेच !

### टेंबे स्वामींचे कुंडलीतील ग्रहयोग

याच दृष्टीने श्री वासुदेवानंद सरस्वती म्हणजेच श्री. टेंबे स्वामी, यांच्या कुंडलीतील ग्रहयोगांचा परामर्श घेता येईल. महान दत्तोपासक, कर्मठ संन्यासी आणि वेदाभिमानी असलेल्या श्री वासुदेवानंद सरस्वती यांच्या कुंडलीतील योग हे निश्चितपणे प्रभावी आहेत.

श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे स्वामी)
यांची जन्म कुंडली खालील प्रमाणे




जन्म - शके १७७६, श्रावण कृष्ण षष्ठी रविवार - दिनांक १३ ऑगस्ट १८५४ दुपारी ४ वाजता, माणगांव -

लग्न - ८.२२°-०-० अश्विन नक्षत्र, दुसरे चरण, देवगण, अश्व योनी, आद्य नाडी, क्षत्रिय वर्ण, मंगळ-स्वामी, अग्नी तत्त्व -

(गोलातील इंग्रजी आकडे अंशाचे आहेत.)

पत्रिकेतील इंग्रजी आकडे अंशाचे आहेत.

वरील पत्रिकेतील महत्त्वाचे योग खालीलप्रमाणे

धनु लग्नाचा स्वामी गुरु लग्नी असून वक्री आहे. त्याचा नेपच्यून बरोबर "लाभयोग" असून हर्शल बरोबर नवपंचम योग आहे. त्याचप्रमाणे सप्तमातील शुक्राशी गुरुचा प्रतियोग असून रवि मंगळाचा लाभ योग आहे. पंचमस्थानी चंद्र हर्शल प्लुटो असल्याने सगुण भक्ति, तसेच धार्मिक आचार विचार गुरुचे नवपंचम योगामुळेच ! बारावे स्थानी केतू असून तो

शनी राहूचे प्रतियोगात ! त्यामुळेच अध्यात्मातील महत्त्वाची भूमिका बजावली. लग्नेश गुरु वक्री असल्याने व शनि राहू बरोबर षडाष्टक त्यामुळे कर्मठ संन्यासी असून श्रेष्ठ बुद्धिमत्ता आहे. तसेच धनु लग्न असल्याने याचा मेष / सिंह राशी (पंचम / नवम) बरोबर शुभ नवपंचम योग देखील आहे. संस्कृत भाषेत विपुल धार्मिक रचना त्यांनी केलेली आहे. मंगळाचे राशीत चंद्र तर चंद्र राशीत रवि / बुध आणि लग्नेश गुरु धनु राशीतच अशीच स्थिती असल्याने ती परमार्थाला निश्चितपणे पोषक झालेली आहे. बारावे स्थानी केतू आहे. हे मोक्षस्थान यावरूनच ईश्वरोपासना, सद्‌गति विचार केला जातो.

लग्नेश गुरु धनु राशीत तर नेपच्युन शनीचे वैराग्य राशीत शिवाय लाभ योग ! चंद्र - हर्शल युति गुरु चंद्र नवमंचम, चंद्र-नेपच्यून लाभ, चतुर्थेश गुरु अष्टमेश चंद्राचे नवपंचम योगात ! धर्म, मोक्ष तसेच त्रिकोण स्थानी ग्रहाधिक्य असल्याने, सगुण भक्ति करणारे असे श्री. टेंबेस्वामी हे महान दत्तोपासक झाले. ग्रहयोग हे व्यक्तिला योग्य रीतीनेच घडवित असतात. कुंडलीत अध्यात्माचे योग मात्र असल्याशिवाय ती व्यक्ति पारमार्थिक / धार्मिक मार्गाकडे वळत नाही, असे ज्योतिषशास्त्र सांगते.

**ज्योतिष भास्कर - पंडित हिंगे**
अमरबाग सोसायटी, गाडीतळ-हडपसर, पुणे ४११०२८.
दूरभाष (०२०) - २६९९०४३५





# प. पू. टेंब्ये स्वामींचे श्रीक्षेत्र माणगांव

कोकणांतील सिंधुदुर्ग जिल्ह्यातील, कुडाळ तालुक्यांतील माणगांव हे थोरल्या महाराजांचे जन्मगाव. या गावात त्यांचे वयाच्या ३५ व्या वर्षापर्यंत वास्तव्य होते. माणगांवच्या गावकऱ्यांच्या श्रमदानांतून मंदिर बांधून, त्यांनी वैशाख शु. ५ शके १८०५ (सन १८८३) रोजी श्रीदत्तमूर्तिची प्रतिस्थापना केली. स्वामींनी बांधलेल्या श्रीदत्त मंदिराचा जीर्णोद्धार श्रीमंत महाराणी इंदिराराणी होळकर इंदूर यांनी वैशाख शु. १३ शके १८६० (सन १९३८) रोजी काशीच्या पंडितांकडून केला. १३ मे १९६१ पासून विश्वस्तांमार्फत 'श्री दत्तमंदिर माणगांव' चा कारभार पाहिला जातो.

माणगांव सोडण्यापूर्वी श्रीदत्तप्रभुची विशिष्ट पद्धतीने दिवसभर करावयाची सेवा त्यांनी कायम स्वरूपी ठरवून दिली. श्रीगुरुचरित्रांत वर्णन केलेल्या देवतांच्या प्रत्येक स्थानी जावून त्या जागा, ती ठिकाणे प्रसंगी शोधून काढून, तेथील मंदिरातही याच पद्धतीची सेवा, सर्वत्र सारखेपण असावा म्हणून ठरवून दिलेली आहे. गावातील पश्चिमाभिमुख वाहणाऱ्या नदीला 'निर्मला' नाव दिले. मंदिराच्या दोन्ही बाजूस दोन मोठे ओंडके असून त्यांची स्थापना 'गण' रक्षक म्हणून आहे. मंदिरालगत असलेल्या औदुंबराखाली, स्वतः महाराजांनी स्थापन केलेल्या १२० वर्षांहून जास्त काळच्या श्रीदत्त पादुका तसेच त्यांच्याच 'योग चिन्हांकित', योग्याची चरण कमळे असलेल्या श्रीदत्त पादुका आहेत. मंदिराच्या उत्तरेस असलेल्या डोंगरातील गुहेत ते ध्यानधारणेसाठी, लोकांच्या संपर्कापासून दूर म्हणून एकटेच जात. साधारणपणे डोंगर पायथ्यापासून गुहेपर्यंत जाण्यास अर्धा तास लागतो. हा वेळ जरी कमी वाटत असला तरी आपणास चढणीमुळे जी धाप लागते; त्यामुळे आपल्यापैकी कित्येकजण वर जाण्याचा विचारच सोडून देतात. शिवाय डोंगरावरील दाट झाडींमुळे वाटणारी भीती निराळीच. एकटेपणाने आजही तेथे कोणाची जाण्याची हिंमत होत नाही. सध्याच्या जंगलतोडीच्या काळातील हे जंगल तर १८७० सालच्या काळातील जंगल काय असेल हा विचार अंगावर काटा आणतो. नक्कीच त्या काळी हा भाग अरण्यमयच असावा. मंदिर आणि गुहा ह्याच्या मध्यावर एक छोटेसे कुंड आहे. ती महाराजांची स्नानाची जागा. तेथे बाराही महिने चोवीस तास पाण्याची संतत धार खाली पडत असून, एक ते दीड वीत खोली असलेला, पाण्याचा साठा कायम असतो. मात्र गुप्तपणे येणारी पाण्याची धार व कुंडातील ठराविक साठ्याच्या वरील पाणी कोठे जाते ते समजत नाही. दुष्काळात सुद्धा पाणी आटत नाही. कोकणांतील निसर्गरम्य सौंदर्याने नटलेल्या व महाराजांच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या त्या तीर्थक्षेत्री श्री दत्तमंदिर, श्रीयक्षिणी मंदिर, महाराजांचे निवासस्थान, गुहा, येथे आवर्जून भेट घ्यावी. महाराजांच्या जन्मस्थानाचे, निवासस्थानाचे विश्वस्तांतर्फे २७ डिसेंबर २००२ रोजी जीर्णोद्धाराचे काम होऊन 'श्रीं'च्या जन्मस्थानी 'श्रीं'च्या पंचधातूच्या मूर्तीची प्रतिष्ठापना झाली आहे. मूर्ती उभी व पूर्णाकृति असून बोलके डोळे व मूर्तीवरील भाव प्रत्यक्ष दर्शन देत आहेत ह्याचीच जाणीव, प्रत्येकास होत असते. ह्या पवित्र व जागृत स्थानी, आजही महाराजांच्या उत्सवांत सायंकाळच्या पालखीच्या वेळी डोंगरातील वाघाच्या डरकाळीची साद येते.

विश्वस्तांतर्फे दरवर्षी मोठ्या प्रमाणात महाराजांची जयंती, पुण्यतिथी, गुरुपौर्णिमा, गुरुद्वादशी, दत्तजयंती, गुरुप्रतिपदा व माघी पौर्णिमेस यज्ञ हे उत्सव तसेच वेळोवेळी यज्ञयाग, पालखी, सामुदायिक नामस्मरण, धार्मिक कार्यक्रम, कीर्तन प्रवचनाद्वारे धर्म जागृति, संस्कार, श्रद्धा वृद्धिंगत करण्याचे कार्य केले जाते. महाराजांचे सार्ध शतसांवत्सरिक वर्ष (१५० वी जयंती) लक्षात घेऊन १७.८.२००३ ते ३.९.२००४ पर्यंत खास कार्यक्रम, विविध यज्ञयाग, जपजाप्य, दर पौर्णिमेस पालखी सोहळा अशा कार्यक्रमांची विविधता ठेवलेली आहे. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे आजूबाजूंच्या वस्तींवर धार्मिक अधिष्ठान वाढावे, सर्वांनी गुण्यागोविंदाने रहावे या हेतूने श्रींची मूर्ती, पालखीतून, मिरवणुकीने टाळ मृदुंगाच्या गजरांत, दर गुरुवारी एका एका वाडीवर नियोजित केलेल्या कार्यक्रमानुसार जाते. गावकरी व वाडीच्या प्रतिनिधीमार्फत हा शिस्तबद्ध, आनंददायी सोहळा, सकाळी ९ ते संध्याकाळी ५ वाजता परतीच्या मिरवणूकीने आणण्यापर्यंत, आखलेला असून, पंचक्रोशीत कायम स्वरूपी चालू राहील इतका त्यास प्रतिसाद आहे.

भक्तांची राहण्याची व प्रसादाची सोय विश्वस्तांमार्फत होऊ शकते. भक्तगण देत असलेल्या, ठेवींच्या व्याजातून, हे केले जाते. ठेव ठेवणाऱ्याच्या नावे, वर्षातून एकदा पूजा, अभिषेक, प्रसाद केला जातो. श्री क्षेत्र माणगांव कुडाळपासून झाराप मार्गे १४ कि.मी. असून सावंतवाडीपासून आकेरी बाजार मार्गे ११ कि.मी. आहे. कुडाळ व सावंतवाडीस येण्यासाठी बसेस व कोकण रेल्वेची सोय आहे.

पत्ता : श्रीदत्त मंदिर, क्षेत्र माणगाव, ता. कुडाळ, जि. सिंधुदुर्ग - ४१६५१६. दूरध्वनी - ०२३६९ - २३६२४५, २३६४२५

माहिती देणार : वैद्य. रा. ज. गणपत्ये,
विश्वस्त

संकलन : श्री. अरविंद. बा. बीडकर
४ जयति, संगमनगर, पद्मावती, पुणे ४११०३७.
दूरध्वनी - २४२११२०७





# श्री प.पू. वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज व शिष्य संप्रदाय

**श्री. शां. गो. पोतदार**

*बी. एस्.सी (ऑनर्स) प.पू नानामहाराज तराणेकर अनुग्रहित. नागपूरच्या शांती पुरुष व हरिद्वारच्या समन्वयसाधना या मासिकांतून लिखाण.*

भारत हा एक खंडप्राय देश आहे. पहिल्यापासूनच यांत अनेक प्रान्त, अनेक पंथ, अनेक भाषा व अनेक रीतीरिवाज अस्तित्वात असूनही या अनेकात एकच सर्वमान्य गोष्ट होती व ती म्हणजे भारतीय संस्कृती. पौराणिक व ऐतिहासिक काळापासून या देशावर अनेक जातीच्या व अनेक धर्माच्या लोकांनी स्वाऱ्या केल्या व शेकडो वर्षे राज्य केले. मुसलमान व ख्रिश्चन लोकांनी देशावरच नव्हे तर भारतीय संस्कृतीवरही आक्रमण करून अनेक लोकांना धर्मांतर करावयास भाग पाडले. धर्मस्थळे लुटली, भस्मसात केली ज्या योगे भारतीय संस्कृतीचा ऱ्हास होऊन त्याचा अंत व्हावा. पण अशा परिस्थितीतही भारतीय संस्कृती टिकली नव्हे फोफावली. कदाचित हेच विधात्याचे विधान होते. कारण

***विधान जे जे करी विधाता विधी त्याचा हेतू खरा.***

दीर्घकालीन भौगोलिक, धार्मिक व वैचारिक आक्रमणाला यशस्वी रीतीने तोंड देणारी भारतीय संस्कृती ही कदाचित जगातील एकमेव संस्कृती असावी. या आपल्या भारतीय संस्कृतीमध्ये हिंदू धर्माला आगळे वेगळे स्थान आहे. ज्या ज्या वेळी धर्मावर मोठे संकट येते त्यावेळी विधाता निरनिराळ्या स्वरूपात अवतार धारण करून समाजाला योग्य तो धर्ममार्ग दाखवून आक्रमणाची मूलभूत खंडना करतो की ज्या योगे धर्मजागृतीस सुरुवात होते. अशा विधात्याच्या अवतारानाच "भगवंत वा संत विभूती" अशी संज्ञा आहे. हा प्रत्यक्ष इतिहास आहे.

पौराणिक काळात श्रीराम, श्रीकृष्ण व इतरही अनेक अवतार झाले तर ऐतिहासिक काळात ज्ञानेश्वर, रामदास, आद्य शंकराचार्य, विवेकानंद इ. अनेक सिद्ध पुरुषांनी हिंदू धर्माच्या जागृतीसाठी महत् कार्य केलेले आहे. त्यांची पुण्याई, खडतर तपःश्चर्या व अथक् परिश्रमामुळेच भारतीय संस्कृतीचे व हिंदू धर्माचे रक्षण झालेले आहे. या सर्व महासिद्धांच्या वैयक्तिक गरजा फार थोड्या होत्या. वस्त्रांची आवश्यकता केवल लज्जा रक्षणापुरती, अन्नाची जरुरी केवळ शरीरपोषणापुरतीच होती. सर्व भारतभर ते थंडी, ऊन, पाऊस सहन करीत फिरत असल्याने निवाऱ्याची आवश्यकता भासलीच नाही. अशा वर्षानुवर्षाच्या भ्रमंतीच्या अंतर्गत त्यांनी अनेक धर्म व जातीच्या लोकांना भक्तीमार्ग दाखविला, त्यांचे शारीरिक क्लेश मंत्रशास्त्राने व वनौषधीने बरे केले व त्यांना धर्माचरणाकडे वळविले. अशाच मार्गातील एक अद्वितीय संत विभूती म्हणजे दत्त-संप्रदायातील प.पू. वासुदेवानंद सरस्वती टेंबेस्वामी महाराज होत.

या अशा आदर्श व कार्य-प्रेषित व्यक्तिमत्वामुळे त्यांना अनेक मान्यवर शिष्य लाभले होते व "आपणासारिखे करिती तात्काळ" या संत वचनाप्रमाणे हे शिष्यही महाराजांच्या प्रमाणेच, त्याच उद्देशाने जीवनभर कार्यरत राहिले. अधिकार परत्वे त्यांचेही अनेक शिष्य झाले व अशी गुरुशिष्य परंपरा वाढतच राहिली.

## १) श्री नृसिंह सरस्वती तथा दिक्षित स्वामी(१८६६-१९२७)

दिक्षित स्वामी हे महाराजांचे एकनिष्ठ भक्त होते. ते मितभाषी, शांत व एकांतप्रिय असून स्वभावाने अति प्रेमळ होते. त्यांचा जन्म चैत्र शु. १ इ.स. १८६६ रोजी नृसिंहवाडीच्या दक्षिणेला असलेल्या सवलगा गावांत झाला. वडिलांचे नांव लक्ष्मणशास्त्री दिक्षित व माता सौ. अहिल्या होते. माता - पिता उभयता दत्तभक्तीपरायण होती. शाळेत असतानाच त्यांना विरक्ती प्राप्त झाली व नंतर शिक्षण सोडून ते शास्त्र मार्गाने वागू लागले. त्यांनी आपल्या माता - पित्यांचे श्री दत्तोपासनेचे व्रत आचरण्यास प्रारंभ केला. संस्कृतातील अनेक विद्यांचे अध्ययन पूर्ण केले व त्यामुळे त्यांची वैराग्यवृत्ती दृढावली हे लक्षात येताच लक्ष्मणशास्त्र्यांनी त्यांना प.पू. वासुदेवानंद सरस्वती यांचे स्वाधीन केले. त्यांना संध्येपासून सर्व आचार धर्माचे शिक्षण प. पू. महाराजांनी केले. दिक्षित स्वामी हे अनन्य भक्त होते. त्यांनी संन्यास दीक्षा श्री दत्तभट नावाच्या कुरुंदवाड येथील तपस्वी ब्राह्मणाकडून वाडी येथे विधीपूर्वक घेतली होती. गुरुसेवेचा सर्वोत्तम आदर्श म्हणजे दिक्षित स्वामी. प. पू. महाराजांनी त्यांना श्री नृसिंह वाडीस रहाण्यास सांगितले असल्याने त्यांनी गुरुआज्ञा काटेकोरपणे पाळली होती. नियमितपणे ते ब्रह्मकर्म व अग्निकार्य करून गृहस्थाश्रम पाळीत असत. महाराजांच्या आज्ञेप्रमाणे पंचमहायज्ञ, अन्नदान, दत्तभजन व देवपूजा श्रद्धेने सतत करीत असत. "वाडीत पादुकांची पूजा करताना तेथे देव प्रत्यक्ष आहेत असे समजून ते पूजा करीत" असे श्री गुळवणी महाराजांनी मुद्दाम नमूद करून ठेवले आहे. प.पू. महाराजांचा श्री दिक्षित स्वामींवर फार लोभ होता. आपण लिहिलेले समग्र दत्तवाङ्मय ते श्री दिक्षित स्वामींकडे पाठवीत असत. प.पू. महाराजांनी आपल्या पादुका कोणालाही दिलेल्या नव्हत्या, पण दिक्षितस्वामींची भक्ती पाहून लाकडी पादुका पायांत घालून त्या दिक्षित स्वामींना दिल्या. त्या पादुका आज अमरेश्वर मठात आहेत. प. पू. महाराजांच्या आज्ञेप्रमाणे कांही कारणपरत्वे त्यांना वाडी सोडण्याचा आदेश मिळाला. तत्पूर्वी प.पू. महाराजांची व दिक्षित स्वामींची वाडीमुक्कामी चौदावर्षानंतर गाठ पडली. या समर्थ शिष्याला आशिर्वाद देताना प.पू. महाराज म्हणाले, "जे एकमेकाद्वितीय परब्रह्म भक्तोद्धारार्थ भूतली अवतीर्ण झाले, ज्याला श्री दत्त नृसिंह सरस्वती हे नामनिधान प्राप्त झाले ते नरसिंह

सरस्वती तुम्ही आहांत." दिक्षित स्वामींनी अमरापूर येथे "श्री वासुदेवानंद सरस्वती पीठ" ही संस्था स्थापन केली. श्री दिक्षित स्वामी यांच्या जाज्वल्य गुरुभक्तीची एक खास आठवण अशी आहे. प.पू. स्वामी महाराजांची गरुडेश्वरी प्रकृती ढासळत असल्याचे वृत्त श्री दिक्षित स्वामींना वाडीला समजले. तेव्हापासून महिनाभर श्री दिक्षित स्वामी गुरु पादुकावर औषधोपचार करीत राहिले व प. पू. महाराजांना बरे वाटावे अशी प्रार्थना करीत होते. नैवेद्यही गुरुमहाराजांच्या पथ्याचाच दाखवीत असत. निर्गुण ब्रह्मांचा अनुभव घेतलेले असूनही सगुण उपासनेची त्यांची ही पराकाष्ठा भावभक्तीतून दिसून येते. हे सर्व ऐकून प. पू. महाराजांचे हृदय प्रेमातिशयाने भरून आले. ते म्हणाले "या औषधोपचारानेच माझा काल एका महिन्यांनी पुढे ढकलला गेला आहे. होणारे अटळ आहे तरी आता औषधे बंद करावीत"

महाराष्ट्रांत ठिकठिकाणी फिरून दिक्षित स्वामी महाराज काशी यात्रेला गेले व शेवटी अयोध्येला गेले. त्यावेळी महाराजांचे एक भक्त प्रसिद्ध गायनाचार्य पं. विष्णु दिगंबर पलुस्कर यांनी महाराजांनी अयोध्या सोडून इतरत्र कोठेही जावू नये अशी प्रार्थना केली. त्याप्रमाणे तेथेच राहून अश्विन वद्य ७ शके १८४९ (सन १९२७) रोजी आयोध्येला त्यांनी देह ठेवला. त्यांनी ५५ स्तोत्रे व "गुरुशिष्यसंवाद" मराठीत लिहिला आहे.

## २) श्री योगानंद सरस्वती तथा गांडा महाराज (इ.स. १८६८ - १९२८)

गुजरायमध्ये सुरत जिल्ह्यातील सचिन तालुक्यातील तलंगपूर येथे दत्तजयंती मार्गशीर्ष शु. १५ इ.स. १८६८ मध्ये त्यांचा जन्म झाला. स्वभावतः ते विरक्त होते. लहानपणी अल्लड स्वभावामुळे लोक त्यांना गांडा म्हणजे वेडा म्हणत असत, पण मूळचे त्यांचे नांव कल्याण होते. त्यांचे लग्न वयाच्या आठव्या वर्षीच झाले होते. विरक्त स्वभाव व मनःशांती नसल्याने गुरुशोधार्थ मद्रासपर्यंत फिरले होते. जातीने ब्राह्मण असल्याने ब्राह्मण जातीचाच सद्गुरू मिळावा अशी इच्छा होती. घरात आई - वडील होते, कुटुंब सधन असूनही कोणत्याही विषयात मनःशांती, सुख मिळेना म्हणून व्यापाराचे निमित्त काढून ते घराबाहेर पडले होते. नंतर वैराग्याचे वेषात ओंकारेश्वराचे झाडीत एका वडाखाली रहात असत. त्यावेळी श्री पांडुरंग महाराज या सत्पुरुषाची ओळख झाली व त्यांनी नेमावर येथील सिद्धनाथाचे देवळात जपानुष्ठान करण्यास सांगितले. तेथे त्यांना प.पू. वासुदेवानंद सरस्वतींबद्दल वार्ता समजली. इ. स. १८९८ मध्ये प.पू. वासुदेवानंद सरस्वती यांचा मुक्काम शिनोर येथे होता. तेथे रामशास्त्री यांना पाठ देताना प. पू. महाराज म्हणाले "लवकरच एक नेहमी भटकणारे अक्षरशत्रू येथे येणार आहेत." नंतर २-३ दिवसांनी एक मध्यमवयाचा गुजरायी ब्राह्मण तेथे आला. नुसता महाराजांच्या खोलीत एका कोपऱ्यात तो बसून राही. आठ दिवस महाराज त्याच्याशी बोलले नाहीत. शेवटी महाराजांनी त्याला विचारले की "येथे तू का बसून रहातोस?" त्यावर श्री गांडा महाराजांनी सर्व हकीकत सांगितली व आपण माझ्यावर कृपा करावी अशी प्रार्थना केली. यावर महाराज फक्त हसले. पुढे त्यांना बरोबर घेऊन महाराज निकोवा या गांवी आले. तेथील एका शंकराचे मंदिरात श्री गांडाबुवांना रहाण्यास सांगून योगाभ्यास करण्यास सांगितले. तुझ्या श्रद्धेप्रमाणे भगवान शंकर तुला फळ देतील. तेथून पुढे जाताना प.पू. महाराजांनी श्री गांडाबुवांना योगाभ्यासाची दिशा दाखविली. नंतर काही दिवसांनंतर प. पू. महाराज शंकर मंदिरात दर्शनार्थ आले असता श्री गांडाबुवांना अशी आज्ञा दिली की " तू प्रथम आई - वडिलांची क्षमा माग व त्यांची आज्ञा घेऊन चातुर्मासाचे सुमारास द्वारकेत माझ्याकडे ये." त्याप्रमाणे श्री गांडाबुवांनी घरी जाऊन चातुर्मासाचे आधी ते द्वारकेस प.पू. महाराजांना येऊन भेटले व म्हणाले "कांही अटीवर मला परवानगी मिळाली आहे" त्यावर प. पू. महाराजांनी सांगितले की "हरकत नाही, श्रद्धेप्रमाणे कार्यसिद्धी होईल" श्री गांडाबुवांची प.पू. महाराजांवर पूर्ण श्रद्धा होती व ते प.पू. महाराजांचा शब्द तंतोतंत पाळीत असत. प. पू. वासुदेवानंद सरस्वतींच्या अनुग्रहीत शिष्यांपैकी जे श्रेष्ठ पदी पोहोचले त्यांत प.पू. योगानंद सरस्वती म्हणजे गांडा महाराज यांचे नांव अग्रक्रमाने घ्यावे लागेल. त्यांना अनेक वर्षे प.पू. महाराजांचा सहवास व सेवेची संधी मिळाली हे त्यांचे विशेष भाग्य होय. पुढे त्यांना प.पू. महाराजांनी भडोच येथे लक्ष गायत्री जप करण्यास सांगितले होते. गरुडेश्वरी श्री गांडा महाराज दर्शनास आले तेव्हा संन्यास घेऊन श्री योगानंद सरस्वती हे नांव धारण करून परभणी जिल्ह्यात गोदावरी कांठी गुंज या गावी राहण्यास सांगितले व तेथेच त्यांचे देहावसान झाले. ते उत्तम योगाभ्यासी होते. खेचरी मुद्रा लावीत असत. त्यांना आयुर्वेदीय औषधांची व झाडपाल्यांची माहिती खूप होती. त्यांनी १३६ अध्यायांचे "श्री गुरुमूर्ती चरित्र" लिहिले आहे. फाल्गुन वद्य १२ शके १८५० (इ.स. १९२८) हा त्यांचा निर्वाण दिन आहे. त्यांची समाधी क्षेत्र गुंज जिल्हा परभणी (मराठवाडा) येथे आहे.

## ३) श्री रंग अवधूत महाराज (इ.स. १८९८ - १९६८)

कोकणातील संगमेश्वर तालुक्यातील देवळे या गावात जयरामभट्ट वळामे नावाचे ऋग्वेदी कऱ्हाडे ब्राह्मण रहात होते. ते गोसेवक होते. त्यांचे तृतीय आपत्य म्हणजे विठ्ठल भट्ट. हे आपल्या पित्याप्रमाणे वेदशास्त्रसंपन्न पुराणांचे अध्ययन करणारे सहज वैराग्याने व विनयाने शोभणारे होते. यांचे एक परममित्र श्री सखारामपंत सरपोतदार यांच्या आग्रहावरून गोध्रा येथील त्यांच्या विठ्ठल मंदिरात पुजारी म्हणून राहाण्याचे श्री विठ्ठल भट्ट यांनी मान्य केले व अशाप्रकारे विठ्ठल भक्तीची सुरुवात झाली. भक्तीत व पूजेत परमानंद येत असता त्यांना पांडुरंगाचा स्वप्न दृष्टांत झाला व लग्न करण्याचा आदेश मिळाला. त्या आदेशात भावी पत्नीबद्दल संपूर्ण माहिती व "मी तुझ्या घरी येणार आहे" अशी पूर्वसूचनाही मिळाली. विठ्ठल भट्टांनी देवळे येथे परतून पाली गावच्या काशी मोघे यांच्याशी विवाह केला व त्या सौ. रुक्मिणी वळामे झाल्या. लग्नानंतर परत हे दांपत्य गोध्रा येथील पांडुरंग सेवेत रमले. श्री पांडुरंगाच्या स्वप्न दृष्टांताप्रमाणे या दांपत्यास २१ नोव्हें. १८९८ रोजी पुत्ररत्न झाले. याचे नांव पांडुरंग ठेवले व हेच भविष्यात "श्री रंग अवधूत महाराज" या नावाने ओळखले गेले. पांडुरंग लहान असतानाच श्री विठ्ठल भट्टांचा मृत्यू झाला व म्हणून माता रुक्मांबा (रुक्मिणी) यांनीच पालन पोषण केले. रामनामाचा जप केल्याने माणूस जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून सुटतो अशी कल्पना दृढमूल झाल्याने पांडुरंग सतत एकांतात राम जप करीत असे. जप शब्दातील 'ज' म्हणजे जन्माचा नाश करणारा व 'प' म्हणजे पापाचा नाश करणारा म्हणजे ज व प ही एकत्र अक्षरे जन्म व पाप नाहिसे करणारा आहे असे स्पष्टीकरण समश्लोकीत प.पू. स्वामींनी केलेले आहे. त्यांच्या वयाच्या आठव्या वर्षी मातेने पांडुरंगास श्री प.पू. वासुदेवानंद सरस्वती यांचेकडे नेले. त्याने

महाराजांना नमस्कार केला त्यावेळी महाराजांनी विचारले "बाल, तू कोणाचा?" त्यावर पांडुरंगाने उत्तर दिले "मी तुमचाच" यावर प.पू. महाराजांनी शिष्य म्हणून त्याचा स्वीकार केला. ही घटना श्री क्षेत्र नृसिंह वाडीस घडली. त्या दिवसापासून सद्गुरूचरणी पांडुरंगाने सर्वस्व अर्पण केले. वाडीहून परतल्यावर पांडुरंगाची अवस्था विरहिणीप्रमाणे झाली. अशा व्याकूळ अवस्थेत ते अत्यंत आर्ततेने ईश्वराची प्रार्थना करीत व दर्शन मागत. त्यावर स्वप्न दृष्टांत होऊन श्री दत्तप्रभूंनी त्यांना "पोथी वाच" असा आदेश दिला. त्याच्या मामांनी त्यांना श्री साईबाबांनी दिलेली "श्री गुरुचरित्राची पोथी" दिली. त्या पोथीचे वाचन केल्याशिवाय श्री अवधूत महाराज तोंडात पाणीही घेत नसत. अवधूत महाराज एकपाठी होते. तीव्र बुद्धिमत्तेमुळे शालेय व विद्यालयीन शिक्षण त्यांनी प्राविण्यासह पूर्ण केले. मराठी, गुजराथी, हिंदी, संस्कृत व इंग्रजी भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. योगविद्या, ध्यान-धारणा आत्मसात करून समाधी अवस्था प्राप्त करून घेतली होती. आपल्या दैनंदिन कार्यात त्यांना श्रीमत् भगवत्गीतेचा आदर्श होता. लौकिक दृष्ट्या त्यांचे शिक्षण बी.ए. पर्यंत झाले होते पण त्याचवेळी लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांच्या विचारसरणीचा परिणाम झाला. ते बडोदा कॉलेज सोडून गांधीजींच्या गुजराथ विद्यापीठात सामील झाले. विचार व चारित्र्यामुळे त्यांनी सर्वांची मने जिंकली होती. पण त्यांच्या अंतर्यामात सतत अस्वस्थता व अपूर्णता जाणवत असल्याने महाराज परत परमार्थाकडे वळले. त्यांनी आपल्या एकाकी जीवनयात्रेची सुरुवात हिमालयापासून केली. विविध प्रांतातील सत्पुरुषांच्या गाठी भेटी घेतल्या. साईखेडचे धुनिवाले बाबा, मोरटक्का येथील अवधूत परमहंस चंद्रशेखरानंद सरस्वती व बडोद्याचे श्री ब्रह्मचारीबुवा यांचा समावेश आहे. शेवटी ते नर्मदाकाठी नारेश्वर येथे दत्तकुटिरात राहू लागले. तेथे लिंबाच्या झाडाखाली विनावस्त्र तपश्चर्या करीत असत. पुढे श्रीदत्त प्रभूंच्या आदेशाप्रमाणे त्यांनी तेथेच दत्तपुराण या पोथीची १०८ पारायणे पूर्ण केली व त्याचे उद्यापन म्हणून १०८ दिवसांत नर्मदा प्रदक्षिणा केली. या नर्मदा प्रदक्षिणेत अवधूत महाराजांची भेट अनपेक्षितरित्या अनेक दैवी आत्म्यांशी होत असे. प्रदक्षिणा पूर्तीनंतर ते नारेश्वर येथे रहात. आपल्या मातेला त्यांनी नारेश्वरला आणून अखेरपर्यंत तिची सेवा केली. अशा या महान दत्तभक्ताची अखेरची जन्मजयंती जयपूर येथे साजरी झाली. जयंतीनंतर महाराज हिमालयाकडे निघाले असता त्यांचा मुक्काम हरिद्वारला पडला व तेथेच १९ नोव्हेंबर १९६८ रोजी त्यांचे देहावसान झाले. पुढे नारेश्वर येथे त्यांचे समाधी मंदिर बांधण्यात आले. त्यांचे वाङ्मयीन कार्यात "श्री गुरुलीलामृत" व ''श्री दत्तबावनी'' ही प्रसिद्ध आहे. याचे शिवायही त्यांनी विपुल वाङ्मय संपदा केलेली आहे.

## ४) श्री सिताराम महाराज टेंबे (इ. स. १८५७ - १९१८)

श्री सिताराम महाराज हे प.पू. वासुदेवानंद सरस्वती यांचे पूर्वाश्रमीचे कनिष्ठ बंधू. पुढे ते स्वामींचे शिष्य झाले व त्यांचे समवेत पायी प्रवास केला. प.पू. महाराजांनी माणगांव सोडले तेव्हा श्री सिताराम महाराजांनी प.पू. महाराजांचे बरोबर जाण्याचा आग्रह धरला पण मातेची सेवा करण्याचा उपदेश प.पू. महाराजांनी दिला व मातेच्या निधनानंतर मला येऊन भेटावे असे सांगितले. श्री सीताराम महाराजांनी प.पू. महाराजांचा आदेश शब्दशः पाळला.

प.पू. महाराजांच्या समवेत ब्रह्मावर्तात असताना श्री सीताराम यांचेकडून प.पू. महाराजांनी गायत्री मंत्राचे पुरश्चरण मोठ्या प्रमाणात करवून घेतले व फलस्वरूप श्री सीताराम यांना मोठी सिद्धी प्राप्त झाली. त्यांना संगीताची चांगली जाण होती. त्यांनी एका कीर्तनात झंपा म्हणून दाखविला त्यावेळी त्यांची "ब्रह्मानंदे लागली टाळी कोण देहाते सांभाळी" अशी स्थिती झाली होती. त्यांना तबला वाजविण्याची कलाही चांगली अवगत होती. काकीनाडा येथे त्यांनी एका कीर्तनकाराला उत्तम साथ केली होती. त्यावेळी प.पू. महाराजही प्रसन्न झाले होते. त्यांना गुरुदर्शनाची वारंवार ओढ लागत असे त्यासाठी ते ठिकठिकाणी जात असत. एकेप्रसंगी बराच काळ त्यांना गुरुदर्शन झाले नव्हते व म्हणून समर्थ रामदासांनी स्थापन केलेल्या उंब्रज येथील मारुतीला सव्वामण शिऱ्याचा सत्यनारायणाचा नवस केला होता. यावरून सद्गुरू प्रेमाचे अद्भुत दर्शन घडते. एका विशिष्ट मुक्कामांत एक कोल्हा जंगलातून आला व तुपाची बरणी घेऊन पळाला तेव्हा त्याला "पोळी पण घ्या" असे श्री सीताराम महाराज म्हणाले होते. या उदाहरणावरून साधुसंतांना सर्व ठिकाणी परमेश्वर दिसतो याची प्रचिती येते. गुरुसेवा म्हणून श्री सिताराम महाराज ब्रह्मावर्त मुक्कामी प.पू. महाराजांची खोली गायीच्या शेणाने सारवीत असत व खोलीची साफसफाई करीत. त्यांच्या जीवनातील एक आनंददायी घटना म्हणजे हेमराज नावाचा एक मारवाडी रोगाने मरणप्राय अवस्थेकडे चालला होता. त्याने श्री सीताराम महाराजांना स्वास्थ्यानिमित्त प्रार्थना केली. औषधाने गुण येत नव्हता तेव्हा श्री सीताराम महाराजांनी त्याला तीर्थ व अंगारा देऊन बरे केले व आपल्या आयुष्यातील कांही वर्षे त्याला बहाल केली होती. प. पू. महाराजांप्रमाणे श्री सीताराम महाराजही निःस्पृह होते. द्वारकापीठाच्या शंकराचार्यांचे पीठ त्यांना अनायासे उपलब्ध झाले असता ते त्यांनी स्वीकारले नाही.

राजूर येथे प.पू. महाराजांनी एक मोठा ऋग्वेद संहितेचा स्वाहाकार केला. या यज्ञाचा विशेष म्हणजे लक्षावधी ब्राह्मणांना जरी अन्न व द्रव्य समर्पण केले तरी तेवढेच अन्न व द्रव्य शिल्लक राहिले होते. या प्रसंगाचे वर्णन करताना श्री प. पू. दिक्षित महाराज म्हणतात की हा सर्व यज्ञ अलौकिकच ठरला. वाणीने याचे वर्णन करता येणार नाही. असा समारंभ करण्यास श्री दत्तप्रभू समान श्री प.पू. स्वामी महाराजांच्या शिवाय कोण करू शकेल? या यज्ञप्रसंगी श्री प.पू. स्वामी महाराजांनी श्री सीताराम महाराजांना आत्मअनात्म विचार समजावून देण्याचे अभिवचन दिलेले होते. त्यानंतर गरुडेश्वराहून पत्र आले की "आषाढ शु. प्रतिपदेस गरुडेश्वर येथे प.पू. वासुदेवानंद सरस्वती सद्गुरु महाराज समाधिस्थ झाले. हे वाचून श्री सीताराम महाराजांचेवर वज्राघात झाला. नेत्रातून दुःखाश्रूंचे पूर वाहिले. पराकाष्ठेचे दुःख होत असतांही गंगेवर स्नान केले. तापी नदीच्या काठावरील जंगलात फिरत श्री. प. पू. महाराजांचे चरित्र आठवू लागले. गुरुरायाने पोटच्या पोराप्रमाणे माझे सर्व अभिष्ट केले, हट्ट पुरविले, मला ऋद्धिसिद्धी दिल्या पण माझ्याकडून सेवा करून घेली नाही. मी त्यांचा उतराई कसा होऊ? राजुरात मला पुनःदर्शन देईन असे अभिवचन दिले होते. आता तेही शक्य नाही. माझा इतका अधिकार नाही म्हणून असे झाले काय? जेवण - झोपेचेही स्मरण राहिले नाही. सारखे "वासुदेव ! वासुदेव ! असा टाहो फोडू लागले व अशा स्थितीत त्यांना मूर्च्छा आली. तेव्हा स्वतः प.पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज सदेह तेथे अवतीर्ण झाले व श्री सीतारामाच्या शरीरावरून हात फिरवीत म्हणाले, "सीतारामा,

उठ मी आलो आहे'' या स्पर्शाने व वाक्याने श्री सीताराम महाराजांनी डोळे उघडले पण आपल्या डोळ्यावरही त्यांचा विश्वास बसत नाही असे जाणताच श्री प. पू. महाराजांनी श्री सीताराम महाराजांना कडकडून मिठी मारली व विचारले "आता शुद्धीवर आहेस ना?" त्यावेळी उभयतांना झालेला आनंद कोण वर्णू शकेल? आपल्या भक्ताची कामना पूर्ण करण्याची प. पू. स्वामी महाराजांची ही कळकळ खरोखरीच विलोभनीय आहे.

पुढे चारच वर्षांनी इ.स. १९१८ च्या फाल्गुन शु. अष्टमीला श्रीक्षेत्र वडनेरी जि. अमरावती येथे श्री सीताराम महाराजांचे निर्वाण झाले. याच वडनेरी येथे श्री सीताराम महाराज प.पू. नृसिंह सरस्वती व दिक्षित महाराज या दोघांच्या समाध्या आहेत.

## ५) श्री वामनराव गुळवणी महाराज (इ.स. १८८६ - १९७४)

कोल्हापूर परिसरातील कुडुत्री या खेड्यात गुळवणी या नावाचे सदाचार संपन्न मध्यम वर्गीय कुटुंब रहात होते. श्री वामनरावांचे पिताजी श्री दत्तभट व माता सौ. उमाबाई उभयता दोघेही विरक्त व महान भगवत भक्त होते. वाडीची वारी करण्याचा त्यांचा प्रघात होता. माता सौ. उमाबाई तर भगवान दत्तात्रेयांच्या निस्सिम उपासक, परम श्रद्धाळू, धार्मिक, शुद्ध अंतःकरणाच्या होत्या. श्री दत्तप्रभूंनी त्यांना साक्षात दर्शन देऊन त्यांच्या ओटीत अष्टगंधयुक्त अशा चांदीच्या पादुका प्रसाद रूपाने टाकल्या होत्या. त्या पादुकांचे नित्य पूजन आजही श्री वासुदेव निवास या आश्रमात होत असते. अशा पवित्रोत्तम माता-पित्यांच्या उदरी जन्म येण्यास अनेक जन्माची पुण्याई पदरी असावी लागते. "शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोभिजायते'' या उक्तीप्रमाणे अशा वैराग्यसंपन्न कुटुंबात श्री वामनरावांचा जन्म २३ डिसेंबर १८८६ गुरुवार रोजी झाला. त्यांच्या वयाच्या ८ व्या वर्षी उपनयन संस्कार झाल्यावर वडील बंधूंनी संध्या, पूजा, वैश्वदेव, पुरुषसूक्त या धार्मिक आचारांचे शिक्षण दिले. पुढे कोल्हापुरात पं. आत्मारामशास्त्री पित्रे यांचेकडे रूपावली, समासचक्र, अमरकोश, रघुवंश, अजविलाप, पंचतंत्र इ. संस्कृत ग्रंथांचे अध्ययन झाले. पूर्वसंस्कारानुसार श्री वामनरावांना कलेची उपजतच आवड होती. त्यांनी ड्रॉइंगच्या तीन परीक्षा दिल्या होत्या. नंतर कलेच्या पुढील शिक्षणासाठी अमेरिकेला जाण्याचा प्रयत्न केला; पण यश आले नाही. त्यांच्या वडील बंधूंनी व मातोश्रींनी त्यांचा विवाह करण्याचे योजिले पण विश्वविधात्याची योजना वेगळी होती. "विश्वाचा प्रपंच" त्यांचे हातून सफल व्हावा असे त्यांचे प्रारब्ध होते. सन १९०७ साली श्री वामनराव कोल्हापूर येथे होते. "श्री दत्तात्रयांचा एक फोटो व एक हार तयार करून वाडीस ये" असा त्यांचे वडील बंधूंचा निरोप आल्यावर ते फोटो व हार घऊन वाडीस गेले; त्यावेळी प.पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांना तो फोटो व हार अर्पण करण्यात आला व त्यावेळी श्री स्वामींचे प्रथम दर्शन झाले. श्री प. पू. स्वामी महाराज प्रसन्न झाले व वामनरावांना आशीर्वाद म्हणून हातात बांधण्यासाठी एक "मंत्र-सिद्ध-प्रसाद" पेटी दिली. ती पेटी श्री वामनरावांचे हातात सतत असे. गुरुंचा हा प्रथम दर्शनीच मिळालेला प्रसाद हे भावी आयुष्याच्या यशस्वितेचे शुभ चिन्हच होते व त्यामुळेच त्यांच्या आयुष्यास कलाटणीच मिळाली. त्यावेळी सर्वत्र प्लेग होता. श्री वामनरावांनाही प्लेगने झपाटले होते. दहा दिवस ते बेशुद्धावस्थेत होते. अन्न जात नव्हते. श्री गुरुचरित्राची पारायणे सुरू केल्यावर प्लेगची गांठ फुटली. त्यांचा पुनर्जन्मच झाला. गुरुवरील श्रद्धा दृढावली. नंतर वाडीस जाऊन माधुकरी मागून त्यांनी श्री गुरुचरित्राचे सात सप्ताह केले. अशारीतीने श्री गुरुकृपा फळाला आली व ते श्री गुरुदत्तात्रेयांचे निस्सीम उपासक झाले. याचवेळी प. पू. स्वामी महाराजांचा पवनी येथे चातुर्मास झाला. वडील बंधुंच्या आदेशानुसार आपल्या मातोश्री व भगिनींसह श्री वामनराव पवनीस आले व योगायोग असा की महाराजांकडून अनंत चतुर्दशीच्या दिवशी त्यांना अनुग्रह मिळाला. हा त्यांच्या जीवनातील सुवर्णमंगल क्षण होता. श्री वामनरावांनी नोकरीसाठी मुंबई येथे प्रयत्न केले पण ते सफळ झाले नाहीत. नंतर उपरती झाली व अंगावरील दोन वस्त्रे व एक लोटा घेऊन पायी ते गाणगापुरास निघाले. वाटेत अत्यंत त्रास सोसला. दौंड येथे कडक उपवास घडला. तो दिवस एकादशीचा होता तेव्हा एकादशी दिवशी आपण उपास करावा अशी सद्गुरुंची इच्छा आहे अशी त्यांची खात्री पटली व त्या दिवसापासून त्यांचे एकादशी व्रत सुरू झाले. श्री गाणगापूर क्षेत्री श्री गुरुचरित्राची सात पारायणे केली व सांगतेनिमित्त आपली छत्री व वस्त्रे पुजाऱ्यास दिली. अनन्यभक्ती बाणली म्हणजे मनाचा ताबा शरीरावर केवढा बसतो व केवढे गुरुकार्य होते याचे हे उदाहरण आहे. पारायण विधी पुरा झाल्यानंतर श्री गुरुदर्शनाची आत्यंतिक ओढ लागली. त्यावेळी प.पू. स्वामी हावनूर येथे होते. अत्यंतिक शारीरिक क्लेश व उपास करीत ते चालत हावनूर येथे पोहोचले. श्री सद्गुरूंच्या पावन दर्शनाने सारे श्रम विसरले व "मी आता येथेच आपल्या सेवेसाठी रहाणार आहे असा सद्गुरुचरणाशी आग्रह धरला. एकभुक्त रहावयाचे, माधुकरीवर उदरनिर्वाह करावयाचा व सर्वकाळ गुरुसेवेत रहावयाचे ऐसा दिनक्रम सुरू झाला. महाराजांनी श्री वामनरावांना आसने, प्राणायाम शिकविले व अजपा-जप सांगितला. श्री गुरुंच्या तोंडून गीतापाठ व ब्रह्मसूत्रवृत्ती ऐकावयास मिळे. गीता व विष्णुसहस्र नामाची संथा श्री सद्गुरुकडून मिळाली. याच मुक्कामात वामनरावांनी तुंगभद्रेचे अप्रतिम चित्र तयार केले. श्री महाराजांनी त्रिपुरांतकेश्वरावर एक सुंदर काव्य रचिले होते. श्री वामनरावांनी त्यातील श्लोक हारबद्ध करून चित्रातील देवीच्या गळ्यात हार घातला. महाराजांना फार समाधान वाटले व श्री वामनरावांनाही आपल्या कलेचे सार्थक झाले अशी दृढ भावना झाली. नंतर सन १९१२ साली श्री क्षेत्र औदुंबर येथे त्यांनी श्री मालामंत्राचे पुरश्चरण केले त्यावेळी त्यांच्या मातोश्री बरोबर होत्या. नंतर श्री प.पू. स्वामी महाराज जेथे जेथे जात तेथे त्यांचे समवेत वामनराव जात. सेवा कधी चुकली नाही, अंतर कधी पडले नाही. श्री क्षेत्र गरुडेश्वरी श्री स्वामी महाराजांनी त्यांना ब्रह्मसूत्रवृत्ती, दशोपनिषदे, श्वेताश्वतर, कैवल्यमौक्तिक ही उपनिषदे समजावून सांगितली. प्रत्येक साधकाने गुरुमुखातून उपनिषदे ऐकावीत ही श्री स्वामींची धारणा त्यांच्या शिष्यांना उपयोगी पडली. चांगल्या मुमुक्षूला वेदांताची भरभक्कम बैठक असली पाहिजे व गुरुंच्या सेवेतून त्यांचा कृपाप्रसाद प्राप्त होतो या दोन्ही गोष्टींचा अनुभव श्री. वामनरावांना त्यांच्या जीवनात आला. याच मुक्कामात श्री. वामनरावांना महाराजांकडून "धौती"ची पद्धत शिकविली. योगातील षट्शुद्धी प्रकारात ह्याचा अंतर्भाव होतो. तीन बोटे रुंद, २१ फूट लांब अशी तलम कापडाची पट्टी गिळून ती परत बाहेर काढायची अशी धौतीची क्रिया असते. यामुळे कफ विकार जातो व छाती स्वच्छ रहाते.

श्री प.पू. स्वामी महाराजांनी एकमुखी दत्ताचे स्तवन केले व त्या स्तवनातील ध्यानाप्रमाणे श्री वामनरावांनी एकमुखी दत्तात्रेयांचे चित्र तयार केले. याशिवाय श्री दत्तात्रेयांच्या षोडश अवतारांपैकी सिद्धराज, अत्रिवरद, कालाग्निशमन, अवधूत, आदिगुरु लक्ष्मीनरसिंह अशी सुंदर चित्रे तयार

करून दिली. श्री एकमुखी दत्तात्रेयांचे चित्र काढण्यास सुरुवात करण्यापूर्वी श्री वामनरावांना स्वप्नात गुरू दत्तात्रेयांचे साक्षात् दर्शन झाले व त्याच भावावस्थेत हे प्रासादिक चित्र साकारले. तो दिवस गुरू द्वादशीचा होता. चित्रकलेची ही सार्थकताच होय !

श्री स्वामी महाराजांच्या कृपेने श्री वामनराव यांना परमभक्त श्री गांडा महाराज, गोविंदमहाराज पंडित व श्री सीताराम महाराज यांचा सहवास घडला.

श्री वामनरावांनी १९१७ ते १९२६ पर्यंत बार्शी येथे म्युनिसीपल शाळेत व १९२६ ते १९४२ पर्यंत पुण्याच्या नू.म.वि. येथे ड्रॉईंग शिक्षकाची नोकरी केली. त्यांनी आसेतुहिमाचल सर्व यात्रा केल्या श्री. शंकराचार्य वाडीकर जेरेशास्त्री यांचेसमवेत श्री बद्रीनारायणाची यात्रा यथासांग झाली. सद्गुरू टेंबेस्वामींच्या महासमाधीनंतर योगमार्गातील ज्ञान त्यांना क्षेत्र पुष्कर येथील ब्रह्मानंद स्वामी यांचेकडून मिळाले. सन १९२२ मध्ये ते गोविंद महाराज पंडित यांचेकडून कुंडलीनी शक्ती जागृत करण्यासाठी हटयोगातील श्रेष्ठ दर्जाचा प्राणायाम व कष्टसाध्य क्रिया प्राप्त करून घेतली. या पुढील मार्गदर्शन प.पू. चिन्मयानंद सरस्वती यांचेकडून झाले. हेच प.पू. चिन्मयानंद सरस्वती पुढे श्री लोकनाथतीर्थ ह्या नावाने प्रसिद्ध झाले. ही शक्ती जागृत करण्याचा अधिकार श्री वामनरावजींना मिळाला. पुढे हे श्री लोकनाथतीर्थ महाराज काशीस जाऊन राहिले व तेथेच त्यांचे महानिर्वाण झाले. त्यावेळी श्री वामनराव श्री गुरुमाऊलीजवळच होते. सन १९२६ मध्ये श्री वामनरावजी पुणे येथे वास्तव्यास आले. नारायण पेठेत दोन खोल्यात त्यांची दत्तोपासना, पूजाअर्चा, अनुष्ठान चालत असे. शेकडो लोक साधक म्हणून मार्गदर्शनासाठी येत. श्री वामनरावजींच्या आयुष्यातील सर्वात मोठी, चिरकाल टिकणारी कामगिरी म्हणजे टेंबेस्वामींच्या समग्र वाङ्मयाचे प्रकाशन. श्री सत्य संकल्पाचा दाता श्री भगवान नेहमीच धावून येतो. गोष्टी अकल्पितपणे घडतात. श्री वामनरावजी महाराजांच्या काही शिष्यांच्या मनात पुण्यास एक योगाश्रम स्थापन करावा व श्री गुरुपादुकांची स्थापना करावी असा विचार आला. श्री भगवंताच्या व श्री वासुदेवानंद सरस्वतींच्या इच्छेने "श्री वासुदेवाश्रम" ही पवित्र व नमुनेदार संस्था उभी झाली.

श्री गुळवणी महाराजांचा अमृतोत्सव व सहस्रचंद्रदर्शन शांती हे पुणे येथे मोठ्या थाटात पार पडले व त्यावेळी "योगचुडामणी" ही बहुमोल पदवी सन्मानपूर्वक देण्यात आली. असा हा थोर स्वामिभक्त दि. १५ जानेवारी १९७४ रोजी श्री दत्तचरणी विलीन झाला.

## ६) श्री नाना महाराज तराणेकर (इ.स. १८९६ - १९९३)

श्री नाना महाराजांचा जन्म मध्य प्रदेशात वाघाचा बडोद येथे श्रावण शु. ५ शके १८१८ (इ.स. १८९६) रोजी झाला. त्यांचे वडील श्री शंकरशास्त्री व आई सौ. लक्ष्मीबाई. दोघेही विशुद्ध सात्विक व संस्कार संपन्न व शिस्तप्रिय असे होते. आठव्या वर्षी त्यांची मुंज झाली व गायत्रीमंत्र मिळाला पण अनुग्रह मिळाला नाही. प.पू. नानांचे शिक्षण फक्त चौथीपर्यंत झाले होते. इंदौरच्या वेद शाळेत नरहर शास्त्री यांचेकडे संहिता पठन व महाकाव्यांचा अभ्यास केला. श्री तांबे स्वामी त्यांचे सहाध्यायी होते. मुंज झाल्यावर गुरुप्राप्तीची तळमळ लागली व गुरुदर्शन व्हावे म्हणून श्री गुरुचरित्राची ओवीने सात पारायणे केली. श्री गुरुचरित्राचे पारायण करताना नाना श्री गुरुंच्याकरिता आसन घालून ठेवीत व त्यावर श्री गुरु येऊन बसतात असा त्यांचा विश्वास होता. पारायणांच्या काळात कधी उपवासाचे पदार्थ, कधी दुधावर, कधी तुळशीचे पान भक्षण करून या तपःश्चर्याच्या जोरावर त्यांचे शरीर शुद्ध झाले व तपोबल वाढले. त्या दिवशी श्री वासुदेवानंद सरस्वती ब्रह्मावर्तात चातुर्मासात व्यग्र होते व तेथून ते वायुवेगाने तराणे येथे आले व नानांनी मांडून ठेवलेल्या आसनावर विराजमान झाले. नाना त्या वेळी डोळे मिटून समाधिस्त होते. आसनावरून "बाळ" अशी हाक ऐकू येताच नानांचे हृदय भरून आले व आनंदातिशयाने कंठ भरून आला. त्यावेळी प.पू. स्वामींनी सांगितले की " तू श्री दत्तमहाराजांचे लाडके लेकरू आहेस व म्हणूनच मी ब्रह्मावर्तातून धांवत आलो. तुला जनजागृतीचे मोठे कार्य करावयाचे आहे. सर्व भक्तजनांना सुलभ व सोपा भक्तिमार्ग दाखव. तो दिवस होता दि. २२-११-१९०४ मंगळवार, त्रिपुरीपौर्णिमा, अमृतसिद्धी योग होता. त्यावेळी नानांचे वय केवळ आठ वर्षे तीन महिने सहा दिवस होते. गुरुआज्ञेचे ती. नानांनी आजन्म पालन केले. ते यज्ञकर्म निपुण होते. त्यांची मंत्रशक्तीही जागृत होती. ते अध्यात्म विद्येतही निपुण होते. एका यज्ञप्रसंगी अग्नी न मिळाल्याने त्यांनी आपल्या दिव्य दृष्टीने वैश्वानर प्रकट केला होता. त्यांना भक्तिरस असलेल्या भजनात अतीव गोडी होती. दया, क्षमा व शांती त्यांच्या रोमारोमांत भिनलेली असून कर्म, उपासना, ज्ञान, भक्ती व वैराग्य हे त्यांचे पंचप्राण होते. त्यांनी अनेक तीर्थयात्रा केल्या होत्या व त्यावेळी अनेक देवदेवतांची दर्शने घडून साक्षात्कार झाले होते. फार कठीण व्रते आचरून त्यांनी नर्मदा प्रदक्षिणा केली होती.श्री प.पू. स्वामीमहाराजांप्रमाणे ती. नानांचा संसारही अल्पकाळ झाला होता. त्यांना एक पुत्ररत्न झाले व त्यांची पत्नी देवाघरी गेली. घरात दुसरे कोणीच बाईमाणूस नसल्याने त्यांनी द्वितीय विवाह केला. द्वितीय विवाहाला तीन वर्षे होताच एक कन्यारत्न देऊन द्वितीय पत्नीपण प्रभूच्या पायाशी निघून गेली. संसाराची गर्ता पुरेशी समजल्याने त्यांनी त्या मोहाला परत जवळ केले नाही. दोन लहान बंधू, पुत्र व कन्या यांना ती नानांच सांभाळत. मुलांवर ते कधीही रागावले नाहीत.

प.पू. नानांच्या पित्याच्या निधनानंतर पौरोहित्य कर्मात अडचणी येत तेव्हा श्री प.पू. स्वामी महाराज स्वतः पूर्व रात्री प.पू. नानांचे स्वप्नात येऊन त्यांना मंत्र प्रयोग समजावून सांगत असत व गुरुंच्या या मार्गदर्शनामुळे योग्य ती कार्यसिद्धी होत असे. श्री गुरु महाराज ज्ञानाच्या बाबतीत आपल्या शिष्याची कशी काळजी घेतात त्याचे हे जिवंत उदाहरण आहे.

प.पू. नानांच्या दत्तमंदिरात वेगवेगळ्या प्रकारचे तापसी येत असत. एकदा वामनबुवा नावाचे ओंकारेश्वराचे एक तापसी आले होते. एका रात्री प.पू. नानांना जाग आली तेव्हा श्री वामनबुवांच्या श्वासोच्छ्वासातून "शिवाहम शिवाहम" असा अनाहत नाद ऐकू आला. असा अजपाजप करणारा कोणी साधारण तापसी असणार नाही हे समजून दुसरे दिवशी प.पू. नानांनी श्री वामनबुवांची खूप विनंती केल्यावर आपण योगमार्गी असल्याचे सांगून अष्टांग योगाची माहिती देऊन तो मार्ग प्रगट केला तर साध्य होत नाही म्हणून त्याची वाच्यता कोठेही न करण्यास सांगितले. नंतर रोज रात्री दोन वाजल्यानंतर वामनबुवांनी प.पू. नानांकडून सर्व साधना करून घेतली व श्री वामनबुवा ओंकारेश्वरी परतले. नंतर काही दिवसांनंतर प.पू. नानांनी ओंकारेश्वरी जाऊन श्री वामनबुवांना भेटण्याचा अटोकाट प्रयत्न केला. खूप प्रयत्नानंतर ओंकारेश्वरी वामनबुवा नावाचे तेथे कोणीच नसल्याने श्री. प.पू. स्वामी महाराजच वामनबुवा असे नाव

घेऊन योग मार्गाची शिकवण देऊन गेले अशी खात्री पटली. प.पू. स्वामी महाराजांचे प.पू. नानांच्यावर फार प्रेम होते. प.पू. नानांच्या अंतर्यामी अजपाजप अखंड चालू असे. "या निशा सर्व भूतानां तस्यां जागृती संयमी" या वचनाला जागून पुढे रात्री एकांतात नाना योगाचा अभ्यास व चिंतन करीत असत. प.पू. नानांचे स्वरूप विश्व व्यापक होते. ते कोणत्याही संत महात्म्याचे व देवाचे रूप धारण करून भक्तांना दर्शन देत असत. जीवनांत त्यांनी अनंत किमया केल्या व सामान्यांना भक्तिमार्गास लावले. प.पू. नानांचे खास वैशिष्ट्य म्हणजे सात्विक, राजस व तामस यांचा संबंध अन्न, यज्ञ व दान यांच्याशी जोडला. अशा या महान समर्पित स्वामीभक्ताची प्राणज्योत १६ एप्रिल १९९३ (वैशाख कृष्ण दशमी) दिवशी अनंतात विलीन झाली. त्यांचे भक्तगण मध्य-प्रदेश, महाराष्ट्र, गुजराथ येथे विखुरलेले आहेत. प. पू. वासुदेवानंद सरस्वती लिखित "करुणा-त्रिपदी" ह्या भक्तीप्रद प्रार्थनेचा प.पू. नाना महाराजांनी सर्वदूर प्रसार केला आहे.

याशिवाय प.पू. वासुदेवानंद सरस्वती यांचे श्री गोविंद महाराज पंडित, सिप्री, श्री. पेंढारकर स्वामी कांदोली (गोवा), श्री दत्तगिरिबुवा ठाकूर, खानोली, श्री चिंतामण विश्वनाथ जोशी असे अनेक अधिकारी अनुग्रहीत आहेत त्यांची संख्या १४०-१४५ पर्यंत होईल. या सर्व भाग्यवंतांची प्रभावळ म्हणजे प.पू. वासुदेवानंद सरस्वतींच्या जीवनकार्याचे विविध पैलूच जे पुढील पिढीतील साधकांना मार्गदर्शक ठरतील.

शां. गो. पोतदार
सदाशिव पेठ, गोपाळगायन समाज रस्ता,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

## हे चिन्मय चिद्‌घन स्वामिन् !

हे चिन्मय चिद्‌घन स्वामिन् –
तव अलौकिक अवतार,
चरणीं तव विनीतभावे
शत-शतदा नमस्कार !

पुण्यशील मायपित्याच्या
उदरीं तुम्हि जन्मा आला,
ते सुकृत पूर्वपिढ्यांचें
घरकुलांत येइ फळाला !

सत्तेज विरागी मुद्रा
ती भस्मविलेपित कांती,
संन्यस्त वृत्ति शोभविते
देहावर भगवी छाटी !

झळकतसे सर्वांगावर
अग्नीसम उज्ज्वल दीप्ति,
आचरिला संन्यासाश्रम
यतिदण्ड घेतला हातीं !

प्रापंचिक, मनीं विरक्ति
घेऊनि परिव्राजक-दीक्षा,
धर्मशील घरीं माधुकरी
निर्वाहापुरती भिक्षा !

साक्षात् दत्तगुरु देती
प्रणवमंत्र स्वयें स्वप्नांत,
भद्रंकर गुरुभक्तीची
दिव्यानुभूति चित्तांत !

अवधूत चिंतनीं मग्न –
तव परिभ्रमण नित पायीं,
आचारधर्म रुजविला
जनहितार्थ ठायींठायीं !

सामर्थ्ये प्रखर तपाच्या –
बहुविधा लाभल्या सिद्धि,
जन केले दुःखविमुक्त
शमवुनिया दारुक व्याधी !

दशदिशांत वितरे कीर्ति
संकटीं किती तारियले,
चित्तशुद्ध भाविक भोळे
जन धन्य दर्शनें झाले !

नारींना सुबोध केला –
'पति हाचि श्रीगुरु तुमचा'
पतिसेवा हेचि महाव्रत
आजीवन आचरण्याचा !

रसवन्ती प्रतिभाशाली –
तुम्हि आळविली गुरुभक्ति,
दत्त दत्तमय चिद्‌वृत्ति
दत्तरूप झाला अन्तीं !

हे चिन्मय चिद्‌घन स्वामिन् –
हे ब्रह्मनिष्ठ सिद्ध तपस्वी
तुम्हि वैदिक धर्म सनातन
ठेविला नित्य तेजस्वी !!

**विश्वनाथ जोशी**
२ / श्रीराम अपार्टमेंट - बी २१,
श्रीराम मंदिरासमोर, इचलकरंजी.

**सदा संतापाशी जावें । त्यांचे जवळी बैसावें ॥**
**उपदेश ते न देती । तरी ऐकाव्या त्या गोष्टी ॥**
**तेचि उपदेश होती । त्यांही कष्ट नष्ट होती ॥**
**'वासुदेव' म्हणजे संत । संगें करीती पसंत ॥१॥**



# श्री. वासुदेवानंदसरस्वती - टेंबे स्वामी यांचे समकालीन संत

**सौ. विजया प्रभुणे**

*बी.ए.बी.एड. रा. भा. पंडित हिंगणे महिला श्रम, कॅम्प एज्युकेशन सोसायटी. काही काळ अध्यापन, राष्ट्रभाषा सभा मध्ये १० वर्षे अध्यापन. अनेक मासिक, वर्तमानपत्रांतून लेखन. दैनिक प्रभात १९८९ ते ९९, ९६-९७ संतचरित्रे, लेखमाला यशस्वी. ६०० च्या वर लेख प्रकाशित, ब्रह्मचैतन्य, स्वरूपानंद, गुरुदेवरानडे, गुलाबराव महाराज, प्रज्ञानानंद सरस्वती या संतांवर कल्याणीमध्ये लेखन.*

*दत्त दत्त ऐसे लागले ध्यान । हरपले मन झाले उन्मन*

मी तू पणाची झाली बोळवण - कृपाकटाक्षही दत्ताचा लाभावा आत्मचिंतनात दत्तही रंगावा । एकरूप व्हावे देव आणि भक्त - इतकी थोर योग्यता असलेले श्री टेंबे स्वामी म्हणजेच मूर्तीमंत वैराग्य, हृदयी प्रेम सागर, प्रेमस्वरूपा भक्तीचा आदर्श, अत्यन्त प्रखर कर्मनिष्ठा, थोर तत्त्वज्ञ अत्यंतिक विशुद्ध असे आचरण असलेले महात्मा होते.

## निर्मलं च विशुद्धंच मानसं देवमंदिरम्

त्याचे साक्षात् उदाहरण - पत्नीच्या मृत्युनंतर सद्गुरूकडून विधिवत् दंड ग्रहण करून संन्यासाश्रम स्वीकारला. त्यांची अपरिग्रह वृत्ती आत्यंतिक पराकोटीची होती. त्यांच्या संग्रही फक्त दोन लंगोट्या, दोन छाट्या, एक लाकडी कमंडलू, हाती संन्याशाचा दंड एवढ्याच वस्तु होत्या. अनवाणी पायाने भारतभ्रमण करून सामान्य प्रापंचिकांना सदाचरण, निमळ कर्माचरण, प्रेमस्वरूपा भक्ती शिकवण्यासाठी हा लोककल्याणकारी संतश्रेष्ठ झटत होता. पावित्र्याचा महामेरू, वैराग्याचा परमोत्कर्ष असल्याने त्यांना वाचासिद्धी ही आपोआपच प्राप्त झाली.

पिशाचबाधा झालेले, समंधाने पछाडलेले कित्येक स्त्री पुरुष त्यांच्या समोर येत आणि सूर्यापुढे अंधःकाराने पळूनच जावे तशी ती पिशाचे पळून जात आणि दुःखी त्रस्त जीव दुःखमुक्त होऊन त्यांना दुवा देत. मूर्तिमंत प्रखर वैराग्यासमोर अतृप्त आत्मे तत्काळ पळून जात. पीडित लोक शांतीने आणि समाधानाने त्यांच्या चरणी लोळण घेऊन मूकपणे आरती करू लागत.

ओवाळू आरती वासुदेवानंद सरस्वती तव दर्शने सर्व विघ्ने लया जाती । त्रैमूर्ति अवतार मनोहर अशा दत्तात्रेय यांची स्वामींवर किती अपार प्रीती होती ही दाखवणारी ही कथा वाचनीय आहे.

संन्यासी स्वामी एकदा पाच घरी भिक्षा मागून आपल्या कुटीत आले. पाहतात तो चौरंगावरील दत्तमूर्ति गायब. स्वामी चकीत झाले. तोच त्यांच्या कानी भगवान् दत्तात्रेयांची वाणी ऐकू आली. - तो दिवस नरकचतुर्दशीचा आदला दिवस ! दत्तमहाराज म्हणाले उद्या नरकचतुर्दशी मला गारपाण्याने स्नान नको. अभ्यंगस्नानास गरम पाणीच हवे. म्हणून मी रुसून नर्मदा नदीत बुडी मारून बसलो आहे. स्वामी आल्या पावली परत फिरून नर्मदातटाकी गेले आणि त्यांनी नर्मदेत उडी मारली. पहातात तो पाण्याचा अंतर्भाग अत्यंत प्रकाशमय झालेला त्यात दत्तमूर्ति सस्मित त्यांच्याकडे बघतेय. स्वामींनी ती छातीशी धरून ते वर आले. आम्ही संन्यासी ! आसनी स्पर्श आम्हाला वर्ज्य ! मग गरम पाणी आणू कोठून ? या चिंतेत असताना लोक जमले. गरम पाणी आणले आणि यथासांग प्रतिष्ठापना, स्नान, पूजा आरती सर्वकाही यथासांग झाले. श्री टेंबे स्वामींच्या नेत्रात प्रेमाश्रुंनी दाटी केली आणि त्यांच्या तोंडून उत्स्फूर्त भक्तीगीत बाहेर पडले.

देव भक्तांची भांडणे । पराभक्तीचे ते ठाणे । वासु म्हणे हा विनोद । देतो दत्ता परमानंदा । - भक्तीचा हा अविष्कार श्रद्धामय अंतःकरण हलवतो.

## १) श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज

रामनाम स्मरण भक्तीने सामान्यांची मने आणि मन भरून आणि भारून टाकणारा हा थोर नाममहर्षी सर्वांनाच कळकळीने सांगत होता - सोडू नका नाम । धरू नका काम । नाही नाही नेम आयुष्याचा । मानू नका नाम साधना लहान । तुम्हा माझी आण जीवेभावे । श्री महाराजांचे एक मित्र थोर संत श्री शान्ताश्रम स्वामी त्यांच्याकडे आले आणि म्हणाले - अहो, महाराज रोज शेकडो लोक गंगा स्नान करतात. गंगा मैय्या पापक्षालीनी आहे मग गंगेत स्नान करणारे पुण्यवानच ना?

श्री महाराज म्हणाले - आपण काशीतच आहोत. चल तुला गंमत दाखवतो. श्री महाराज स्वतः वैरागी बनले आणि शांताश्रम स्वामींना अंगाला चिंध्याचांध्या गुंडाळून महारोग्याचे रूप देवून ते गंगेच्या काठावर बसले.

श्री महाराज उभे राहून ओरडू लागले लोक हो हा माझा मित्र महारोगाने पीडित आहे. गंगास्नानाने पवित्र झालेल्या माणसाने जर याला अलिंगन दिले तर याचा रोग दूर होईल, असे आमच्या गुरुंनी सांगितले आहे. आहे कोणी तयार? काही लोकांनी दुर्लक्ष केले. काही लोक पुढे आले. श्री महाराज म्हणाले - थांबा, पुढचे पूर्ण ऐकून जो याला मिठी मारेल तो मात्र मरेल. सगळेच लोक मागे सरले. एवढ्यात एक तगडा सावळा तरुण गंगास्नान करून आला त्यांनी श्री महाराजांचे ओरडून बोलणे ऐकले आणि कसलाही विचार न करता त्या महारोग्याला मिठी मारली . रोगी माणसाला रोगमुक्त करण्यासाठी मरण पत्करावे लागले तरी त्याची पर्वा केली नाही. श्री महाराज अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी त्याला छातीशी धरले. अन् आशिर्वाद दिला - तू खरा शुद्ध पुण्यशील. 'रामराय तुझे कल्याण करतील ! हा माझा तुला आशिर्वाद आहे. संत कबीरदास म्हणतात, न्हाये धोये क्या भया । मनका मैल न जाय । मीन सदा जलमें रहे बूबास कभी न जाय ।

## २) श्री अक्कलकोट स्वामी समर्थ

कठोर तपश्चरण करून एका साधुला एक सिद्धी प्राप्त झाली. काही विशिष्ट मंत्र म्हणताच आकाशातून सोन्याच्या छोट्या छोट्या तुकड्यांचा वर्षाव होवू लागे. त्या मंत्राचा उपयोग करून तो थोडे थोडे सोने जमवू लागला. मुक्ती प्राप्तीच्या साधनेत सिद्धी हा अडथळा असतो. आध्यात्मिक प्रगती ऐवजी अधोगती अगदी जलदरित्या होते. तसेच या साधुचे झाले. सोने तयार करणारा किमयागार साधु म्हणून त्यांची सर्वत्र प्रसिद्धी झाली. विलासी ऐषारामी जीवन जगू लागला. मुक्तीची प्राप्ती हे ध्येय तो विसरला. एकदा गोदावरी नदी तीरावर यानी या मंत्रसिद्धीचा प्रयोग करून सोन्याचा वर्षाव केला. शेकडो लोक हा चमत्कार पहाण्यास जमले होते. सारे लोक त्यांचा जयजयकार करू लागले. त्या गर्दीत वामनराव वांबुरकर हा स्वामी समर्थांचा एकनिष्ठ शिष्य हजर होता. त्याला या साधुची अधोगती सहन झाली नाही. वामनराव पुढे येवून म्हणाले अरे मित्रा सोन्याच्या मागे लागून सोन्यासारखे आयुष्य उध्वस्त करू नकोस. अरे जीवाचे अंतीम कल्याण साधावे म्हणून माझ्या सद्गुरूला स्वामी समर्थांना शरण जा. परंतु उपदेशोहि मुर्खाणां प्रकोपाय न शांतये' - वामनरावांचे बोलणे साधूला पटले तर नाहीच उलट तो संतापला आणि मोठा धोंडा घेवून वामनशास्त्रांच्या डोक्यात घालण्यास धावून गेला. एवढ्यात स्वामी समर्थांनी लीला केली. कसा काय कोण जाणे, धोंडा हातून निसटला. साधु उताणा पडून त्याच्याच छातीवर पडून तो बेशुद्ध झाला. वैऱ्यावरही दया करणारे वांबुरकर वामनशास्त्री पुढे धावले, पाणी आणून मुखावर शिंपडले आणि वारा घालू लागले. थोड्या वेळाने साधु शुद्धीवर आला आणि वामनशास्त्र्यांचे पाय धरले आणि म्हणू लागला, मी चुकलो. मला आता अक्कलकोटस्वामी समर्थांच्या चरणावर घाला. मला क्षमा मागू दे. ते दोघेही अक्कलकोटला येवून स्वामींच्या समोर गेले आणि स्वामी चरणी साष्टांग दंडवत घातले. काय रे माझ्या शिष्याच्या डोक्यात धोंडा घालतोस? काय हवे तुला? सोनेच ना ! तिकडे त्या वटवृक्षाकडे बघ. साधूने तिकडे बघितले तो काय आश्चर्य ! सारा वटवृक्षच सोन्याचा होता. सोन्याची पाने सळसळत होती. पारंब्या, खोड, मुळ्या सारेच काही सोन्याचे होते. आसपासचा संपूर्ण भूभागही सुवर्णमय होता. साधुच्या तोंडून शब्द फुटेना तो पुनः पुनः स्वामी चरणी लोळण घेवू लागला. स्वामींनी त्याच्या अंगावर एक लंगोटी आणि मृगाजीनाचा गुंडाळा फेकला आणि म्हणाले जा पलीकडील डोंगरावर जाऊन उग्र तप कर. त्याने तुझा उद्धार होईल. तो साधु हात जोडून स्वामींची स्तुती करू लागला.

*स्वामी समर्था तू आहे खरा समर्थ ।*
*आचरण तुझा जगण्या करी मला समर्थ ।*

## ३) श्री संतश्रेष्ठ प्रज्ञाचक्षु गुलाबराव महाराज

संस्कृत, मराठी, हिंदी आदि भाषांमध्ये विविध विषयांवर ग्रंथलेखन करणारा हा महात्मा जन्मांध होता पण अंतरीचा ज्ञानदिवा इतका प्रज्वलित होता की त्यांचे लेखन पाहून मन थक्क होते. शेकड्याहून अधिक ग्रंथ त्यांनी लिहिले. ते स्वतःला श्रीकृष्णाची प्रिया मानत. स्त्रीवेष करून मधुरा भक्तीने भगवान श्रीकृष्णाचे पती समजून प्रियाराधन करीत. ते स्वतःला ज्ञानेश्वरकन्यका समजत. ज्ञानेश्वर माऊलीवर त्यांची अपार श्रद्धा होती. श्री गुलाबराव महाराज एकदा एका श्रीमंत सावकाराबरोबर ज्ञानेश्वर माऊलीच्या समाधीच्या महापूजेसाठी आळंदीला गेले. समाधीची पंचामृती पूजा सावकार मोठ्या श्रद्धेने करू लागला. दूध, तुप, दही, मध - समाधीवर चोळू लागला. त्यांच्या हातातील सोन्याचे कडे समाधीवर घासू लागले. त्याचा खर्ऽऽ खर्र आवाज येवू लागला.

त्या सावकाराच्या बरोबर असलेल्या मंडळींतून श्री गुलाबराव पुढे आले आणि सावकाराचा हात धरून म्हणाले अरे सावकाश ! पूजा करताना तेवढे कडे काढून ठेव. माझ्या माऊलीच्या अंगावर घासले जात आहे. माझ्या माऊलीला त्याचा त्रास होत असेल रे ! ज्ञानेश्वर माऊलीवरील केवढे हे अलोट प्रेम. आणि समाधीवरील खरखर फक्त कानाने टिपून भांबवणारे गुलाबराव महाराज म्हणजे जणु प्रेमाची गंगाच होते.

## ४) शेगांवचे गजानन महाराज

वऱ्हाड प्रांतातील हा ज्ञानहिरा, योगीयांचा राणा, 'गण गण गणात बोते' या भजनात रंगणारा भक्तोत्तम ! एक समर्थ सिद्धयोगी ! भक्त पीतांबर यांने कोंडोळी गावातून धावा करताच यौगिक बळावर तेथे जाऊन वठलेल्या आम्रवृक्षाला त्यांनी पालवी फोडली आणि संकटात सापडलेल्या आणि गावकऱ्यांनी धमकी देवून वेढलेल्या भक्ताचे संरक्षण केले. विशुद्ध आचरण असणारे कर्मकांडाचे कट्टर पालनकर्ते श्री टेंबे स्वामी शेगावला आपल्या भेटीला येत आहेत हे समजताच गजानन महाराजांची प्रेमपूर्ण गडबड उडाली. ते शिष्यांना म्हणाले - अरे माझा मित्र शेगावी येत आहे. त्याचे सोवळे ओवळे फार कडक. अंगण सारे स्वच्छ ठेवा. चिंध्या कागद घाण कचरा वाटेत नको. तो माझा मित्र कर्ममार्गीय कर्माचा सागर आहे. टेंबेस्वामी आले. गजाननांच्या खोलीच्या उंबऱ्यातच उभे राहिले. त्यावेळी गजानन महाराज पलंगावर बसून टिचक्या वाजवत भजन करत होते. वासुदेवानंद सरस्वतींना पाहताच टिचक्या थांबल्या. प्रेमपूर्ण नजरेने आणि सुहास्य वदनाने त्यांनी एकमेकांकडे पाहिले. श्री समर्थ गजानन महाराजांनी मान तुकविली आणि टेंबे स्वामी तेथूनच आपल्या दंडासहित परत फिरले.

गजानन महाराजांचा शिष्य बाळाभाऊ चकित झाला आणि महाराजांना म्हणाला, 'महाराज ही कसली भेट? आले काय गेले काय?'

गजानन महाराज हसून म्हणाले, ' बाळाभाऊ, अरे मी मौनातच संवाद केला. ये हृदयीचे ते हृदी घातले अंतरीच्या हितगुजाला शब्दांची काय आवश्यकता आहे रे? दासगणु विरचित गजाननविजय ग्रंथात त्यांचे काय सुंदर वर्णन आहे पहा -

एकमेकासी पाहता दोघे हसले तत्वता । हर्ष उभयतांच्या चित्ता झाला होता अनिवार । एक कर्माचा सागर । एक योग योगेश्वर । एक मोगरा सुंदर । एक तरु गुलाबाचा । एक साक्षात् पशुपती । एक शेषशायी नारायण -

## ५) शिर्डीचे साईबाबा

श्री माधवराव देशपांडे हे साईबाबांचे निकटवर्ती शिष्य होते. एकदा त्यांना शिर्डी येथे सर्पदंश झाला. लोक मोठ्या श्रद्धेने त्यांना घेऊन बाबांच्या मशिदीजवळ गेले. ते सर्व मशिदीच्या पायऱ्या चढू लागणार तोच बाबा आतूनच ओरडले. अंदरमत आओ, भटुरड्या वर चढू नकोस आधी खाली उतर. सर्पदंशाने आधीच खचलेले माधवराव आणखीनच घाबरले.

बाबा रागवले मग आपल्याला आता कोण वाचवणार? आता आपला मृत्यू अटळ असेच त्यांना वाटले. पण बाबांचे गूढ सांकेतिक बोलणे माधवरावांसाठी नसून ती आज्ञा त्या सापाला आणि त्याच्या विषाला होती. मशिदीत येऊन माधवरावांनी आत येऊन साईबाबांच्या चरणावर मस्तक ठेवताच प्रेमभराने थोपटत म्हणाले - बाळा घाबरू नकोस ! तुला काही होणार नाही. असाच घरी जा. फक्त रात्री झोपू नकोस. जागा राहा. दुसरे दिवशी सर्पाचे विष पूर्णपणे उतरले. माधवराव खडखडीत बरे झाले.

जाके राखे साई । बाल न बाका होय ॥

याचे प्रत्यंतर आले.

## ६) श्री संत यशवंतराव महाराज - देव मामलेदार

आपल्या मामलेदार पदाची जबाबदारी ते व्यवस्थितरित्या पार पाडीत. एकदा रात्री झोपले असता त्यांना दृष्टांत झाला तुझ्या बिछान्यात शाळीग्राम आहे तो घे आणि अक्कलकोटला जाऊन स्वामी समर्थांचा अनुग्रह घे ! देव महाराज तत्काळ शाळीग्राम घेऊन अक्कलकोटला गेले आणि स्वामी समर्थांचे अनुग्रहीत झाले. तेव्हापासून काय चमत्कार तुझे रूप चित्ती राहो मुखी तुझे नाम । देह प्रपंचाचा दास सुखे करो काम। अशी त्यांची अवस्था झाली. समर्थांच्या अनुग्रहाने हिऱ्याला सोन्याचे कोंदण मिळाले. गुरुकृपेचा परिसस्पर्श होताच ते ईश्वरमय झाले. न बोलावता शेकडो अनुयायी झाले.

एकदा देव महाराजांनी मामलेदार असूनही वरिष्ठांच्या संमतीशिवाय गोरगरिबांकरिता धान्याची कोठारे छुटविली. प्रांत साहेब, कलेक्टर आदि वरिष्ठ अधिकारी धावत आले. अटक वॉरंट निघाले तरी देव मामलेदार शांतच. त्यांचे शिष्य व गावकरी म्हणू लागले, 'धान्याच्या किमतीच्या रकमेचा भरणा आम्ही सर्वजण मिळून करतो पण देव महाराजांना हात लावू नका. केवढे हे सद्गुरुप्रेम. वरिष्ठ अधिकाऱ्यांनी दुसरे दिवशी कोठार खोलले तो काय आश्चर्य सर्व धान्याची पोती जशीच्या तशी ! हे आधुनिक संत दामाजीच नव्हे काय?

महाराष्ट्र हा संतांचे माहेरघर. आपापल्या वेगवेगळ्या मार्गाने स्वतेजाने प्रकाशमान होणारे संत एकमुखाने आपल्याला सांगतात -

*असतो मा सत् गमय ।*
*तमसो मा ज्योतिर्गमय ।*
*मृत्योर्मा अमृतं गमय ।*
*ॐ शांतिः शांतिः शांतिः ।*

**सौ. विजया प्रभुणे**
१/१५ ब, श्रीमान सोसायटी परिसर,
पुणे पीपल्स बँकेसमोरील लेन, कर्वेनगर, पुणे ४११०५२.

---

**मैत्रीने कोणाते मैत्रीने सर्वात । सरस्से वर्ते तोचि संत ।**
**ममता अहंता सोडी, लोकांवर । कृपा करी धीर धरी क्षमा ।**
**दैवलासे हारिख सम सुख दुःख । मानी तेचि चोख दत्तभक्त ।**
**उदासीन दक्ष शुची अनपेक्ष । शत्रुमित्र पक्ष न लक्षी जो ।**
**हर्षामर्ष भीती न ठेवी जो चित्ती । उदासीन वृत्ती राखी नित्य ।**

---



# श्री. प. प. वासुदेवानंद सरस्वती महाराजांच्या वाङ्मयातून प्रगटलेली सिद्ध प्रज्ञा

**वासुदेव गोविंद चोरघडे**

*एम.ए. भाग १, संस्कृत व दर्शन शास्त्राचे अध्ययन, हिंदी भाषेच्या प्राज्ञ आदि परिक्षा उत्तीर्ण. ज्येष्ठ लेखाधिकारी (डाक लेखा) निवृत्त ११ पुस्तके प्रकाशित, २५ ग्रंथांना प्रस्तावना, अनेक पुस्तकांची परिक्षणे. नियतकालिक व वर्तमानपत्रांतून अध्यात्म व इतर विषयांवर विपुल लेखन. आकाशवाणी नागपूर केन्द्रावर अनेक व्याख्याने. आध्यात्मिक ग्रंथांवर नागपूर, बडोदा, पवनार आदि ठिकाणी अध्यात्मिक विषयांवर भाषणे. परिसंवाद, चर्चाशिबीरे यांतून सहभाग, नियमित प्रवचन सेवा. अध्यक्ष भागवत सेवासमिती, अध्यक्ष अ. भा. केन्द्रीय निवृत्त कर्मचारी संघटना, अध्यक्ष ज्येष्ठ नागरीक मंडळ (प.) नागपूर. विविध संस्थांशी संबंध.*

पूर्वदेही योग संपादन करणाऱ्या योग्याच्या प्राप्त देहातील स्थितीचे ज्ञानेश्वर वर्णन करतात. त्यांची बालवयातच आत्मज्ञानाची पहाट होते. सूर्योदय होण्यापूर्वी पुढे जसा प्रकाश प्रगट होतो त्याप्रमाणे योग्य दशेची वाट न पाहता बालवयातच त्यांना सर्वज्ञतेने वरलेले असते. जन्मसिद्ध प्रज्ञेच्या लाभाने त्यांचे मनच अनेक ग्रंथांना प्रसवित असते. इतर शास्त्रेही त्यांच्या मुखातून सहजतेने बाहेर पडतात.

*सिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभे ।*
*मनचि सारस्वते दुभे । मग सकळ शास्त्रे स्वयंभे ।*
*निघती मुखे (ज्ञानेश्वरी ६-४५४)*

अशी जन्मसिद्ध प्रज्ञा श्री. प. प. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांना लाभली होती, असा प्रत्यय त्यांच्या कार्यकाळात, केवळ सामान्यांनाच नव्हे, तर तो आध्यात्मिक क्षेत्रातील अधिकारी व्यक्तींनाही आला होता. आजही त्यांच्या वाङ्मयातून अभ्यासकांना त्याची प्रचीति आल्याशिवाय राहणार नाही.

## सिद्ध प्रज्ञेचेनि लाभे

'श्री स्वामी महाराज हे आपले आद्य शंकराचार्यच आहेत व त्यांच्याप्रमाणेच सर्वगुणसंपन्न असून त्यांचे धर्मसंस्थापनेचे कार्य करीत आहेत', या आशयाचे उद्‌गार शृंगेरी मठाधीश श्री. प. प. सच्चिदानंद शिवाभिनव नृसिंह भारती महाराजांनी शृंगेरी मठातील भेटीचे प्रसंगी काढल्याचे स्वामी महाराजांच्या सर्वच चरित्रग्रंथांत विस्ताराने आले आहे. भेटीची ही घटना १९०७ च्या आसपासची आहे. त्यानंतर श्रीस्वामी महाराजांचे निर्याणानंतर केवळ सात आठ दिवसांनी ह.भ.प. श्री. ल. रा. पांगारकर ह्यांनी २/७/१९१४ रोजी 'मुमुक्षू'त हा लेख लिहिला होता. त्यात ते म्हणतात, 'स्वामींच्या दर्शनाचा लाभ आम्हाला नरसोबाच्या वाडीला झाला होता. स्वामींची योग्यता फार मोठी होती. स्वाध्यायव्यसनरूप वाङ्मयतप स्वामींचे अतिशय होते. स्वामींचे वेदाध्ययन बालपणीच झाले होते व तेव्हापासून वेदाने स्वामींचे तोंड कधीच सोडले नाही.

*जरी कोणी करी पुसणे । तरी होआवे ऐसे बोलणे ।*
*नातरी आवर्तणे । निगम की नाम ।*
*ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठती वाग्भुवनी ।*
*केली जैसी वसनी । ब्रह्मशाळा (ज्ञानेश्वरी १७-२२१/२२)*

हे बोलणे वासुदेवानंद सरस्वतींना पूर्णपणे लागू पडते. त्यांच्यासारखा तपस्वी सिद्ध, शुभाचरणी, स्वाध्यायनिरत आणि दत्तभक्त असा दिव्य ब्राह्मण या काळी दुसरा आढळणे कठीण. स्वामी महाराजांसारखा एक धर्मात्मा धर्मप्रसाराचे जेवढे काम करतो, तेवढे हजारो वक्त्यांस मिळूनही करता येणार नाही.' ही त्यांची महाराजांच्या दिव्य प्रज्ञेसंबधी त्यांच्याच कार्यकाळातील ही केवळ दोन उदाहरणे दिली आहेत.

## मनचि सारस्वते दुभे

स्वामींची ग्रंथरूप यशःकाया आपल्याला आज उपलब्ध आहे. त्यातून त्यांच्या सिद्ध प्रज्ञेचे दर्शन होते व संसारत्रस्त जीवांना मार्गदर्शनही लाभते. आपल्या देहपातानंतर साधकांना येणाऱ्या संशयांचे निराकरण कसे होईल या पृच्छेच्या उत्तरात दिनांक ८ फेब्रुवारी १९०२ रोजी श्री. उकीडवे यांना सारंगपुराहून पाठवलेले पत्रच उपलब्ध आहे. त्यात ते म्हणतात, - 'हा देह तिकडे येण्याचा इत्यादि इच्छा करण्याची गरज नाही. क्षणभंगुर देहापेक्षा यशःकीर्ति राहणार नाही काय ?

*जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः*
*नास्ति तेषां यशःकाये जरामरणजं भयम्*

जरी यशःकायाने शंकासमाधान व भाषणादी कसे घडले, असे म्हणणे असेल तर प्राकृत लोकांकरिता रसभरती दत्तमहात्म्य प्रसिद्ध झाले आहे. शिवाय संस्कृत प्राकृत अनेक ग्रंथांची निर्मिती झाली आहे. त्याने शंकासमाधान होईल. हे पत्र जाता सविस्तर उत्तर यावे. क. नारायण."

## ग्रंथनिर्मितीची अलौकिक प्रक्रिया

स्वामी महाराजांच्या हातून प्रचंड अशी संस्कृत व प्राकृत ग्रंथरचना झाली आहे. ही रचना श्रीदत्तगुरुच्या आज्ञेने व कृपेने झाली आहे, असे ते म्हणतात. त्यात पुराणग्रंथ, भाष्य, चूर्णिका, महात्म्यग्रंथ, चंपू, लहरीकाव्य, स्तोत्रे, अभंग, संवादात्मक रचना, कीर्तनाख्याने, दत्तषोडशावतार कथा, नर्मदा लहरी, कृष्णा लहरी यासारखी लोकमातांवर लिहिलेली स्तोत्रे, प्रकरणग्रंथस्वरूप वेदांत स्तोत्रे, याशिवाय साधकांना लिहून दिलेले मंत्र, स्तोत्रे असा प्रचंड विस्तार आहे. सापेक्षाने अपरिग्रहाचे व्रत आणि संन्यास धर्माचा आदर्श ठेवीत असताना अशी प्रचंड ग्रंथनिर्मिती होणे हाच चमत्कार आहे. प्रत्यक्ष ग्रंथातील आशय आणि त्यातील संदर्भ पाहिल्यावर या दिव्य

अभिव्यक्तीच्या चमत्काराची खात्री झाल्याशिवाय राहणार नाही.

माणगावी असताना शके १८०६ साली दत्तप्रभूंची आज्ञा झाली, की संस्कृत भाषेत गुरूचरित्र लिही. 'संस्कृत येत नाही म्हणून काळजी नको, दौत लेखणी घेऊन लिहिण्याची तयारी कर की सर्वकाही सुचत जाईल' अशी ईश्वरी आज्ञा होताच अल्पावधीत तेवीस अध्यायाचा ग्रंथ तयार होवून प्राकृत गुरूचरित्रातला सर्व विषय त्यात आला आहे. आणि इतकी कामगिरी झाल्यावर 'इयं द्विसाहस्त्री' असा शब्द ऐकू आला. हेच ते द्विसाहस्त्री गुरूचरित्र. यावर पुढे पंधरा वर्षांनी द्वारका मुक्कामी टीका लिहिली गेली. 'हातात मूळ ग्रंथ नसताना श्रींच्या प्रसादाने ही टीका झाली आहे. रामोहरि करणाऱ्या हाताने हा ग्रंथ लिहिणे शक्य नाही, करिता हा ईश्वरी प्रसाद समजावा' असे स्वामींचे त्यासंबंधी उकीडवे यांना पाठविलेल्या पत्रात उद्‌गार आहेत. या टीकेतील न्याय कौमुदी, मीमांसाग्रंथ, अनेक स्मृति ग्रंथ यातील संदर्भ पाहिल्यावर स्वामींच्या जन्मसिद्ध प्रज्ञेची प्रचीति आल्याखेरीज राहणार नाही. पुढे ब्रह्मावर्त मुक्कामी शके १८९२ साली ३५०० संस्कृत श्लोकसंख्येचा 'दत्तपुराण' हा ग्रंथ सिद्ध झाला. सर्गविसर्गादि सर्व लक्षणांनी युक्त असलेले हे पुराण श्रीव्यासांची दिव्य प्रतिमा असलेले, श्रीस्वामी महाराजच करू शकले. पुरुषार्थसंपन्न जीवनाचे प्रबोधन घडवणारा हा ग्रंथ आहे. ज्ञान, कर्म, भक्ती, उपासना या सर्व भाषेचे विवरण त्यात आले असून आचारधर्माचे पालन, वेदांतांचे अध्ययन, मार्गदर्शन आणि ईश्वरोपासना याद्वारे चित्तशुद्धी साधीत जीवन पुरुषार्थसंपन्न घडविता येईल हा त्यातील थोडक्यात परिचय आहे.

*आजीवितं भयः सेव्या वेदान्तो गुरुरीश्वरः*

*पूर्वं ज्ञानाप्तये पश्चात् कृतान्तत्वनिवृत्तये (दत्तपुराण अष्टक १)*

यातील वेदपादस्तुती स्वामी महाराजांच्या दिव्य साक्षात्कारी प्रज्ञेची अतुलनीय अशी अभिव्यक्ती आहे. प्रत्येक श्लोकात ऋग्संहितेतील मंत्रभाग व पुढे श्लोक अशी रचना आहे. विविध देवदेवतांच्या स्तुतीतील काही शब्द योजून श्री दत्तात्रेयाच्या स्तुतीचे श्लोक यात आलेले आहेत. यातून विविध देवतांचे दत्तस्वरूपाशी 'ऐक्य' साधले आहे. स्वामी महाराजांच्या सिद्ध प्रज्ञेचे हे महत्त्वाचे उदाहरण आहे. थोडक्यात ऋग्वेदातील मंत्रांच्या साह्याने स्वामी महाराजांनी ६८ श्लोकांचे हे दत्तसूक्त तयार केलेले आहे. या सूक्ताचा ऋषी श्रीस्वामी महाराज आणि देयता दत्तात्रय असे म्हणावेसे वाटते. यानंतर शके १८२५ मध्ये ६४७१ श्लोकांचा 'समश्लोकी गुरुचरित्र' हा सुबोध संस्कृतातील ग्रंथ सिद्ध झाला. दत्तप्रभूंचे हा ग्रंथ तयार करण्याचे 'सांगणे झाले' त्यानुसार ग्रंथनिर्मिती झाली आहे. त्यासंबंधीचे सविस्तर पत्रही उपलब्ध आहे. दत्तगुरूच्या सांगण्याप्रमाणे महिना सव्वा महिन्यात तो ग्रंथ तयार झाला. मूळ गुरुचरित्राच्या काही अध्यायांच्या ओव्यांची संख्या कमीजास्त ठरवली गेली, तीहि अनुज्ञेनेच ठरवली गेली आणि जे झाले त्यात आता बदल करता येत नाही असे स्वामी महाराज त्या पत्रात म्हणतात. रोज शंभर आणि पाच दिवस २०० याप्रमाणे श्लोक होत होते. ग्रंथाच्या शेवटी त्याचा उल्लेख आहे.

*संग्रथ्य लिखिताः प्रायोऽन्वहं श्लोकाः शताधिकाः*

*श्लोकाः पञ्चदिनान्यस्य प्रत्यहं द्विशताधिकाः*

*प्रत्न प्राकृत सद्ग्रन्थाद्वासुदेव सरस्वती*

*यथावेतमतः प्रीयान्नरसिंह सरस्वती*

श्रीस्वामींचे आशयसंपन्न असे ३०० संस्कृत श्लोकांचे त्रिशति काव्य आहे. एखाद्या आरशात जसे मठाचे संपूर्ण प्रतिबिंब भासते, तशा या लहानशा ग्रंथात संपूर्ण गुरूचरित्र आले आहे. चित्तशुद्धी हा या ग्रंथाचा उद्देश आहे. काव्य आकलनाला कठीण असले, तरी त्यातील स्वामींच्या भाषाप्रभुत्वाचा, शब्दसामर्थ्याचा प्रत्यय यातून येतो. अनेक वृत्त, शब्दालंकार, अर्थालंकार, रचनाकौशल्य, एकाक्षरी श्लोक, दोन अक्षरी श्लोक, गोमुत्रिका बंध, मुरजबंध अशा विविध प्रकारांनी हे काव्य नटलेले आहे.

दत्तपुराणातील उपासना भागावर ५५०० ओवीसंख्या असलेला दत्तमहात्म्य हा अत्यंत सुबोध असा ग्रंथ आहे. त्यात दत्तमहात्म्यात दत्तावताराच्या प्राचीन कथा आल्या आहेत. त्यासोबत वेदांत ज्ञान हादेखील उद्देश आहे.

'मंदा विशेषेकरून । नुपजे औपनिषदज्ञान । त्या करिता हे लेखन । करवी अत्रिनंदन दयाळू ।।' दत्तात्रेयाच्या विविध कथांसोबत २४ गुरूंचीही आख्याने व अनेक ग्रंथांतील साररूप उपदेश यात आलेले आहेत. याबरोबरच सप्तशती गुरूचरित्र, दत्तलीलामृताब्धिसार, शिक्षात्रयी, विविध स्तोत्रे असे विविध ग्रंथ दत्तकृपेच्या आज्ञेने तयार झालेले आहेत. वृद्धशिक्षा ही तर उपनिषदांची स्मरणी आहे.

## दत्तस्वरूपाचे व्यापकत्व आणि मंत्रगर्भरचना

श्रीस्वामी महाराजांच्या सिद्ध प्रज्ञेतून निर्माण झालेल्या ग्रंथांची ठळक वैशिष्ट्ये म्हणजे त्यांनी मांडलेली दत्तस्वरूपाची व्यापक कल्पना आहे. दुसरे म्हणजे मंत्रगर्भरचना हे होय. श्रीदत्त हेच विश्वाचे अधिष्ठान आहे.

भूतं भव्यं भव्यच्चास्माजायते जायते येन जीविति । लीयते यत्र तद्‌ब्रह्म श्रीदत्ताख्यं त्र्यधीश्वरम् । इतकेच नव्हे, तर सर्व उपासना मार्गांना कवेत घेणारा हा भागवत संप्रदाय आहे. दुसरे, या ग्रंथांतून / स्तोत्रांतून केलेली अन्यत्र अभावाने आढळणारी मंत्रगर्भरचना होय. प्रभावी अशी मंत्राक्षरे साधकांद्वारे उच्चारली जावीत, हा या रचनेतील उद्देश असावा. दत्तमहात्म्यात उपनिषदे, सप्तशती गुरूचरित्रात गीतेचा पंधरावा अध्याय, दत्तलीलामृताब्धिसारात ओंकाराच्या मात्रा तर माघ महात्म्यात माला मंत्र, स्तोत्रादिकात विविध देवदेवतांचे मंत्र गुंफलेले आहेत. या रचनावैशिष्ट्याचा परिचय स्वामीभक्त डॉ. गु. वा. पिंपळापुरे यांनी यापूर्वी घडवून दिला आहे. त्यानंतर निदर्शनास आलेले मंत्रगर्भ दत्तात्रेयाष्टोत्तरशतनाम स्तोत्रम् या स्तोत्राचाहि परिचय प्रस्तुत लेखकाद्वारे घडविला गेला आहे. अजूनही काही अशी रचना दृष्टीला येण्याची शक्यता नाकारता येत नाही.

## सिद्धांताचिया सिंहासनी । राज्य करिती त्रिभुवनी

श्रीदत्तपुराण, द्विसाहस्त्री, समश्लोकी गुरूचरित्र याहि ग्रंथावरील भाष्यात श्रुति, स्मृति, पुराण, षड्दर्शने, योगसूत्रे यातील विविध प्रमाणे आलेली आहेत. ही सारी शास्त्रवचने, या भाष्यात आपल्याला स्थान मिळावे म्हणून जणू उपस्थित झालेली आहेत. शास्त्राधिष्ठित सिद्धांताच्या सिंहासनावर विराजमान झालेली ती श्रीस्वामी महाराजांची दिव्यमूर्ती या भाष्यग्रंथातून दृष्टिसमोर साकार होते. श्रीआद्य शंकराचार्यांच्या भाष्यग्रंथाचे सातत्याने स्मरण व्हावे असा हा अलौकिक सिद्ध प्रज्ञेचा आविष्कार या ग्रंथातून झालेला आहे. खरे म्हणजे या साऱ्या प्रमाण वचनांचे, त्यांच्या आधारग्रंथाच्या माहितीसह संकलन हा संशोधन प्रबंधाचा स्वतंत्र विषय आहे.

## सकळ शास्त्रे स्वयंभे निघती मुखे

श्रीस्वामी महाराजांच्या अनेक शास्त्रग्रंथांतील प्रभुत्वाच्या घटना त्यांच्या सिद्ध प्रज्ञेच्या व अलौकिक बुद्धि-कौशल्याच्या निदर्शक आहेत. इ.स. १८९९ साली चिखलद्याहून द्वारकेस जाताना मार्गात एकादशी पहायला पंचांगाची आवश्यकता भासेल म्हणून भक्तांनी पंचांग त्यांच्यासमोर आणून ठेवले. त्याला उत्तर मिळाले, 'आपल्याला ओझे नको, ही काडी घेवून जमिनीवर हिशेब करावा म्हणजे एकादशी काढता येते.' संपूर्ण खगोलाचे उघडे पंचांग त्यांच्यासमोर होते. चिखलधास असताना सागरकडील श्रीमैयाशास्त्री त्यांच्याजवळ 'वेदांत केसरी' नावाचा ग्रंथ समजावून घेण्यासाठी येत. एक दिवस त्यांनी श्रीस्वामी महाराजांना प्रश्न केला. 'या संदर्भात नवीन श्लोक करायला आपल्याला किती वेळ लागेल ?' त्यावर श्रीस्वामींनी उत्तर दिले, 'जलदकलमी असे दोन गृहस्थ बसल्यास त्या दोघांना पृथक् श्लोक नवीन करून सांगण्यात येतील. तथापि दोघांकडूनही लिहिण्याचे काम होणार नाही, आपणास निरर्थक बसावे लागेल. एकदा माणगावी असताना आलेल्या वैदिकांना त्यांनी पुरुषसूक्ताचा अर्थ सांगितला व नारायण उकीडवे यांनी त्यांना विचारले, 'आपल्याकडे वेदार्थ सांगणारी मंडळी नसताना तुम्हाला वैदिक सूक्ताचा अर्थ कसा समजतो ?' त्याला महाराज म्हणाले की, 'नरसोबावाडीहून येताना एका मंदिरात संहितेचा एक अध्याय म्हटला. तिथे एक स्वामी पूजा करीत होते. त्यांना तो पाठ आवडला. ते म्हणाले, वेदार्थ जाणण्याचा तुमचा अभ्यास आहे काय ? मी इथे तीन दिवस आहे. आपल्याला त्याबाबत दिशा दाखवीन. त्यांनी संहितेतले तीन अध्याय सांगितले. तेव्हापासून अर्थ सांगता येवू लागला आहे; ही सद्गुरुची कृपा.' अशा अनेक आठवणी सांगता येण्यासारख्या आहेत.

## जीवनपरिवर्तनाचे सामर्थ्य असलेली ग्रंथरचना

श्रीस्वामी महाराजांच्या स्तोत्रांच्या, ग्रंथांच्या नित्य वाचनाने जीवनात परिवर्तन घडते. सात्विक वृत्तीचा परिपोष होतो. निर्भयता वाढते. स्वामी महाराजांच्या चार चार ओळींच्या पत्रांनी सामान्य साधकातून 'निर्धाराचे महामेरू' निर्माण केले आहेत. स्वामींच्या सहवासात आलेली, त्यांच्या ग्रंथांशी परिचित झालेली सामान्य साधक मंडळी 'गरुडाचिया पिलाशी । सर्प तो कवणे परी ग्रासी' या आत्मविश्वासाने जीवनातील क्लेशांना सामोरे जाऊ शकत होते. त्यांची स्तोत्रे, त्यांची पदे अनेकांना जीवनाच्या दोषातून मुक्त करणारी ठरली आहेत. धैर्य देणारी ठरली आहेत. 'करुणा त्रिपदी' ही तर सर्व दत्त सांप्रदायाला जोडून ठेवणारी संहिता आहे. त्यांची ग्रंथरचना मंत्रगर्भ आहे. साधकाचे जीवन उजळून टाकणारी, त्यांना ज्ञानसंपन्न करणारी आहे. 'शुष्क काष्ठा'ला पल्लवित करणारी आहेत.

**डॉ. वासुदेव गोविंद घोरपडे**
१६२, शिवकृपा-अभ्यंकर नगर, नागपूर.
दूरध्वनी : २३५७०६





# श्रीवासुदेवशास्त्री टेम्बे यांचा गृहस्थाश्रम

**सौ. रेखाताई पटवर्धन**

*एम.ए. (संस्कृत) श्रीरामचरितमानसावर पीएच.डी. करण्याची मनिषा. जीवनविकास, संतकृपा, प्रसाद इ. मासिकांत 'श्रीरामचरितमानसावर' लेख प्रकाशित. श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ, सचिव. गेली ४-५ वर्षे प्रवचन सेवा - पुणे, सांगली, मिरज.*

रांगणगडचे श्री. बाबाजीपंत गोडे पोलीस खात्यात हवालदार होते. त्यांची एकुलती एक मुलगी बायो वर्णाने काळी, एका पायाने बरीच अधू, सामान्यपणे कुरूप अशी होती. तिचे लग्न जमणे अत्यंत अवघड झाले होते. त्या मुलीचे दैव बलवत्तर असेच म्हटले पाहिजे. तिने पूर्वजन्मी काय पुण्य केले होते कुणास ठाऊक म्हणून तिला श्री. वासुदेवशास्त्री टेम्बे यांच्यासारखा अलौकिक पती लाभला ! अशा लोकोत्तर पुरुषाचे गृहिणीपद निभावणे म्हणजे तारेवरची कसरत असते ! अक्षरशः विस्तवाशी खेळ म्हणा ना ! पण या कसोटीस सौ. अन्नपूर्णाबाई पूर्णपणे उतरल्या !

टेम्बे कुटुंबाचे आप्तसंबंधी श्री. नाना कोनकर यांनी श्री. बाबाजीपंत गोडे यांना त्यांच्या मुलीसाठी श्री. वासुदेवशास्त्र्यांचे स्थळ सुचविले आणि मुलीची पत्रिका मागून घेतली. पण श्री. वासुदेवशास्त्री अगर त्यांच्या मातोश्री रमाबाई यांना ती पत्रिका दाखवलीच नाही. त्यांनी थेट श्री. विष्णूपंत उकिडवे यांना गाठले व दोन्ही पत्रिका जमत असल्याने या विवाहासाठी मध्यस्थी करण्याची विनंती केली. तसेच रमाबाईना त्यांनी या विवाहास त्यांच्या मुलाची संमती आहे असे खोटेच सांगितले. मुलाने आपली संमती न घेता विवाह ठरविला या गोष्टीचा रमाबाईना खेद वाटला. त्यांनी श्री. वासुदेव शास्त्री यांना याबाबत विचारले तेव्हा आपल्याला सध्या लग्नच करावयाचे नाही आणि याबाबत आपल्याला काहीही माहिती नाही असे त्यांनी सांगितले. तेव्हा त्यांना आश्चर्याचा धक्का बसला; आणि ही नाना कोनकरांची कारवाई हेही लक्षात आले. पण तोपर्यंत लग्नाचा मुहूर्तही ठरला होता. श्री. नाना कोनकरांनी रमाबाईंची समजूत घातली की वेळप्रसंगी श्री. बाबाजीपंत गोडे यांचा आधार मिळेल. हा योग जुळून आल्यास तुमच्या मुलाचे भलेच होईल. तेव्हा त्यांनी नाईलाजाने संमती दिली.

श्री. वासुदेवशास्त्री यांची संमती मिळणे एवढे सोपे नव्हते. म्हणून नानांनी श्री. विष्णुशास्त्री उकिडवे यांना मध्ये घातले. श्री. विष्णुशास्त्री श्री. वासुदेवशास्त्र्यांना म्हणाले की, मी तुमच्या कुटुंबियांच्या आग्रहास्तव एक स्थळ पाहिले आहे. पत्रिका जमतात म्हणून मी वधुपित्यास शब्दही दिला आहे. तेव्हा तुम्ही माझा शब्द खाली पडू देणार नाही व या विवाहास संमति घालच अशी खात्री आहे ! हे ऐकून श्री. वासुदेवशास्त्री अवाक् झाले ! काय बोलावे हे कळेना ! त्यांचे मौन हीच मूक संमति समजून श्री. उकिडवे यांनी त्यांच्या हातावर साखर ठेवून विवाह निश्चित झाल्याचे जाहीर केले.

हा विवाह अगदी साधेपणाने झाला. एकतर तो त्यांच्या व त्यांच्या मातोश्रींच्याही मनाविरुद्ध होता. विवाह हा एक आवश्यक संस्कार असे समजून शास्त्रावर आत्यंतिक निष्ठा असलेले श्री. वासुदेवशास्त्री विवाहास उभे राहिले. लग्नामध्ये ज्या अग्नीवर लाजाहोम केला जातो तोच अग्नी आपल्या घरी आणून त्यांनी स्वतः तयार केलेल्या मातीच्या कुंडामध्ये त्याची स्थापना केली. लग्नानंतर तावडतोब स्मार्ताग्नी घेऊन त्यांनी अग्नीची परिचर्या सुरू केली. गृहस्थाश्रमास सुरुवात केल्याबरोबर दर प्रतिपदेस स्थालिपाक आणि अमावस्येला पिण्डपितृयज्ञ असा कार्यक्रम ठरून गेला. गृह्याग्नीवर त्यांनी सात पाक संस्थाही पार पाडल्या.

रमाबाई या विवाहामुळे नाखूष होत्या. सुनेबद्दल त्यांचा वाईट ग्रह झाला होता. कदाचित सून आपल्या मुलास साजेशी नाही असेही त्यांना वाटत असावे. नववधूचे नाव आजेसासूच्या नावावरून अन्नपूर्णा ठेवले गेले. पण रमाबाईना तिची कुठलीच गोष्ट पसंत पडेना. प्रत्येक गोष्टींत दोष काढून त्या तिला घालून पाडून बोलू लागल्या. सासु-सुनेचे जराही पटेनासे झाले. अन्नपूर्णाबाई सोशिक होत्या. त्या निमूटपणे सर्व सोशीत असत. पण त्यामुळे रमाबाई अधिकच कठोर बनल्या व मर्मभेदक बोलू लागल्या. श्रीवासुदेवशास्त्र्यांच्या ही गोष्ट लक्षात आली. घरातील शांतीसमाधान नष्ट झाले. श्री. शास्त्रीबुवा मातृभक्त होते. त्यामुळे त्यांनी या भांडणात कधीच लक्ष घातले नाही. पण त्यांचे वैराग्य मात्र वाढू लागले. आईला आवडणार नाही म्हणून व तिचा आदर राखावा म्हणून ते कुटुंबाशी बोलतही नसत.

गणेश चतुर्थीचा दिवस होता. सासुसुनेच्या भांडणात कोणीच पूजेची तयारी केली नाही. तेव्हा आज श्रीगणेश चतुर्थी आणि पूजेची काहीच तयारी नाही ? असे शास्त्रीबुवा अप्रत्यक्षपणे पत्नीस म्हणाले. झाले; रमाबाईना निमित्त मिळाले; त्यांनी सुनेवर तोफ डागण्यास सुरुवात केली. शेवटी हाताशी असलेल्या सामग्रीनिशी श्री. शास्त्रीबुवांनी पूजा उरकली. घरातील सुखशांतीस ग्रहण लागले. त्यामुळे श्री. वासुदेवशास्त्री जास्तीत जास्त वेळ घराबाहेरच काढू लागले. त्यांनी विवाह केला होता, म्हणून गृहस्थाश्रमाची कर्तव्ये ते यथाशास्त्र पार पाडावी म्हणून हे सर्व अलिप्तपणे करीत.

एक दिवस शेजारच्या गावी कामास जावयाचे होते म्हणून त्यांनी आईला लवकर स्वयंपाक करावयास सांगितला. अनुष्ठान उरकल्यावर जेवणासाठी स्वयंपाकघरात आले तर चूल थंड ! त्यांनी आईला विचारले तेव्हा ती म्हणाली, 'तुझ्या बायकोला विचार. स्वयंपाक करावा लागेल म्हणून ती झोपून राहिली आहे !' त्यांनी पाहिले तो माजघरात अन्नपूर्णाबाई एक गोधडी टाकून झोपल्या आहेत. त्यांनी पत्नीच्या अंगाला हात लावून पाहिले तेव्हा ती तापाने फणफणली आहे असे दिसले. ते आईला म्हणाले, 'आई ! ही ढोंगी आहे असे कसे म्हणतेस ? हिला तर सडकून ताप भरला आहे !' झाले इतके ऐकताच आई इतकी संतापली की सांगता सोय नाही ! शेवटी उठून न जेवताच ते कामासाठी निघून गेले.

वासुदेवशास्त्र्यांच्या इतकाच नव्हे अधिकच मनस्ताप अन्नपूर्णाबाईना होत असे. त्यांना वाटे कधीतरी नवऱ्याने मध्ये पडून आपली सुटका करावी. पण वासुदेवशास्त्री मातृभक्त असल्याने काहीच बोलत नसत. अन्नपूर्णाबाई बिचाऱ्या अश्रू ढाळीत बसत. एकदा आग्रायणेष्टीच्या संकल्पासाठी श्री. वासुदेवशास्त्रींनी पत्नीला सोबत बसण्यास बोलावले.

पण तेवढ्यात सासु-सुनेचा खटका उडाला होता. त्यामुळे अन्नपूर्णाबाई रागावून म्हणाल्या की 'मी संकल्पाला येत नाही. मी तुमची कोण ? कोण बायको असेल तिला बोलवा. मी तुमची बायको असते तर माझा असा छळ तुम्ही होऊ दिला नसता !' शास्त्रीबुवांना ती इष्टी पत्नीशिवाय करावी लागली. या कटकटीमुळे त्यांचे वैराग्य प्रखर होऊन त्यांना संन्यास घेण्याची इच्छा होऊ लागली. पण श्रीदत्तप्रभूंची या गोष्टीस परवानगी मिळत नव्हती.

माणगावला जुने घर पाडून तेथे नवीन घर बांधले होते. त्याची वास्तुशांती करावी म्हणून श्री. वासुदेवशास्त्र्यांनी मुहूर्त काढून सर्व तयारीही केली. पण त्याच वेळी सासु-सुनेचे खडाष्टक झाल्याने ठरविलेल्या मुहूर्तावर सौ. अन्नपूर्णाबाई आल्याच नाहीत. त्यामुळे श्री. वासुदेवशास्त्री उद्विग्न होऊन म्हणाले, 'या घरात कोणी नांदणार नाही. येथे धर्मशाळा होईल.' त्यांचे हे शब्द अर्थातच खरे ठरले.

श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेवरून माणगाव येथे मंदिराची उभारणी झाली व वैशाख शुद्ध पंचमी शके १८०५ मध्ये कागलहून आणलेल्या श्रीदत्तमूर्तीची स्थापना मंदिरात झाली. या दिवसापासून पुढे सात वर्षे श्रीदत्तप्रभूंचे येथे वास्तव्य होते. देवळाच्या पाठीमागील खोलीत श्रीशास्त्रीबुवांच्या स्मार्ताग्नीची व स्वयंपाकगृहाची जागा होती. शास्त्रीबुवा देवळातच राहात. प्रथम बुवा जेवण्यासाठी घरी जात असत. पण गुरुद्वादशीचा पहिला उत्सव झाल्यानंतर त्यांनी घरी जाणे बंद केले. त्यानंतर त्यांनी कोरडी भिक्षा तीही एकाच घरी मागण्यास सुरुवात केली. भिक्षेहून आले की माध्यान्ह, संध्या, ब्रह्मयज्ञ, मूर्तीची पूजा व आणलेल्या भिक्षेतून वैश्वदेव नैवेद्य करून स्वतः भोजन करीत. तांदूळ व मुगाची डाळ एकत्र करून स्वयंपाक करीत. मंदिराला एक गाय कुणी दिली होती तिचे दूध, तूप वापरीत. शिजविलेल्या अन्नातून गोग्रास, अतिथिचा वाटा बाजूस ठेवून उरलेला भाग ग्रहण करीत. स्वयंपाकाची भांडी स्वतः घासत असत. संध्याकाळी परत स्नानसंध्या, धुपारती, मंत्रपुष्प होऊन देवांना पलंगावर निजवले की ग्रंथवाचन, योगाभ्यास करून मग ते झोपत. देवळातच झोपत. अखंड नामस्मरण सुरू असे.

त्यांचा विवाह झाल्यानंतरही देवाची आज्ञा होईपर्यंत त्यांनी स्वस्त्रीसंबंध मुळीच केला नाही. पूर्णपणे ब्रह्मचर्य वृत्तीने राहात. अपूर्व आणि कठोर आत्मसंयम करून ते राहिले होते. सौ. अन्नपूर्णाबाई रोज सकाळी देवापुढे सारवून, रांगोळी घालून जात व दुपारी जेवण्यापूर्वी देवदर्शन करून तीर्थप्रसाद घेऊन जात. मंदिरात भक्तगणांची वर्दळ जशी वाढू लागली तसे देवासमोर पेढे, बर्फी, खारीक, नारळ, उदबत्ती, कापूर इत्यादी वस्तूंचा पर्वतप्राय ढीग होई. पालखीनंतर देवापुढे आलेले सर्व जिन्नस प्रसाद म्हणून वाटले जात. धान्यसुद्धा मोठ्या प्रमाणावर जमत असे. त्याचा भंडारा होऊन सर्वांना प्रसाद मिळे. रुपयाच्या आतील उत्पन्न माणगाव देवस्थानसाठी ठेवून त्याच्या वरील उत्पन्न श्रीक्षेत्रनृसिंहवाडीस धाडले जाई.

देवापुढे नारळ, केळी, धान्य यांचे ढीग पडत पण बुवांचे तिकडे लक्षही नसे. त्यांचा निर्वाह भिक्षान्नावर चाले. पण तेथील व्यवस्था पाहणारी मंडळी मोठ्या आग्रहाने श्रीदत्त मूर्तीपुढील उत्पन्नांतील चौथा हिस्सा बुवांच्या घरी धाडून देत. पण बुवा त्यांतील काही घेत नसत.

श्री. वासुदेवशास्त्र्यांच्या या निःस्पृह वृत्तीमुळे त्यांच्या पत्नीस मनासारखे वस्त्र, अलंकार कधीच मिळाले नाहीत. त्यांनीही कधी तक्रार केली नाही. एकदा बुवांच्या बद्दल आदर असणाऱ्या गृहस्थाने सौ. अन्नपूर्णाबाईना आपल्या घरी नेऊन एक सुवर्ण अलंकार दान दिला. देवळांत रोजच्या प्रमाणे सडा, सारवण, रांगोळी करण्यासाठी त्या देवळात आल्या तेव्हा बुवांनी तो पाहिला व चौकशी केली. त्यांना ही गोष्ट आवडली नाही, त्यांनी पत्नीस तो अलंकार उतरून ठेवण्यास सांगितला. सौ. अन्नपूर्णाबाईनी लगेच तो उतरवून फडक्यात बांधून घरात फेकून दिला आणि त्या देवळात आल्या. स्वतःप्रमाणे पत्नीनेही निरीच्छ असावे अशीच बुवांची इच्छा होती.

घरात दैन्यावस्था म्हणून श्री. नाना कोनकरांनी आंबोली येथे इचलकरंजीकरांच्या अन्नछत्रात सौ. अन्नपूर्णाबाईना स्वयंपाकासाठी धाडण्याचे ठरविले. घरातील भांडणे, दैन्यावस्था, नवरा कशातच लक्ष घालीत नाही तेव्हा चार दिवस या घरच्या कटकटीपासून दूर राहू म्हणून सौ. अन्नपूर्णाबाईनी संमति दिली. रमाबाईनीही परवानगी दिली. दुसऱ्या दिवशी अन्नछत्रांत जावयाचे म्हणून त्या रात्रीच नाना कोनकरांच्याकडे राहावयास गेल्या. रमाबाईना आपल्या मुलास न विचारताच आपण सुनेस परवानगी दिली याची व लोकापवादाची चिंता वाटू लागली. म्हणून त्यांनी एका माणसाच्या हाती बुवांना कळविले. शनिवारची पालखी झाल्यावर बुवा जरा स्वस्थ बसले इतक्यात त्या माणसाने येऊन ही हकीगत सांगितली. तेव्हा बुवांनी त्यालाच विचारले की, 'अप्पा, आमच्या कुटुंबाने असे अन्नछत्रात जाऊन काम करणे तुम्हास योग्य वाटते का ? ते 'नाही' म्हणाले तेव्हा बुवांनी सांगितले की तुम्ही तशी देवाची प्रार्थना करा म्हणजे जाणे रहित होईल. त्याप्रमाणे प्रार्थना करून ते गृहस्थ घरी गेले. दुसरे दिवशी पहाटे नाना कोनकरांना फुरसे चाऊन पायाला सूज आल्याने जाणे रहित झाले. आणि सौ. अन्नपूर्णाबाई घरी परत आल्या.

यानंतर काही दिवसांनी देवांनी शास्त्रीबुवांना गृहस्थाश्रमास प्रारंभ करण्याची आज्ञा दिली. बुवांनी ती लगेच आईच्या कानांवर घातली. रमाबाईना आनंद झाला. देवळाच्या उत्तरेला एक पडवी काढून शास्त्रीबुवांनी तेथे गृहस्थाश्रम सुरू केला. बुवांचे जेवण मंदिरातच होई. अन्नपूर्णाबाई मात्र जेवायला घरी जात व संध्याकाळचे जेवण व काम उरकून त्या देवळात येत. गृहस्थाश्रम सुरू झाल्यानंतर शास्त्रीबुवांनी आपल्या पत्नीला योगाभ्यास शिकविण्यास सुरुवात केली. त्यांनी योगाभ्यासात चांगलीच प्रगती केली होती.

एका रात्री सर्व उरकून अन्नपूर्णाबाई आपल्या पडवीत गेल्या. तेथे शास्त्रीबुवा दिसले नाहीत; म्हणून त्या मंदिराकडे आल्या. देवळाचे दार लावलेले होते व त्यांचे पतिदेव काही ग्रंथवाचन करत होते. अन्नपूर्णाबाईनी बाहेरून दार वाजविल्यावर त्यांनी 'कोण आहे ?' असे विचारले तेव्हा 'मी आहे.' असे अन्नपूर्णाबाई म्हणाल्या आणि बंद दरवाजाशी पायरीवर बसल्या. इकडे वाचनाच्या नादात शास्त्रीबुवा ही गोष्ट विसरूनच गेले. वाचन झाल्यावर दार उघडून पाहतात तर तेथे अन्नपूर्णाबाई बसलेल्या दिसल्या. शास्त्रीबुवा बाहेर आल्याची चाहूल त्यांना लागली नाही. तेव्हा शास्त्रीबुवांना वाटले की पत्नीस झोप लागली असावी. जवळ जाऊन पाहतात तर पत्नी गाढ समाधि अवस्थेत असल्याचे त्यांना दिसले. बुवांनी सर्व लक्षणे नीट तपासून पाहिल्यावर ते उद्गारले, 'ही तर निर्विकल्प समाधि आहे.' आपल्या पत्नीची ती अवस्था पाहून त्यांना अतिशय आनंद झाला. जी परमोच्च अवस्था मात्र व्हावी म्हणून आपण इतकी वर्षे साधन करीत आलो ती दत्तप्रभूंच्या कृपेने पत्नीस सहज प्राप्त झाली होती. बुवांनी प्रथम हलवून जागे करण्याचा प्रयत्न केला पण उपयोग होत नाही हे पाहून शास्त्रोक्त उपचार केल्यावर त्या देहभानावर आल्या. समाधीतून उत्थान

होताच त्या म्हणाल्या की, मी निरतिशय आनंदात होते. आपण मला उगीच सावध केलेत.

या प्रमाणे ७ वर्षे श्रीदत्तमंदिरात आनंदाचा बाजार भरला होता. तो मोडण्याची वेळ येऊन ठेपली. ज्या दिवशी सात वर्षे पूर्ण झाली त्या दिवशी पूजा आटोपताच 'आज माणगाव सोडून जावयाचे आहे' असे देवांनी बुवांना सांगितले.

यापूर्वी एकदा बुवांना वानप्रस्थाश्रम घ्यावा असे वाटू लागले म्हणून ते पत्नीसह अरण्यांत जाऊन राहिले होते. एका रात्री अन्नपूर्णाबाई झोपडीच्या बाहेर गेल्या असता एक पिशाच्च त्यांना भीति दाखवू लागले तेव्हा त्या परत आल्या आणि बुवांना बोटाने स्पर्श करून जागे केले आणि घडलेली हकिगत सांगितली. वानप्रस्थाश्रमांत रात्री शय्येवर पतीपत्नींनी एकमेकांस स्पर्श करू नये आणि स्पर्श टाळण्यासाठी मध्ये दंड ठेऊन झोपावे असा दंडक आहे. दंडक मोडला म्हणून बुवांना वाईट वाटले. रात्री स्वप्नांत देवांनी असे सांगितले की 'कलियुगांत वानप्रस्थाश्रम असाध्य आहे. घरी परत जा. तेथेच या आश्रमाची सिद्धी होईल ! म्हणून उभयता परत घरी आली होती. असो.

देवांची अशी ही आज्ञा झाली होती की माणगांव सोडतांना 'देव व कुटुंब बरोबर न्यावे. शास्त्रीबुवांनी अन्नपूर्णाबाईंना देवाची आज्ञा सांगितली आणि माझ्या बरोबर येणार असाल तर तात्काळ चला! असे म्हणाले त्या बरोबर त्या जाण्यास तयार झाल्या. बुवा म्हणाले, "दागिने असतील तर काढून ठेव, एक मंगळसूत्राखेरीज काही नको." लगेच नाकांतील लहान नथ आणि कानांतील बुगडी जोड त्यांनी घरांत काढून ठेवला. नंतर शास्त्रीबुवांनी दोन दत्तमूर्ती, एक संपुष्ट आणि एक तांब्या आणि अन्नपूर्णाबाईंनी एक लुगडे आणि धोतर एवढेच सामान बरोबर घेतले ! उभयतांनी एका क्षणांत सर्वस्वाचा त्याग केला. शके १८११ च्या पौषांत माणगांव सोडले आणि प्रथम सावंतवाडीस जाऊन नृसिंहवाडी गांठली. बुवा वाहनांत बसत नसत आणि अनवाणीच जात. अर्थात अन्नपूर्णाबाई त्या वेळी गरोदर असूनही त्यांनी पतीच्या पाठोपाठ नृसिंहवाडीचा रस्ता धरला. त्या एका पायाने अधू होत्या. आणि शास्त्रीबुवांची चाल फार जलद होती. त्यामुळे त्या माऊलीस किती कष्ट झाले असतील ते त्याच जाणोत !

वाडीला वर्षभर राहण्याची देवांची आज्ञा होती. बुवा रोज कोरान्न भिक्षा आणीत त्या भिक्षेवरच स्वयंपाक होऊन वैश्वदेव नैवेद्य होत असे. पुढे सौ. अन्नपूर्णाबाई श्री. गोखल्यांच्या ओवरीत प्रसूत झाल्या. पुत्र झाला पण तो मृतावस्थेत जन्मला. अन्नपूर्णाबाईंचे बाळंतपण दुर्गाभावशीने केले खरे पण त्यांचे टोचून बोलणे अन्नपूर्णाबाईंना ऐकावे लागे. नंतर श्री ब्रह्मानंदांच्या मांडीवर वासुदेवशास्त्रींनी आपला स्मार्ताग्नी स्थापून गृहस्थाश्रमास सुरुवात केली. अतिथी अभ्यागतांची सेवा आवडीने केली जाई. तेथे श्री. नारायण दीक्षित पू. वासुदेव शास्त्र्यांच्या सेवेत हजर झाले. त्यांची गुरुपत्नीस चांगली मदत होत असे. एक वर्षाचा काळ आनंदात केव्हाच निघून गेला. वर्ष संपताच उत्तरेकडे जाण्याविषयी देवांनी आज्ञा दिली. प्रथम उभयतां पतीपत्नी कोल्हापूर येथे आले. तेथे अन्नपूर्णाबाईंच्या मनांतील दर्शनाची इच्छा जाणून पंचगंगेवर बुवा आन्हिक करीत असतां, धांवत येऊन अन्नपूर्णाबाईंच्या हातातील तांब्या घेऊन त्याने गटागटा पाणी पिऊन परत तो तांब्या अन्नपूर्णाबाईंच्या हातांत देऊन पळून जाऊन कुंभार स्वामींनी पूर्ण केली. त्यामुळे अन्नपूर्णाबाईंना फार आनंद झाला. कुलस्वामिनीचे दर्शन घेऊन दोन दिवस कोल्हापूरला धर्मशाळेत राहून शास्त्रीबुवा पत्नीसह पंढरपुरास आले. तेथे देवदर्शन करून पुढे बार्शीस जाऊन गंगाखेड येथे आले.

गंगाखेडला असतांना एका रात्री स्वप्नांत देवांनी असे सांगितले की 'आजपासून चौथ्या दिवशी तुम्हा दोघांना नेण्यास आम्ही येणार आहो !' त्यावर शास्त्रीबुवांनी सांगितले की आपणास संन्यास घ्यावयाचा आहे म्हणून आपण येणार नाही, मंडळींना घेऊन जा त्याला आपली हरकत नाही ! त्यानंतर अन्नपूर्णाबाईंना ताप येऊन महामारीचा उपद्रव सुरू झाला. त्यांना फार अशक्तपणा आल्याने त्यांची वस्त्रे धुणे, त्यांना वस्त्र नेसवणे वगैरे कामेही शास्त्रीबुवांनी केली. या आजारांतच वैशाख वद्य चतुर्दशी शके १८१३ ला शुक्रवारी अन्नपूर्णाबाईंना देवाज्ञा झाली. आयुष्यभर कष्टच सहन करावे लागले पण तृप्त मनाने त्यांनी देह सोडला. अशौचात सहावे दिवशी परत शास्त्री बुवांना मृत्यूची सूचना मिळाली पण संन्यास घेतल्याशिवाय आपण देह सोडणार नाही असे त्यांनी स्पष्ट बजावले. पत्नीच्या और्ध्वदेहिक क्रिया ९ व्या दिवसापासून १३ व्या दिवसापर्यंत यथाविधि करून 'अनाश्रमी न तिष्ठेत्' या शास्त्रवचनानुसार शास्त्रीबुवांनी पत्नि गेल्यावर चौदावे दिवशी ज्येष्ठ शुद्ध १३ शके १८१३ उत्तरायणांत संन्यास घेण्यास सुरुवात केली. याप्रमाणे या उभयतांच्या अलौकिक गृहस्थाश्रमाची इतिश्री झाली.

हरिः तत् सत् ।

**सौ. रेखाताई पटवर्धन,**
स्टेशन रोड, मिरज, जि. सांगली.

---

॥ श्री गुरुः शरणम् ॥
॥ श्री वासुदेवानंद सरस्वतींना दंडवत ॥
**(वृत्त-भुजङ्गप्रयात)**

तुला **श्री**गणेशा करू वंदनास ।
तसे **'वासुदेवा'** नमितो तुम्हास ॥
मनी **सु**ज्ञता नि सुविचार यावे ।
असो **दे** सदा चित्त नामीं स्वभावें ॥१॥
असा **वा** मनीं सत्य संकल्प छान ।
सदा **नंद** चित्तीं असो दत्त ध्यान ॥
नको **दर्प** वाणीमधें वागण्यांत ।
मुखीं **सर्व**दा राहू द्या नाम-दत्त ॥२॥
असे **रत्न** भांडार शब्दी जयांच्या ।
सर **स्वती** वास जिव्हाग्री ज्यांच्या ॥
किती **तीर्थ** क्षेत्रीं चतुर्मास झाले ।
सदा **नाद ब्रह्मीं** मन रंगलेले ॥३॥
असा **दंडि** संन्याशी दत्तावतारी ।
उदं **ड** सत्संग जगतास तारी ॥
विसा **वले** 'क्षेत्र गरुडेश्वरास' ।
नमी **त** 'विष्णु' तयांच्या पदांस ॥४॥

कवि
**विष्णु ल. शिंत्रे**



# श्रीवासुदेवानन्दसरस्वती ह्यांचे 'गुरुचरित्र' (संस्कृत)

**डॉ. गणेश उमाकांत थिटे**

*एम्. ए. पीएच्. डी. (प्राध्यापक) विभाग प्रमुख - संस्कृत प्राकृत भाषाविभाग, पुणे विद्यापीठ, अंदाजे २०० लेख इंग्रजी, मराठी, संस्कृत ह्या भाषांतील भारतीय व परदेशी नियतकालीकात प्रसिद्ध, ७ पुस्तके प्रकाशित.*

## प्रस्तावना

वासुदेवानन्द सरस्वती ह्यांनी संस्कृतभाषेतून पुष्कळच लेखन केले आहे. त्यात दत्तपुराण, दत्तचम्पू, श्रीगुरुचरित्र ह्यांसारख्या रचना अत्यंत महत्त्वाच्या आहेत. पुण्यातील ओंकार ट्रस्टच्या वतीने प्रतिवर्षी प्रसिद्ध करण्यात येणाऱ्या 'कल्याणी' ह्या विशेषांकाचा ह्या वर्षीचा अंक श्रीवासुदेवानंदसरस्वती ह्यांच्यावरच प्रसिद्ध होत असल्यामुळे वासुदेवानंद-सरस्वतींच्या विविध पैलूंचे दर्शन ह्या विशेषांकातून होईल. त्यामुळे ग्रंथकाराचे चरित्र किंवा त्याचे अन्य विशेष ह्या संबंधीची माहिती येथे देणे ही एक प्रकारे पुनरुक्ती होईल. म्हणून तशी पुनरुक्ती टाळून फक्त गुरुचरित्र (संस्कृत) ह्या ग्रंथाचा परिचय करून देणे ह्या प्रकारचा मर्यादित उद्देश प्रस्तुत लेखनामागे ठेवला आहे.

## बाह्य परिचय

श्रीगुरुचरित्रकाव्य अर्थात त्रिशतीकाव्य हे पुस्तक श्रीवासुदेव निवास प्रकाशन, पुणे ४ येथून प्रसिद्ध झाले असून त्यात मूळ संस्कृत ग्रंथ, श्लोकांचा अन्वय आणि मराठी भाषांतर ह्या सर्व गोष्टी दिल्या आहेत. प्रस्तुत पुस्तक १ एप्रिल १९९५ मध्ये प्रसिद्ध झाले. त्यापूर्वी ह्या पुस्तकाची प्रथमावृत्ती १९५३ ह्या वर्षी झाली असल्याचा पुस्तकात उल्लेख आहे. ह्या पुस्तकात सुमारे तीनशे श्लोक असून त्यातील प्रत्येकी एक शतक वेगवेगळ्या विद्वानांकडून अनुवादित केले गेले आहे. पहिले शतक श्रीपादशास्त्री कवीश्वर, दुसरे गोविंदशास्त्री जेरे आणि तिसरे ईश्वरशास्त्री दीक्षित यांनी मराठीत अनुवादिले आहे. प्रथम शतकातील शंभर श्लोक, द्वितीय शतकातील एकशे दोन श्लोक आणि तृतीय शतकातील एकशेसात श्लोक अशा रीतीने एकूण श्लोकसंख्या तीनशे नऊ इतकी आहे.

## अंतरंग परिचय

संस्कृत गुरुचरित्र काव्याची सुरुवात मंगलाचरणाने झाली आहे. त्यात प्रथम दत्तात्रेयाला वंदन केले आहे.

***सुशंकरं सन्तमजं गुरुं परं परंपरार्थं प्रणमत्सुरस्वरम् ।***
***दरं हरन्तं प्रवरं सुतावरं भजेऽत्रिजं योगिवरं निरन्तरम् ॥१.१॥***

जो उत्तम कल्याण करणारा, अज, श्रेष्ठ गुरु, परंपराधारक, इन्द्राकडून वन्दन केला जाणारा, भय दूर करणारा, श्रेष्ठ, अत्रिपुत्र, योग्यांमध्ये उत्तम आहे अशा (दत्ताची) मी आदरपूर्वक आणि सतत भक्ती करतो असा ह्या श्लोकाचा अर्थ आहे. ह्या श्लोकातील शब्दरचना अनुप्रासयुक्त आहे.

गाणगापुराचे वर्णन करताना असे म्हटले आहे की,

***सत्रक्रिया प्राक् सफला भवन्ति यत्र प्रियार्थाश्च नरा भवन्ति ।***
***आपन्नदुःखाः सुखिनश्च दत्त आपन्नदुःखानि यतोऽत्र दत्तः ॥१.७॥***

ह्या नगरात यज्ञक्रिया लगेच सफल होतात, जेथे लोकांना त्यांना हव्या त्या गोष्टी मिळतात, दुःखी लोक सुखी होतात आणि तेथे दुःख घडत नाही.

ह्या गाणगापुरात नरसिंह नाव धारण करणारा एक श्रेष्ठ मानव दत्तात्रेयांच्या दर्शनासाठी गाणगापुरात आला. नरसिंह सरस्वती असे त्यांनी दत्ताला म्हटले, 'तू मला कसा ओळखत नाहीस ?' पुढे दत्तजन्म आणि दत्त ह्यांच्याही काही कथा आल्या आहेत. श्रीदत्तावताराची कथाही आली आहे. श्रीपादाने आईवडिलांना विनंती केली की, मला योगश्री पाहिजे. भोगश्री नको.

***योगश्रियं तात वृणेऽम्ब मान्याम् ।***
***भोगश्रियं नैव कदाप्यमान्याम् ॥१.४२॥***

ह्या ओळीतील अनुप्रासही लक्षात घेण्याजोगा आहे. त्यानंतर हा मुलगा संन्यास घेणार, ह्या कल्पनेने श्रीपादाच्या वडिलांना कंप सुटला. (विप्रोऽप्यकम्पत विनाप्यनिलमेकपुत्रः । १.४३) त्यानंतर आईने त्याला गृहस्थाश्रमी होण्याची विनंती केली. तरीसुद्धा श्रीपादाने आपले दत्तरूप दाखवले आणि सर्वसंगपरित्याग केला. नंतर श्रीपाद गोकर्ण ह्या तीर्थक्षेत्रात पोचला.

***अपर्णापस्य तत्क्षेत्रमपर्णा यान्निवासिनः ।***
***गोकर्णाख्येऽवसत् त्र्यब्दं गोकर्णाकृतिलिङ्गभाक् ॥१.५०॥***

पार्वतीपति शंकराच्या त्या क्षेत्रात राहिल्यामुळे तेथील लोक सर्व ऋणांपासून मुक्त होत असतात. अशा त्या क्षेत्री तीन वर्षे त्याने शंकराची उपासना केली. ह्या श्लोकांतही शाब्दिक कोटिक्रम आढळतो. तेथून श्रीपाद कृष्णातीरी आले. त्यानंतर ते कुरुगड्डी येथे आले. तेथे त्यांनी केलेल्या कृत्यांमध्ये मृत ब्राह्मणाला पुनः जीवित करणे ह्या कृतीचा समावेश आहे (१.७०). श्रीपादयतींनी नंतर त्या ब्राह्मणाला दर्शन दिले.

ह्यानंतर अम्बा नावाच्या स्त्रीला झालेल्या नरहरी ह्या मुलाची कथा आली आहे. तो लहानपणी मुका होता. परंतु त्याने खुणांच्या साहाय्याने आपल्या आईवडिलांना सांगितले की, 'माझी मुंज करा म्हणजे मला बोलता येईल.' तसेच त्याने लोखंडाचे सोने करण्याचा चमत्कारही केला (१.९४). मुंज झाल्यावर त्या नरहरीला बोलता येऊ लागले आणि त्याने "आई ! मला संन्यास घ्यावयाचा आहे" असे सांगितले. आईने त्याला परावृत्त

करण्याचा प्रयत्न केला (१.९५). गृहस्थाश्रम झाल्यानंतर संन्यास घेणे योग्य असे सांगितले.

*संस्कारैः संस्कृतोऽन्तः शुचिरिह लभते साधनानीतरो नो*
*तस्मात्त्वं सद्वितीयो भव भवहतये देवपित्रर्चकः स्याः ।*
*कालोप्तं बीजमुर्व्याः फलति सुत तथोद्वाहनादि स्वकाले ।*
*काम्यं पूर्वेऽपि सर्वे पितर इममहो तात हीच्छन्ति नित्यम् ॥१.९६॥*

सर्व संस्कार ज्याच्या बाबतीत पार पडले आहेत अशालाच अन्तःशुद्धी प्राप्त होते आणि शमदमादींची प्राप्ती होते. म्हणून तू विवाहित होऊन देव आणि पितर ह्यांची पूजा कर. योग्य वेळी पेरलेले बीजच उत्कृष्ट फळ देते. म्हणून विवाह ह्यासारखे विधी योग्य वेळी होणेच योग्य असते. आपले पूर्वजही हीच इच्छा करतात.

ह्यावर नरहरीने असे उत्तर दिले की गृहस्थाश्रम झाल्यानंतर संन्यास घेण्याचा नियम माझ्यासारख्या विवेकी विरक्तासाठी नाही. निःसार अशा संसारात सुख नाही. विवाह दुःखाला कारण होतो. त्याचप्रमाणे दारिद्र्य, क्लेश, अशांतता हे सर्व दुःखाला कारण होतात. श्रीमंतांनाही सुख नसते. स्वर्गात सुख नसते (१.९७). शेवटी आईने सांगितले की आणखी एक मुलगा झाल्यावर मी तुला संन्यासासाठी परवानगी देईन. पुढे तिला दोन जुळे मुलगे झाले (१.१००). येथे पहिले शतक संपले.

पुढे नरहरी काशीला गेला आणि तेथे कृष्णसरस्वती ह्या यतीस गुरु करून संन्यास घेतला. नंतर त्यांचे नाव नृसिंहसरस्वती असे ठेवले गेले (२.१७). नृसिंहसरस्वतींचे वर्णन करताना पुढीलप्रमाणे अनुप्रासयुक्त श्लोक आला आहे.

*कुण्डीमण्डितदोर्दण्डो दण्डी दण्डितमूढकः ।*
*मुण्डी मुण्डितपाखण्डश्चण्डीश इव बभौ मृडः ॥ (२.१९) ॥*

त्यांच्या हाताला कमण्डलूने शोभा आणली आहे. ज्यांनी दण्ड हातात घेतला आहे, ज्यांनी मूढांना दण्ड केला आहे, ज्यांनी मुण्डन केले आहे, ज्यांनी नास्तिकांचे खंडन केले आहे, अशा प्रकारचे ते नृसिंहसरस्वती शंकराप्रमाणे शोभत होते.

नृसिंहसरस्वतींनी काशीत वेदार्थाचे विवेचन केले. नंतर प्रयागला जाऊन मग ते स्वतःच्या गावी येऊन आईला भेटले (२.२३). आईचे प्रेम संन्याश्यांनासुद्धा टाळता येत नाही (१.२४). पुढे ते गोदावरी नदीच्या काठी आले. तेथे त्यांनी पोटदुखीने पीडित झालेल्या ब्राह्मणाचे दुःख दूर केले (२.३०-३१). श्रीगुरु नरसिंह देवयतींचा शिष्य सायदेव ह्याला म्लेंच्छराजा मारणार होता. परंतु गुरुमाहात्म्यामुळे त्याने त्यास मारले नाही. उलट सत्कार करून परत गुरुगृही पाठवले. गुरु बरोबर तीर्थयात्रेस जाण्याची त्याची इच्छा होती. पण गुरूंनी त्याला तेथेच राहावयास सांगितले आणि सोळा वर्षांनी पुनः भेट होईल असे त्याला आश्वासन दिले (१.३४). बाकीच्या शिष्यांनाही त्यांनी सांगितले की संन्याशाने चातुर्मासाशिवाय एरवी एखाद्या ठिकाणी जास्त काळ राहू नये. त्याने सतत तीर्थाटन करावे (२.३४). अयोध्या, मथुरा, माया, ह्यांसारखी नगरे, कृष्णा, नर्मदा, गोदावरी, गंगा, ह्यांसारख्या नद्या इत्यादींची तीर्थयात्रा झाल्यावर आपण पुनः भेटू असे त्यांनी आश्वासन दिले (२.३६). नंतर नृसिंहसरस्वती परळी वैद्यनाथ येथे गेले. तेथे गुरूंचा त्याग केलेला एक ब्राह्मण त्यांना भेटला. त्याला नृसिंहसरस्वतींनी गुरूंचा त्याग न करण्याचा उपदेश केला. धौम्य ऋषींचे अरुण, बैद, उपमन्यु हे शिष्य गुरुगृही कष्ट झाले तरी कसे राहिले ते त्यांनी त्याला समजावून सांगितले (२.३९-४३). अखेर त्या ब्राह्मणाने गुरुगृह सोडण्याबद्दल स्वतःला शिक्षा घेऊन प्राणत्याग केला (२.४५). नंतर नृसिंहसरस्वती पंचगंगा आणि कृष्णा नद्यांच्या संगमावर (नृसिंहवाडीक्षेत्री) बारा वर्षे राहिले (२.४८). नंतर अमरापूर येथे जाऊन त्याने एका ब्राह्मणाचे दारिद्र्य दूर केले. तेव्हापासून नृसिंहवाडी हे क्षेत्र अतिशय महत्त्वाचे पवित्र क्षेत्र झाले. हे सांगताना पुढील श्लोक आला आहे. तोही अनुप्रास, यमक ह्या अलंकारांनी नटलेला आहे.

*ततः प्रभृति तत्पुरं प्रवरमाबभौ सुन्दरं दरम् । हरति यत्सदा निवसतां सतां सादरम् ।*
*वरं च वितरत्यरं गदहरं सुचारं नरं न रञ्जयति किं न किं दुरितहारि पृथ्वीवरम् ॥२.५३॥*

ते क्षेत्र श्रेष्ठ आणि सुंदर आहे. तेथे राहणाऱ्या लोकांची भीती ते दूर करते. सन्मार्गवर्ती लोकांना ते मनोरंजक आणि पापनाशक वाटणार नाही काय ? वाटेलच.

मृत पुत्राच्या दुःखाने आर्त झालेली एक ब्राह्मणस्त्री गुरुपादुकांजवळ आली; आणि तिने गुरुपादुकांची सेवा केली. पूर्वजन्मात त्या स्त्रीने एका ब्राह्मणाकडून शंभर रुपये घेतले. ते तिला परत न करता आल्यामुळे तो तिच्या स्वप्नात येऊन तिला छळत असे. त्याचप्रमाणे त्यानेच त्या स्त्रीच्या मुलाचा नाश केला होता. तो ब्राह्मण एक पिशाच झाला होता. नृसिंहसरस्वतींनी त्या स्त्रीला त्या पिशाचापासून सद्गती मिळवून दिली. नृसिंहसरस्वतींच्या कृपेमुळे त्या स्त्रीला दोन जुळे मुलगे झाले (२.५५-६५). तो मृत मुलगाही त्यांनी जिवंत केला (२.७६). गाणगापुरात त्यांनी वंध्य म्हशीलाही दूध देण्यास समर्थ केले (२.७८). नंतर त्यांनी त्रिविक्रम-भारतीचा गर्व हरण केला (२.७९-८५). इतरही दोन ब्राह्मणांचे गर्वहरण केले (२.८७-८९). ह्या संदर्भात आलेल्या एका श्लोकात फक्त द् आणि व् ह्या दोन व्यंजनांचा वापर केला आहे -

*दन्ददावदव देव वेदविद्देवदेव वद वेदवादवी ।*
*वादवादवद वेदवादविद् दन्दवोऽवदविदं वदोवदः ॥२.८८॥*

शाब्दिक कसरती हे संस्कृत साहित्याचे वैशिष्ट्य येथे दिसून येते. पुढे हे दोन ब्राह्मण ब्रह्मराक्षस झाले. पण नृसिंहसरस्वतींच्या कृपेने बारा वर्षांनंतर त्यांना सद्गती लाभली (२.९). आधी ज्या पतिताचा उल्लेख केला आहे तो सात जन्मांपूर्वी एक विद्वान् ब्राह्मण होता. दुराचरणामुळे तो पतित झाला होता (२.९१ व पुढे). येथेच नृसिंहसरस्वतींनी कर्मविपाकतत्त्वाचे विवेचन केले आणि दुराचरणामुळे मिळणाऱ्या वाईट फळांचे स्पष्टीकरण केले (२.९२-९६).

भस्मधारणाचे महत्त्व सांगण्याच्या निमित्ताने नृसिंहसरस्वतींनी अशी एक कथा सांगितली आहे की दुर्जन हा दुराचारी राजा दुर्वर्तनामुळे ब्रह्मराक्षस झाला. वामदेव मुनींना खाण्यासाठी त्याने पकडले. वामदेव मुनींच्या अंगाचे भस्म ज्या ब्रह्मराक्षसाला लागल्याबरोबर त्याला पूर्वजन्मीचे स्मरण झाले मग त्याने वामदेव मुनींना खाण्याचा विचार सोडून दिला (२-१०१) त्यानंतर भस्मधारण करण्याचा विधी, त्याचे महत्त्व ह्यासारख्या गोष्टी नृसिंहसरस्वतींनी विशद केल्या. एक कुत्रे स्मशानात भस्मावर बसले त्याच्या पोटाला भस्म लागले. ते कुत्रे पुढे एका द्राविड ब्राह्मणाच्या शवाव बसले. कुत्र्याच्या पोटावरचे भस्म त्या ब्राह्मणाच्या कपाळी लागले व त ब्राह्मण मुक्त झाला (२.१०२).

तृतीय शतकात गोपीनाथ नावाच्या ब्राह्मणाला झालेला दत्त नावाचा मुलगा, त्याची आई आणि वडील यांची कथा सुरुवातीला आली आहे. तो मुलगा रोगी झाला. त्याचे वडीलही मेले. ती आई गाणगापुराला आली. त्या आईला भगवान् यतिवर गुरुमूर्ती ह्यांनी उपदेश केला (३.१-९). त्या निमित्ताने स्त्रीधर्माचे विवेचन गुरुमूर्तींनी केले. 'स्त्रियांना स्वातंत्र्य नाही; पति हाच स्त्रियांचा गुरु. त्याची सेवा हीच देवूपजा. पतीच्या नातलगांची सेवा हीही हितकरच आहे. दैववशात् पती मृत झाला असता त्याच्याबरोबर अनुगमन करावे (सती जावे) किंवा वैधव्यव्रत धारण करून राहावे. वैधव्यव्रत म्हणजे जमिनीवर झोपणे, केशवपन करणे, एकादशी इत्यादींचा उपवास, धार्मिक कृत्ये, दान इत्यादी करीत जीवन कंठणे (२.१४-१५). गुरुमूर्तींनी तिला रुद्राक्ष व भस्म दिले. गुरुमूर्तींच्या कृपेमुळे तिचा पती जिवंत झाला (२.१६-१८). गुरूंनी पुढे तिला क्षमेश राजा, भद्रसेन हा त्याचा मुलगा इत्यादींच्या कथा सांगितली (२.१९). तसेच स्त्रियांना मंत्र देऊ नये ह्या नियमाच्या संदर्भात देवयानीची कथा सांगितल्या (२.२०). तसेच सोमवारचे व्रत सांगण्याच्या निमित्ताने सीमंतिनीची कथा सांगितली (२.२१). नंतर दत्तगुरूंनी ब्राह्मणाच्या वर्तनाचे नियम सांगितले. त्यात सकाळी लवकर उठणे, शौच, मुखमार्जन, स्नान, संध्या इत्यादी कसे करावे ह्यासंबंधीची माहिती सांगितली (२.२६-२७). त्याचप्रमाणे पंचायतन-पूजा, देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भोजन इत्यादींचे नियम सांगितले (२.२८-२९). भोजनाविषयीच्या नियमात पौर्णिमा, दर्श आणि रविवार ह्या दिवशी अनशन, चतुर्दशी, अष्टमी ह्या दिवशी दिवसा भोजन न करणे, एकादशीच्या दिवशी पूर्ण निराहार राहणे, हे नियम समाविष्ट आहेत. विधवा आणि यति ह्यांनी तांबूलभक्षण करू नये (२.३०).

ह्यानंतर भास्कराची कथा आली आहे. तो तीन जणांना पुरेल एवढे अन्न घेऊन गुरूकडे आला. परंतु तीन महिने वाट पाहूनही त्याला भिक्षा घालणे शक्य झाले नाही (३.३२). शेवटी गुरूंनी त्याला अन्न शिजवण्यास सांगितले. त्या अन्नाने चार हजार मानव तसेच अनेक पशु-पक्षी तृप्त झाले. त्याचे अन्न सगळ्यांना पुरले. येथे 'प्राकाम्यसिद्धी' ह्या सिद्धीच्या प्रकाराने भास्कराची इच्छा गुरुदेवांनी पूर्ण केली असे म्हटले आहे (२.३१-३४).

सोमनाथ ब्राह्मणाच्या रजोनिवृत्त स्त्रीलाही अश्वत्थसेवेने गर्भप्राप्ती होण्याचा चमत्कार श्रीगुरु मूर्तींनी केला (३.३५-४०). नरहरी नावाच्या कुष्ठरोग्याला औदुम्बर काष्ठाची उपासना गुरूंनी सांगितली. त्या औदुंबराच्या काष्ठालाही पुढे अंकुर फुटले आणि नृहरींचा कुष्ठरोग बरा झाला (३.४१-४४).

तन्तुकाला झालेले श्रीशैल्याचे दर्शन हा विषय नंतर आला आहे (३.४९-५६). नन्दिशर्मा नावाच्या कुष्ठरोगी ब्राह्मणाची कुष्ठरोग्यापासून मुक्ती ही कथा ह्यानंतर आलेली आहे (३.५७-६९). ह्याच संदर्भात एकाक्षरबन्ध आणि द्व्यक्षरबन्ध ह्या प्रकारचे श्लोक आले आहेत.

*तीतातितातीत तात ततताम्रुततीत ते ।*
*तत्ता तुता तता तेऽन्तातीतता ऽ तितता ततः ॥*
(३.६७) ॥ (एकाक्षरबन्ध)

*सरसासारसंसार सुरासारारिसारर ।*
*सूरिसूरेऽसुरारे रैस्सारेरं रसोऽसि सः ॥*
(३.६८) (द्व्यक्षरबन्ध)

ह्यानंतर म्लेंच्छ राजाकडून गाणगापुरास भेट ह्यांसारखे संकीर्ण विषय आले आहेत. श्लोक क्र. १०५ आणि १०६ ह्या श्लोकांमध्ये अनुक्रमे सर्वतोभद्र आणि मुरजबन्ध ह्या दोन शब्दालंकारांचा (चित्रकाव्य प्रकारांचा) उपयोग आहे.

*साकारता तारकासा कापि साररसापि का ।*
*रसाय मेऽमेयसार तारमेय यमेरता ॥ (३.१०५) (सर्वतोभद्रः)*
*अवरं श्रीवरं वन्दे श्रीवरं श्रीकरं वदे ।*
*देवरं श्रीवरं सन्तं नूवरं श्रीपरं सतम् ॥ (३.१०६) (मुरजबन्धः)*

## उपसंहार

श्रीवासुदेवानन्दसरस्वतींच्या श्रीगुरुचरित्रकाव्य ह्या तीनशे श्लोकांच्या काव्यांची काही सर्वसाधारण वैशिष्ट्ये अशी सांगता येईल. संस्कृत भाषेवर, संस्कृतमधील विविध वृत्तांवर, व्याकरण, तत्त्वज्ञान ह्यांसारख्या विषयांवर असलेले कमालीचे प्रभुत्व ह्या काव्यातील प्रत्येक श्लोकात प्रतिबिंबित झाले आहे. गुरु ह्या कल्पनेविषयी असलेला नितांत आदर, दत्तसंप्रदायातील विविध महापुरुषांच्या चरित्रांचे सम्यक् ज्ञान, नवरसांचे चित्रण करण्याची क्षमता, शब्दचातुर्य, श्लेष, अनुप्रास, यमक, चित्रबन्ध ह्यांसारख्या काव्यालंकारांचा उत्तम परिचय आणि त्यांचा वापर करण्याची कुशलता ह्यांनी हे काव्य सुशोभित झाले आहे आणि त्या काव्याला 'अभिजातते'चा स्पर्श झाला आहे. श्रीवासुदेवानंदसरस्वतींचे स्थान केवळ धार्मिक आणि आध्यात्मिक क्षेत्रातच महत्त्वाचे आहे असे नसून संस्कृत काव्येतिहासातही महत्त्वाचे आहे असा निष्कर्ष काढता येईल.

**डॉ. गणेश उमाकांत थिटे**
संस्कृत विभाग प्रमुख, पुणे विद्यापीठ, गणेश खिंड, पुणे ४११००७.




# द्विसाहस्री गुरुचरित्र


**श्री. उ. र. कुर्लेकर**

*बी.कॉम, एल.एल.बी. युनियन पब्लिक सर्व्हिस कमिशन दोन्ही वर्षी शासकीय सेवा परिक्षा उत्तीर्ण. १९५७ सेंट्रल सेक्रेटेरिएट सर्व्हिसमध्ये प्रवेश. ४ वर्षे इंडियन ऑईल कंपनीचे संस्थापक सचिव. ४ वर्षे मँगेनीज ओअर कंपनीचे ॲडमिनिस्ट्रेटीव्ह ऑफिसर व सेक्रेटरी. दिल्लीत निरनिराळ्या मंत्रालयात निरनिराळ्या पदांवर १९९० मध्ये केंद्रीय खाद्य व नागरी पुरवठा मंत्रालयातून डायरेक्टर म्हणून निवृत्त. सर्व ठिकाणी घरातील धार्मिक उपासना सांभाळली. श्रीगुळवणी महाराजांकडून शक्तिपात दिक्षा व श्रीदत्तमहाराज कवीश्वर यांचेकडून मंत्रदिक्षा प्राप्त. गीतेवर मराठी-इंग्रजीतून प्रवचन सेवा.*


पूजनीय श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामीमहाराज ही आधुनिक काळामध्ये महाराष्ट्रात होऊन गेलेली सुप्रसिद्ध अशी दत्तावतारी विभूती म्हणून दत्तभक्तांमध्ये सर्वज्ञात आहे. त्यांचा अवतारकाल इसवी सन १८५४ ते १९१४ म्हणजे श्रावण वद्य ५ शके १७७६ ते आषाढ शुद्ध १ शके १८३६ असा साठ वर्षांचा आहे. आपल्या अवतारकाळात पूजनीय श्रीस्वामीमहाराजांनी श्रुतिस्मृतिपुराणोक्त वैदिक धर्मानुसार ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चारही आश्रमांचे अत्यंत काटेकोरपणे प्रत्यक्ष आचरण करून दाखविले आणि दत्तभक्तीचा प्रसार सर्व भारतभर पायी संचार करून केला. पुराणकाळांत वर्णिलेल्या पण नंतर खंडित झालेल्या व ऐतिहासिक काळात इसवीसनाच्या चौदाव्या व पंधराव्या शतकांमध्ये श्रीपाद श्रीवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती या दोन दत्तावतारी विभूतींच्या चरित्रद्वारा पुनरुज्जीवित झालेल्या दत्तोपासनेचा जोरदार पुरस्कार श्रीटेंबेस्वामीमहाराजांनी केला. त्यासाठी त्यांनी श्रीसरस्वती गंगाधर (साखरे) यांनी साधारणपणे इसवी सन १५५८ च्या सुमारास रचलेला मराठी भाषेतला 'श्रीगुरुचरित्र' हा ओवीबद्ध ग्रंथ आधारभूत मानला. त्याच्या आधारे संस्कृत भाषेत "द्विसाहस्री गुरुचरित्र", "समश्लोकी गुरुकथा", "त्रिशती गुरुचरित्र" अशा मोठमोठ्या श्लोकबद्ध ग्रंथांची रचना केली. त्यापैकी "द्विसाहस्री" व "समश्लोकी" यांच्यावर संस्कृत गद्य भाषेत भाष्ये लिहिली. तसेच मराठी भाषेतही "सप्तशती गुरुचरित्र" हा सातशे ओव्यांचा ओवीबद्ध ग्रंथ आबालवृद्ध स्त्रीपुरुष दत्तभक्तांना नित्य उपासनेसाठी उपयुक्त व्हावा म्हणून निर्माण केला.

याशिवाय दत्तोपासनेच्या प्रसाराच्या उद्देशाने त्यांनी प्रचंड अशी ग्रंथरचना संस्कृत भाषेत केली. त्यांनी निर्माण केलेल्या दत्तभक्तिसंबंधी वाङ्मयाची तुलना संख्या आणि गुणवत्ता या दोनही दृष्टीने भगवत् पूज्यपाद श्रीमदाद्य शंकराचार्यांनी रचलेल्या वाङ्मयाशीच केवळ होऊ शकते ! मराठी भाषेतही अनेक भजने, पदे, कीर्तने, आख्याने अशी दत्तभक्तीपर रचना पूजनीय श्रीटेंबे स्वामीमहाराजांनी केलेली आहे. त्यांनी निर्माण केलेले हे सर्व वाङ्मय हे 'सिद्ध वाङ्मय' आहे ! म्हणजे प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने निर्माण झालेले, श्रीदत्तप्रभूंच्या पसंतीस उतरलेले व अनेक वर्षे अनेक दत्तभक्तांना ज्याची प्रचिती आलेली आहे असे "मंत्रसामर्थ्य" असलेले असे ते वाङ्मय आहे ! पूजनीय श्रीटेंबे स्वामीमहाराजांजवळ एक दत्तमूर्ती होती; ती त्यांच्याशी बोलत असे. श्रीस्वामीमहाराजांचे सर्व जीवन अगदी बारीक-सारीक हालचालीसुद्धा त्या दत्तमूर्तीच्या आदेशांप्रमाणे घडलेल्या असून त्यांचे चरित्र म्हणजे एका अतिशय आचारनिष्ठ, तपोनिष्ठ, ईश्वरनिष्ठ अशा ज्ञानी भक्ताची, कर्मयोग्याची, सर्वार्थाने समर्पित अशा जीवनाची कथा होय. पूजनीय श्रीटेंबेस्वामीमहाराजांच्या प्रचंड अशा वाङ्मयसंपदेतील "द्विसाहस्री गुरुचरित्र" या त्यांच्या सुप्रसिद्ध संस्कृत रचनेचा परिचय आज आपणांस थोडक्यात करून घ्यावयाचा आहे. नावाप्रमाणेच या ग्रंथात दोन सहस्र संस्कृत श्लोक असून शिवाय "योगरहस्य" व "बोधरहस्य" अशी दोन परिशिष्टेही त्यांत समाविष्ट आहेत.

या ग्रंथाच्या निर्मितीची हकिकतही विलक्षणच आहे. हा ग्रंथ पूजनीय श्रीटेंबेस्वामीमहाराजांच्या पूर्वायुष्यात ते माणगांवी गृहस्थाश्रमात असताना निर्माण झालेला आहे. श्रीटेंबेस्वामींच्या चरित्राकडे पाहिले तर असे दिसते की त्यांचे संगोपन त्यांचे आजोबा श्री. हरिभट टेंबे यांनीच केले. वयाच्या तिसऱ्या वर्षी बाळ वासुदेव खाजगी शाळेत धुळाक्षरे काढावयास शिकले. पण त्यांच्या आजोबांनी त्यांच्याकडून घरच्या घरीच रूपावली, समासचक्र, अमरकोश, नित्यस्तोत्रपाठापासून अष्टाध्यायीपर्यंत संस्कृत पठण करवून घेतले होते. वयाच्या आठव्या वर्षी (म्हणजे इसवी सन १८६२-६३) त्यांची मुंज झाली. त्यानंतर बटु वासुदेवांनी साधारण तीन-चार वर्षेपर्यंत विष्णुभट तात्या उकिडवे, भास्करभट ओळकर, विष्णुभट अळवणी यांचेजवळ वेदाध्ययन केले व याज्ञिकीचे शिक्षण पूर्ण केले. संभूशास्त्री साधले यांचे जवळ रघुवंशासारखे काव्य व थोडासा ज्योतिषाचा अभ्यास झाला. तसेच गोवा प्रांतात निळंभट पद्ये यांच्याकडेही थोडा ज्योतिषाचा अभ्यास झाला. त्यांचे औपचारिक शिक्षण म्हणावे तर ते इतकेच झाले होते ! मुंजीनंतर अडीच-तीन वर्षातच म्हणजे साधारणपणे सन १८६५ च्या आसपास आजोबा श्री. हरिभट टेंबे हे मृत्यू पावले. त्यामुळे आई, भाऊ-बहिणी यांचा सांभाळ करण्याची व प्रपंच चालविण्याची जबाबदारी बटु वासुदेवांवर येऊन पडली. कारण त्यांचे वडील श्रीगणेशभट टेंबे हे प्रारब्धवादी व भोळ्या स्वभावाचे होते आणि बहुतेक काळ ते गाणगापुरातच असत. बटु वासुदेवांचे चुलते बाळकृष्ण यांनी घरातल्या वस्तु पळविणे व कर्ज करून ठेवणे या पलिकडे काहीच केले नाही. बटु वासुदेवांनी प्रपंचाची जबाबदारी पौराहित्य करून पार पाडली व भावांच्या मुंजी, बहिणींची लग्ने इत्यादी कार्ये करण्यास वडिलांना मदत केली. वयाच्या एकविसाव्या वर्षी वासुदेवांचा विवाह झाला व त्यांनी गृहस्थाश्रमात प्रवेश केला (इसवी सन १८७५). त्यानंतर दोन वर्षातच (सन १८७७) मध्ये वडील श्रीगणेशभट यांचे निधन झाले. आता प्रपंचाची सर्वच जबाबदारी वासुदेव भटजींवर (त्यांना त्या वेळी 'बुवा' म्हणत असत) येऊन पडली व ती त्यांनी आपल्या

वयाच्या छत्तिसाव्या वर्षी माणगांव कायमचे सोडेपर्यंत निभावून नेली. वर उल्लेखिलेली त्यांच्याशी बोलणारी दत्तमूर्ति त्यांच्याकडे शके १८०५ म्हणजे इसवी सन १८८३ मध्ये आली होती. या मूर्तीच्याद्वारे श्रीदत्तप्रभूंकडून जसे आदेश मिळत त्याप्रमाणे श्रीवासुदेवभटजी किंवा बुवा यांचे कार्यक्रम चालत असत. कधी कधी आपले सदाचारसंपन्न मित्र अळवणी यांचेकडे सावंतवाडीस बुवा जात असत. तेथे विष्णुपंत आणावकर यांच्या अंगांत पिशाच्च योनीत गेलेला त्यांचा एक पूर्वज येत असे. तो सर्व शास्त्रांत निष्णात होता व भूतभविष्य वृत्त अगदी बरोबर सांगत असे. देवांच्या आदेशाप्रमाणे वागताना काही शंका आल्यास बुवा देवांना प्रार्थना करीत व देवांकडून लगेच उत्तरही मिळत असे. केव्हा स्वप्नात, केव्हा जागेपणी मोठ्या आकाशवाणीच्या रूपाने असे आदेश अनेक प्रकारांनी होत असत व त्याप्रमाणे बुवा वागत असत. केव्हा केव्हा आणावकर पिशाच्चाकडूनही काही निर्णय होत असे.

शके १८०५ च्या वैशाख मासामध्ये (म्हणजे इसवी सन १८८३) दत्तमूर्तीची स्थापना माणगांवात झाली व लगेच पुढच्याच वर्षी शके १८०६ (इसवी सन १८८४) मध्ये त्या दत्तमूर्तीने मराठी गुरुचरित्रावर संस्कृत रचना करावी असा आदेश बुवांना दिला. देवाचे असे सांगणे झाले की, "सध्या गुरुचरित्र नावाने प्रसिद्ध असलेला हा ग्रंथ मराठी भाषेत असल्यामुळे त्याचा या भरतखंडांत सर्वत्र उपयोग होत नाही. या करिता सर्वत्र गुरुलीलेचे स्मरण होऊन भक्ति-ज्ञानाची वाढ व्हावी यासाठी संस्कृत भाषेत गुरुचरित्र लिहावे !" हा आदेश मिळाल्यावर "हे काम व्हावे कसे ?" अशी शंका साहजिकच बुवांच्या मनात आली. कारण ग्रंथरचना करण्याइतपत संस्कृतचे ज्ञान आपणांस आहे असा त्यांना विश्वास वाटत नव्हता. त्यांना बालपणी मिळालेल्या औपचारिक शिक्षणाचा उल्लेख वर आलेलाच आहे. ते शिक्षण पौराहित्य व याज्ञिकीपुरतेच मर्यादित होते. रघुवंश वगैरे काव्यग्रंथांचे अध्ययन जुजबी स्वरूपाचेच झाले होते. तेव्हा आपल्या अपुऱ्या संस्कृतच्या ज्ञानावर संस्कृत भाषेत गुरुचरित्र लिहिणे कसे शक्य होणार ? अशी शंका बुवांच्या मनात आल्यावर लगेच देवांकडून पुनः सांगणे झाले की 'संस्कृत येत नाही म्हणून काळजी करू नये. दौत-लेखणी घेऊन लिहिण्याची तयारी करावी; काय लिहायचे ते सुचत जाईल.' त्याप्रमाणे बुवांनी तयारी केली व लेखन सुरू झाले. श्री. नारोपंत उकिडवे या नावाच्या बुवांच्या स्नेह्याने 'हे ग्रंथलेखनाचे काम तुम्ही कसे करू शकता ?' असे त्यांना विचारले. तेव्हा बुवांनी सांगितले की, 'मी लिहिण्यास बसलो की एका कागदावर मला जशी अक्षरे दिसतात तशी मी लिहून काढतो. माझा काही संबंध नाही.' थोड्याच काळात २३ अध्यायांचा संस्कृत ग्रंथ तयार झाला व त्यांत प्राकृत ओवीबद्ध गुरुचरित्रांतील बहुतेक सर्व विषय आला. ग्रंथ संपल्यावर 'संहितेयं द्विसाहस्री' असे देवांकडून सांगणे झाले. बऱ्याच वेळाने त्या वाक्याचा अभिप्राय लक्षात घेऊन बुवांनी ग्रंथाची श्लोकसंख्या मोजून पाहिली पण ती दोन हजार इतकी भरेना ! तेव्हा सप्तशतीप्रमाणे उवाच मंत्र, अर्धश्लोक यांच्यासह गणना केली असता ती बरोबर भरली ! या लेखनांत व्याकरणाच्या दृष्टीने काही अशुद्धे राहिली असावीत असे बुवांना वाटू लागले. तेव्हा "ते (लेखन) मला आवडले आहे आणि अन्य व्याकरणादी दृष्टीने ते शुद्धच आहे" असे देवांचे पुनः सांगणे झाले. तेव्हापासून हा ग्रंथ 'द्विसाहस्री गुरुचरितम्' किंवा 'द्विसाहस्री गुरुचरित्र' म्हणून ओळखला जाऊ लागला !

पण या ग्रंथाच्या निर्मितीची विलक्षण कथा येथेच संपली नाही. शके १८०६ (इसवी सन १८८४) मध्ये माणगांवी हा ग्रंथ लिहिला गेला. पुढे वैशाख वद्य चतुर्दशी शके १८१३ या दिवशी बुवांच्या धर्मपत्नी सौ. अन्नपूर्णाबाई यांचे गंगाखेड येथे निधन झाले. पत्नीच्या निधनानंतर १४ व्या दिवशी बुवांनी संन्यासाश्रम स्वीकारला. त्यानंतर ते परिव्राजक झाले व संन्यास धर्माप्रमाणे चातुर्मासाखेरीज कोणत्याही एका ठिकाणी तीन दिवसांपेक्षा अधिक न राहता सर्वत्र संचार करण्याचे व्रत त्यांनी स्वीकारले. या लेखाच्या प्रारंभी उल्लेख केल्याप्रमाणे त्यांनी सर्व भारतभर पायी अनवाणी प्रवास करून दत्तभक्तीचा प्रसार केला आणि सन १८९१ ते १९१४ या तेवीस वर्षांच्या संन्यासाश्रमाच्या काळात त्यांचे चातुर्मास भारताच्या निरनिराळ्या भागांत झाले. या संचारात शके १८२० (म्हणजे इसवी सन १८९८) मध्ये पूजनीय श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज गिरनार पर्वतावर आले. तेथे श्रीदत्तपादुकांना वंदन करून सोरटी सोमनाथाचे दर्शन व्हावे म्हणून माघ महिन्यांत प्रभास क्षेत्रांत आले. प्रभासपट्टणांत असताना श्रीस्वामीमहाराजांना "द्विसाहस्री गुरुचरित्रावर टीका" लिहिण्याची देवांची आज्ञा झाली. त्यावेळी मूळप्रत सुद्धा जवळ नव्हती. तरीही आज्ञेप्रमाणे टीका लिहिण्यास प्रारंभ केला व दिव्यस्मृतीने ९ व्या अध्यायापर्यंत टीका तेथे (म्हणजे प्रभासपट्टणांत) झाली. प्रभासक्षेत्राहून महाराज ज्या ठिकाणी श्रीकृष्णपरमात्मा निजधामास गेले त्या प्राची सरस्वती या स्थानात जाऊन पोचले. तेथून सुदामपुरीस (पोरबंदर) काही दिवस राहून ज्येष्ठ मासात (शके १८२१) महाराज श्रीक्षेत्र द्वारका या मुक्तिपुरीत येऊन पोचले. शके १८२१ (म्हणजे इसवी सन १८९९) चा चातुर्मास द्वारकेत झाला. द्वारकेत असताना 'द्विसाहस्री' वरील टीका दहाव्या अध्यायापासून सुरू करून तेविसाव्या अध्यायापर्यंत पुरी केली. मूळ ग्रंथ जवळ नसताना केवळ स्मरणानेच ही टीका झाली याचे महाराजांना स्वतःलासुद्धा मोठे आश्चर्य वाटले. त्यानंतर लिहिलेल्या एका पत्रांत महाराज म्हणतात, "श्रीक्षेत्र प्रभास येथे ९ अध्यायांची टीका झाली. बाकीची आनर्त देश, श्रीक्षेत्र द्वारका येथे १४ अध्याय पूर्ण झाले. ही टीका होणे एवढा या व्यक्तिचा अधिकार नाही. रामो हरी करणाऱ्या मुखाचे हे माहात्म्य नव्हे तर स्वामींचा अनुग्रह व स्वहृदयस्थ स्वमहिमाख्यापक श्रीगुरुप्रसाद जाणावा."

अशा लोकविलक्षण रीतीने लिहिला गेलेला "द्विसाहस्री" हा ग्रंथ म्हणजे पूजनीय श्रीटेंबेस्वामी महाराजांची स्वतंत्र रचना आहे. हे काही सरस्वती गंगाधरांनी मराठीत लिहिलेल्या ओवीबद्ध श्रीगुरुचरित्र या ग्रंथाचे निव्वळ संस्कृत रूपांतर नव्हे किंवा त्यावरची टीकाही नव्हे. ज्याप्रमाणे श्रीरामप्रभूंची कथा ही प्रथम वाल्मिकींनी आपल्या 'रामायणात' सांगितली आणि नंतर तुलसीदासांनी आपल्या 'रामचरितमानस' मध्ये सांगितली. दोन्हींमध्ये प्रसंग तेच आहेत. पण म्हणून 'रामचरितमानस' म्हणजे वाल्मिकी रामायणाचे हिंदी रूपांतर किंवा वाल्मिकी रामायणावरील हिंदी टीका असे मानले जात नाही. "रामचरितमानस" ही तुलसीदासांची स्वतंत्र रचना मानली जाते. त्याचप्रमाणे श्रीगुरुचरित्रांतील प्रसंगांवर प्रथम मराठी ओवीबद्ध रचना सरस्वती गंगाधरांनी केली आणि नंतर संस्कृत भाषेत श्लोकबद्ध रचना श्रीटेंबेस्वामीमहाराजांनी "द्विसाहस्री" द्वारा केली. पण एकाच प्रसंगावर बेतलेल्या त्या दोन स्वतंत्र रचना आहेत. एकाच भाषेतील ग्रंथाचे दुसऱ्या भाषेतले रूपांतर नव्हे ! सरस्वती गंगाधरांच्या मूळ मराठी गुरुचरित्राचे संस्कृत रूपांतरही पूजनीय श्रीटेंबेस्वामीमहाराजांनी केले आहे; पण ते "सप्तश्लोकी गुरुकथा" या ग्रंथांत; "द्विसाहस्री" ही स्वतंत्र रचना आहे !

अशी स्वतंत्र रचना करायचा उद्देश काय ? एक उद्देश वर सांगितलेलाच आहे तो म्हणजे सर्व भरतखंडांत गुरुलीलेचे स्मरण होऊन भक्ति-ज्ञानाची वाढ व्हावी हा होय. दुसरा उद्देश, दत्तसंप्रदाय म्हणजे विशिष्ट देवता आणि ग्रंथ यांच्या कर्मठ उपासनेशी संबंधित असा पंथ निदान महाराष्ट्रात तरी बनला होता, ते त्याचे सीमित स्वरूप बदलून दत्तोपासनेचे व्यापक स्वरूप प्रकट करावे हा होता. त्यासाठी अद्वैत वेदांताच्या महान परंपरेचा प्रभावी व उपासनात्मक आविष्कार श्रीदत्तसंप्रदायाद्वारे होता हे दाखवून देणे आवश्यक होते. ''द्विसाहस्री'' ग्रंथात श्रीगुरुचरित्र या मराठी ग्रंथातील प्रसंगांच्या आधारे श्रीटेंबेस्वामीमहाराजांनी शुद्ध वैदिक धर्माचे सिद्धांतच विषद करून दाखविले आहेत. हे सिद्धांत विषद करताना श्रुती, स्मृती, पुराणे यांचे संदर्भ जागोजागी दिलेले आहेत. त्यांनी श्रीदत्तात्रेय हा एक देव असे न मानता सर्व देवतांना आपल्यामध्ये समाविष्ट करून घेणारा परब्रह्म परमेश्वर पूर्ण ब्रह्म म्हणजे दत्तात्रेय होत अशी भूमिका प्रतिपादिली आहे. दैवतविचारामध्येसुद्धा ती ती देवता ही अनेक रूपे धारण करणाऱ्या परब्रह्माचीच वाचक असते. त्यामुळे वैदिक धर्ममध्ये जरी देवता व उपासनापद्धती यांची भिन्नता स्वीकारली असली तरी भारतीय जीवनदृष्टीमध्ये अनेक दैवतवाद किंवा अनेक श्वरवाद स्वीकारलेला नाही, हे लक्षात ठेवले पाहिजे. एकेश्वरवाद व ब्रह्मवाद हेच भारतीय जीवनदृष्टीचे अंतरंग आहे ! श्रीमदाद्यशंकराचार्यांनी पंचायतनपूजा रूढ करून भारतीय भक्तिशास्त्राला समन्वयी भूमिकेचे अधिष्ठान दिले आणि त्याला ब्रह्मसाक्षात्काराची जीवनदृष्टी दिली. श्रीशंकराचार्यांच्या अद्वैतज्ञानाधिष्ठित भक्तियोगाचेच प्रतिपादन ''द्विसाहस्री'' मध्ये असून पूजनीय श्रीटेंबेस्वामी महाराजांनी ज्ञानी भक्ताचे जीवन स्वतः जगून श्रीदत्तोपासनेचा अन्वयार्थ लोकांना समजावून दिलेला आहे. ''श्रीवैष्णवैशगाणेशसौरशाक्त्यादिरूपधृक् । दत्तात्रेयोऽस्त्वजोऽनंतः सदा मे हृदि सद्गुरुः ।।'' या द्विसाहस्रीच्या प्रथम श्लोकांतच त्यांची विशाल उदार अशी समन्वयी दृष्टी प्रकट झालेली आहे. अधर्माचा नाश करून धर्माची संस्थापना करण्यासाठी ईश्वराचे अवतार होतात. या सर्व अवतारांमध्ये भगवान् दत्तात्रेयांचा अवतार हा कलीयुगामध्ये सर्वाधिक लोकोपकारक आहे, कारण या अवतारांत श्रुतिस्मृतिपुराणोक्त भुक्तिमुक्तिप्रदायक अशा सद्गुरु रूपाने प्रत्यक्ष परब्रह्मच सगुणरूपाने व्यक्त होते आणि म्हणून कलीयुगात ईश्वराचा गुरु अवतार असलेल्या श्रीदत्तात्रेयांची उपासना शीघ्र फलदायी होते असा पूजनीय श्रीटेंबेस्वामीमहाराजांचा अभिप्राय आहे.

''द्विसाहस्री'' या ग्रंथामध्ये एकूण २३ अध्याय आहेत. त्यांतील अध्याय १ ते १३ मध्ये ज्ञानयोग, अध्याय १४ ते १८ मध्ये कर्मयोग व अध्याय १९ ते २३ मध्ये भक्तियोग सांगितलेला आहे. ग्रंथाच्या आरंभी असणाऱ्या श्रीगुरुस्तुतिमध्ये मानसपूजा, क्षमापराधस्तोत्र, अष्टोत्तरशतनामावली यांचा समावेश असून शिवाय श्रीदत्तप्रभूंचे श्रुतिप्रतिपादित निर्गुण ब्रह्मस्वरूप आणि भक्ताच्या अंतःकरणात असणारे सगुण दिव्य स्वरूप यांचे वर्णन करून श्रीदत्तप्रभूंची दिनचर्याही दिलेली आहे. याखेरीज ग्रंथाच्या अखेरीस योगरहस्य व बोधरहस्य अशी दोन स्फुट प्रकरणे आहेत. या ग्रंथाच्या चौथ्या अध्यायात मूळ मराठी गुरुचरित्रांत समाविष्ट नसलेला, श्रीपाद-श्रीवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वतीच्या अवतारांच्या पूर्वीच्या श्रीदत्तचरित्राशी संबंधित असा काही भाग आहे. त्यांत यदु, प्रल्हाद, कार्तवीर्य, अर्जुन यांना श्रीदत्तप्रभूंनी केलेला उपदेश आणि श्रीमद्भागवतातील श्रीदत्तात्रेयांच्या २४ गुरुंचे वर्णन तसेच अष्टांग योगाचे विवेचन यांचा समावेश केलेला आहे. अशा तऱ्हेने श्रीदत्तात्रेयाधिष्ठित संपूर्ण जीवनदृष्टी ''द्विसाहस्री'' या ग्रंथात व्यक्त झालेली आहे. त्यामुळे ''द्विसाहस्री'' हा एक ग्रंथ समग्र समजून घेतल्यास अद्वैत तत्त्वज्ञानाने प्रतिपादिलेली जीवनदृष्टी वाचकांना समजून येण्यासारखी आहे. ही जीवनदृष्टी हेच ''श्रीगुरुंचे तत्त्वज्ञान'' असून त्याच्या आकलनामुळे श्रीमद् आद्य शंकराचार्यांनी पुनर्स्थापित केलेल्या वैदिक धर्माचे आकलन सर्वसाधारण लोकांना होणार आहे. आपला वैदिक धर्म व आपली अद्वैत जीवनदृष्टी सर्वांना समजावी हा ''द्विसाहस्री''चा उद्देश आहे.

*नाभ्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः ।*
*यत्तत्वं मीलति ज्ञानां तं चिदानंदसद्गुरुम् ॥*
*भात्यनेकवदेकं सद्धीभेदादेकरूपया*
*विदात्यैकं परं ब्रह्म तत्सत्यं दत्तसंज्ञितम् ॥ (द्विसाहस्री अध्याय १ श्लोक १-२)*

विवर्ताधिष्ठानभूत सर्वेश्वराच्या अज्ञानामुळे व अविद्यादि मोहामुळे दोरीवर भासमान होणाऱ्या सर्पाप्रमाणेच नामरूपात्मक खोट्या जगताचा उदय झाला आहे. खरे (ब्रह्मात्मैक्य) ज्ञान झाल्यावर जगदाभास उरत नाही; अज्ञान मावळते आणि चिदानंदस्वरूप परमश्रेष्ठ गुरुतत्त्वाची अपरोक्षानुभूति येते. तोच परमेश्वर श्रीदत्त सच्चिदानंदरूप सद्गुरु आहे. अशा परमेश्वरांस मी नमस्कार करतो. भेदशून्य, त्रिकालाबाधित, देशकालयुक्त परिच्छेदरहित अशी परमसत्ता अंतःकरण उपाधिभेदामुळे अनेकरूप व विविध भासते. ज्या परमसत्तेच्या परब्रह्माच्या खऱ्या ज्ञानामुळे अनेकत्व व विविधता नाहीशी होतात त्या परमसत्तेस श्रीटेंबेस्वामीमहाराजांनी द्विसाहस्रीमध्ये दत्त असे म्हटले आहे !

## योगरहस्य व बोधरहस्य

''द्विसाहस्री'' ग्रंथाची ही दोन परिशिष्टे म्हणजे दोन स्फुट प्रकरणे आहेत. त्यांचा आता थोडक्यात विचार करू !

### योगरहस्य

''शाश्वतावतार'' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या श्रीदत्तात्रेयांचे योगमार्गाचे पुनरुज्जीवन व संवर्धन हे प्रमुख कार्य आहे. दत्तात्रेय हे 'योगिनां चक्रवर्ती' म्हणून ओळखले जातात आणि भारतीय साक्षात्कार शास्त्राच्या सर्व परंपरा दत्तात्रेय व योगमार्ग यांना 'गुरुपीठ' म्हणून गौरवितात. त्यामुळे पूजनीय श्रीटेंबेस्वामीमहाराजांच्या सर्व प्रमुख ग्रंथांमध्ये ''योग'' या विषयाचा उल्लेख व माहिती पहावयास मिळते. ''योगरहस्य'' हे ''द्विसाहस्री'' ग्रंथाचे परिशिष्ट अत्यंत संक्षिप्त केवळ ४२ श्लोकांचे असूनसुद्धा त्यांत अष्टांगयोगाची सर्व माहिती आलेली आहे. सर्व जन्मात मनुष्यजन्म श्रेष्ठ असून हा दुर्लभ जन्म प्राप्त झाला असता ईश्वर साक्षात्कार करून घेऊन त्या जन्माचे सार्थक करणे हे प्रत्येक माणसाचे श्रेष्ठ असे साध्य मानलेले आहे. त्यासाठी ज्ञान-कर्म-भक्ति ही साधने सांगितलेली आहेत. भक्तीवाचून कर्माला सफलता नाही आणि निष्काम कर्माने चित्तशुद्धी झाल्याशिवाय ज्ञानाची प्राप्ती नाही. ज्ञानाशिवाय कोणालाही मोक्ष मिळत नाही. भक्तियुक्त कर्माने चित्तशुद्धी, चित्तशुद्धीतून ज्ञान व ज्ञानाने मोक्ष अशी ही साखळी आहे. परंतु भक्ति, कर्म व ज्ञान या तिहींचा अंतर्भाव ''योगा'' मध्ये होतो. प्राण व मन यांचा लय झाल्याशिवाय ज्ञान होत नाही. ज्याला प्राण व मन यांचा लय साधतो त्याला 'योगी' असे म्हणतात. यम, नियम, आसन, प्राणायाम,

... अशी योगाची आठ अंग आहेत. यांतील पहिली चारही साधने असून बहिरंग स्वरूपाची आहेत. यम-नियमांच्या आचरणाने चित्तशुद्धीकरण, नीति व धर्मानुकूल सद्गुणांची जोपासना होते. यांचे अधिष्ठान सिद्ध झाल्यावरच योगाभ्यासाची पात्रता येते. योगाभ्यासाने कुंडलिनी जागृती साधता येते. अशा तऱ्हेने 'योगरहस्य' या प्रकरणात ज्ञान-कर्म-भक्ति यांचा योगाशी समन्वय सांगितला आहे. पण दुर्दैवाने योगमार्गी, ज्ञान, कर्म व भक्तीला तुच्छ लेखतात, तर ज्ञान, कर्म, भक्ती करणारे योगाला तुच्छ लेखतात, परंतु ज्ञान, कर्म, भक्ती यांची परिणती अखेर योगदर्शनात होते हे ओळखले पाहिजे. म्हणून पूजनीय श्रीटेंबेस्वामी महाराज सांगतात की ज्ञान-कर्म-भक्ति या तिहींचा अंतर्भाव अष्टांगयोगांत होतो. पूजनीय श्रीगुळवणी महाराजांनी "योगभक्तिदर्शन" च्या विशेषांकामध्ये "योगरहस्य" प्रकरणावर विवेचन केले आहे. त्यांत ते म्हणतात, "अष्टांगयोग साधन हे सर्व साधनांचा समन्वय असलेले असे साधन आहे. याचा अभ्यास करणाऱ्याला कर्म-ज्ञान-भक्ति हे अपरिहार्य आहेत. एक साधननिष्ठा ही चूक नसली तरी इतर साधनमार्गाची निंदा न करणे हेही महत्त्वाचे आहे ! हठयोगाच्या साधनाने कुंडलिनी शक्ति जागृत होते. पण हठयोग अवघड व कष्टप्रद आहे. त्याशिवाय कुंडलिनी शक्तीच्या जागृतीचा दुसरा शास्त्रसंमत मार्ग म्हणजे शक्तिपात दीक्षा हा होय. यामध्ये शिष्यामध्ये असलेली शक्ति सद्गुरुंच्या कृपेने जागृत होते. शक्तिजागृतीने प्राणवायु ऊर्ध्वगामी होतो आणि चित्त व प्राण या दोघांचा पूर्ण लय होतो. म्हणून कुंडलिनी योगाला "महायोग" म्हणतात. हा योगसुद्धा पातंजलयोगाप्रमाणे चित्तवृत्तिनिरोधरूपच आहे. पण हा गुरुकृपेने शीघ्र प्राप्त होतो. इतर मार्ग परिश्रमसाध्य आहेत. शक्तिपाताची परंपरा अनादि काळापासून चालत आलेली आहे. बहुतेक सर्व संप्रदायांमध्ये शक्तिसंचार कमीजास्त प्रमाणात मंत्रोपदेशद्वारा होतो. कुंडलिनीसुद्धा ईश्वररूपच आहे. तीच सर्व मंत्ररूप व सर्व देवतास्वरूपही आहे. ती जागृत होऊन सुषुम्ना नाडीतून तिचे आरोहण अवरोहण सुरू होण्यासाठी सद्गुरुंच्या सहाय्याची अत्यंत आवश्यकता आहे. गुरुतत्त्व ज्यांच्या ठिकाणी पूर्णपणे जागृत झालेले असते तेच शिष्याला सहाय्यक होत असल्यामुळे त्यांना सद्गुरु म्हणतात. शक्तिजागृतीद्वारा मोक्षप्राप्तीसाठी प्रयत्न करताना सद्गुरुभक्ति हीच सर्वश्रेष्ठ साधना असते. योगसाधनेमध्ये अनेक प्रकारची विघ्ने उत्पन्न होतात; ती सर्व सद्गुरुंच्या दृढ भक्तीने नाश पावतात. दृढ सद्गुरुभक्ति हीच निर्विघ्न योगसिद्धी करणारी असते; त्याशिवाय दुसरा उपाय नाही ! गुरु साक्षात् ईश्वररूप आहे ही भावनाच शिष्याच्या उन्नतीस कारणीभूत होते. गुरुविषयी किंवा गुरुबंधूविषयी ईर्षा, असूया, द्वेष, वैमनस्य इत्यादी दोष शिष्याच्या मनात कधीही निर्माण होऊ नयेत यासाठी शिष्याने दृष्ट अदृष्ट प्रयत्न सतत केला पाहिजे. नाहीतर या दोषांमुळे जागृत झालेल्या शक्तीचा विकास स्थगित होण्याचा संभव असतो. ज्या गुरुकुलामध्ये परस्पर सौहार्द भावना उत्तम प्रकारची असते तेथे गुरुतत्त्वाचा विकास अधिकाधिक व सर्वकल्याणप्रद असा होतो. उलट ज्या गुरुकुलामध्ये वरील दोषांचा प्रवेश होतो त्या कुळातील गुरुतत्त्वाची प्रथम प्रकट झालेली अभिव्यक्तीही लुप्त होऊन जाते !

**बोधरहस्य**

या शब्दामध्ये "बोध" या शब्दाचा अर्थ सर्व श्रुतींचे सार असलेल्या उपनिषदांचे "रहस्य" असा आहे. या बोधरहस्यामुळे ब्राह्मी स्थिति प्राप्त होत. गुरु शिष्यसंवादरूपाने सर्व वेदांचा रहस्यरूप जो ज्ञानमार्ग तो या रहस्यांत पूजनीय श्रीटेंबे स्वामीमहाराजांनी प्रकट केला आहे. यांत सर्व वेदांताचे सार भरलेले आहे. मोक्षप्राप्तीसाठी ज्ञान-कर्म-भक्ति व योग ही पायाभूत साधने आहेत. त्यापैकी ज्ञानमार्गामध्ये ब्रह्मचिंतन व आत्मानुसंधान हे महत्त्वाचे असते. ब्रह्मात्मैक्याचा अपरोक्षानुभव हीच परमोच्च अवस्था आहे. यालाच आत्मज्ञान म्हणतात. अशा या आत्मज्ञानाचे स्वरूप व महत्त्व 'बोधरहस्यामध्ये' प्रकट झाले आहे.

जी व्यक्ति आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा त्रिविध – विवेकवैराग्यशील बनते, जिची वृत्ती निष्काम स्वधर्माचरणाने संन्यस्त झालेली असते, आणि जी सद्गुरुंना अनन्यभावाने शरण गेलेली असते अशी व्यक्तीच ब्रह्मबोधाची अधिकारी बनू शकते ! अशी व्यक्ति दैवी संपत्तीने युक्त असली पाहिजे. तिच्याजवळ स्वधर्माचरण, शास्त्र व गुरु यांच्या वचनांवर श्रद्धा, आत्मानात्म विवेक, इहामुत्रफलभोगविराग, शमदयादिषट साधन संपदा आणि मुमुक्षुत्व या गोष्टी असल्या पाहिजेत.

या बोधरहस्यांत (१) जीवस्वरूप पिंड मीमांसा (२) जगत्स्वरूप ब्रह्मांडमीमांसा व (३) ब्रह्मात्मैक्य हे मानवीजीवनाचे परमसाध्य - असे ब्रह्मविद्येचे प्राण म्हणून उपनिषदांनी वर्णिलेले नियम आलेले आहेत. "बोधरहस्य" म्हणजे उपनिषदांचे एक प्रकारचे सार आहे ! पिंड ब्रह्मांड मीमांसा करताना पंचकोशविवरण सिद्धांत, सांख्यदर्शनातील विश्वमीमांसा व उपनिषदांमध्ये ब्रह्मात्मैक्यासाठी करावयास सांगितलेल्या उपायांची मीमांसा - या सर्व सिद्धांतांचे सार व समन्वयी तत्त्वदर्शन केवळ ४४ श्लोकांमध्ये केलेले आहे. पंचकोशांच्या तादात्म्याने जीवदशा प्राप्त होते. पण "मी कोण ?" या प्रश्नाचा शोध घेत साधक हे पंचकोश ओलांडतो, त्याचप्रमाणे स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चारही देहांच्या पलीकडे तो जातो, तेव्हा सच्चिदानंदमय, कूटस्थ, नित्य व साक्षीरूप अशा आत्म्याचे व तो आत्मा व या सर्व विश्वाला व्यापून असणारा परमात्मा हे दोघेही एकच आहेत असे ज्ञान व तशी अपरोक्षानुभूति प्राप्त करणे हाच मानवी जीवनाचा परमपुरुषार्थ आहे. हा पुरुषार्थ अन्वय-व्यतिरेक पद्धतीने विचार करून कसा साध्य करावा, श्रवण, मनन, निदिध्यासन यांच्या सहाय्याने साक्षात्कारपूर्वक ब्रह्मात्मैक्यबोध कसा प्राप्त करावा हे बोधरहस्यामध्ये सांगितले आहे. या बोधानंतर कोणतेच साधन शिल्लक राहात नाही. "या काष्ठा सा परागतिः ।" "यं ज्ञात्वा नापरं ज्ञानम्, मं लब्ध्वा नापरं लाभः ।" "यद्गत्वा न निवर्तन्ते" अशा श्रेष्ठ जीवनाचे दिग्दर्शन बोधरहस्यात आहे.

अशा तऱ्हेने पूजनीय श्रीटेंबेस्वामी महाराज यांनी रचलेला 'द्विसाहस्री गुरुचरित्र' हा ग्रंथ व त्याची 'योगरहस्य' व 'बोधरहस्य' ही दोन परिशिष्टे म्हणजे डॉ. सौ. सुनीता ज. जोशी यांनी "श्री दत्तावतार श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामीमहाराज वाङ्मयसंपदा व जीवनदृष्टी" या आपल्या प्रबंधामध्ये म्हणतात त्याप्रमाणे "द्विसाहस्री" हा ग्रंथ म्हणजे "मोक्षविद्येचे आनंदवन" आहे. त्याचा अभ्यास व अनुसंधान बद्ध, मुमुक्षु, साधक आणि सिद्ध अशा सर्व अवस्थेतील व्यक्तींना प्रेरक, उपकारक व मार्गदर्शक ठरेल यांत शंका नाही."

**श्री. उ. र. कुलेंकर**
डॉ. अनगळ पार्क, डी-८, चतुःशृंगी, सेनापती बापट मार्ग,
पुणे ४११०१६. दूरध्वनी - २५६५२२८०

## दत्तात्रेय ध्यानश्लोकाष्टकम्

दत्तात्रेय हरे कृष्ण उन्मतानंददायकम् ।
दिगंबर मुने बालपिशाच ज्ञानसागर ॥१॥
दत्तात्रेयं शिवं शान्तम् इंद्रनीलनीभं प्रभूम् ।
आत्ममायारत देवं अवधूतं दिगंबरम् ॥२॥
ज्ञानयोगनिधीं विश्वगुरूं योगिजनप्रियम् ।
भक्तानुकंपिनं सर्वसाक्षिणं सिद्धसेवितम् ॥३॥
दत्तात्रेयो महायोगी भगवान भूतभावना ।
चतुर्भुजो महाविष्णु योगसाम्राज्यदीक्षितः ॥४॥
जगदंकुरकंदाय सच्चिदानंदमूर्तये ।
दत्तात्रेयाय योगिन्द्रचंद्राय परमात्मने ॥५॥
दिगंबरं भस्मविलेपिताङ्ग बोधात्मकं मुक्तीकरंप्रसन्नं ।
निर्मानिसं ज्ञानतनुं भजेऽहं दत्तात्रेयं ब्रह्मसमाधियुक्तं ॥६॥
अवधूत सदानंद परब्रह्मस्वरूपिणे ।
विदेहदेह रूपाय दत्तात्रेय नमोऽस्तुते ॥७॥
स्वमैवैक परब्रह्म सच्चिदानंदम् अद्वयम् ।
अव्यक्तं व्यक्तिमापन्नं दत्तात्रेयं जगद्गुरुम् ॥८॥
श्रीगुरूदत्तात्रेयार्पणमस्तु ।
श्रीरस्तु ।

संकलन
वसंत गोडबोले
१२४, शनिवार पेठ (नेने घाट), पुणे - ४११०३०.

श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीकृत

## घोरकष्टोद्धरण स्तोत्र

श्रीपाद श्रीवल्लभ त्वं सदैव, श्रीदत्तास्मान्याहि देवाधिदेव
भावग्राह्य क्लेशहारिनसुकीर्ते, घोरात्कष्टोदुद्धरास्मान्नमस्ते ॥१॥
त्वं नो माता त्वं पिताप्तोधिपस्त्वं, त्रातायोगक्षेमकृत्सद्गुरुस्त्वं ।
त्वं सर्वस्वं नो प्रभो विश्वमूर्ते, घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥२॥
पापं तापं व्याधिमाधिं दैत्यम्, भीतिं क्लेशं त्व हरा ऽ शुत्वदैन्यम् ।
त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते, घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥३॥
नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता, त्वतो देव त्वं शरण्योऽकहर्ता ।
कुर्वत्रियानुग्रहं पूर्णराते, घोरात्कष्टदुद्धरास्मान्नमस्ते ॥४॥
धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्ति, सत्संगाप्तिं देहि मुक्तिं च भुक्तिं ।
भावासक्तिं चाखिलानन्दमूर्ते, घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥५॥
श्लोकपंचकमेतद्यो, लोकमङ्गलवर्धनम् ।
प्रपठेतन्नियतोभक्त्या स श्रीदत्तप्रियो भवेत् ॥६॥
इति श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीकृत "घोरात्कष्टोद्धरणस्तोत्रं" संपूर्णम् ।

स्तोत्रविशेष

१) श्री टेंबे स्वामी विरचित सर्व स्तोत्रांमध्ये हे मुकुटमणी आहे.
२) नरसोबावाडी सोडताना लोकाग्रहास्तव हे स्तोत्र रचले.
३) नित्य श्लोकसंख्येइतके (६) पाठ करावेत.
४) अर्थाशी समरस होऊन, पूर्ण एकाग्रतेने व भक्तीभावे ओथंबलेल्या स्वरात दत्तगुरुसमोर पठण करावे.
५) विशेष आपत्तीतून मुक्तीसाठी १०८ पाठ करावेत.
६) १०८ पाठांनी अभिमंत्रित विभूती असाध्य रोगांवरही गुणकारी.



# श्रीसप्तशतीगुरुचरित्रसार

सांसारिक दुःख - संशय निवृत्तीसाठी नाममंत्रसाधनेतून ईश्वरदर्शनप्राप्ती


**प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**

*एम्. ए. पीएच. डी. मराठी - विषय : चिं. त्र्यं. खानोलकरांची कविता - कादंबरी, अध्यापन मराठी विभागप्रमुख दयानंदकला व शास्त्र महाविद्यालय, सोलापूर. एम्. फील व पीएच.डी. मार्गदर्शक, ४० वर्षे वृत्तपत्रांत सातत्यपूर्वक लेखन, संतवाङ्मयावर लेखन, व्याख्याने, प्रवचने २४ वर्षे स्वामी समर्थ अक्कलकोट महाराज वार्षिक पुण्यतिथी महोत्सवाचे आयोजन २० पुस्तके प्रकाशित ४ पुरस्कार प्राप्त - डॉ. मु. श्री. कानडे पुरस्कार, महर्षि नारद पुरस्कार वगैरे.*


श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य प.पू. वासुदेवानंद सरस्वती तथा टेंबे स्वामी महाराज यांनी 'श्रीसप्तशती गुरुचरित्रसार' नांवाचा सातशे ओव्यांचा लघुकाव्यग्रंथ लिहिला असून त्यांत प्रत्येक ओवीतील तिसरे अक्षर घेतले तर श्रीमद् भगवाद्गीतेतील पंधरावा अध्याय तयार होतो. श्री टेंबेस्वामींनी तशी रचना करताना अर्थातच दोन्ही ग्रंथातील 'पारमार्थिक - बोध' साधकांना उपयुक्त आणि मार्गदर्शक ठरावा, अशीच भूमिका ठेवली असावी. त्यादृष्टीने दोन्ही ग्रंथातील या पारमार्थिक बोधाचा समन्वय कोणता असू शकेल, याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न इथे विनम्रपणे केला आहे.

## पूर्वपीठिका....

टेंबेस्वामी यांनी 'श्रीगुरुचरित्र' ग्रंथाचे सार विशद करणारा सातशे ओव्यांचा जो लघुकाव्यग्रंथ लिहिला आहे, तो 'श्रीसप्तशती गुरुचरित्रसार' या नावाने प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ त्यांनी शके १८२४ मध्ये लिहिला. तो मराठी / प्राकृत भाषेत लिहिला असून त्यांत प्रत्येक ओवीतील तिसरे अक्षर घेतल्यास भगवद्गीतेतील पंधरावा अध्याय तयार होतो. मराठी / प्राकृत भाषेतील ओवीरचनेत संस्कृत भाषेतील गीतेच्या पंधराव्या अध्यायातील अक्षर हे कोंदणात हिरा चमकावा तसे आहे. गुरुचरित्रसार सांगताना पंधराव्या अध्यायाचा म्हणजे 'पुरुषोत्तम योग' याचा विचार टेंबेस्वामी यांनी अग्रणी कां ठेवला असावा, याचा मागोवा घेताना 'पुरुषोत्तमयोग' मधील 'जीवोद्धाराची भूमिका' आणि 'गुरुचरित्र' मधील 'लोकोद्धाराचे कार्य' यांच्यातील 'समन्वय' हा प्रेरक - उपकारक - मार्गदर्शक आहे, हे ध्यानात येते. दोन्ही ग्रंथात 'गुरूद्वाविलिया वाटा' अशा मार्गाने गेल्यासच जीवाचे / लोकांचे कल्याण होणार आहे, यांत मुळीच शंका नाही. 'श्रीसप्तशतीगुरूचरित्रसार' आणि 'पुरुषोत्तम योग' यांतील समन्वय पाहताना त्यांची एक आकलनाची दिशा आणि विवेचनाची सीमा ठरवून घेतली आहे. प्रथम 'श्रीसप्तशती गुरुचरित्रसार' मधील ओव्यांमधून प्रकटलेले भक्तितत्त्व पाहून मग त्याचा पंधराव्या अध्यायाशी म्हणजे पुरुषोत्तम योग मधील विवेचनाशी कोणता संबंध आहे, हे पाहिले आहे. त्यावेळी (१) श्री ज्ञानदेव (२) श्रीगुरुदेव रानडे (३) स्वामी स्वरूपानंद यांनी केलेली भाष्ये पाहिली आहेत. त्यानंतर 'श्रीगुरुचरित्र' ग्रंथातील विशेषत्वाने प्रकटलेला आशय लक्षात घेतला आहे. दोन्हीकडे म्हणजे 'पुरुषोत्तमयोग' आणि 'गुरुचरित्र' यामध्ये येणारे अश्वत्थवृक्षाचे प्रतिमारूप हे अग्रणी ठेवून त्यांतील प्रकटलेला 'भक्तिबोध' हा इथे विदरून पाहिला आहे. टेंबेस्वामींनी 'श्रीगुरुचरित्रसार' सांगताना 'पुरुषोत्तम योग' मधील अश्वत्थवृक्ष कोणत्या रीतीने लक्षणीय मानला असेल, याचाही विचार त्यामधून मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

## 'सप्तशती' मधील भक्तिसार...

श्री दत्तात्रेयांच्या अवतारित्वाचे विभूतीमत्व ज्या अनेक सत्पुरुषात प्रविष्ट झाले आणि प्रकटही झाले, त्या विभूती परंपरेत श्री वासुदेवानंद सरस्वती तथा टेंबेस्वामीमहाराज यांचा समावेश होतो. इ. स. १८५४ मध्ये कोकणभूमीत माणगांवी त्यांचा जन्म झाला. नरसोबाची वाडी येथे त्यांना श्री गोविंदस्वामी नामक सद्गुरू भेटले. त्यांचेकडून ब्रह्मविद्या आणि गूढशक्ती त्यांना प्राप्त झाली. उज्जैन येथे श्री नारायण सरस्वती यांचेकडून त्यांनी संन्यासदीक्षा घेतली. ज्ञानमार्गी आणि कर्मयोगी असलेले त्यांचे व्यक्तिमत्व शुद्धआचरण आणि कठोर व्रतानुसंधान यामुळे 'दत्तप्रभू' या बिरुदावलीने ओळखले जाऊ लागले. संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषेतून त्यांनी विपुल ग्रंथलेखन केले. हृदयात करुणा भरून राहिल्याने त्यांनी आपले सर्व आयुष्य जीवोद्धार / लोकोद्धार करण्यासाठी खर्च केले. त्यांची समाधी गुजरातमध्ये गरुडेश्वर येथे आहे. ध्यानधारणा, श्रीगुरुचरित्रपठण, दत्तप्रभूंची सेवा ही त्यांच्या जीवनधारणेची त्रिसूत्री आहे. 'द्या महाराज अशी प्रार्थना केली असता 'दिले' म्हणून जी फलप्राप्ती हाती येते, तीच 'दत्तकृपा' होय. त्यादृष्टीने त्यांनी साधकांना उपासना सांगितली आणि दत्तकृपेचे फळ म्हणून जीवनात सुख, समाधान, आनंद, तृप्ती, शांती ही परमार्थाची पंचपदी देऊ केली. २००३ ते २००४ हे त्यांच्या जयंतीचे 'शतकोत्तर सुवर्णमहोत्सवी वर्ष' म्हणून साजरे होत आहे. या निमित्ताने त्यांच्या ग्रंथसंपदेचा आणि कार्यकर्तृत्वाचा आढावा घेणे औचित्यपूर्ण असल्याने 'श्रीसप्तशती गुरुचरित्रसार' ग्रंथातील भक्तिबोध पाहणे महत्वाचे आहे. 'आचारः प्रथमो धर्मः' हे त्यांचे ब्रीद आहे.

'श्रीसप्तशती गुरुचरित्रसार' ग्रंथातील भक्तिबोधाचे स्वरूप पाहता असे दिसते की, पठण-पारायणासाठीही हा संक्षिप्त गुरुबोध त्यांनी काव्यरूपाने प्रकट केला असून त्यांत 'सत्पुरुषांचे / सद्गुरूंचे / भजन केले असता भवरोग निर्बीज होईल' असे श्रीदत्तगुरुंचे जे आश्वासन आहे, त्याची नोंद टेंबेस्वामी यांनी केली आहे. (अ. ५० ओवी ७) 'वागती सत्कर्मे । स्वधर्मे तरती ते ।।' (अ. २८ ओवी १४) अशा स्वरूपात नीतीयुक्त आचरण आणि नामस्मरणयुक्त उपासना केल्यासच भवरोगातून जीव उद्धरून जाईल, हे त्यांनी प्रतिपादिले आहे. भवरोग म्हणजे सांसारिक दुःखे होत. अज्ञान आणि संशय या दोन्हींची छाटणी ज्ञानशस्त्राने व्हायला हवी. ज्ञानशस्त्र म्हणजे नामशस्त्र होय. म्हणूनच गीतेत आणि गुरुचरित्रात

दुःख - संशय निवृत्तीसाठी अध्यात्मविद्या आत्मसात केली पाहिजे, हा गुरूबोध प्रकटला आहे.

श्रीगुरुचरित्रग्रंथाचे वाचन आणि श्रवण जे करतील ते (१) भवाब्धि तरती आणि (२) निजकुळा उद्धरती अशा फलश्रुतीने कृतार्थ होतील, असे टेंबेस्वामी सांगतात. (अ. १ ओवी ५) 'कलियुगी यतीश्वर। नृसिंहसरस्वती' अशी ग्वाहीही त्यांनी दिली आहे. श्रीदत्तात्रेयांना नमस्कार करून टेंबेस्वामी यांनी म्हटले आहे की (१)"हृदयरूपी वस्त्रास धुवून साफ करणाऱ्या (२) आपल्या आत्मरूप ज्योतीचा प्रकाशरूप असणाऱ्या (३) सुखरूप असणाऱ्या (४) आणि सर्व अनर्थांची शांती करणाऱ्या श्रीदत्तगुरूंना मी वंदन करतो. ज्याच्यापासून (५) भूत, भव्य, भवत् (विश्व) उत्पन्न होते व ज्याच्या योगाने जिवंत राहते, ज्याचे ठिकाणी लय पावते, ते त्रिगुणावर सत्ता करणारे ब्रह्म श्रीदत्तनामक आहे. (६) भक्तीने ज्याची प्राप्ती होते अशा त्या दत्तगुरूंचे हे चरित्र चित्ताची शुद्धी होण्यासाठी आहे" (आरंभीच्या तीन संस्कृत श्लोकांचा हा मराठी भावार्थ आहे.) 'दुःखरूपी उष्माने जो जीव / मनुष्य व्यथित झाला आहे, त्याला आश्रय / छाया हवी असेल, तर त्याने 'दत्ता मला भेट देई' अशी आर्त हांक मारावी.' (अ. १ ओवी ८ - ९) असेही त्यांनी आरंभीच सांगून ठेवले आहे. 'गुरू हो प्रसन्न। काय न्यून तया ।।' (अ. २ ओवी १३) अशी सद्गुरूकृपेची थोरवी आहे. गुरू काय करतील? तर.... 'हो अस्तंगत माया। गुरू प्रसन्न हो जया। भज सोडोनि संशया। करील दया त्रिमूर्ती हा ।। (अ.२ ओवी १४) अशी गोष्ट घडून येईल. 'देवपूजा हीच मुख्य' (अ.३६ ओवी ३५) असे सांगून त्यायोगे आनंदप्राप्ती करून घ्यावी, असेही त्यांनी म्हटले आहे. वंध्यास्त्रीला (वांझ स्त्रीला) अश्वत्थपूजन सांगितले. त्यायोगे तिला पुत्रकन्या इ. संतान प्राप्त झाले. (अ.३८ ओवी २) श्रीगुरुचरित्र ग्रंथातील भक्तिबोधाचे एक स्पष्ट / प्रकट विवेचन टेंबेस्वामी यांनी केले आहे ते असे : (मूळ ओव्यांचा भावार्थ) "पापाने तापलेल्यांचे दुःख तू नाहीसे करतोस... मायारूपी अंधःकार सूर्यप्रकाशरूपी ज्ञानाने नष्ट करतोस... भक्तांच्या अंतःकरणाला बोध करून रमवितोस... संन्याशाचे रूप घेऊन तू लोकांच्या इच्छांची पूर्ती करतोस... भक्तांच्या मनातील राग, द्वेष इ. दोष तू दूर करावेस... भक्तांचा उद्धार करावा... तूच भक्तांची कामधेनू आहेस... भक्तांचे अपराध सोसून तू नित्य व शुद्ध व मुक्त अशा भक्तांच्या अंतःकरणाला रमवितोस... तुला माझा नमस्कार असो. दत्ता, तूंच देव आहेस, योगी आहेस, दैन्य व दुःख यांचा नाश करावास... तूच ब्रह्म वस्तू आहेस, वासना दूर कर, भक्ती देऊन तार." (अ. ४० ओवी १३ ते २०) यांत दुःख दूर कर, संशयाचे निराकरण कर, त्यासाठी भक्ती दे, म्हणजे उपासनेचा मंत्र दे / उपाय दे, आणि उद्धार कर, हाच महत्वपूर्ण विचार प्रकट झाला आहे.

## 'गुरुसेवा' केली पाहिजे....

दुःख - संकटे - प्रतिकूलता ही सांसारिक जीवनाला व्यापून राहिलेली आहेत. तर अज्ञान - आळस - संशय ही परमार्थाच्या आड येऊ पाहणारी त्रिपदी आहे. या सर्वांचे निराकरण करणे आणि त्यातून ईश्वरीप्राप्तीचा मार्ग सांगणारी सद्गुरुकृपा मिळवणे, ही गोष्ट सर्वाधिक महत्त्वाची होय. त्यासाठी भक्तिमार्ग कळला पाहिजे. 'भक्तीने देव आपुलासा' होतो, हे त्यांतले विशेषत्व होय. अ.४३ ओवी १३) 'प्रहरभर कां होईना गुरुभजन करावे' (अ.४४ ओवी १) हेही त्यांनी सांगितले आहे. गुरुसेवा म्हणजे काय? त्याचे दोन अर्थ कोणते? तर, गुरुसेवा म्हणजे गुरुंची सेवा करणे होय. काया-वाचा-मने ती करावी. गुरुसेवेचा दुसरा अर्थ म्हणजे सद्गुरुंनी सांगितलेली सेवा. म्हणजे त्यांनी सांगितलेली साधना होय. त्यांनी दिलेल्या नाममंत्राचे सदैव व सर्वत्र स्मरण करणे म्हणजे गुरुसेवा होय. त्याला 'गुरुस्तोत्र पठण' असेही इथे म्हटले गेले आहे. (अ.४५ ओवी ९) ते सांगतात, 'त्वद्वीक्षणा विना कैसा। मोक्षा जाईल हा पिसा। तुंचि कृपा करी ऐसा। प्रार्थी मानसा स्थिरवून ।।' (अ.४५ ओवी १३) सातभक्तांनी श्रीदत्तस्वरूप असलेल्या श्रीनृसिंहसरस्वती यांना आपल्या घरी दिवाळीला बोलाविले होते ही कथा सर्वश्रुत आहे. त्यावेळी सातही भक्तांच्या घरी श्रीनृसिंह सरस्वती गेले होते. एके वेळी. ते सात भक्त 'माझ्याच घरी सद्गुरू उपस्थित होते' म्हणत भांडू लागले. तर ग्रामस्थ म्हणाले की, सद्गुरू गांवातच होते. ते कुठे गेलेच नाहीत. 'गुरू म्हणती सर्व सत्य' असे इथे सांगितले गेले आहे. 'होसी केवळ परब्रह्म। असे स्तविती ते सप्रेम। तया भक्ता गुरूत्तम। देती धाम अलभ्य ते ।।' (अ. ४६ ओवी ५) जिथे भाव आहे, तिथे देव आहे' या भक्तितत्त्वाचीच ही प्रचिती नव्हे काय? होय. सद्गुरूंनी एका भक्ताला 'कच्चे शेत कापून टाक' असे सांगितले. त्यानेही अपार श्रद्धेने गुर्वाज्ञेचे पालन केले. तर 'शतगुण त्या शेतात। गुरूनाथ धान्ये देती ।।' (अ.४७ ओवी ७) असा कृपालाभ घडून आला. (श्रीगुरूलीलामृत या ग्रंथातही श्री स्वामीसमर्थ अक्कलकोट महाराजांनी बसप्पा तेलीला सर्प धरावयास लाविले. त्याने ते धरले. घरी जाऊन पाहतो, तो काय? त्या सर्वांचे / सर्पाचे सोने झाले होते, अशी कथा येऊन गेली आहे. गुरूसेवा ही गुर्वाज्ञेचे पालन करण्यानेही होते, हे महत्त्वाचे !)

कलियुगी गुप्त होऊन, 'भजन कराल तर भेटू' असा अभिवचनाचा दिलासा श्री नृसिंहसरस्वतींनी दिला आहे. टेंबेस्वामींनी त्याविषयी लिहिले आहे ते असे की, 'जे सद्बुद्धी असती लोक। दिसो तयासी सम्यक। गाणगापुरी राहू, भाक। घ्या हो लोक त्रिवाचेसी ।। भवध्वाहो तुम्हा सुगम। भजता पादुका जे काम। ते पुरोन अंती धाम। मिळेल नाम माझे गाता ।। भवांबुधितरणार्थ। भजा मज मिळेल स्वार्थ। चरित गाता मनोरथ। पुरती, व्यर्थ चिंता नसो ।। (अ. ५१ ओवी ३ ते ५) 'भक्तिमान भावी जसा। त्यापाशी मी तसा' (अ. ५१ ओवी ७) असाही फलश्रुतीचा ठेवा त्यांनी नोंदविला आहे. 'आरती' मध्येदेखील टेंबेस्वामी यांनी असे म्हटले आहे की, "पापताप नाहीसे होण्यासाठी हे दत्तात्रेया तू आमचेवर अनुकंपा कर... कामक्रोध निर्माण होऊ देऊ नकोस... दुर्वासना मनात येऊ देऊ नकोस... आसक्ती कमी कर आणि सत्संगात वाढ होऊ दे... विषयाबद्दल विरक्ती निर्माण व्हावी... तुझ्यापदी प्रेम वर्धिष्णु व्हावे... कष्टाचे वेळी धैर्य प्राप्त होऊ दे... सेवा घडू दे... तुझ्याचरणी दृढभाव वसो दे... तुझ्याशिवाय मी कुणाला शरण जाऊ?" (अ.५१ ओवी २ ते ७ / भावार्थ) अशा रीतीने दुःख निवृत्तीसाठी ईश्वरदर्शनाच्या प्राप्तीचा भक्तिमार्गच इथे विशद केला गेला आहे. मनन - चिंतन - स्मरण हे उपासनेला उपकारक आहेच.

## पुरुषोत्तमयोगाचे स्वरूप...

'श्रीसप्तशतीगुरुचरित्रसार' या ग्रंथात टेंबेस्वामी यांनी श्रीमद्भगवद्गीतेतील पंधरावा अध्याय 'पुरुषोत्तम योग' हा अग्रणी का ठेवला? तर, त्यांत संसाराचे मिथ्यात्व दाखवून, जीवाला आत्मस्वरूपाची

प्राप्ती करून देऊन, त्या मागची जन्म-मरण येरझार चुकविणे हा त्या अध्यायाचा विषय आहे. ईश्वरप्राप्तीच्या आड येतो, तो प्रपंच होय. अर्थात प्रपंच म्हणजे प्रपंचातील आसक्ती ही ईश्वरप्राप्तीच्या मार्गात आड येते. हा प्रपंच म्हणजे एक बळकट वृक्ष असून इतर वृक्षाला खाली मूळ व वर फांद्या असतात. त्याचा अंत लागतो किंवा त्याच्या मुळाशी घाव घातला तर तो नष्टही होतो. पण हा वृक्ष तसा नाही. त्याचे मूळ वर आहे आणि फांद्या खाली आहेत. त्याचा शेवट लागत नाही वा त्यांच्या फांद्या तोडता येत नाहीत. ब्रह्म मूळ आहे. मायारूपी फांद्या खाली पसरलेल्या आहेत. या संसारवृक्षाला अहंकाराचा शेंडा आहे. हा अश्वत्थवृक्ष सतत बदलणारा आहे. अज्ञानी लोकांना तो हिरवागार वाटतो. ज्ञानी मात्र त्याचे क्षणभंगुरत्व ओळखतात. या वृक्षाला 'भववृक्ष' असेही म्हणतात. चौऱ्यांशीलक्ष योनीतून जीवाचा प्रवास चालतो.

प्रश्न असा उरतो की, अज्ञानाचे छेदन कशाने करावयाचे? तर, ज्ञानरूपी शस्त्राने करावयाचे. ज्ञानासोबत वैराग्यही हवे. ज्ञान व वैराग्यासह जो ब्रह्मपदापर्यंत पोहोचतो तो पुरुषोत्तम होय. ज्ञानमार्गाने परमेश्वराशी एकरूप होणारे हे मूलतः अभिन्नच आहेत. पण देहदृष्टीने आपण त्यांच्याकडे पाहतो म्हणून ते भिन्नत्वाने दिसतात.

देव हा चराचरात व्यापून राहिलेला आहे, मग कांहीजण सुखी तर कांहीजण दुःखी का? हाही प्रश्न उपस्थित होतो. त्याचे उत्तर श्रीकृष्णाने दिले आहे ते असे की, पाहणाऱ्यांच्या दृष्टीतील भेदामुळे तशी अनुभूती येते. माझ्यावरील भक्तिप्रेमाने सुख प्राप्त होते. तर देहावरील आसक्तीमुळे दुःख प्राप्त होते. क्षर, अक्षर हे दोन पुरुष म्हणजे सर्वप्राणिमात्र हे क्षर पुरुष होत. मायोपाधीने युक्त तो अक्षर पुरुष होय. तिसरा तो उत्तम पुरुष होय. तो म्हणजेच परमात्मा होय. तो प्रकटला तर क्षर व अक्षर हे दोन्हीपुरुष उरतच नाहीत. सांसारिक जीवाने ईश्वरदर्शनाची प्राप्ती करून घ्यावी, त्यासाठी नामसाधना करावी, हा यातील मथितार्थ होय.

भगवद्गीतेतील पुरुषोत्तमयोगाचे स्वरूप वरीलप्रमाणे आहे ही गोष्ट खरी. पण त्यावर साक्षात्कारी संतसत्पुरुषसाधू यांनी 'भाष्य' केले असल्याने त्याचे विशेषत्व कळून येण्यास मदत होते. त्या दृष्टीने श्री ज्ञानदेव, श्रीगुरुदेव रानडे आणि श्री स्वामी स्वरूपानंद यांची भाष्ये नोंदविणे आवश्यक ठरते. श्री ज्ञानदेवांचे भाष्य गेली सातशेवर्षे परंपरेने सर्वज्ञात आहेच. पण विसाव्या शतकातील दोन साक्षात्कारी - सत्पुरुषांनी म्हणजे डॉ. रा. द. रानडे तथा श्री गुरुदेव रानडे यांनी ध्यानोपकारिणी तथा ध्यानगीता या आपल्या संकलनवजा संग्रहित केलेल्या छोटेखानी ग्रंथात श्लोक घेऊन त्यावर आत्मानुभूतीच्या निकषाने मार्मिक भाष्य केले आहे. त्यात पंधराव्या अध्यायातील श्लोकबंधानेच त्यांनी 'ग्रंथारंभ' केला आहे. (मूळश्लोक, भाष्य, विवरण यास्वरूपाचा ग्रंथ आता प्रकाशित झाला आहे. "श्रीगुरुदेव रानडे प्रणित 'ध्यानगीता' तथा नामस्मरणात्मक भक्तियोग" विवरण प्रा. डॉ. नरेंद्र कुंटे, प्रकाशक - श्री गुरुदेव रानडे समाधी विश्वस्तमंडळ निंबाळ, जून २००३, पृष्ठे ४००, मूल्य १२५ रु.) पावसक्षेत्रीचे प. पू. स्वामी स्वरूपानंद यांनी तर 'भावार्थगीता' लिहिली आहे. त्यांतही त्यांनी मांडलेला आशय पाहण्याजोगा आहे. अध्यात्मबोध कळून घ्यायला ती उपकारक आहेत.

## 'भाष्यकाराते वाट पुसतु'...

विवेचनाच्या दृष्टीने सोयीचे व्हावे म्हणून श्रीज्ञानदेव व श्रीगुरुदेव यांनी केलेली भाष्य सलगपण घेतली असून नंतर स्वामी स्वरूपानंद यांच भाष्य उधृत केले आहे. दुःख - संशयाच्या भोवऱ्यात अडकलेल्य जीवांना 'ईश्वरदर्शन प्राप्तीचे सुख आणि आनंद देणाऱ्या भक्तिमार्गाचे स्वरूप सर्वच भाष्यकारांनी प्रतिपादिले असून त्यांत 'ध्यानगीता' ही 'ईश्वरस्वरूपवर्णनम्' पासून ते 'भगवदाश्वासनम्' पर्यंत जीवस्वरूपासह आणि नामसाधन मार्गासह बारा अध्यायात संपादित / संग्रहित केली गेली आहे. 'पंधरावा अध्याय' तिथे संक्षेपाने घेतला गेला असून त्याठिकाणीच श्री ज्ञानदेवांचे भाष्यही विवरणकाराने नोंदविले असल्याने त्या दोन्हीतील अर्थ - समन्वय आणि स्वतंत्रता पाहण्याजोगी आहे.

'ईश्वरप्राप्ती हेच ध्येय' असल्याने श्री ज्ञानदेवांनी ईश्वर हाच उर्ध्वमूल आहे असे सांगून अश्वत्थवृक्ष हा सतत बदलत राहतो. प्रपंचाला देहरूपी फांद्या फुटतात. तो अस्थिर आहे. ज्ञानी पुरुष ते जाणतो आणि त्याला (साधनमार्गाने जाणल्याने) ईश्वरप्राप्तीचे फळ मिळते, असे प्रतिपादिले आहे. (अ.१५ श्लोक १) त्यावर भाष्य करताना श्रीगुरुदेव रानडे यांनी 'अश्वत्थाचे असंगशस्त्राने छेदन करून परमपुरुषाचा शोध घ्यावा असे म्हटले आहे. प्रापंचिक आसक्ती न वाढविता ईश्वरप्राप्तीचे ध्येय ठेवावे. देव जाणणे हे खरे ज्ञान असून नाम हेच शस्त्र होय असे प्रतिपादिले आहे. 'कर्मामुळेच मायेचा विस्तार' होतो. (अ. १५ श्लोक २) 'नामरूपी ज्ञानाचे शस्त्र हवे' (अ. १५ श्लोक ३) वैराग्यजन्य ज्ञान हेच असंगशस्त्र आहे. अज्ञानाबरोबरच संशयही नष्ट करण्यासाठी हेच शस्त्र उपयुक्त आहे. 'नामध्यानाने शरण जावे' त्यासाठी 'नामदृष्टीची सर्वाधिक गरज' असून 'आत्मस्वरूप हाच परमात्मा' होय. 'साधकांनी परमात्म्यास जाणावे' (अ. १५ श्लोक ४-१६-१७-१८) 'अंशरूपाने सर्वाठायी ईश्वर असून 'जन्म-मृत्यू : अवस्थेचे स्वरूप' सर्वज्ञात आहेच. (अ. १५ श्लोक ७-८) जन्म-मृत्यू हा देहाचा धर्म' असून 'ज्ञानी / योगी हे देवाला जाणतात' (अ. १५ श्लोक ९-१०) 'आत्मदर्शनासाठी वैराग्य हवे' (अ. १५ श्लोक ११) श्री ज्ञानदेव आणि श्री गुरुदेव यांनी अज्ञान - संशय यांचे छेदन करण्याचा एकमेव मार्ग प्रतिपादिला आहे, तो म्हणजे ज्ञानरूपी नाम आणि वैराग्यरूपी नीती यांचा ! या दोन पाऊलबळानेच प्रापंचिकाला परमार्थात 'प्रवेश' करता येतो आणि 'प्रगती' करता येते. ज्ञान देतो तो कोण? तर सद्गुरू हा ज्ञानी आहे. तो नाममंत्ररूपी शस्त्र देतो. त्या नामाचे अहर्निश स्मरण करणे हीच उपासना होय. उपासनेने ईश्वरदर्शन घडून येते. ईश्वरदर्शनाने प्रेम आणि आनंद निर्माण होऊन अज्ञान व संशय दूर होतो. प्रापंचिक दुःखे तर असतातच. पण ईश्वरदर्शनाचे सुख प्राप्त होऊ लागले की, ती दुःखे पचविण्याचे सामर्थ्य येते. नाम, गुरू, संप्रदाय आणि ईश्वरदर्शन या विषयी देखील साधकाच्या मनात खूप संशय / विकल्प असतात. पण ईश्वरदर्शनाने ते दूर होतात. म्हणून 'नामे ध्यान, ध्यानी दर्शन' हाच भक्तिमार्ग उभयतांनी तुम्हा-आम्हाला भगवद्गीता आणि ध्यानगीता यातून विशद करून सांगितला आहे. तत्त्वबोधाचे आचरण करणे हे साधकाचे कर्तव्य आहे, एवढेच !

प. पू. स्वामी स्वरूपानंद यांनी 'भावार्थगीता' लिहिली असून पंधरावा अध्याय ६७ ओव्यांमधून विशद केला आहे. मूळ असलेल्या वीस श्लोकांचा हा जवळपास तिप्पटीने त्यांनी विस्तार केला आहे, असेच म्हणता येईल. त्यात 'अनंत फांद्या फुटल्या, उभ्या आडव्या सुटल्या' हेच तर देहरूपी जीवाचे स्वरूप होय. प्रपंचात वंशमूळाच्याच फांद्या संघर्ष करीत आपल्याच आप्त-स्वकीय-नात्यातील जीवांना कांचत / छेदत असतात. 'अविद्या' नष्ट

व्हायची असेल, तर 'जागृती' हाच उपाय आहे. म्हणजेच प्रापंचिक अज्ञानाला पारमार्थिक भक्तियोगानेच दूर करता येणे शक्य आहे. परमपदप्राप्तीसाठी प्रथम प्रार्थना करणे जरुरीचे आहे. अन्यथा 'कधी तयांना भेटे ना मी देव' अशीच स्थिति होऊन राहील. खरी गोष्ट अशी की, 'परी अहंता देही वसता संसारी चि निमग्न । होऊनि दारूण दुःख भोगिती अज्ञविषय संलग्न ॥४४॥ कर्म तसे फळ मिळेचि केवळ जगी उच्च वा नीच । परी अर्जुना, ज्ञानाज्ञाना मुळात कारण मीच ॥४५॥' तसेच भक्तिमार्गाने काय होईल ? तर 'जशा सागरी उठता लहरी जळधि जळावरी लोळे । तसा अंतरी मद्रूप तरी भक्त होऊनि खेळे ॥६४॥' कृतार्थ कोण होतो ? तर, 'जाणुनिया हे नर तो पाहे ब्रह्म-रूप होऊन । कृतार्थ होतो सहजे सुटतो कर्म - बंधनातून ॥६७॥' असा हा भक्तिमार्ग असून ईश्वराला जाणण्यासाठी 'भजे सर्व भावाने' (६३) हाच एक उपाय आहे, असे या भाष्य-स्वरूप ओवीग्रंथात म्हटले गेले आहे.

## श्रीगुरुचरित्रातील 'बोध'...

पंधराव्या अध्यायात म्हणजे : 'पुरुषोत्तमयोग'मध्ये : अश्वत्थ वृक्षाचे प्रतिक प्रापंचिक धारणेने प्रकट केले गेले आहे. तर श्रीगुरुचरित्र ग्रंथातील अश्वत्थवृक्ष हा पारमार्थिक धारणेने प्रकट केला गेला आहे. त्यामुळेही 'श्रीसप्तशतीगुरुचरित्रसार' ग्रंथात टेंबेस्वामी यांनी दोन्हींचा समन्वय साधला असावा, असे म्हणता येईल. आता श्रीगुरुचरित्र ग्रंथात दुःख-संशय निवृत्तीसाठीचे भक्तिवर्म कसे सांगितले आहे, याचा विचार करू. ईश्वरदर्शनाने आनंदप्राप्ती हीच त्यातील परिणती आहे. त्यासाठी पुन्हा 'नाममंत्रसाधना' हीच श्रीनृसिंहसरस्वती यांनी सांगितली आहे. इथे फक्त दोनच प्रसंगांचा उल्लेख करून त्याविषयीचे विवेचन केले आहे.

श्रीगुरुचरित्रातील अध्याय तेवीस मधील एक घटना अशी आहे की, वांझ म्हशीला श्रीगुरुकृपेने दूध आले आणि ब्राह्मण पती-पत्नीस श्रीगुरूंनी संतुष्ट होऊन त्यांचे दैन्य-दारिद्र्य दूर केले. 'श्रीगुरुकृपा होय ज्यासी । दैन्य कैसे त्या नरासी ॥' (अ. २२ ओवी ६१) ही आश्चर्याची गोष्ट सर्वदूरपर्यंत पसरली. ती ऐकून ग्रामाधिपती श्रीनृसिंह सरस्वतींच्या दर्शनार्थ आला. त्याने विनविले की 'तूं तारक जगज्ज्योती । उद्धरावे आम्हाते ॥ (अ. २३ ओवी १४) ग्रामाधिपतीने श्रीगुरुंना विचारले की, 'तुम्ही तर तारक आहात, मग अरण्यात का राहता ?' माझी विनंती अशी आहे की, 'आपण गाणगापुरी यावे. तेथे नित्य अनुष्ठान करावे. तेथे मठ करावा. आमचा उद्धार करावा.' (अ. २३ ओवी २१ ते २५) श्रीगुरूंनी त्यांचे मनोरथ पूर्ण करण्याचे ठरविले. 'तया ग्राम पश्चिमदेशी । असे अश्वत्थ उन्नतेसी । ओस गृह तयापासी । असे एक भयंकर ॥' (३५) त्या वृक्षावर एक ब्रह्मराक्षस होता. तो क्रूर होता. म्हणून तेथील गृह ओस पडलेले होते. श्रीगुरु तेथे आले. ब्रह्मराक्षस त्यांना शरण आला. श्रीगुरुंनी त्याच्या मस्तकी वरदहस्त ठेवला. ब्रह्मराक्षस मुक्त झाला.

इथे एक 'स्पष्टीकरण' करून घेता येते की, (१) तेथे अश्वत्थ होता. (२) ओसाड घर होते. (३) ब्रह्मराक्षस होता. (४) तो श्रीगुरूंना शरण आला. (५) तो उद्धरून गेला. येथील 'अश्वत्थवृक्ष' हा पंधराव्या अध्यायातील 'भववृक्ष' आहे. भक्तीविहीन स्थळ तेच ओसाड घर. प्रपंचात अहंकाराने वावरणारा तोच ब्रह्मराक्षस होय. श्रीगुरुच्या दर्शनाने तो शरण आला. अहंकार गेला, विनम्रता आली. सद्गुरुंनी त्याला संगमावर स्नान करण्यास सांगितले. भक्तिसंगमावरचे हे स्नान म्हणजेच अंतःकरणाची शुद्धी होणे होय. ओसाड घर नष्ट होऊन तेथे श्रीगुरुनिवास असलेला मठ झाला. अहंकारी माणसाचा देह 'मठ' स्वरूप झाला. मग श्रीगुरु भक्ताधीन होऊन राहिले. ब्रह्मराक्षस म्हणजे दुर्गुणी माणूस होय. श्रीगुरुभेटीने दुर्गुण नष्ट झाले. तो उद्धरून गेला. देव आणि भक्त यांच्या संगमावर सद्गुरुंचेच 'कृपातीर्थ' होते. शुद्धस्नान घडून तो मुक्त झाला.

दुसरी घटना आहे ती गुरुचरित्रातील अध्याय एकोणचाळीस मधील होय. तिथे 'सिद्ध म्हणे नामधारका । पुढे अपूर्व वर्तले ऐका । साठी वर्षी वांझेसि एका । कन्यापुत्र झाली परियेसा ॥ (अ. ३९ ओवी १) असे म्हटले गेले आहे. सोमनाथ व गंगा यांची ही कथा आहे. गंगा साठ वर्षांची झाली तरी तिला पुत्रसंतान नव्हते. पतिसेवा करूनही ती नित्य श्रीगुरुंच्या दर्शनार्थ येत असे. सेवेमागील इच्छा काय ? असे श्रीगुरुंनी विचारताच तिने आपले दुःख सांगितले. तेव्हा कुणाच्या सांगण्यावरून आपण अश्वत्थ वृक्षाचे पूजन केल्याचेही तिने सांगितले. त्या वेळी 'ऐकोनि तियेचे वचन । श्रीगुरु म्हणती हांसोन । अश्वत्थसेवा महापुण्य । वृथा न होय परियेसी ॥' (अ. ३९ ओवी ३५) असे सांगून श्रीगुरुंनी तिला गाणगापुरी संगमावर जाऊन तेथील अश्वत्थ वृक्षाचे पूजन करण्यास सांगितले. तिथे 'आमचे अनुष्ठान' आहे, हेही सांगितले. तिने अश्वत्थ माहात्म्य सांगा, असे विनविल्यावरून श्रीगुरूंनी अश्वत्थ माहात्म्य प्रतिपादले आहे. (अ. ३९ ओव्या ४२ ते १०५ पहा.) अश्वत्थ वृक्षावर ईश्वराचा म्हणजे : ब्रह्मा-विष्णू-महेश यांचा निवास असून 'भजता कार्यसिद्धी त्वरित होय' असेही फलरूप सांगितले. हा अश्वत्थवृक्ष पारमार्थिक धारणेने वर्णिला गेला आहे. या वृक्षास प्रदक्षिणा घालाव्यात... ईश्वराचे नाम घ्यावे... 'ऐसे दृढ करोनि मन । अश्वत्थ सेविता कामना पूर्ण । पुत्रकाम्य तत्क्षण । होय निरुते अवधारा ॥' तसेच 'अश्वत्थस्थळी बैसोन । एखादा मंत्र जपता क्षण । फळ होय अनंतगुण । वेदपठण केलिया ।' इतकेच नव्हे, तर 'भावभक्ती असे ज्यासी । त्यासी होय फलश्रुती ॥' हेही सांगितले. पंधराव्या अध्यायातील अश्वत्थवृक्ष हा 'भववृक्ष' आहे, तर गुरुचरित्रातील अश्वत्थवृक्ष हा 'कल्पवृक्ष' आहे. श्रीगुरु सांगतात, 'कल्पवृक्ष असे अश्वत्थ । कल्पिले फळ त्वरित होय ॥' (अ. ३९ ओवी ११९) गंगेने अश्वत्थ वृक्षासह श्रीगुरुंची सेवा केली. तिला पुत्र-कन्या प्राप्त झाली. हा अध्याय संपविताना सरस्वती गंगाधर यांनी म्हटले आहे की, 'निर्धार असे ज्याचे मनी । तयाते वर देती तत्क्षणी । एकभावे या कारणी । भक्ती करावी श्रीगुरुची ॥' (अ. ३९ ओवी १६४) वांझ स्त्री कोण ? गुरुसेवा कोणती ? फलश्रुती काय ? या तीनही प्रश्नांचे उत्तर प्रतिकात्मक आहे. काया ही स्त्री आहे. भक्तिविहीन अशी ती असेल, तर तेच तिचे वांझपण आहे. गुरुंचा कृपामंत्र बीजरूपाने या देह-मनासह इंद्रियांना मिळाला आणि तो रूजला, तर ईश्वरदर्शन हेच फळ म्हणून प्राप्त होईल. पुत्र-कन्या ही ईश्वरदर्शन स्वरूप अनुभूती आहे, असेच म्हणता येईल.

## एक भावे करुनिया भक्ती...

सरस्वती गंगाधर सांगतात की, 'जो भजे श्रीगुरुसी । एकभावे भक्तीसी । दैन्य काय बाधेल त्यासी । जे जे मागेल ते देईल ॥ श्रीगुरू म्हणजे कामधेनू । अंतःकरणी नको अनुमानू । जे जे इच्छित भक्तजन । समस्त देईल परियेसा ॥' (अ. ३९ ओव्या १६६-१६७) निंबरगी संप्रदायातील गुरूपरंपरेत श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांची अनुग्रहित

साधकभगिनी श्रीमती शिवलिंगव्वाआक्का (जत) यांनी एका पदात म्हटले आहे की, 'मला पुत्र झाला' त्यांचे पती अल्पायुशी मरण पावले होते. त्यांनी त्यांचे माघारी खडतर नामस्मरण केले. त्यायोगे तिला ईश्वरदर्शनाचा अनुभव आला. 'डोळारूपी योनीमध्ये ईश्वराच्या रूपाचा आकार जन्माला आला' असे तिने म्हटले आहे.

प्रपंचातील दुःख-संशयाचे निराकरण करण्यासाठी पंधराव्या अध्यायातील पुरुषोत्तमयोग हाही नामसाधनेनेच ईश्वरदर्शनाची प्राप्ती होईल, असे सांगतो. श्रीगुरुचरित्रातही अश्वत्थपूजनाने नाममंत्रोच्चारच ईश्वरदर्शनाची कृपा करतो हे सांगितले गेले आहे. अश्वत्थवृक्ष एकच आहे. पण प्रापंचिकांना तो भववृक्ष आहे, तर पारमार्थिकांना तो कल्पवृक्ष आहे. दोन्हीकडे 'भजावे एकाच देवास' आणि तेही 'एक भावे करुनिया भक्ती' याच न्यायाने भक्तिमार्ग विशद केला गेला आहे. म्हणूनच टेंबे स्वामी यांनी 'श्रीसप्तशती गुरुचरित्रसार' ग्रंथात श्रीमद्‌भगवतगीतेतील पुरुषोत्तम योग अग्रणी ठेवून दोन्हीतील अश्वत्थ वृक्षांचा समन्वय सूचित केला आहे. 'गुरुपदिष्ट नाममंत्राचे अहर्निश स्मरण करणे' हाच यातील मथितार्थ आहे. भाविकांनी / साधकांनी / उपासकांनी हा 'नामस्मरणात्मक भक्तियोग' अनुसरला तर श्रीसद्‌गुरुकृपा प्राप्त होऊन अज्ञान-संशय यांचे निराकरण होईल आणि ईश्वरदर्शनाने जीवन कृतार्थ होऊन राहील, यात मुळीच शंका नाही.

**प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**
'प्रज्ञा' ए-७४, आसरा सोसायटी, होटगी रस्ता,
सोलापूर ४१३००३. दूरभाष (०२१७) २६०००३



# श्रीवासुदेवानंद सरस्वती यांचा कुंटे घराण्यावर कृपावरदहस्त

**प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**

श्रीवासुदेवानंद सरस्वती यांची कुंटे घराण्यावर कृपा असून त्यायोगेच घराण्यात भक्तिविषयक परंपरा रुजली आणि वाढलीही ! माझे आजोबा (कै.) महादेव शंकर तथा माधवराव कुंटे (जमखंडीकर) यांचा आणि प. पू. गुळवणी महाराज यांचा केवळ परिचयच होता असे नव्हे, तर त्यांचेशी स्नेहही होता. त्यांनी चित्रकलेच्या तीन परीक्षा दिल्या होत्या. त्यांचे एक जोडीदार श्री. एन. ए. नाडगौडा व दुसरे जोडीदार वामनराव गुळवणी हे बार्शीस चित्रकला शिक्षक म्हणून नोकरीस होते. हे तिघेही एकाच वेळी चित्रकलेची परीक्षा उत्तीर्ण झाले होते. त्यांचेकडून श्रीवासुदेवानंद सरस्वती तथा टेंबे स्वामी यांची किर्ती आजोबांना ठाऊक होती. प्रापंचिक दुःख-संकटामुळे त्यांना सद्गुरु भेटीची तळमळ होती. टेंबे स्वामी वामनराव गुळवणी महाराजांसमवेत जमखंडीस आले होते. तेव्हा भेट झाली नाही. पण तेथून ते गलगली येथे गेल्याचे कळताच माझे आजोबा श्रीसद्गुरु भेटीच्या तळमळीने बारा मैलांचे अंतर पायी चालत गेले. तिथे त्यांची शंकराच्या देवळात भेट झाली. श्रीवासुदेवानंद सरस्वती यांनी त्यांना अनुग्रह दिला व कृपाप्रसाद म्हणून नारळ दिला. त्यांच्या कृपाप्रसादाने पुत्ररत्न प्राप्त झाले, म्हणून त्याचे नाव त्यांनी वासुदेव ठेवले. माझे काका (वासुदेवराव), वडील (सदाशिवराव) धाकटे काका (शंकरराव) हे तिघेही भक्तिमार्गीच होते. वडिलांना नंतर थोर साक्षात्कारी संत डॉ. रा. द. तथा श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून अनुग्रह मिळाला. माझ्या काकू (श्रीमती) सुमतीबाई या कीर्तन-प्रवचन करीत. धाकटे काका (कै.) शंकरराव हेही नोकरी सांभाळून उत्तम कीर्तन करीत. काकूंची मुलगी सौ. विद्या खर्डीकर हिनेही कीर्तनास प्रारंभ केला आहे. श्रीगुरुदेव रानडे यांच्या समाधीवर आम्ही सर्व भावंडे, कुटुंबीय, मुले यांनीही अनुग्रह घेतलेला आहे. घराण्यात गुरुभक्तीची परंपरा रुजून वाढली ती केवळ टेंबेस्वामींच्या 'दत्तकृपा' स्वरूपातील प्रसादाने होय, अशीच आमची दृढ श्रद्धा-भावना आहे.

### 'दत्तमूर्ती' आणि 'स्वामी सेवा'

श्रीवासुदेवानंद सरस्वती यांचा अनुग्रह मिळाल्यानंतर माझ्या आजोबांनी काही कालावधीनंतर जयपुरहून दोन संगमरवरी मूर्ती घडवून आणल्या होत्या. एक श्रीरामाची मूर्ती होती, तर दुसरी श्रीदत्ताची मूर्ती होती. श्रीरामाची मूर्ती कुर्डुवाडी येथील रेल्वे कॉलनीतल्या लोकांनी घेतली व तिची स्थापना तेथेच मंदिर बांधून केली. रामजन्मोत्सव तेथे केला जातो. दुसरी मूर्ती श्रीदत्ताची होती. ती कोणी घेईना म्हणून आजोबांनी त्या वेळी 'टाईम्स ऑफ इंडिया' मध्ये जाहिरात दिली. ही जाहिरात मोरच्या संस्थानिकांनी वाचली व मूर्ती आणवून देवघरात स्थापिली. तेथे दिवाळीत महाड येथील कीर्तनकार सौ. लक्ष्मीबाई जोशी यांचे कीर्तन होई. त्यांना मूलबाळ नव्हते. त्यांनी ही दत्तमूर्ती आपणास उपासनेसाठी / भाऊबीज म्हणून ओवाळणी स्वरूपात द्यावी, असे संस्थानिकांस विनविले. संस्थानिकांनीही मूर्ती दिली. सौ. लक्ष्मीबाईनी ती देवघरात स्थापिली. पुढे त्यांना पुत्ररत्न झाले. आजही ही मूर्ती महाड येथील चवदार तळ्यासमोरील जोशी यांच्या घरामागील अंगणात असून तेथे आता मंदिर बांधले गेले आहे. दरवर्षी तेथे दत्तजन्मोत्सव / दत्तजयंती साजरी होते.

मलाही श्रीवासुदेवानंद सरस्वतींची 'दत्तकृपा' वेगळ्या रीतीने अनुभवाला आली. पहिली नोकरी लागली ती अक्कलकोट येथील कॉलेजात. तेथील श्रीवटवृक्ष स्वामी मठाच्या विश्वस्तांशी पारमार्थिक उपक्रमाच्या दृष्टीने जुळून राहिलो. १९७८ ते २००१ अशी २४ वर्षे तेथे श्रीस्वामीसमर्थ पुण्यतिथी महोत्सवाची 'आयोजन सेवा' करायला मिळाली. तेथे 'नित्यक्रम आणि उपासना' ही सांप्रदायिक भजनपुस्तिका तयार करता आली. 'स्वामीपदी सर्व बुद्धिसेवा प्रकट करा' असे पुजाऱ्याने दंडास धरून सांगितले. तेव्हापासून आजपावेतो वीस पुस्तके लिहून प्रसिद्ध झाली आहेत. श्रीगुरुदेव रानडे यांच्यासारखे श्रेष्ठ / साक्षात्कारी सद्गुरु लाभले. ही 'दत्तकृपा'च म्हटली पाहिजे. श्रीसद्गुरु हे मायबाप आहेत, तर श्रीदत्तगुरु / स्वामीसमर्थ / हे पणजोबा-आजोबा किंवा तात आहेत, असेच कृतज्ञतेने म्हणावेसे वाटते. परंपरेचा स्त्रोत आहे तो असा.

### माणगांवी 'दर्शनयोग'

माझ्या आजोबांना श्रीवासुदेवानंद सरस्वतींनी अनुग्रह देऊन कृपेचा नारळ दिला. त्यानंतर त्यांच्या 'निवासस्वरूपतीर्थक्षेत्री' जाण्याचा उत्तम योग मला आला, ही परमभाग्याची गोष्ट होय. माणगांव हे त्यांचे जन्मस्थान आणि निवासतीर्थ आहे. माझ्या पन्नासाव्या वाढदिवशी / २३ डिसें. १९९५ रोजी / मी माणगांवला होतो. गोवा, सिंधुदुर्ग, रत्नागिरी जिल्ह्यातील कीर्तनकारांचे संमेलन तेथे होणार होते. त्यासाठी प्रमुख वक्ता म्हणून त्यांनी मला आमंत्रित केले होते. त्यामुळे दर्शनाचा योग आला. आजोबांच्या नंतर तिसऱ्या पिढीला तेथे जाऊन टेंबेस्वामींचे दर्शन घेता आले, ही त्यांचीच असीम कृपा होय. गतवर्षीच्या दत्तजयंतीस सोलापुरच्या गणपती घाटावरील श्रीदत्त संस्थानकडून भक्तिप्रसार कार्यास्तव मिळालेला 'श्रीदत्तरत्न पुरस्कार' हाही दत्तकृपा / गुरुकृपा यांचाच मिळालेला वरदहस्त आहे, अशीच माझी भावना आहे. 'नाथभागवतातील भक्तिवर्म' चे 'ई' टी.व्ही. मराठी वाहिनीवर नव्वद दिवस निरूपण करण्याचा आलेला 'योग' हीही सद्गुरु परंपरेच्या कृपेचीच फलश्रुती आहे. दत्तकृपा / गुरुकृपा अशीच आम्हा सर्वांच्या पाठिशी / सन्मुख / सांगाती / राहो आणि त्यायोगे भक्तिकार्याशी जुळून राहतानाच साधना घडत राहून कृतार्थतेचा 'सुवर्णयोग' प्राप्त होवो, अशी त्यांचे चरणी विनम्र प्रार्थना.

**प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**



# दत्तपुराण : एक परिचय

**डॉ. प्र. ग. लाळे**

*एम्. ए. पीएच्. डी. संस्कृत राष्ट्रीय संस्कृत पंडित राष्ट्रपती पुरस्कार, पुराणांवर विशेष अभ्यास उस्मानिया विद्यापीठात संस्कृत विभागातून निवृत्त अनेक संशोधनपर लेख प्रकाशित प्रमोद-सिंधु नावांचा गौरव ग्रंथ प्रकाशित*

संस्कृत साहित्याची विविध अंगे कालक्रमाप्रमाणे समृद्ध होत गेली आहेत. प्रतिक्षणं यन्नवतामुपैति ही स्थिति संस्कृत साहित्याची असल्यामुळे संस्कृत साहित्याचा जिवंत प्रवाह अखंडपणे वहात राहिला आहे. हे तथ्य पुराणांसारख्या प्राचीन, कालाभिमुख साहित्यालाही लागू पडते. पुराण साहित्य हे जुनाट झाले. त्यात सांगितलेली सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतर आणि वंश्यानुचरित ही पाच लक्षणे कालबाह्य झाली असून त्यातील कथा केवळ मनोरंजक आणि केवळ एकाच वर्गाच्या पक्षपाती आहेत, अशी तक्रार अनेक 'ज्ञानलवदुर्विदग्ध' अशा लोकांकडून ऐकू येत असतानाच याच विसाव्या शतकांत - 'दत्तपुराण' रचणारे महर्षि वासुदेवानन्द सरस्वती जन्मास आले. अठरा महापुराणांपैकी अधिकांश पुराणे कोणत्या एका देवतेचे गुणगान करणारी किंवा त्या देवतेकडून अधिष्ठित किंवा प्रतिष्ठित झालेली असून, सर्वत्र देवताभक्तिचा प्रचार आणि प्रसार पुराणांत झाल्याचे दिसून येते. विष्णुपुराण, शिवपुराण आणि काही अवतारनिष्ठ पुराणे (उदा. गरुडपुराण, मत्स्यपुराण इ.) यांच्यामध्ये देवतांचे माहात्म्य, त्यांची स्तोत्रे, आणि त्या देवतांच्या भक्तांचा आदर्श जनतेपुढे ठेवणारी अशी पुराणे, मध्य युगांत म्हणजे भक्तिप्रधान युगात खूपच प्रसिद्ध पावली. अलौकिक, सर्वशक्तियुक्त अशा देवतांवर लोकांची श्रद्धा असल्यामुळे पुराणपठण किंवा पुराणश्रवण हे एक सामाजिक-धार्मिक कार्य बनले. पुराणे ही केवळ अद्‌भुत शक्तीचे तराणे नाहीत, तर ते सामान्य लोकांना भवसागरातून तरून जाण्याचे मार्गदर्शक कोश आहेत, अशी लोकांची धारणा होती. पण सध्याच्या काळात त्यात काल्पनिक कथा आणि अफलातून वर्णने आहेत. आणि त्यामुळे त्यांना साहित्येतिहासांत थोडे फार स्थान असेल; पण विवेकी समाजात त्यांना फारसे स्थान नाही, असा एक उद्देश, उन्मुक्त विचारप्रवाहही आधुनिक काळात दिसून येतो. कोणतीही एक बाजू न घेता पुराणसाहित्याचे यथार्थ अनुशीलन करून आधुनिक दत्तपुराणाचा संक्षिप्त परिचय या लेखात करून घ्यावयाचा आहे.

पण 'पुराण' म्हणजे काय ? पुराणाची व्याख्या जरी स्पष्ट नसली तरी त्याच्या आशयाशक्तीचे लक्षण अमरकोशात सांगितले आहे. इतिहासः पुरावृत्तं पुराणं पञ्चलक्षणम् । इतिहास आणि पुराण हे जरी निराळे भाग असले व इतिहास ग्रंथांची संख्या ज्री थोडी असली, तरी पुराणकथा, राजवंश इ. बाबतीत दोघांमध्ये विषयसाम्य आणि आशयसाम्य आहे. वर सांगितलेल्या पाच लक्षणांपेक्षा देखील काही अधिक लक्षणे उपलब्ध पुराणात आढळून येतात. सर्व पुराणांत त्यांची संख्या एक तृतीयांशापेक्षा जास्त नाही. मग उरलेल्या दोन तृतीयांश पुराणभागांत कोठले विषय आले आहेत ? यातच पुराणांच्या विकासाची कथा आहे. व्यासाने पुराणांचा प्राचीन भाग रचला असावा व त्यांत सर्ग, प्रलय, राजवंश इत्यादिकांचे वर्णन केले असावे, असे मानण्यात येते. पुढे वैशंपायन, सौति आणि सूत यांनी पुराणांचा विस्तार केला. कोणी किती विस्तार केला, हे निश्चित सांगता येत नाही. खरे म्हणजे आख्याने, उपाख्याने यांची भर घालून व्यासानीच पुराणांचा विस्तार करण्यास सुरुवात केली होती. यासंबंधीचा एक श्लोक महाभारतात आणि काही पुराणांत येतो -

*आख्यानैश्चाप्युपाख्यानैर्गाथाभिः कल्पनोक्तिभिः (कल्पशुक्तिभिः) ।*
*पुराणसंहितां चक्रे पुराणार्थविशारदः ॥*

आख्याने, उपाख्याने, पारंपारिक श्लोक आणि कल्पश्लोक यामुळे पुराणांची श्लोकसंख्या वाढली, असा या श्लोकाचा अर्थ आहे. म्हणजेच, महाभारताप्रमाणे पुराणांतही विषयवृद्धि होत गेली आणि दोन्ही वाढींचे जनक महाभारताशीही संबंधित होते, हे स्पष्ट आहे. नंतरच्या अध्यायांत ज्ञानाचे महत्त्व पटवून दिले आहे. जीव-ईश्वर हे भेद खरोखरचे नाहीत. स्वरूपज्ञान झाल्यानंतर बंधमोक्ष असे काहीच रहात नाहीत.

*बन्धमोक्षौ तथा जीवसर्वेश्वरभिदावपि ।*
*कोशोपाधिपरित्यागान्न जीवो नापि चेश्वरः ॥ १.१.२७*

ज्याच्या मनात साधन चतुष्टयाविषयी आस्था उत्पन्न होते, ज्याला ब्रह्मात्म भाव जाणण्याची इच्छा होते आणि जो 'तत्त्वमसि' आदि वाक्यांचा अर्थ सम्यग् जाणून घेतो, त्याचे अज्ञानाचे कार्य निवृत्त होते आणि तो जीवन्मुक्त होतो, असा उपदेश केला आहे. या अष्टकाच्या चौथ्या अध्यायाच्या सुरुवातीला गणेशस्तुति आहे. त्यानंतर शिवस्तुति आहे. मायेचा प्रभाव सांगताना हे पुराण म्हणते की, तारुण्य, नित्यनूतनता, सौंदर्य आणि तुपासारखे सुमुख या चारांच्या द्वारे माया जीवाच्या ज्ञानाला (वयुनानि) आच्छादित करते. पाचव्या अध्यायात दत्तात्रेयाने आत्मतत्त्वाचे निरूपण केले आहे. त्यात दम, शम, श्रवणादिविधि इत्यादी उपनिषदातील पदांचा प्रयोग केला आहे. शांडिल्य-अथर्व संवादातही ब्रह्माचे म्हणजेच पर्यायाने दत्तात्रेयाचे अजर, अमर, कोशविलक्षण असे वर्णन आहे.

याच अष्टकांत पद्मासनासारख्या काही आसनांची स्थिती सांगितली आहे. तसेच प्राणायामाचे कुम्भकादि प्रकार, त्यावेळी धारण करावयाच्या खेचरी, महामुद्रासारख्या मुद्रा आणि परिपूर्णानन्द, शुद्ध चैतन्यरूप दत्तात्रेयाचे ध्यान सांगितले आहे.

दुसऱ्या अष्टकाची सुरुवात योगसूत्रांत असलेल्या पाच भूमिकांच्या वर्णनाने झाली आहे. (क्लिष्टाक्लिष्टशब्दज्ञानानुपाती वस्तुशून्यो विकल्पः, वितर्क, विचार इ. योगशास्त्रीय विचारांचा ऊहापोह आहे. राग, द्वेष, अविद्या, अभिनिवेश या यौगिकसंज्ञांचा विचार, यमनियम आणि त्यांचे प्रकार यांचेही वर्णन आहे. हा सर्व अध्याय योगसूत्राचा सारांशच आहे, असे म्हणता येईल.

पुढील भागात अनेक योगघातकांचा उल्लेख आहे. याच संदर्भात सवितर्क, सविचार, निर्वितर्क, निर्विचार समापत्ति वर्णन आहे. समाप्ती

समाधिच्या अर्थाचेच वहन करते.

या पुढील भागात सृष्टीच्या उत्पत्तीचे वर्णन आहे हे पूर्ववर्ती पुराणे व वेदान्त ग्रन्थ यांना अनुसरून आहे. भूभौतिक सर्ग, प्रत्येक शरीरात असलेल्या अंगाच्या देवता, विराट पुरुषाच्या विविध अवयवात असलेले विविध लोक, परमात्म्याचे व्यष्टि-समष्टिरूप, ब्रह्मदेवाच्या विविध अवयवांपासून उत्पन्न झालेले ऋषी, अत्रि-अनसूया विवाह पातिव्रत्याचे तेज, दत्तात्रेयादि अवतारांचे कथन, दत्तात्रेय हा अत्रि-अनसूयेपासून झालेला सहा हातांचा, सहा आयुधांचा अवतार इ. विषयांची चर्चा आहे.

यानंतरच्या भागात विष्णूचे विविध अवतार, वराह-नृसिंहावतारांची उत्पत्ति, दत्तात्रेयाचा प्रल्हादास उपदेश या सर्वात पूर्वीच्या पुराणांचे सार आले आहे. या अष्टकांत काही शब्दालंकार आणि काही विशिष्ट वृत्ते यांचा सुंदर शब्दप्रयोग दिसून येतो. याच्याबरोबरच कश्यप, पिंगल इ. विभिन्न अवधूतांचे वर्णन आहे.

तिसऱ्या अष्टकात निरनिराळ्या उपासनाविधींचे विधान आहे. ॐ श्रीं ह्रीं क्रों लं ऱ्हाम - या षडक्षर मंत्राचे तसेच इतर काही दत्तात्रेय मंत्रांचे निर्देश आलेले आहेत. याच अष्टकांत कार्तवीर्य सहस्रार्जुनाचे चरित्र कथन करण्यास सुरुवात झाली आहे. मातापुर किंवा माहूर या क्षेत्रांचे माहात्म्य सांगितले आहे. बीजाक्षरांबरोबर तिन्निरूपित मंत्र सिद्ध करण्याची पद्धति सांगितली आहे. या ॐ, ह्रीं इत्यादी मंत्रांचा प्रभाव विस्ताराने सांगितला आहे. जसे ॐकार संसारबन्धनाशक ह्रीं सर्व ऐश्वर्यप्रदायक, वषट् वशीकरणात्मक इत्यादी या सर्व चर्चेतून वासुदेवानन्द महाराजांचा तंत्रे आणि पुराणे यांचा अभ्यास किती सखोल होता हे दिसून येते. तिसऱ्या अध्यायात कार्तवीर्याची कथा पुढे चालू झाली आहे. याच अष्टकांत विद्या-अविद्या, प्रधान, प्रकृति, माया, विक्षेप, आवरण शक्ती, यांसारख्या वेदान्तातील विषयांचा उपदेश आहे.

चौथ्या अष्टकांत अष्टांगयोग, प्राणायामाचे प्रकार, समाधिभेद, परशुराम अवतार, बलात्काराने कामधेनु हरण करणाऱ्या राजाची कथा इ. विषय आहेत. साहजिकच येथे प्रश्न उत्पन्न होतो की वाढीव पुराणात कोणत्या विषयांची वाढ झाली ?

याचा विचार करताना एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. वैदिक यज्ञयाग, कर्मकांड किंवा उपनिषदांतील ज्ञानकांड यांचा प्रसार विशिष्ट कुळातील किंवा विशिष्ट वर्गापुरता मर्यादित राहिला. पण पुराणांचा म्हणजे पुराणांतील अवतारकल्पना, भक्ति यांचा प्रचार समाजाच्या तळागाळापर्यंत झाला. त्यांची सुलभ शैली, मनोरंजक आणि बोधप्रद संवाद आणि पुरातन कथांची हेतुपूर्वक मांडणी यांच्यामुळे पुराणे लोकप्रिय झाली. त्यातही ज्यांची भर पडत गेली, ते विषयही समाजाच्या अंतरंगात स्पर्श करणारे होते. भक्ति, स्वर्गप्राप्ति, पापहानि, पुण्यसंचय हे सर्व स्वल्प, पण भक्तिश्रद्धापूर्वक केलेल्या कामांपासून प्राप्त होऊ शकतात, असे पुराणांनी सांगितले. उदाहरणार्थ,

***स्वल्पेन हि प्रयत्नेन धर्मः सिध्यति वै कलौ ।***
***नरैरात्मगुणाम्भोभिः क्षालिताखिलकिल्बिषैः ॥ विष्णुपुराण ६.२***

त्याचप्रमाणे दान, अहिंसा, पूर्त, यांच्याबरोबर असंख्य व्रते, तीर्थ माहात्म्ये, तिथिमाहात्म्य असे सर्वजन सुलभ मार्ग दाखवून पुराणांनी जनसामान्याला मोक्षमार्ग अभिप्रेत आणि उपलभ्य बनविला आहे. हे सर्व पसरविले सूताने, अशा सूताने की जो वैदिक चातुर्वर्ण्यापासून दूरच होता. पुराणांतून अतिशयोक्ति असेल, काही विधाने अतार्किक वाटत असतील आणि एक विशिष्ट अभिनिवेशही दिसून येत असेल. पण भक्ति, धर्म, व्रते, तीर्थे यांच्याद्वारे पुराणांनी जी देवभक्ति आणि कर्मश्रद्धा वाढीस लावली व जे काही आदर्श समाजापुढे ठेवले, त्यांना इतरत्र कोठेच जोड नाही.

पुराणांनी आपले देवताप्रधानत्व न सोडता अनेक सद्गुणांची स्तुति आणि धर्मशास्त्रीय विषयांचा पाठपुरावा केला. ही पद्धति वर्षानुवर्षे चालूच होती. विसाव्या शतकांत लिहिलेल्या, दत्तपुराणातही ही सर्व वैशिष्ट्ये प्रतीत होतात. प्राचीन पुराणांच्या निश्चित कर्त्यांची जरी फारशी माहिती मिळत नाही, तरी दत्तपुराणाचे लेखक मात्र प. प. श्री. वासुदेवानन्द सरस्वती आहेत, यांत शंका नाही. दत्तात्रेयाचे ते परम उपासक होते. त्यांनी दत्तमाहात्म्य वर्णन करणारे ग्रंथ मराठीत लिहिले. पण इतर प्रांतीयांना देखील दत्ताचे माहात्म्य समजून देण्यासाठी त्यांनी गुरुचरित्र (संस्कृत अनुवाद), स्तोत्रादिकांसह ग्रंथ लिहिले आणि पुराणांच्या शैलीत श्रीदत्तपुराणही लिहिले. या दत्तपुराणात वर उल्लेखिलेली पुराणांची सर्व वैशिष्ट्ये दिसून येतात. पुराणांप्रमाणे त्यांच्याही मनात जनहिताची कळकळ होती. तिच्याच पोटी या संस्कृत ग्रंथरत्नाचा जन्म झाला आहे.

या पुराणाची रचना नेहमीच्या स्कन्ध अध्याय पद्धतीची नाही. त्यांत आठ अष्टके असून प्रत्येकात आठ अध्याय आहेत. असे एकंदर ६४ अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायात दत्तात्रेयाच्या माहात्म्याचे वर्णन आले आहे.

दत्तात्रेय एक विख्यात योगी असून त्यांनी अलर्क, परशुराम यासारख्या महानुभावांना योगाचा उपदेश केला आहे. या पुराणांतील पहिल्या अष्टकातच हठयोगाचे वर्णन प्रामुख्याने आले आहे. सुरुवातीला वैदिक ऋचांची आठवण करून देणारी परमेश्वर स्तुती आहे. त्यांत इंद्राचे वर्णन दत्तात्रेयांना लागू करून देऊन स्तुतीला पौराणिक बनविले आहे. बहुतेक श्लोकांत परमेश्वरास रक्षण करण्याची विनवणी केली आहे. ह्या एका स्तुति करणाऱ्या ब्राह्मणांस दत्तात्रेयाने स्वतः दर्शन दिले. दत्तात्रेयापुढे त्याने असे सांगितले आहे की गौतम, कणाद, मीमांसक यांनी परस्परविरुद्ध तत्त्वे सांगितली आहेत. त्या ब्राह्मणाने सांगितले की केवळ मनन, चिंतन यांनी प्रत्यक्ष मोक्षप्राप्ती होत नाही. दुःखाचा प्रतिकारही क्वचित झाला तरी सिद्धीचा अभाव मात्र कायम राहील. परिणामवादी सांख्य आणि विवर्तकवादी अद्वैत वेदान्तीही पूर्णतः विश्वास ठेवण्यास पात्र नाहीत. कार्तवीर्याचे पारिपत्य, पित्याचे और्ध्वदेहिक करून परशुरामाने ऋषींना केलेले पृथ्वीदान, रेणुकास्तुति हे विषय प्रामुख्याने आले आहेत. पाचव्या अष्टकाच्या सुरुवातीला कुवलयाश्व राजाने केलेली मदालसेची प्राप्ति सांगितली आहे. मृत झालेली मदालसा शंकराच्या कृपेने अश्वतरायच्या निःश्वासातून उत्पन्न झाली, अशी अद्भुत घटना सांगितली आहे. मदालसेला एकंदर चार पुत्र झाले. त्यातील तिघांना तिने ज्ञानोपदेश केला. त्यातील हा उपदेश ध्यानयोग्य आहे -

***दुःखैः सन्तप्यते मूढो विषयान्धेव कानि हि ।***
***पराधीनतयोत्थं कं तत्तुच्छं विरलं क्षणात् ॥ ५.३.७***

तसेच 'भूते भूते स्थितोऽप्यर्क इवाप्स्वात्मैक हि अशा तऱ्हेचा आत्मबोध मदालसेने आपल्या मुलास केला आहे. अलर्काला केलेला उपदेश त्याने स्वतःच सांगितला आहे. तो एके ठिकाणी म्हणतो - 'स्थूल देह आणि तन्मात्रावस्थित सूक्ष्म देह यांत उत्पन्न झालेले आधिभौतिक, आधिदैविक, आध्यात्मिक असे तीन प्रकारचे दुःख मी साक्षीरूपाने पहातो. कर्म करण्याची

इच्छा असणारे भुंगे संसारवृक्षावर राहतात. त्या वृक्षाचे बीज अज्ञान, अंकुर अहंकार, वेली ममता, पाने म्हणजे नातलग, फुले म्हणजे पुण्य आणि पाप. या मायिक वृक्षावर सुख कोठचे. या दत्तात्रेयाच्या उपदेशास ? अलर्कानेही योग्य तो प्रतिसाद दिला. दत्तात्रेयाने असेही सांगितले की तत्त्वज्ञानं मनोभङ्गे वासनाक्षय इत्यदः... मुक्तये कारणं परम् (५.४.४२) त्यानंतर अष्टांगयोगाचे मार्मिक विवेचन दत्तात्रेयाने केले आहे. याच अनुषंगाने ओंकारोपासनेचे माहात्म्यही या अष्टकात सांगितले आहे. मृत्यूचे आगमन कसे ओळखावे, त्याची काही चिन्हे आहेत. या विषयीही दत्तात्रेयाने उपदेश केला आहे. वासुदेवानंदांनी या ठिकाणी अनेक मौलिक आणि प्रत्ययगम्य अशी चिन्हे सांगितली आहेत.

सहाव्या अष्टकांत आयुराजाची कथा आहे. त्यातच हुंड राक्षसाच्या वधाचे उपकथानक आहे. आयुराजाचा मुलगा वसिष्ठाश्रमात येतो. वसिष्ठ याच्यावर दत्तात्रेयाची कृपा होईल, असा आशीर्वाद देतात. कार्तवीर्याच्या कथानकांत शेवटी कार्तवीर्यचे दत्तात्रेयाचा अनन्य भक्त म्हणून उन्नयन झाले आहे. सामान्य किंवा नीच उपासकांचा त्यांच्या भक्तीने उद्धार होऊ शकतो, हे पुराणसाहित्यात अनेक ठिकाणी दाखविले आहे. (अजीमल, रावण इ.) हेच तत्त्व या पुराणांतही व्यक्त केले गेले आहे. दत्तात्रेयाने प्रसन्न होऊन कार्तवीर्याला शिल्पशास्त्र आणि कामशास्त्रांतही प्रवीण बनविले आहे. अशा रीतीने दत्तात्रेयांनी अनेक शास्त्रांच्या विषयीचे आपले अभिप्राय प्रकट केले आहेत. पण सरस्वतींनी उत्तर कालीन वेदान्ताचा अधिक ऊहापोह केला आहे. पुराणांतून अनेक शास्त्रांचे पाठ मधून मधून दिले जातात. दत्तपुराणातही जनतेच्या हितासाठी अनेक तत्त्वमद् कीर्तीचे सार सांगितले आहे. या पुराणात आलेला 'जीवन्मुक्त' शब्द याचाच द्योतक आहे -

***प्रारब्धभोक्तारामो जीवन्मुक्तो भवेदियम् ।***
***योगभूर्महती ख्व एतां मुग्धादिवच्चरेत् ॥ ४.२.५१***

या ज्ञानाचा उपयोग करून कार्तवीर्य अर्जुनाने योगाभ्यासपूर्वक राज्यप्राप्ति करून घेतली. चौथ्या अष्टकांत परशुरामाच्या अवताराचे सविस्तर वर्णन आले आहे. परशुरामाला दत्तात्रेयाने आध्यात्मिक उपदेश दिल्याचे वर्णन अनेक तंत्रग्रंथात आले आहे. या पुराणांत असे सांगतले आहे की बलात्काराने कामधेनु हरण करणाऱ्या कार्तवीर्य अर्जुनाचा परशुराम वध करतो. या अष्टकाचा पुढील अध्यायांतून मदालसेची कथा पूर्ण झाली आहे. पुराणांच्या पद्धतिप्रमाणे ६ व्या अष्टकात चौदमन्वंतर आणि ब्रह्मांड यांचे वर्णन केले आहे. ६ व्या अष्टकांत; सातव्या अध्यायात रामायणकथेचा महत्त्वाचा भाग आलेला आहे. पद्मपुराण, देवीभागवत इत्यादी पुराणांतून रामकथेचा महत्त्वाचा भाग अगोदर आलेलाच आहे. पुढच्या अध्यायांमध्ये सोमवंशवर्णन, सुन्दोपसुन्दकथा, हेमकुंडल वैश्याचे चरित्रकथन, देवदूतांनी वैश्यपुत्रास समजावून सांगितलेले देवताभजकादि धर्मांचे महत्त्व, दानधर्ममाहात्म्य या विषयांचे निरूपण आहे. पुराणांत अनेक व्रतांचे आचरण व त्यांची फलश्रुति यांचे सविस्तर वर्णन आले आहे. किंबहुना, मन, तीर्थ, आचार हे पौराणिक धर्माचे महत्त्वाचे घटक आहेत. सर्व पुराणांत एकादशीचे महत्त्व वर्णिले आहे. सातव्या अष्टकातील पाचव्या अध्यायात वैष्णव धर्म आणि त्या धर्माचे मुख्य जे एकादशी व्रत आहे, त्यासंबंधीच्या नियमांचे विवरण केले आहे. कारण -

***नेदृशं पावनं पुण्यं नेदृशं परमं तपः ।***
***नेदृक् पूर्तेष्टवत्तादि तारकैकादशी ततः ॥ ७.५.२१***

पुढच्या सहाव्या अष्टकांत विकुंडलाने प्रसन्न केलेल्या विष्णु दूताकडून त्याच्या भावाच्या मोक्षाचा उपाय सांगितला जातो. त्यापैकी विशेष महत्त्वाचे उपाय असे आहेत -

***अद्रोहः सर्वभूतानां मनोवाक्कायकर्मभिः ।***
***स्ववर्णाश्रमधर्मोक्तचरणं पापवारणम् ।***
***सत्यमेव प्रवक्तव्यं न चौर्यं यस्य कस्यचित् ।***
***शक्त्या पात्रे प्रदातव्यं सन्त्याज्या विषयस्पृहा । ७.६.१.८***

पुराणांनी अशा सुलभ कर्माचे प्रतिपादन केले होते. त्याचाच अनुवाद दत्तपुराणात झालेला आहे. त्यानंतर माघस्नानविधि आणि त्याला जोडून एका अप्सरेचे विचार सांगितले आहेत. प्रयागतीर्थाचे माहात्म्य सांगताना ७ व्या अध्यायाच्या सातव्या अष्टकात प्रयागवासामुळे इंद्राची परस्त्रीगमनाच्या पापापासून कशी मुक्ति झाली, ते सांगितले आहे. त्यानंतर निरनिराळ्या ऋषींच्याद्वारे ब्रह्मचर्य, गृहस्थ धर्म, यांतील कर्तव्यांचा पुनरुच्चार करविला आहे. यामध्ये शरीर शुद्धि संध्या, जप यांचेही उल्लेख आहेत. ८ व्या अष्टकाच्या तिसऱ्या अध्यायात और्ध्वदेहिक विधी आणि श्राद्धलक्षणप्रयोग सांगितले आहेत. चौथ्या अध्यायात तीर्थांचा निर्णय कसा करावा, ते सांगितले आहे. पाचव्या अध्यायात पापाची कारणे आणि पापांचे निवारण करण्यासाठी जी प्रायश्चित्ते करावयाची असतात, त्यांचे वर्णन आले आहे. उदाहरणार्थ,

***त्रिगुणं शतानिष्कान्ते सहस्रान्ते चतुर्गुणम् ।***
***अतं ऊर्ध्वं ब्रह्महत्या व्रतं न्यूनं तु ताम्रके ॥ ८.५.४७***

केलेल्या पापांचे रोगात पर्यवसान होते, असे सांगितले आहे.

***जन्मान्धो विश्वासघाती क्षमी गण्डी गणार्थहृत् ।***
***अपुत्रोऽन्यार्थहृद्वस्त्रहृच्छ्वित्री चानृतो कुवाक् ॥ ८.६.४७***

विश्वासघात करणारा जन्मांध, सेवकांचे धन चोरणारा गंडयोगी (आम्लपित्तरोगी), परद्रव्य चोरणारा निपुत्रिक, वस्त्रे चोरणारा कुष्ठरोगी, तसेच अन्न चोरणारा पाप करी रोगाने त्रस्त होतो इत्यादी. सातव्या अष्टकात सोळा संस्कार, अशौचनिर्णय, वानप्रस्थादि आश्रमांचे वर्णन हे विषय आले आहेत. आठव्या अष्टकांत प्रलय, युगमान आणि संन्यास पद्धती यांचे थोडक्यात विवरण आहे.

अशा रीतीने दत्तपुराणातील महत्त्वाचा असा कर्मकाण्ड आणि आश्रमनियमांचा भाग समाप्त झाला आहे. 'विसाव्या शतकात पुराण' हे जरा नवल आहे. पण आख्यान, आचारकर्म आणि देवताविज्ञान यांचा संगम पुराणांत झाल्यामुळे प. पू. वासुदेवानन्द सरस्वती यांना दत्तात्रेयाचे योगाधिष्ठित चरित्र व त्यांनी केलेला उपदेश यांची दत्तभक्तांना माहिती देण्यासाठी 'पुराणारचनाच' उपयोगी वाटली. सर्ग, प्रतिसर्ग यांचा दिङ्मात्र उल्लेख प्राचीन पुराणातच आहेत. पण पुराणांचे सार्वकालिक चिरंतन वैशिष्ट्य म्हणजे सामान्य लोकांना अनेक तीर्थे आणि आदर्श भक्त यांचे वर्णन करून ज्ञानसाध्य मोक्षाचा मार्ग भक्तिसाध्य करून देणे, हे आहे. आज सुमारे १ हजार वर्षे या वैशिष्ट्यामुळेच सामान्य जनतेत पुराणधर्म टिकून राहिला आहे. अर्थात् अतिशयोक्ति, रचनेतील शिथिलता यांमुळे त्यांची उद्दिष्टे तर्कवादी किंवा हेतुवादी यांच्या मनात भरणार नाहीत. कदाचित् पुराणे देवतामाहात्म्य आणि स्वर्गफल सांगून माणसांना ऐहिकाविषयी अनास्था आणि पारलौकिकाविषयी ओढ निर्माण करीत असतील. पण हा युगमहिमा आहे. उत्तरोत्तर काळांत नीरक्षीरविवेकानेच लोकांनी पुराणे

स्वीकारली तो भाग निराळा. पण पुराणांनी 'तत्कालीन ज्ञानाचा विश्वकोश' म्हणून यथार्थ ख्याति मिळविली आणि नंतरच्या पिढ्यांस एक मोठा खजिना उघडा करून दिला. भक्ति, ज्ञान, पारलौकिक किंवा ऐहिक सुखाचीही वांछा या मानव सुलभ प्रवृत्ति आहेत. निदान देवताभक्तांना तरी त्या निश्चितच स्वीकार्य आहेत. पुराणांच्या याच वैशिष्ट्यांवर प. पू. वासुदेवानंद सरस्वतींनी जोर दिला व अगोदरच महाराष्ट्रात असलेल्या दत्तभक्तीला पुराणविधेचे अधिष्ठान दिले. अनेक देवतांची पुराणे आहेत. त्यातील कथा लोकप्रिय झाल्या आहेत. ब्रह्मा, विष्णू, महेश यांच्या कथा शेकडो वर्षे लोकांना मार्गदर्शक ठरल्या आहेत. त्या तिघांचे एकत्र मूर्तीकरण झालेले दत्तात्रेयाचे चरित्र पुराण रूपांनी आले नव्हते. परशुराम कल्पसूत्रासारख्या तंत्र ग्रंथात दत्तात्रेय एक तांत्रिक योगी म्हणून वर्णिले आहेत. त्यांनी अलर्क, कार्तवीर्य इत्यादींना केलेला उपदेश पुराणात आला आहे. त्या सर्वांचा समन्वय, आपल्या भावपूर्ण आणि निराडंबर शैलीने या पुराणांत या महर्षींनी केला आहे. केवळ दत्तभक्तांनाच नव्हे, तर सर्व भाविक, सत्प्रवृत्त आणि सद्भक्त यांना हे दत्तपुराण अत्यंत मार्गदर्शन होईल. पुराणांच्या विस्तारित संपदेपेक्षा ही सुटसुटीत आणि प्रांजल भाषेत लिहिलेली पुराणरचना सर्व भारतीय जनतेला मार्गदर्शन करेल यात शंका नाही. या लेखांत या पुराणाचा सामान्य परिचय करविण्याचा प्रयत्न केला गेला आहे. साधकांनी मूळ पुराण वाचणेच योग्य ठरेल.


**डॉ. प्रमोद गणेश लाळे**

६, कमला पार्क सोसायटी, नारायणी हॉस्पिटल जवळ,
एरंडवणा पुणे ४११०३८.

**वेदान्तपररामायणम् श्री प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती विरचितं**

**वेदांतपर रामायणातील माला रूपक**

दशेन्द्रियरथो देही राजा दशरथः स्मृतः ॥
कौसल्या तत्प्रिया बुद्धी रामस्तत्रोद्‍भवः परः ॥१॥
वृत्वा सीतां स्वानुभूतिं सुखमास्तेऽथ दैवतः ॥
संसार विपिनं प्रापाहंकारो रावणाभिधः ॥२॥
राजसः स्वानुभूतिं तां सीतां यत्नाज्जहार ह ॥
रामः परात्मापि ततः स्वानुभूतिवियोगतः ॥३॥
प्राप्तो दीनदशां दुःखी शुशोच विरहातुरः ॥
परिभ्रमन् हनुमता विवेकेनच संगतः ॥४॥
तेन सीतास्वानुभूतिस्थिति वार्ता प्रदर्शिता ॥
ततो वानरसद्‍वृतिसैन्येनच हनूमता ॥५॥
सेतुं बध्वा स्व जलधी साधनाश्मभिकत्कटैः ॥
ततो भवाब्धिमुल्लंघ्य दीपाज्ञानाग्निना भृशं ॥६॥
सुक्ष्मदेहाख्यलंकांच दग्ध्वौपनिषदस्त्रतः ॥
कामक्रोधादि रक्षांसि हत्वा युद्धे सहस्रशः ॥७॥
सात्विकाहंकारबिभीषणसाहास्यतस्ततः ॥
कुंभकर्ण तामसाहंकारं राजसमप्यथ ॥८॥
निहत्य रावणं स्वानुभूतिं सीतां प्रगृह्यच ॥
रामः स्वरूपसाम्राज्येऽभिषिक्तोऽरीरमत्तया ॥९॥

दहा इंद्रियरूपी स्थान राहणारा जो देही तोच वस्तुतः राजा दशरथ असून बुद्धि ही त्याची प्रिया कौसल्या होय. त्या युग्माचे ठिकाणी आत्माराम प्रकट झाला. तो स्वानुभूतिरुपी सीतेला वरून तिच्यासह निजानंदात निमग्न असता दैवयोगाने संसारूपी दंडकारण्यात रावण नावाचा अहंकार प्राप्त झाला. हा राजसाहंकार होय. या राजसाहंकाररूपी रावणाने खूप प्रयत्न करून स्वानुभूतिरूपी सीतेचे अपहरण केले. श्रीराम परात्मा असतानाही स्वानुभूतिरूपी सीतेच्या वियोगामुळे दीनदशेला प्राप्त होऊन दुःखी झाला. तिच्या विरहाने आतुर होऊन शोक करू लागला. तो भ्रमण करीत असता विवेकरूपी हनुमंताशी त्याचा संबंध जुळला. या हनुमंताने स्वानुभूतीरूपी सीमेची वार्ता आत्मारामाला सांगितली. नंतर विवेकरूपी हनुमान व सद्‍वृत्तीरूपी वानरसैन्य यांच्या समवेत उत्कट साधनरूपी पाषाणांचा सेतू संसार समुद्रावर उभारून तो समुद्र आत्मारामाने उल्लंघन केला नंतर प्रदिप्त ज्ञानाग्निने व उपनिषदरुपी महास्त्राने सूक्ष्म देहरूपी लंकेला जाळून युद्धात सहस्रावधि कामक्रोधरूपी राक्षसांचा त्याने संहार केला. सात्त्विक अहंकाररूपी बिभीषणाच्या साहाय्याने आत्मारामाने कुंभकर्णरूपी तामसाहंकार व रावणरूपी राजसाहंकार यांना ठार केले. नंतर स्वानुभूतिरूपी सीतेला प्राप्त करून घेऊन आत्मारामाचे स्वरूप साम्राज्यावर आभिषिक्त होऊन तो स्वानुभूतिरूपी सीतेसह निजानंदात निमग्न झाला.

**सौ. प्राची प्रसाद कुंटे**

'प्रज्ञा' ए-७४, आसरा सोसा., होटगी रस्ता, सोलापूर - ३.

# वेदांतपरभागवतम्

वसुदेवः शुद्धसत्वं तद्वृत्तिर्देवकी मता ।
कृष्ण आत्मागतस्तत्र पितृबन्धविमोचकः ॥१॥

गोकुलं प्रापितोऽथापि दैवात्पित्रेन्द्रियाभिधम् ।
सवृत्तिसात्विकात्माख्ययशोदानन्दतातमाक् ॥२॥

दुर्वासनापूतनाघ्नो रेमे गोप्याख्यवृत्तिभिः
विलीय तत्सञ्चितगोरसाग्दोगोपपालकः ॥३॥

नानाकौतुककृद्दुवृत्तिवृन्दावने स्थितः ।
गोप्याशापूरकोऽविघानिशायां चित्ररासकृत् ॥४॥

गोप्योर्द्वयोर्द्वयोर्मध्ये वशस्तदनुरूपवत् ।
रेमे दैवात्तद्वियुक्तो दुर्हप्राक्पितृसंगतः ॥५॥

भवाब्धिमध्ये देहाख्यां कृत्वा द्वारपतीं पुरीं ।
सोऽनुप्रविष्टस्तां वृत्त्याख्या विविधाः स्त्रियः ॥६॥

सर्वाः पतिव्रताः कान्तं मेनिरे तं वशीकृतम् ।
आत्मारामोऽप्यसङ्गोऽपि ततो दीन इवाबभौ ॥७॥

षोडशस्त्रीसहस्त्रेशः संसारं समवर्धयत् ।
परोपदेशकृत्पञ्चप्राणपाण्डवपालकः ॥८॥

उरीकृत्य ब्रह्मशापं विनाश्य स्वजनान् क्षणात् ।
पुरीं द्वारवतीं चापि कृष्ण एकस्ततः स्वयम् ॥९॥

हृतपाण्डवसारोगाद्वैकुण्ठं पूर्वधाम तत् ।
भक्तः सुभक्त्या भगवत्संबन्धीदं सदा पठेत् ॥१०॥

भवार्तिहृद् भागवतं स नूनं भवमर्जकः ।
इति श्री प. प. वासुदेवानंदसरस्वती विरचितं
वेदांतपरभागवतम् संपूर्णम् ।

वेदान्तपर भागवत हेच स्तोत्र श्रीस्वामीमहाराजांच्या स्तोत्रादिसंग्रहात छापले असून त्या वेळी त्याचा अर्थ प्रकाशित केला नव्हता. नुकतेच चिखलधाजवळील निसरपूर येथील गंगाधर अण्णाजी वैद्य (महंमदपूरकर) यांचे टिपणीतून स्तोत्राचा अर्थ उपलब्ध झाला. या गंगाधरपंतांनी स्वतः स्वामीमहाराजांकडून काही संस्कृत ग्रंथ, उपनिषदे इत्यादी समजून घेतली, त्यामुळे वेदांतस्तोत्राचा अर्थही श्रीस्वामीमहाराजांच्या मुखाने त्यांना प्राप्त झाला असा योग्य निष्कर्ष निघतो.





**अर्थ :** निर्मल असा जो सात्त्विक गुण; तो वसुदेव मानून त्या सात्त्विक गुणाची जी वृत्ति, ती त्याची स्त्री देवकी मानली आहे, त्या शुद्ध सात्त्विक गुणाच्या वृत्तीत, आईबापांची, संसारबंधनापासून मुक्ति करणारा किंवा वसुदेव देवकीला कारागृह बंधनातून सोडविणारा कृष्ण हा आत्मा उत्पन्न झाला आहे किंवा उदयाला आला आहे.॥१॥ आत्म्याचा उदय झाल्यानंतरही प्रारब्धयोगामुळे वसुदेवरूपी शुद्धसत्त्वाने (मथुरेमधून निघून) श्रोतादि इंद्रियेनामक गोकुळाप्रत कृष्णरूपी आत्मा प्राप्त केला - आणून ठेवला. तेव्हा वृत्तीसीसहवर्तमान, सात्त्विकगुण रूपी जे यशोदानंद नामक आईबाप त्यांची सेवा (तो कृष्ण) करता झाला.॥२॥ दुष्ट वासना ही पूतना राक्षसी होय. हिचा वध करणारा गोपाळनायक अनेक वृत्ती त्यांच्यासी सहवर्तमान (श्रीकृष्ण) रममाण होता झाला. गायी व गोपाल किंवा श्रोतादि इंद्रिये व त्यांचे स्वामी, यांचे पालन करणारा (कृष्ण आत्मा) गोपाळांच्या दुधादिकाप्रत किंवा संचित कर्मास हरण करता झाला.॥३॥ अनेक प्रकारांची कौतुके करून दुष्ट दैत्यांचा नाश करणारा, वृत्तिच्या समुदायांचे पालननिमित्त राहणारा किंवा (श्रीकृष्ण गोकुळातून निघून) वृंदावनात येऊन वास्तव्य करता झाला. गोपिकांची आशा परिपूर्ण करणारा व रात्रीच्या ठायी (शरदऋतूत) आश्चर्यजनक क्रीडा करणारा तो कृष्ण, आत्मा होय.॥४॥ दोन दोन गोपिकांमध्ये (जसा दोन मोत्यांत एक लोलक असतो तद्वत्) गोपिकांच्या स्वरूपाला शोभेल अशी अनेक रूपे धारण करणारा व गोपिकांच्या स्वाधीन झाल्यासारखा होऊन (श्रीकृष्ण) रमता झाला. नंतर प्रारब्ध कर्माने गोप व गोपिकांदिकांची ताटातूट झाली (मथुरेत येऊन) कंसादिक दुष्टांचा नाश करून वसुदेवदेवकी, पूर्वीचे आईबापांची भेट घेतली.॥५॥ संसार समुद्राचे ठायी देह नावाची, जिला नऊ द्वारे आहेत अशी नगरी (जीवाने) निर्माण केली किंवा (श्रीकृष्णाने) द्वारका शहर करविले. श्रीकृष्णाने द्वारकेत प्रवेश करून किंवा जीवाने देहात प्रवेश करून वृत्ति नावाच्या अनेक प्रकारांच्या स्त्रियास वरिल्या आहेत.॥६॥ सर्व स्त्रिया पतिव्रता धर्माने वागणाऱ्या असून, सुंदर श्रीकृष्णास आपल्या स्वाधीन झाला आहे असे मानीत होत्या. आत्मस्वरूपी रममाण असून सर्वत्र अनासक्त असताही श्रीकृष्ण जसा दीन असतो तद्वत् शोभत होते.॥७॥ सोळा हजार अर्थात अनंत स्त्रियांच्या स्वामीने (श्रीकृष्णाने) उत्तम प्रकारचा संसार वाढविला. अज्ञानी लोकांस सन्मार्गाचा उपदेश देणारा श्रीकृष्ण आहे, त्याने पाची पांडवांना पाच प्राणांसारखे संरक्षिले.॥८॥ (ह्या मुसळापासून कुलक्षय होईल असा) ऋषीचे शापाला ग्रहण करून श्रीकृष्णाने थोड्या अवकाशात स्वकीय जनांचा नाश केला आणि द्वारका नगरीचाही नाश करून, तत्पश्चात स्वतः एकटे होऊन राहिले.॥९॥ श्रीकृष्ण स्वरूपाचे सार पांडवांनी ग्रहण केले आहे, तो श्रीकृष्ण आपले जे वैकुंठनामक पूर्वीचे निवासस्थान त्याप्रत गमन करता झाला. जो भक्त पराभक्तीने ह्या भगवत्संबंधी (चरित्राला) निरंतर पठण करील तो पुरुष संसाराला जाळणारा होईल. हे भागवत संसारातील संपूर्ण पीडा हरण करणारे आहे.॥१०॥

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य वासुदेवानंद सरस्वतीकृत भागवत समाप्त झाले.



# श्रीदत्तमाहात्म्य

कै. म. म. बाळशास्त्री हरदास

*महामहोपाध्याय, साहित्याचार्य.*

भगवान् श्रीदत्तात्रेयांसारख्या जगत्कल्याणास्तव सगुण व साकार झालेल्या परतत्त्वाच्या माहात्म्याचा विषय व परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती स्वामिमहाराजांसारखे सिद्ध पुरुष हे ग्रंथकार, असा प्रस्तुत ग्रंथाच्या संबंधात आलेला योग श्रीमद्भागवतासारखाच अलौकिक आहे. अशा या ग्रंथाला माझ्यासारख्या पारमार्थिक क्षेत्रात कोणताही अधिकार नसलेल्या व केवळ सद्गुरुंच्या चरणारविन्दांचा आश्रय केलेल्या व्यक्तीने प्रस्तावना लिहिण्याचे धाडस करणे योग्य नाही, याची मला जाणीव आहे. पण माझे मित्र पंडित दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर यांच्या शब्दाचा अवमान होऊ नये व अंशतः सेवेचा लाभ घडून 'काही आपण तरावया' उपयोग व्हावा या हेतूनेच मी हे धाडस करीत आहे.

सांस्कृतिक मूल्यांचा वर्तमान युगांतील दीपस्तंभ म्हणून प. प. श्रीमद्वासुदेवानंद सरस्वतींचे स्थान अनन्यसामान्य आहे. 'ब्राह्मणत्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्याद्वैदिको धर्मः' असे भगवत्पूज्यपाद श्रीमदाद्य शंकराचार्यांनी श्रीमद्भगवद्गीतेवरील आपल्या भाष्यांत म्हटले आहे. श्रीमदाचार्यांना जे ब्राह्मण्य अभिप्रेत आहे ते श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतींच्या रूपाने साकारले होते. चारही आश्रमांच्या आचारधर्माचे यथार्थ दर्शन ज्यांच्या जीवनग्रंथांतून घडते असा दुसरा कोणता महापुरुष वर्तमान युगांत दाखविता येईल ? कडकडीत तपाचरणामुळे ब्राह्मणाचे सारे सामर्थ्य त्यांच्या जीवनांतून प्रगट झालेले होते. श्रीज्ञानदेवांनी ब्राह्मण्याचे हृदयंगम व दीप्तिमान चित्र रेखाटताना भावार्थदीपिकेत म्हटले आहे -

***वर्णामाजीं छत्रचामर । स्वर्ग जयांचे अग्रहार । मंत्रविद्येचे माहेर ।***
***ब्राह्मण जे ॥५॥***
***जे पृथ्वीतळींचे देव । जे तपोवतार सावयव । सकळ तीर्थांसि दैव ।***
***उदयलें जे ॥६॥***
***जे अखंड वसिजे यागी । जे वेदांची वज्रांगी । जयांचिये दिठीचिया उत्संगीं ।***
***मंगळ वाढे***
***जयांचा कोप सुभटा । काळाग्निरुद्राचा वसौटा । जयांचें प्रसादीं फुकटा ।***
***जोडती सिद्धी***
***मियां लक्ष्मी डावलोनि केली परीति । फेडोनि कौस्तुभ घेतला हाती ।***
***मग वोडविली वक्षस्थळाची वाखती । चरणरजा ॥९॥***

श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतींच्या जीवनातून हे सर्व विशेष प्रगट झालेले होते. स्वतःच्या जीवनांतून त्यांनी जसे धर्माचे व आध्यात्मिक ध्येयवादाचे स्वरूप प्रगट केले, त्याचप्रमाणे अनेक जीवांचे "आर्त" दूर करून त्यांना सन्मार्गाला लावले व कृतार्थ केले. भावी पिढ्यांसाठी त्यांनी साहित्य निर्माण करून पारमार्थिक क्षेत्रांतील साधकांची सदाची सोय करून ठेवली हे त्यांचे सर्वात मोठे कार्य होय. त्यांनी निर्माण केलेल्या ग्रंथसंपत्तीपैकी बरेचसे ग्रंथ संस्कृत भाषेत आहेत. त्या ग्रंथांची महत्ता केवढीही मोठी असली तरी सर्वसामान्य लोकांना त्यांचा विशेष उपयोग होण्यासारखा नाही. हे ध्यानात घेऊन श्रीमहाराजांनी मराठीत जे साहित्य निर्माण केले आहे, त्यांत प्रस्तुत ग्रंथाची योग्यता अनेक दृष्टींनी अलौकिक आहे. प्रस्तुत ग्रंथाचे स्वरूप व त्याच्या निर्मितीचे कारण यावर महाराजांनी स्वतःच प्रकाश टाकलेला आहे. ते लिहितात -

***'जगदुद्धारार्थ परमेश्वर । अत्रीच्या घरी धरी अवतार ।***
***त्याच्या चरिताचा विस्तार । वर्णिला सुंदर पुराणीं ॥***
***तत्सारभूत दत्तपुराण । औट सहस्र निरूपण ।***
***तें अपरिचित गीर्वाण भाषण । प्राकृतजन नेणती ॥***
***म्हणोनि हा ग्रंथारंभ । ह्या योगें उमजेल स्वयंप्रभ ।***
***भक्तवत्सल पद्मनाभ । चित्तक्षोभहर्ता जो ॥***
***श्रीदत्तपुराणाचे तीन भाग । ज्ञानोपासनाकर्मयोग ।***
***त्यांतील उपासनाकांड भाग । ईश्वरानुराग वाढवी जो ॥***
***जेथें कार्तवीर्याचें आख्यान । अलर्काचें विज्ञान ।***
***आयुयदूचें उद्धरण । हेंचि वर्णन मुख्यत्वें ।'***

निरनिराळ्या पुराणांतील श्रीदत्तावतारविषयक साहित्य एकत्र करून श्रीमहाराजांनी दत्तपुराण नावाचा जो संस्कृत ग्रंथ लिहिला, तो भाषेमुळे सामान्यजनांना दुर्बोध असल्याकारणाने त्यांनी प्रस्तुत ग्रंथाची रचना केली.

दत्तपुराणाचे कर्म, उपासना व ज्ञानकाण्ड हे जे तीन भाग आहेत त्यांतील केवळ उपासनाकाण्डच महाराजांच्या या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय आहे.

## प्रस्तुत ग्रंथाची मंत्रमयता

श्रीमहाराजांचा प्रस्तुत ग्रंथ केवळ उपदेशपर साहित्य नसून ज्याच्या केवळ पठणाने जीवाचे कल्याण व्हावे अशा सामर्थ्याचा आहे. श्रीज्ञानेश्वरी अथवा दासबोध यांच्या सारखाच तो 'प्रत्ययो पहावा' या योग्यतेचा आहे. ज्यावरून मी हे अनुमान केले आहे. ते प. प. श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतींचे या ग्रंथासंबंधीचे उद्गार पुढीलप्रमाणे आहेत -

कर्ता धर्ता संहर्ता । विश्वाचा जो तारी आर्ता । जो स्मरणें दुःखवार्ता । नुरवी भर्ता तो अमुचा ॥ तो आमुचा गुरुवर । त्याला जोडुनी दोन कर । त्याचे चरणी ठेविलें शिर । ज्याला सुरवर वंदिती ॥ तो हा परमात्मा श्रुतिगेय । नरसिंहसरस्वतीदत्तात्रेय । परब्रह्मसच्चिदानंदमय । निरामय अद्वितीय तो ॥ तोचि रची हा ग्रंथ । निमित्तमात्र वासुदेव येथ ॥ श्रवणें पठणें करवील स्वार्थ । हा यथार्थ भाविकांचा ॥' तात्पर्य, सामान्यजनांना या ग्रंथांतील उपदेशानुसार वागल्याने तर कल्याणाचा लाभ होईलच; पण

ग्रंथाच्या केवळ पठणानेही ईश्वरी कृपेचा लाभ होऊ शकेल. केवळ साहित्यिक दृष्टीनेही या ग्रंथाला वाङ्मयीन क्षेत्रांत विशिष्ट स्थान लाभावे इतका तो प्रसादगुणाने परिपूर्ण आहे.

## साहित्यिक मूल्यमापन

वस्तुतः बोधवाद हा आत्मा असलेल्या संत साहित्याला साहित्यिक निकषांवर आणणे योग्य नाही. पण बोधवादी साहित्य रसपूर्ण नसावे असा काही दंडक नाही. किंबहुना बोधवादी व परतत्त्वाला स्पर्श करणारे साहित्य केवळ कलावादी साहित्यापेक्षांही कधीकधी अनंत पटीने सरस निराळा व सौंदर्यपूर्ण असू शकते, हे श्रीज्ञानदेवांच्या साहित्याने सिद्धच झाले आहे. प्रस्तुत ग्रंथ बोधवादी साहित्याच्या क्षेत्रातील असला तरी त्याचे साहित्यगुणही आकर्षक आहेत. प्रसाद हा या ग्रंथाचा डोळ्यात भरणारा गुणविशेष असून अलंकार इतके सहजपणे साधले आहेत की, त्यांच्या गुंफणीत कृत्रिमतेचा अंशही नाही. विशेषतः पहिल्याच अध्यायांत असलेले सती अनसूयेचे वर्णन या दृष्टीने पाहाण्यासारखे आहे.

## ग्रंथाचे प्रतिपाद्य

सगुण व साकार परमेश्वराची भक्ति हे या ग्रंथाचे प्रतिपाद्य आहे. क्षेत्रक्षेत्रज्ञविवेकपूर्वक व क्षराक्षरविवेकपूर्वक नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव व सच्चिदानंद घन अशा परमात्म तत्त्वाचे प्रत्ययात्मक ज्ञान मिळवून 'सर्व खल्विदं ब्रह्म' अशा सच्चिदानंदात तल्लीन होऊन राहणे हेच भारतीय संस्कृतीप्रमाणे जीवनाचे ध्येय असले तरी ते सहजसाध्य होणारे नाही. अंतःकरणांत स्फुरणारी मीपणाची जाणीव; देह, इंद्रिय, प्राण इत्यादि अनात्मभूतपदार्थ यांचा इतका विलक्षण एकात्म संबंध जुळलेला आहे की, तत्त्वज्ञांचे उपदेश, शास्त्रग्रंथांची वचने व सर्वसामान्य साधनमार्ग यांच्या भरवशावर हा संबंध तुटण्याची व "यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्" या स्थितीत सामान्य जीवाला तरी स्थिर होण्याची शक्यता नाही व जोपर्यंत ही स्थिती प्राप्त होत नाही तोपर्यंत दुःख व भय यापासून मनुष्याची सुटकाही होण्याची शक्यता नाही. "द्वितीयाद्वै भयं भवति" दुजेपणाच्या जाणिवेत भय सांठविलेले आहे', हे जे उपनिषदांत म्हटले आहे, ते सिद्ध करण्याचीही आवश्यकता नाही, इतके सर्वांना पटलेले सत्य आहे. या अनुभूतीसाठी म्हणजेच शास्त्रीय परिभाषेप्रमाणे निर्बीज समाधीसाठी शास्त्रज्ञांनी अनेक साधनमार्ग सांगितले आहेत. अष्टांगयोगाचे व हठयोगाचे प्रक्रियाशास्त्र यासाठीच प्रवृत्त झाले आहे. पण सर्वसामान्य मनुष्याला झेपण्यासारखे हे प्रक्रियाशास्त्र व साधनमार्ग नाहीत.

शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधात्मक विषयाकडे सारखी धांव घेणाऱ्या इंद्रियांना पूर्णपणे संयमाच्या अडसर घालून प्रखर वैराग्याच्या अग्नीत मन भाजून काढणे मोठमोठ्या साधकांच्या बाबतीतसुद्धा अशक्यप्राय ठरते. तिथे सामान्य जीवांचा पाड काय? कविवर्य मोरोपंतांनी आपल्या केकावलीत "विषयवासना रासभी, जसि शुका अहीरास भी, तसी न इतरांस भी" असे जे म्हटले आहे ते यथार्थ आहे आणि असे प्रखर वैराग्य हा तर योगादि प्रक्रियांचा व साधनमार्गाचा पायाच आहे. वशीकारसंज्ञा वैराग्य व धारणेचा सतत अभ्यास यांवांचून कोणत्याही साधकाला योगप्रक्रियेच्या क्षेत्रात पदन्यासही करतां येणार नाही. या मार्गाच्या कठीणपणाची जाणीव प्राचीन भारतीय सिद्धांना व द्रष्ट्यांना आहे. स्वतः भगवंतांनीच श्रीमद्भगवद्गीतेत म्हटले आहे -

*"क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।*
*अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥"*

भगवंतांच्या या अभिप्रायाचे मर्म विशद करताना श्रीज्ञानदेव म्हणतात - "ताहाने ताहानची पियावी । भुकेलिया भूकचि खावी । अहोरात्र वावी । मवावा वारा ॥ शीत वेढावे । उष्ण पांघुरावे । वृष्टीचि असावे । घराआंतु ॥ किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीच नवा । भ्रतारेवीण करावा । तो हा योगु । ऐसे मृत्युहुनी तिख । कां घोटे कढत विख । डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ॥ म्हणोनि योगाचिया वाटा । जें निगाले गा सुभटा । तयां दुःखाचाचि वाटा । भागा आला ॥"

मला वाटते, श्रीज्ञानदेवांनी वर्णन केले आहे त्याहून अधिक समर्थ शब्दात या मार्गाची दुर्गमता कोणालाही सांगता येणे अशक्य आहे. मग सामान्यजीवांच्या उद्धराचा कांही मार्गच नाही काय? असा मार्ग आहे ! आपली असमर्थता व विश्वाच्या नियामकशक्तीचे प्रचंड सामर्थ्य यांची जाणीव ठेवून या नियामकशक्तीला सर्वस्वी शरण जाणे व तिच्या कृपेवर सर्वस्वी अवलंबून राहाणे हाच तो मार्ग होय. स्वतः श्रीभगवंतांनीच गीतेत म्हटले आहे

*ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।*
*अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥*
*तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।*
*भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥*

" जे सर्व कर्मे मला समर्पण करून अनन्यभक्तीने माझे ध्यान करीत उपासना करतात, माझ्या सगुण स्वरूपाच्या ठिकाणी ज्यांनी आपले चित्त ठेविले आहे अशांना मी अल्पकाळांत मृत्यू व जन्मरूपी संसारसागरांमधून वर काढतो."

श्रीभगवंताच्या या आश्वासनाचे रहस्य विशद करतांना श्रीज्ञानदेव म्हणतात, "जयांचिये आवडी । केली मजसी कुळवाडी । भोगमोक्ष बापुडी । त्यजिली कुळें ॥ ऐसे अनन्य योगें । विकले जीवें मनें आंगें । तयाचे कामीं एक सांगे । जें सर्व मी करी ॥ किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा । केतुला पां ॥ एऱ्हवीं तरी माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ तैसे ते माझे । कलत्र हें जाणिजे । कायिसेनि ही लाजें । तयांचेनि मी ॥ जन्ममृत्यूचा लाटी । झळंबती इया सृष्टी । ते देखोनिया पोटी । ऐसे जाहलें ॥ भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे । येथ जरी कीं माजे । बिहिती हन ॥ म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा । करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥ नामाचिया सहस्त्रवरी । नावा इया अवधारीं । सजूनियां संसारीं तारुं जाहलों ॥ सडे जे देखिले । ते ध्यान कासे लाविले । परिग्रही घातले । तरियावरी ॥ प्रेमाची पेटी । बांधली एकाचां पोटीं । मग आणिले तटीं । सायुज्याचां ॥ परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे । वैकुंठीचियेराणिवे । योग्य केले ॥ म्हणोनि गा भक्तां । नाही एकही चिंता । तयातें समुद्धर्ता । अंति मी सदा ॥"

शरणागतीचा मार्ग स्वीकारून प्रेमभक्तिच्या साधनाने सगुणसाकार भगवंताशी संबंध जोडल्यावर पशुपक्ष्यांचासुद्धा जर उद्धार होतो तर चांगल्या विशुद्धजीवाचा उद्धार होईल हे काय सांगावयास पाहिजे? प्रस्तुत ग्रंथांत श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीमहाराजांनी याच भक्तीमार्गाचा पुरस्कार व

प्रतिपादन केलेले आहे. केवळ तत्त्वप्रतिपादन न करतां भगवंताच्या व भगवद्भक्तांच्या लीलाकथांच्या रसाळ वर्णनांतून तत्त्वाचा आविष्कार केलेला असल्यामुळे वाचकांच्या चित्ताची ग्रंथ सहज पकड घेतो.

## ईश्वराचे अस्तित्व

प्रस्तुत ग्रंथांत प.प. श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांनी ज्यांचे माहात्म्य वर्णिले आहे तो ईश्वर प्रत्यक्ष अस्तित्वात आहे की नाही असा प्रश्न अत्याधुनिक व स्वतःला प्रागतिक समजणाऱ्या आजच्या शिक्षित मनाला पडतो. ईश्वरास्तित्ववादी लोक तर्कशास्त्रीय पद्धतीने ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न करून या प्रश्नाचे उत्तर देतातही. पण हा प्रश्न बुद्धिवादाच्या आश्रयाने वस्तुतः सुटणारा नसल्यामुळे तार्किकवादांनी कुणाचेच खरे समाधान होत नाही. ईश्वर हा वस्तुतः तर्कवादाचा विषय नसून तो अनुभूतीचा विषय आहे. पण अनुभूति म्हटले की, एकतर ती आहे त्या स्थितीतल्या आजच्या इंद्रियांना आली पाहिजे अथवा विज्ञानाच्या संशोधनाचा आधार असलेल्या प्रयोगशाळांतून तेथील उपकरणांच्या द्वारे सिद्ध झाली पाहिजे असे आजच्या आक्षेपकांचे म्हणणे असते.

## प्रयोगशाळांचा अपुरेपणा

आपल्या ज्ञानेंद्रियांची शक्ती मर्यादित असल्यामुळे अनेक सूक्ष्म गोष्टींचे अथवा अतिव्यापक गोष्टींचे अस्तित्व त्यांच्या प्रत्ययाला येणे अशक्य असते, ही गोष्ट या आक्षेपकांनाही मान्य असते. पण प्राचीन मनुष्याचा जितका वेदांवर तितकाच या लोकांचा प्रयोगशाळांवर भरवसा असतो. कोणत्याही गोष्टीचे अस्तित्व शास्त्रशुद्ध पद्धतीने सिद्ध करावयाचा प्रयोगशाळा हा एकमात्र राजमार्ग आहे असा या लोकांचा ठाम सिद्धांत असतो. पण हा सिद्धांत वस्तुतः शास्त्रीय नसून ती केवळ एक श्रद्धा व तीही अंधश्रद्धा आहे असे विज्ञानाच्या व प्रयोगशाळांच्या अवस्थेकडे सूक्ष्मतेने पाहिले असता ध्यानांत येईल. प्रयोगशाळांतील उपकरणांत जगांतील सारी गूढे उकलण्याचे सामर्थ्य आहे हा एकोणिसाव्या शतकातील दंभ विसाव्या शतकांत पार गळून पडलेला आहे. एकोणिसाव्या शतकांत दुर्बिणींना अज्ञात असा खगोल राहू शकत नाही असा शास्त्रज्ञांचा विश्वास होता. आता विसाव्या शतकांत ॲस्ट्रॉनॉमीचे (खगोल शास्त्राचे) शास्त्रज्ञ असे उघडपणे मान्य करू लागले आहेत की, अनंत विश्वगोलांतील केवळ एका अतिक्षुद्र मर्यादित भागाचेच तेवढे आपणांस ज्ञान होते. खगोलांत असे किती तरी गूढ आहे की, जेथपर्यंत आपली ज्ञानशक्ति पोहोचूच शकत नाही. उदाहरणार्थ, कुत्री अपराध्याचा मार्ग काढू शकतात हे सत्य अनेकवार सिद्ध झालेलं असून स्कॉटलंड यार्डसारख्या महत्त्वाच्या गुप्तचरसंस्थांकडून त्यांचे प्रयोग होत असतात. कुत्री हा अपराध्यांचा मार्ग कसा काढीत असतील? कुत्री हा माग मनुष्याच्या वासावरून काढतात. याचाच अर्थ असा नाही का की, मनुष्य, जेथे कोठे उभा असेल तेथे त्याच्या शरीराच्या गंधाचे परमाणु विखुरलेले असतात व कोणत्याही कारणास्तव ते नष्ट होऊ शकत नाहीत. आजच्या प्रयोगशाळांत हे गंधपरमाणु अनुभविण्याचे साधन नाही. मग त्यांचे अस्तित्व मानावयाचे की न मानावयाचे? आजचे शास्त्रज्ञ परमाणूंच्या अंतःकरणाचा प्रत्यक्ष ठाव घेऊनही सृष्टीचे गूढ उकलण्याऐवजी ते अधिकच गूढ होत चालले आहे असे म्हणू लागले आहेत. कै. सर जगदीशचंद्र बोस हे आधुनिकविज्ञानमहर्षी आपल्या "Plant autographs and their revelations" या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हणतात, "In this vision of truth, the final mystery of things will by no means be lessened but greatly deepened."

प्रयोगशाळा व उपकरणे हीच सृष्टीच्या मूलतत्त्वाच्या सत्यासत्य निर्णयाच्या ज्ञानाची कसोटी आहे असं मानणं व केवळ त्यांच्या भरवशावर होणारे ज्ञान सत्य मानणे अत्यंत चुकीचे आहे, प्रयोगशाळांतून उत्पन्न होणारे ज्ञान किती बेभरंवशाचे असते हे सतराव्या, अठराव्या, एकोणिसाव्या व आजच विसाव्या शतकांतील विज्ञानाच्या बदलत्या सिद्धांतावरून सुद्धा पूर्णपणे स्पष्ट होण्यासारखे आहे. Law of causation व Law of gravity यावरून उत्पन्न झालेल्या जडवादाला नुसती क्वांटम थिअरी उत्पन्न होताच धक्का मिळाला. हे शास्त्रीय सत्य सर जेम्स जीन्स यांनी अतिशय सुंदर रीतीने विशद करून सांगितले आहे. जडद्रव्य हेच सर्वस्व आहे असे मागचे शतक सांगत होते, तर शक्ती हेच सर्वस्व आहे हे इलेक्ट्रॉन्सच्या सिद्धांतावरून आजचे विज्ञान सांगू लागले आहे. एकविसाव्या शतकांतले विज्ञान हे विसाव्या शतकांतल्या शक्तीकल्पनेवर स्थिरावेलच असे कोणीही सांगू शकत नाही. म्हणूनच आजच्या प्रयोगशाळा व उपकरणे हे बेभरवशाचे कूळ आहे. हे ध्यानांत घेणे आवश्यक आहे. त्यामुळे प्रयोगशाळा व उपकरणे यांच्या साधनांनी ईश्वराचे अस्तित्व सिद्ध न होण्याने ईश्वरास्तित्ववादाला अणुमात्रही धक्का बसण्याचे कारण नाही. कानांनी वास येत नाही, नाकाने ऐकतां येत नाही अथवा डोळ्याने पदार्थाचा स्वाद घेता येत नाही, म्हणून अत्तर, स्वरसंगीत व मधुर पदार्थ यांचे अस्तित्व कोणी नाकारू शकेल काय? प्रयोगशाळा व उपकरणांची ही त्रुटी ओळखून आजचे जाणते विज्ञानमहर्षी ईश्वरास्तित्ववादासारख्या प्रश्नाला त्यांच्या भरवंशावर बगल देत नाहीत. आजच्या विज्ञानमहर्षीत आईन्स्टीनचे स्थान सर्वश्रेष्ठ आहे ईश्वरासंबंधी आईन्स्टीन म्हणतो,

"I believe in God..... who reveals himself in the orderly harmony of the Universe. I believe that intelligence is manifested through all nature. The basis of scientific work is the conviction that the world is an ordered and comprehensible entity and not a thing of chance."

(Modern Leaders on Religion P.292)

केवळ विज्ञानाच्या वाफेनेच तोल सुटलेल्या विद्वानांनी या विज्ञानमहर्षींच्या उपयुक्त उद्गारांचा गंभीरपणे विचार करणे आवश्यक आहे.

ईश्वरास्तित्ववाद्यांनी ईश्वराच्या अनुभूतीचे जे प्रयोगशास्त्र सांगितले आहे ते प्रत्यक्ष प्रयोगांत आणणे हा खरा प्रामाणिकपणाचा मार्ग आहे. त्या प्रयोगशास्त्रानुसार प्रयत्न केले असता ईश्वराचा अनुभव येतो. याची साक्ष ऋग्वेदादि ग्रंथ व भारताचे प्राचीन साहित्य तर देतेच; पण श्रीज्ञानदेव, एकनाथ यांच्यापासून तर श्रीरामकृष्ण परमहंस, विवेकानंद, अरविन्द व रमण यांच्या पर्यंतची परंपराही देते. या परंपरेचे तेजस्वी मेरुमणी प.प. श्रीमद्वासुदेवानंद सरस्वतीमहाराज यांचा प्रस्तुत, भक्तिसाधनाचा पुरस्कार करणारा ग्रंथ, साधकाचे निश्चित कल्याण करील. साधकांनी त्याची अवश्य कास धरावी असे सुचवून मी ही प्रस्तावना पूर्ण करतो.

**बाळशास्त्री हरदास**
श्रीदक्षिणामूर्ती मंदिर, स.७, महाल, नागपूर.

*(पुनर्मुद्रण श्रीमती वीणा हरदास यांचे सौजन्याने)*



# दत्त महात्म्य (सिंहावलोकन)

**सौ. सरिता देशमुख**

*बी.ए. (संस्कृत), बी. एड्. (संस्कृत), एम्. ए., संस्कृत शिक्षक शृंगेरी येथे नाशिक जिल्ह्यातर्फे 'संस्कृत संभाषण वर्गासाठी निवड' ३० संस्कृत संभाषण वर्गाचे आयोजन. संस्कृत प्रचार व प्रसारासाठी निरनिराळ्या संस्थांचे पदाधिकारी, संस्कृत स्मरणिका संपादन. गीता कॅसेट शुद्ध स्वरोच्चारासाठी, निरनिराळ्या संस्थांचे ७ पुरस्कार प्राप्त. महाराष्ट्र शासन 'राज्य संस्कृत स्थायी कमिटीवर अशासकीय सदस्य म्हणून नेमणूक. मोडी लिपी व वैदिक गणित प्रमाण पत्र*

*गुरो तुझी ही पदवारिधारा धुवो सदा कायिक दोष सारा ।*
*सदैव माझे मन आणि शुद्ध करो तुझे नाम पवित्र सिद्ध ॥*

प.पू. दत्तमहाराज कवीश्वर

जीवनात काही सुवर्णसंधी अनपेक्षित अनुभवास येतात. प्रस्तुत लेखन हा असाच एक सुखद अनुभव आहे. किशोर वयात प. पू. गुळवणी महाराज यांच्या आश्रमाच्या सान्निध्यात रहात असल्याने नित्य सायंकालीन आरती आणि नैमित्तिक उपक्रमात उपस्थित राहून प्रसन्नतेचा आनंद घेतला. नियमित वेळी आश्रमाची ओढ वाटत असे. भक्तिमार्गाचा तो संस्कार मनावर घडला आहे. आज अनेक वर्षानंतर पुन्हा श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्री वासुदेवानंद सरस्वती यांच्या भक्तिज्ञानरसभरित श्रीदत्तमहात्म्य या ग्रंथाच्या सिंहावलोकनाच्या निमित्ताने भक्तिप्रेमाचे हे सूत्र जोडले गेले, हा योग आहे.

परमपवित्र अशा संतचरित्राचा परिसस्पर्श जीवनरूपी लोखंडास लाभून भक्तिज्ञानमय अशा कांतिमान सुवर्णात त्याचे रूपांतर होणे हे महद्‌भाग्य. ब्रह्मपदाला पोचलेल्या सद्‌गुरूस्वरूप संतांनी जनसामान्यांना मार्गदर्शक अशा प्रकारची साहित्य निर्मिती केली आहे. यातील अमृतमय विचार आणि वाचनरूपी दुग्धावर भक्तमनाचे पोषण होते. यातून फाकणारा ज्ञानाचा प्रकाश अज्ञानाच्या अंधारातून बाहेर पडण्यासाठी मदत करतो. शिवाय या साऱ्या साहित्यकृती म्हणजे अक्षर आणि वाङ्‌मय असे संतांचे विग्रह होत. यांच्या अभ्यासाने, वाचनाने आणि पारायणाने या विभूतींचा प्रत्यक्ष सहवास लाभून जीवाची उन्नती आणि कल्याण साधले जाते यात शंका असण्याचे कारण नाही. प्रस्तुत लेखनाच्या निमित्ताने श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामींच्या श्री दत्तमहात्म्य या ग्रंथाच्या माध्यमातून स्वामींचा सहवासच जणु लाभला अशी भावना दृढ आहे आणि मनाला अत्यंत सुखदायक आहे.

प.पू. दत्तमहाराज कवीश्वर यांनी लिहिलेल्या स्वामींच्या चरित्रातून स्वामीमहाराजांच्या अलौकिक जीवनाचे दर्शन घडते. महाराजांचा जन्म शके १७७६ मधील आनंद संवत्सरात श्रावण कृष्ण पंचमी या दिवशी झाला. वडिलांचे नाव गणेशभटजी. त्यांच्या आचरणातील असंगत्व, निरहंकारिता आणि वैराग्य यांचा आदर्श बालवयात डोळ्यासमोर होता. तत्कालीन काटेकोर चातुर्वर्ण्य व्यवस्थेनुसार ब्राह्मण वर्णाच्या पवित्र वातावरणात वेदाध्ययन झाले. त्यामुळे बालवयातच महाराजांना वेदमंत्रांची शक्तिसिद्धी प्राप्त झाली. एकादशीचे पाक्षिक कठोर व्रत पाळणे, अत्यंत शुद्ध अन्नाचे मितप्रमाणात सेवन करणे, परान्न न खाणे, सत्कर्मात काल्यापन करणे, प्राण गेला तरी नियम न मोडणे, कधीही असत्य न बोलणे, त्रिकाल स्नान, अपरिग्रह वृत्ती, मातेला सदैव नम्रतापूर्वक वंदन अशा प्रकारचे अंतर्बाह्य नियमपूर्वक आचरण आणि उत्तम तेजस्वी अध्ययन यामुळे बालपणापासूनच लोकांची त्यांचेवर श्रद्धा उत्पन्न झाली. आपल्या एकसष्ट वर्षाच्या आयुष्यात महाराज नित्य 'तमसो मा ज्योतिर्गमय' या भक्ताच्या, जिज्ञासूंच्या आणि आर्तांच्या प्रार्थनेला न्याय देत राहिले. शके १८३६ च्या आषाढ शुद्ध प्रतिपदेला सिद्धासनात दीर्घ प्रणवोच्चार करीत देहाचे विसर्जन केले आणि महाराज ब्रह्मरूपी लीन झाले. वयाचे ३८ व्या वर्षी शके १८१३ मध्ये महाराजांनी संन्यास घेतला. यानंतर प्रतिवर्षी त्यांनी वेगवेगळ्या तीर्थक्षेत्री चातुर्मासाचे आध्यात्मिक सोहळे संपन्न करून लोकांना भक्तिमार्गाला प्रवृत्त केले. महाराजांचा अकरावा चातुर्मास उज्जैनीजवळ क्षिप्रा नदीच्या काठावर महत्पूर येथे झाला. सुमारे सहा महिने महाराजांचा मुक्काम येथे होता. येथेच मंडळींच्या आग्रहावरून दत्तपुराणातील सर्व कथांचा संग्रह करून श्रीदत्तमाहात्म्य या नावाचा प्राकृत, ओवीबद्ध, रसाळ असा ग्रंथ केला. प्रत्येकी १०८ ओव्यांचे ५१ अध्याय या ग्रंथात आहेत.

या ग्रंथाच्या प्रथमावृत्तिविषयी येथे उल्लेख करणे उचित वाटते. ग्वाल्हेर संस्थानात गुण छावणी म्हणून एक लष्करी ठिकाण आहे. तेथे डॉ. विश्वनाथराव ताटके नावाचे सर्जन होते. प्रथम ते नास्तिक वृत्तीचे होते. त्यांच्या पायाला हाड्या व्रण झाला व तो पाय आतून सडू लागला. अनेक उपचार केले पण गुण येईना. शेवटी सर्व डॉक्टरांनी पाय कापण्यावाचून गत्यंतर नाही असा निर्णय दिला. कोणाच्या तरी सांगण्यावरून डॉ. ताटके महाराजांना शरण गेले. तेव्हा महाराज म्हणाले, "तुम्ही सर्वांना औषध देणारे. तुम्हाला औषध कोणी द्यावे ?" असे बोलून त्यांना एक मंत्र लिहून दिला व त्याचा जप करण्यास सांगितले. पायास पोटीस बांधण्यास सांगून औषधही दिले. डॉक्टरांनी या सर्व गोष्टी केल्यावर त्यांचा पाय हळूहळू पूर्णपणे बरा झाला व पूर्ववत् चांगला झाला. हे पाहून सर्व डॉक्टर मंडळींनाही आश्चर्य वाटले. पण यामुळे डॉ. ताटके यांचा नास्तिकपणा पूर्णपणे गेला. संध्येपासून सर्व ब्रह्मकर्म ते महाराजांचे जवळ शिकून पुढे ते आचारधर्माप्रमाणे वागू लागले. महाराजांचे ते एकनिष्ठ भक्त झाले. या निष्ठेतून त्यांनी श्रीदत्तमाहात्म्य ग्रंथ स्वतःच्या खर्चाने छापून प्रसिद्ध केला.

प्रस्तुत ग्रंथाच्या द्वितीयावृत्तीची प्रस्तावना साहित्याचार्य महामहोपाध्याय बाळशास्त्री हरदास यांनी लिहिली आहे. 'सांस्कृतिक मूल्यांचा वर्तमान युगातील दीपस्तंभ' या शब्दात महाराजांचे दिव्य असामान्यत्व त्यांनी मांडले आहे. त्यांच्या विचाराने या ग्रंथाची मंत्रमयता स्पष्ट आहे. त्यांनी असे स्पष्ट केले आहे की हे केवळ उपदेशपर साहित्य नसून याच्या केवळ पठणाने जीवाचे कल्याण व्हावे या सामर्थ्याचा हा ग्रंथ आहे. प्रसाद हा या ग्रंथाचा डोळ्यात भरणारा गुणविशेष त्यांना लक्षणीय वाटतो. म. म.

हरदास यांनी या प्रस्तावनेत ईश्वराच्या अस्तित्वाविषयी जे विचार मांडले आहेत ते आजच्या काळात अत्यंत संयुक्तिक आहेत. ईश्वर वास्तविक तर्कशास्त्राचा विषय नसून तो अनुभवाचा विषय आहे. अनुभव एकतर इंद्रियांना घेता येतो किंवा वैज्ञानिक प्रयोगशाळांमधून तो संशोधनाच्या प्रक्रियेने सिद्ध करता येतो. परंतु ईश्वराचा अनुभव अत्यंत सूक्ष्म असून तो अतींद्रिय शक्तींनीच घेता येणे शक्य आहे. त्यामुळे ईश्वराच्या अनुभूतीचे जे प्रयोगशास्त्र आहे ते प्रत्यक्ष प्रयोगात आणणे हाच खरा मार्ग आहे. अशा प्रयोगातून ईश्वराचा अनुभव घेता येतो याची साक्ष आपले प्राचीन साहित्य नित्य देत असते; शिवाय भारतातील प्राचीन संतपरंपरा याची ठळक साक्ष देते. त्यामुळेच जेव्हा नरेंद्राने 'तुम्हाला देव दिसला आहे का ? मला तो तुम्ही दाखवू शकता काय ?' असे रामकृष्ण परमहंसांना विचारल्यावर पूर्ण आत्मविश्वासाने त्यांनी ते करून दाखविले आणि जगाला विवेकानंद मिळाले. यामुळेच भक्तिसाधनाचा पुरस्कार करणारा हा ग्रंथ साधकांचे निश्चित कल्याण करील असा विश्वास म. म. हरदास यांना वाटतो.

डिसेंबर २००२ मध्ये या ग्रंथाची १० वी आवृत्ती प्रकाशित झाली आहे. महाराजांच्या इतर ग्रंथांच्या तुलनेत या ग्रंथाच्या १० आवृत्त्या सर्वाधिक असल्याने त्यावरून त्याची लोकमान्यता व भक्तप्रियता लक्षात यावी. चौथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत वे. शा. सं. आत्मारामशास्त्री जेरे यांनी व्यक्त केलेले मनोगतसुद्धा या ग्रंथाचे थोरपण सांगते. साल व कोयरहित आम्रादि फळांचा गाभा जसा सर्वच अमृतमय असतो तसाच हा ग्रंथ अमृतमय आहे. त्यामुळे त्याच्या निरंतर सेवनाने मूळचाच अमृत असणारा मानव अमृतमय होईल, यात बिलकुल संशय नाही असा विश्वास पं. जेरेशास्त्री व्यक्त करतात. यावरून असे लक्षात घेता येईल की 'नर करणी करे तो नरका नारायण बन जाये' या प्रसिद्ध उक्तिनुसार मानवाची आत्मोन्नती होण्याचे साधन म्हणून प. पू. वासुदेवानंद सरस्वतींचा हा ग्रंथ नित्य उपयुक्त ठरेल.

प्रथमाध्यायाच्या प्रारंभी 'स्मरणे समस्त विघ्नहर्ता' अशा गणेशाचे चरण वंदन करून ग्रंथाचे आरंभी मंगलाचरण साधले आहे. दत्तपुराणातील संस्कृतरचना प्राकृतजनांना समजत नसल्याने त्यांच्या सुखबोधासाठी हा ग्रंथप्रपंच केला आहे. दत्तपुराणातील ज्ञान, उपासना व कर्मयोग यातील उपासनाकांड या ग्रंथात विशद केले आहे. दत्तोपासना करताना कार्तवीर्याने स्मरणभक्तीने, अलर्काने वंदनभक्तीने, आयुराजाने दास्यभक्तीने, परशुरामाने सख्यभक्तीने आपले ध्येय गाठले. विष्णुदत्ताने सेवन, यदुराजाने अर्चन, वेदधर्माने कीर्तन व दीपकाने श्रवण करून साध्य गाठले. आत्मनिवेदनाने तर कित्येक भक्तांनी निर्वाणस्थान मिळविले. निर्गुण, निराकार ब्रह्म या भक्तीमुळेच सगुण साकार होते म्हणून महाराज म्हणतात -

*भक्ति ज्ञानाची माऊली । करी कृपेची साऊली ।*
*जिणे नामरूपा आणिली । ब्रह्ममूर्ती भली अनायासे ॥*

नवविधा भक्तीची लक्षणे अत्यंत सोप्या शब्दात येथे वर्णिली आहेत. महामुनी अत्रिऋषी या नवविधा भक्तीमुळेच देवपिता झाले आहेत. पहिले सूर्यग्रहण सर्वज्ञ अशा अत्रींनी प्रगट केले. ऋग्वेदाचे ५ वे मंडल त्यांनी प्रगट केले. कृतयुगात रोगग्रस्त लोकांना त्यांनी औषध देऊन रोगमुक्त केले व सुखी केले. मनूने केलेली स्मृती लोकांना समजेना तेव्हा दुसरी स्मृती निर्माण केली. अशा सामर्थ्यसंपन्न महर्षींने स्वतः निरिच्छ असूनही पित्याची आज्ञा म्हणून अनसूयेचे करग्रहण केले. कर्दम ऋषी आणि देवहूती यांची कन्या अनसूया, जिच्या स्वप्नातही अतिथी कधी विन्मुख गेला नाही अशा अनसूयेने सावित्री, लक्ष्मी आणि पार्वती यांचा पण अहंकार उतरविला. कौशिक पत्नीला समजावून सूर्याचा मार्ग मुक्त केला व जगाचे नाशापासून रक्षण केले.

*कोण तये अनसूयेला । जगीं तुला करील ।*
*अशी अतुलनीय अनसूया म्हणजे केवळ चित्कला*
*धुंडता हे त्रिभुवन । न मिळे तुजे साध्वीरत्न ।*

अशा अनसूया आणि अत्री यांच्या पोटी जन्मले श्रीदत्तात्रेय. दिव्य तेजातून तेजच जन्माला आले. यात काय नवल ?

वेदधर्मा नावाच्या गुरुची सेवा दीपक नावाच्या शिष्याने २१ वर्षेपर्यंत केली. हरिहरांच्या प्रलोभनांनासुद्धा तो भुलला नाही. त्याला वरदान म्हणून ही दत्तकथा गुरुंनी सांगितली आहे.

द्वितीयाध्यायात भार्गवकुलोत्पन्न ब्राह्मणाच्या योगभ्रष्ट पुत्राने आपल्या पित्याला ज्ञान देण्याच्या उद्देशाने कौशिकगोत्रोत्पन्न ब्राह्मणाची व त्याच्या पतिव्रता स्त्रियेची कथा सांगितली. तिच्या विचारांवरून तत्कालीन स्त्रिया ज्ञानी होत्या असे लक्षात येते. त्यामुळेच तिच्या पातिव्रत्यापुढे सूर्याला सुद्धा शरण जावे लागले. तिच्या शापाने तो उगवायचा थांबला. त्यामुळे साऱ्या विश्वात प्राणशक्तीवरच संकट आले. यावरून सूर्य न उगवल्यास जीवसृष्टी धोक्यात पडते हा निसर्गनियम जाणत असल्याचे दिसते. सती अनसूयेने कौशिकपत्नीची समजूत काढली व तृतीयाध्यायात अनसूयेकडून पतीच्या प्राणांची शाश्वती मिळताच तिने आपला सूर्यावरील शाप मागे घेतला. सृष्टीला भयमुक्त केले. हे सर्व वर्णन अतिशय रसाळ आहे. यातील काव्यमयता मनाला कथेची ओढ लावणारी आहे.

अनसूयेच्या या अघटित कार्यामुळे देवांकडून तिला वरदान मिळाले. त्यावर सतीने यावज्जीव पतियोग मागितला. ब्रह्मा, विष्णु व महेश हे पुत्र म्हणून मागितले व

*देव म्हणती हे दिले वर । पुत्र होतील विधिहरिहर*
*करितील जगाचा उद्धार । धरी निर्धार अनसूये ।*

असे आश्वासन तिला मिळाले.

*ज्यांच्या स्मरणे सुटे फास । त्यांसी कैंचा गर्भवास ।*
*अज असोनी धरिती खास । भक्तानीधत्व या लोकी*

अशा प्रकारे महाराजांनी भक्तीचे फल सांगितले आहे.

मार्गशीर्ष पौर्णिमेस दत्तावतार झाला. पुत्रमुख व ते त्रिमूर्तीचे दिव्य रूप पाहून अत्री आणि सती अनसूया यांनी केलेले स्तवन मन प्रसन्न करते. महाराजांच्या दत्तभक्तीचे दर्शन त्यातून घडते.

*जयजया परात्परा । अजा अव्यया निर्विकारा ।*
*जगत्कारणा जगदाधारा । सत्या असंगा उदासीना ॥*
*स्वये असोनि स्वतंत्र । भावाच्या भुकेने होसी परतंत्र ।*
*कोण जाणे तुझा मंत्र । प्रपंचिती पंचवक्त्र विश्व ॥*

या स्तुतीचे स्पष्टीकरण करावयाचे ठरविल्यास प्रत्येक शब्दात अर्थघनता व तत्त्वविचार आहे असे आढळते. अनसूया आपल्या त्रिमूर्तीला पाळणा गात आहे त्यातही अशीच आशयघनता आढळते. महाराजांनी दत्तांच्या बाललीला येथे वर्णन केल्या आहेत. त्याचप्रमाणे

*त्यांनी आचरणे प्रायः न घ्यावी । वचने मात्र न टाळावी ।*

किंवा

*त्यांची सुचरिते घ्यावी । असी बोले श्रुति बरवी ।*

यातून माणसाचे आचरण कसे असावे याविषयी महाराजांचे मार्गदर्शन मोलाचे आहे.

चौथ्या अध्यायात कृतवीर्य राजाची गोष्ट प्रारंभ होते. त्यात प्रथम पुत्रप्राप्तीसाठी रविव्रताचे माहात्म्य सांगून या व्रताचा विधी सांगितला आहे. महाराजांचे जीवन चरित्र पाहता त्यांनी हजारो आर्त, दुःखी शरणागतांना अशाच प्रकारे विविध उपाय व बरोबरीने औषधोपचार करून दुःखमुक्त केले आहे.

कृतवीर्याच्या राणीनेही मैत्रेयीच्या सूचनेवरून अनंतव्रत करून पुत्रप्राप्तीसाठी साधना केली आहे. यावरून आजच्या काळात बोध घेता येईल की उत्तम, तेजस्वी संततीसाठी पतिपत्नी दोघांनीही शारीरिक, मानसिक व भावनिक साधना करणे आवश्यक होय. असो.

कृतवीर्याचा पुत्र कार्तवीर्य अर्जुन याने पित्याचे राज्य राजनीतीच्या भयाने नाकारले परंतु गर्ग मुनींच्या उपदेशाने तो श्रीदत्तांना शरण गेला. पाचव्या अध्यायात गर्गमुनींनी जंभासुराची कथा सांगितली. समरधीर अशा जंभासुराने स्वर्गावर स्वारी केली. देव व दैत्यांचे तुंबळ युद्ध झाले. देव दत्तांना शरण गेले. त्यांनी मार्ग दाखवून देवांद्वारे दैत्यांचा पराभव केला. देवांनी येथे श्रीदत्तांची अतिशय मधुर व अर्थगर्भित स्तुती केली आहे.

*आमुची कायसी मती । आमुची कायसी शक्ती ।*
*स्वल्पही नसता भक्ती । केली आमुची मुक्ती*
*तू असती स्वतंत्र । आम्ही खास परतंत्र ।*
*बांधोनिया कर्मसूत्र । मायामंत्री भ्रमविसी ॥*

हे सारे ऐकून कार्तवीर्याने दत्त दर्शनासाठी प्रस्थान केले. त्याच्या दत्तसेवेच्या माध्यमातून महाराजांनी जनांकरिता असा उपदेश केला की आपल्या शरण्य गुरुबाबत भक्त साधकाच्या मनात भावना कशी असावी ?

*देह जावो अथवा राहो । त्वद्रूपी मन निश्चळ होवो ।*
*विपरीत भावना न राहो । हा निश्चय भगवंता ॥*

अशा भावनेमुळे साधकाला जे आश्वासन मिळते ते असे असते की

*जे माझे अनन्य भक्त । त्यांपाशी राहे मी सतत ।*
*जे असती अभक्त । दुःखयुक्त ते होती ॥*

या वरील ओळी वाचताना श्रीमद्भगवद्गीतेतील भगवान श्रीकृष्णांचे आश्वासन येथे जुळते असे वाटते.

*ये यथा मां प्रपद्यन्ते । तांस्तथैव भजाम्यहम् ॥*

भक्तीचा परिणाम साधकाला गुरुंचे प्रेम मिळवून देतो. गुरुंकडून वरदान मिळते. आपल्या मनातील इच्छांची पूर्तता होते. कार्तवीर्य अर्जुनाच्या सर्व इच्छा श्रीदत्तांनी पूर्ण केल्या आहेत व तो एक यशवंत राजा म्हणून प्रसिद्धी पावला.

*कार्तवीर्याऽर्जुनो नाम राजा बाहुसहस्रवान् ।*
*तस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते ॥*

अशा प्रकारचे चिरंजीवत्व व कीर्तीला मंत्रसामर्थ्य प्राप्त झाले. दीर्घकाळ भोग भोगून शेवटी वैराग्य प्राप्त झालेल्या सहस्रार्जुनास विविध कथांचे माध्यमातून उपदेश केला. यातही गीताविचार आपल्या अनुभवास येतो.

*ईश्वरोद्देशे कर्म करिता । चित्ता ये शुद्धता ।*
*प्रतिग्रहा जो सोडी ज्ञाता । तपस्तेजहर्ता जो ॥*

पुढील ओवी तर साक्षात गीता श्लोकाचेच रूपांतर आहे.

*शम दम तप शौच । क्षांति आर्जव ज्ञान साच ।*
*आस्तिक्य विज्ञान हेच । स्वाभाविक ब्रह्मकर्म ॥*

विष्णुदत्त आणि हरिशर्मा ब्राह्मणाचा पुत्र यांच्या कथेतून पुढील प्रमाणे उपदेश साधकाला मिळतो.

*प्रायश्चित्ते रोगनाश । मग आरोग्य दे रस ।*
*तसा शास्त्रे होता अविद्या नाश । प्रबोध ब्रह्मरस देतसे ।*
*शास्त्र नव्हे हे स्वर्गार्थ । नव्हे हे वशीकरणार्थ ।*
*नव्हे कामभोगार्थ । शत्रुघातार्थ नव्हे हे ।*
*शास्त्र बुद्धिशुद्धी करी । युक्तिने भ्रम निवारी ।*

अशा वचनांमधून महाराजांची शास्त्रनिष्ठा सतत जाणवते.

अध्याय अकराव्यात शास्त्रशुद्ध असे जन्ममृत्यूच्या चक्राविषयीचे ज्ञान विशद केले आहे. जीव जन्माला येताच मायेचे आवरण पडते व सोहंभाव तो विसरतो.

*उपजता स्पर्शे वात । ती स्मृती जाई अकस्मात ।*
*सोहं विसरूनिया पोत । राहे रडत कोहं कोहं ॥*
*बाल्यावस्था खेळात जाय । विषयभोगी तारुण्य जाय ।*
*तेव्हा धर्माधर्म दिसेल काय । संतांचे पाय न धरती ॥*
*पूर्व संस्कारे जी प्रकृती । तदनुसार कर्मे घडती ।*
*शास्त्रेविणे न पालटे ती । म्हणूनी शास्त्रयुक्ती आचरावी ।*
*शास्त्रे होता भ्रमनिरसन । जरी ज्ञाती येईल ज्ञान ॥*
*स्थिरबोध न हो तव जाण । भय दारूण वाटे की ॥*

अशा प्रकारे महाराजांनी पुनरपि जननं पुनरपि मरणं । या चक्राचे ज्ञान व त्यातून शास्त्र वचनाच्या ज्ञानाने मुक्तता मिळविण्याचा बोध करून दिला आहे.

*अभिमान हाची बंध । सोडी त्याचा संबंध ।*
*हीच युक्ती म्हणती बुध । आत्मबोध होई जेणे ॥*
*जो कर्मफळ सोडी । अहंकारा न जोडी ।*
*हो का तो अज्ञ अनाडी । बंध तोडी निश्चये ॥*

या ओव्यांमधून कर्मयोगाचा विचार सामान्य जनांसाठी सोपा करून सांगितला आहे.

*मोक्ष नाही स्वर्गावरी । खाली किंवा भूमिवरी ।*
*जो अहंकारा मारी । त्याचे अंतरी मोक्ष वसे ॥*

या ओवींमधून अहंकार दूर करण्याचा विचार दिला आहे. मोक्ष मिळविणे म्हणजे सर्व सोडून अरण्यात जाण्याचे कारण नाही. येथे लौकिक जगात राहून एक अहंकार काढून टाकून मोक्ष मिळवता येतो असा बोध गोष्टीरूपातून दिला आहे.

बारा आणि तेरा या दोन अध्यायात ब्रह्म, माया, विद्या, अविद्या इ. वेदान्त विचाराचे विवेचन केले आहे. अध्याय चौदा व पंधरा मध्ये अष्टांग योग, तो आचरण करणाऱ्याची लक्षणे यांचे स्पष्टीकरण आहे.

मुक्ताने सुद्धा लोकबाधा न व्हावी म्हणून कर्म करणे अत्यंत आवश्यक आहे. गीता म्हणते -

*यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।*
*स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥*

महाराजांनी हा बोध सोप्या शब्दांत पुढीलप्रमाणे शब्दबद्ध केला आहे.

*धर्म आहे सनातन । त्याला न घावा सोडून ।*
*स्वये धर्म आचरून । जना शिक्षण ते लावावे ॥*
*येणे होय परोपकार । नातरी सिद्धा पाहूनी इतर ।*
*वागतील तरी अनाचार । होईल संहार संकराने ॥*
*तू गृहस्थ असती । न टाकी वर्णाश्रमाती ।*
*करी त्रिविध कर्मासी । सक्ती मानसी न धरिता ॥*

अशा प्रकारे वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांनी रचलेल्या या ओवीबद्ध ग्रंथातील विविध कथांच्या माध्यमातून आध्यात्मिक विचार, पारमार्थिक तत्त्वज्ञान, वेदान्त विचार, षड्दर्शने यांच्या विवेचनामुळे सामान्य जनांना हे सर्व ज्ञान सोप्या भाषेत उपलब्ध झाले आहे.

अध्याय ३९ पासून मांडुक्योपनिषद आणि ईशावास्योपनिषद, शांतिमंत्र आणि अतो देवा... हे मंत्र प्रत्येक ओवीच्या तिसऱ्या अक्षरातून गुंफून या ग्रंथात योजले आहेत. संस्कृत मंत्रातील अक्षरे मराठी ओवीत ठराविक ठिकाणी अर्थानुसार योजणे हे सोपे नक्कीच नाही. महाराजांनी हे कठीण काम शक्य करवून अलौकिक काव्यप्रतिभेचा प्रत्यय दिला आहे.

*नर जे असे भजती । ते संसार तरती ।*
*तेही स्वरूपी मिळती । न ढळती पुनः ते ॥*

असे दृढ आश्वासनही ते वारंवार संसारतप्त जीवाला देत आहेत.

अध्याय ४७ ते ५० यामध्ये दत्तांनी केलेल्या चोवीस गुरुंचे व्याख्यान सोप्या व रसाळ शैलीत मांडले आहे. त्या त्या गुरुचा प्रत्येक गुण अंगी बाणवून कोणालाही गुणसंपन्न होता येईल व आत्मिक उन्नती साधता येईल अशी आकर्षकता या ओव्यांमध्ये आहे. यांपैकी काही उदाहरणार्थ येथे देण्याचा मोह आवरता येत नाही.

*१) जेवी भूमीवरी नर । टाकिती मळमूत्र ।*
*थुंकिती तरी त्यावर । न होता क्रूर क्षमा करी ॥*
*मोक्षमार्गाकडे दृष्टि देऊन । करावे सर्व सहन ।*
*जरी पीडिती जन । त्यावरी कोप न करावा ॥*
*२) मानापमानचिंता सोडून । यावया वाळ गुरु झाला ।*
*जो भस्म किंवा चिखल । नेणे सुगंधी परिमळ ।*
*सत्कार तिरस्कार सकळ । नेणे बाळ निजानंदे ॥*
*ह्या घरात काय न्यून । कसे करावे संपादन ।*
*आता होईल की अपमान । हेही घरी राहून न चिंती ॥*

शेवटच्या ५१ व्या अध्यायात सर्व अध्यायांचा गोषवारा घेतला असून शेवटी ग्रंथांचे कर्तृत्व परमेश्वरास अर्पण केले आहे.

*तू आर्यसंरक्षक । तूची अनार्य शिक्षक ।*
*तूची हे ग्रंथकौतुक । करविती लोक तारावया ॥*

या बरोबरच शेवटी या ग्रंथाविषयी त्यांनी मागणे मागितले आहे की...

*विहार तुझा स्वभक्तहृदयात । तू भक्ताधीन संतत ।*
*मी मागतो पसरून हात । ह्या ग्रंथी सतत सान्निध्य ठेवी ॥*

शके १८२३ मध्ये क्षिप्रा तटावर हा ग्रंथ रचिला गेल्याचा उल्लेख शेवटी केला आहे.

ऐहिक जीवनात आणि वर्तमान कालातील संकटमय कालप्रवाहात मनाला आश्वस्त करून कर्मप्रवण राखण्याचे कार्य या ग्रंथाचे गेल्या शंभर वर्षात अखंडित चालू आहे. आपल्या जीवनकाळात शरणागत आर्तांना महाराजांनी अनेक आपत्तींमधून आणि संकटांमधून सोडविल्याचे आपण त्यांच्या चरित्रातून जाणलेच आहे. हेच कार्य आजच्या कष्टमय काळात साधकांसाठी हा ग्रंथ करीत आहे.

प्रस्तुत लेखन माझेकडून झाले हे मला विस्मयकारकच वाटते. संस्कृतचे अध्ययन, अध्यापन, श्रीमद्भगवद्गीता, सप्तशती व असंख्य स्तोत्रांचे पाठांतर व पारायण इ. साधनांचे फलस्वरूप हे लेखन झाले असावे असे वाटते. माझे ज्येष्ठ मेव्हणे भगिनीपती पुण्याचे श्री. शां. गो. पोतदार हे प. पू. नानामहाराज तराणेकर यांचे सत्शिष्य आहेत. त्यांच्यासाठी संस्कृत स्तोत्रांचे मराठी भाषांतर करताना त्यांच्याकडून प्रेरणा व मनःपूर्वक आग्रह धरला गेल्यामुळे माझेकडून हे लेखन श्रीमहाराजांचे चरणी अर्पण होत आहे. याबद्दल त्यांचेविषयी कृतज्ञता बाळगून हा लेखनविस्तार श्रीदत्तचरणाशी अर्पण करताना माझे मन सात्विक प्रसन्नतेचा अनुभव घेत आहे यात शंका नाही. लेखनात काही उणिवा असतील तर तो माझा दोष समजून वाचकांनी क्षमाशील असावे अशी विनंती.

*देवा योगक्षेमाची वार्ता । सोडूनि देवू सर्वथा ।*
*जेथे जेथे तुझ्या कथा । गाऊ माथा नम्र करूनी ॥*
*असो आता हे मागणे । सर्वथा आम्हा न विसरणे*
*आम्हा वाचवावे स्मरणे । हे गार्‍हाणे पुनः पुनः ।*

यापेक्षा अन्य भावना मनात नाहीत.

**सौ. सरिता देशमुख**
८, निषाद अपार्टमेंट, मनोहर कॉलनी, समर्थ नगर,
नाशिक ४२२००५. फोन नं. : २३६४००४



# थोरले महाराज

**प्रा. का. द. समुद्र**

*एम.एम. मुंबई विद्यापीठ संस्कृतचे प्राध्यापक. ३४ वर्षांच्या सेवेनंतर सेवानिवृत्त.*

**यस्य स्मरणमात्रेण पापं तापश्च नश्यति ।**
**वासुदेवयतिं पुण्यं भूयो भूयो नमाम्यहम् ॥**

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामी महाराज म्हणजेच 'थोरले महाराज.' त्यांचे जीवन म्हणजे कलियुगातील एक अद्‌भुत चमत्कार. प्रत्यक्ष भगवान दत्तात्रेय त्यांचेशी बोलत असत, त्यांना सतत मार्गदर्शन करत असत. जणू त्यांना स्वतःचे मन नव्हतेच. दत्तगुरूंनी उठ म्हटले की उठले, बस म्हटले की बसले. उत्तरेकडे चल म्हटले की निघाले. या गावी थांब म्हटले की थांबले. आज भिक्षा नाही म्हटले की उपवास. या गावी मुक्काम नको म्हटले की तत्क्षणी पुढील प्रवासाला सिद्ध; मग दिवस असो, रात्र असो, पाऊस, ऊन, वादळ, अरण्यातला रस्ता, कशाचीही त्यांनी पर्वा केली नाही. कारण दत्तगुरु बरोबर आहेत ही त्यांना पुरेपूर खात्री होती व त्यांच्या सान्निध्यात त्यांना कसलेही भय नव्हते. उलट परमानंदाचा अनुभव होता. देव भक्तांचे असे सान्निध्य खरोखर दुर्लभ.

त्यांचे चोवीस वर्षांचे संन्यास जीवन म्हणजे एक अत्यंत खडतर तपश्चर्या होती. या काळात त्यांनी सबंध भारतवर्षभर हिमालयापासून रामेश्वरपर्यंत असे तीन वेळा पायी, अनवाणी भ्रमण केले. कुठल्याही वाहनाचा वापर केला नाही. संन्यास आश्रमाच्या नियमांचे अत्यंत कठोरपणे पालन केले. सदैव भिक्षान्नावर निर्वाह केला. भिक्षा घेण्यास योग्य ठिकाण नसले की उपवास. प्रकृती स्वास्थ्यासाठी त्यांना ताक पिण्याची आवश्यकता असे; पण कित्येक दिवस तेही मिळत नसे. एकवेळी तर प्रवासात एका महिन्यात फक्त तीन दिवस भिक्षा मिळाली; इतर सर्व दिवस केवळ जलपान करून काढले; असेही घडले. चार लंगोट्या, छाट्या, देवाची संबळ, पोथी व दण्ड कमण्डलू एवढेच सामान सदैव त्यांचेबरोबर असे. सबंध चोवीस वर्षांच्या संन्यास जीवनात लोकाग्रहास्तव व देवांनी परवानगी दिली म्हणून त्यांनी दिवाळीच्या दिवसात केवळ चार-पाच वेळा गरम पाण्याने स्नान केले. अत्यंत कडाक्याच्या थंडीतसुद्धा ते दिवसातून तीन वेळा जवळपासच्या नदीत स्नान करत असत. कित्येक वेळा तर त्यांनी दहा दहा वेळा सुद्धा थंड पाण्याने स्नान केले. बहुधा एखाद्या देवळात त्यांचा मुक्काम असे. सदैव ध्यान, तपश्चर्या आणि लेखन, प्रवचन असा त्यांचा कार्यक्रम असे. रात्रीची सुमारे २-२॥ तासांची झोप त्यांना पुरी होत असे. एकदा एके ठिकाणी त्यांच्या पायातील २०-२२ काटे काढावे लागले. त्यावेळी पाय अत्यंत दुखत होता, तरी त्यांच्या तपश्चर्येत कुठलाही कमीपणा त्यांना चालला नाही. खरोखर त्यांच्या संन्यास जीवनाचा विचार केला तर जीवाचा थरकाप होतो. आदिशंकराचार्यानंतर वैदिक धर्माने आखून दिल्याप्रमाणे संन्यासाश्रमाचे पालन करणारे ते कदाचित अखेरचेच संन्यासी होते.

थोरल्या महाराजांचे वाङ्मय हाही एक चमत्कारच आहे. लौकिक पद्धतीने त्यांचे शिक्षण झाले नव्हते; पण संस्कृत भाषेवर त्यांचे असामान्य प्रभुत्व होते. त्यांच्या वाङ्मयावर आधारित एक प्रबंध पुणे विद्यापीठात सादर झालेला आहेच. पण असे अनेक प्रबंध तयार होतील असा त्यांच्या वाङ्मयाचा विस्तार व गुणवत्ता आहे. ते ज्या ठिकाणी जात तेथील क्षेत्रदेवता तयांच्या भेटीला येत. मग महाराज त्यांची स्तुती करणारी स्तोत्रे लिहीत. शिवाय दत्तसंप्रदायावरील त्यांचे लिखाण अफाट आहे. पण हे वाङ्मय मी लिहिले आहे असे त्यांनी कधीही म्हटले नाही. मला अक्षरे दिसतात तशी मी उतरवून घेतो असे ते म्हणत. याबाबतीत त्यांची तुलना वेदवाङ्मय लिहिणाऱ्या ऋषींशीच होऊ शकते. 'मंत्रगर्भ स्तोत्रे' हे एक त्यांचे खास वैशिष्ट्य. एखाद्या स्तोत्रातील प्रत्येक ओळीतील पहिले अक्षर घेतले की एक मंत्र, तिसरे अक्षर घेतले की दुसरा मंत्र, पाचवे अक्षर घेतले की आणखी एक मंत्र, अशा अनेक अद्‌भुत रचना त्यांनी केल्या आहेत. उदाहरणार्थ, त्यांनी लिहिलेल्या 'सप्तशती गुरुचरित्रसार' या ग्रंथातील प्रत्येक ओवीतील तिसरे अक्षर घेतले की श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील संपूर्ण पंधरावा अध्याय तयार होतो. त्यांनी लिहिलेले कित्येक शब्द शब्दकोशातही सापडत नाहीत; कारण त्यांनीच ते निर्माण केलेले आहेत व त्यांचा अर्थ त्यांच्या कृपेनेच समजतो. दुसरा मार्ग नाही.

थोरले महाराज माझे परमगुरु. माझे सद्‌गुरु श्रीगुळवणी महाराज यांचे ते सद्‌गुरु. मला महाराजांनी सुमारे तीस वर्षांपूर्वी योगदीक्षा दिली. पण त्यांच्याही पूर्वी तीस वर्षे थोरल्या महाराजांचे प्रतिमारूपाने आमचे घरी आगमन झाले होते. मी एस्. एस्. सी. झाल्यानंतर ज्यांनी आम्हा भावंडांचे पितृवत् पालन केले त्या माझ्या काकांकडे कल्याणला पुढील शिक्षणासाठी आलो, त्यावेळी त्यांचे घरी मी थोरल्या महाराजांचा फोटो पाहिला. त्यांच्या कुणी एका मित्राने, बदली झाली म्हणून तो फोटो त्यांचेकडे आणून दिला होता. हे महाराज कोण आहेत हे ही मला माहीत नव्हते; पण मी त्यांना दररोज नमस्कार करूनच कॉलेज-नोकरीला जात असे. नंतर कधीतरी या स्वामींचे नाव 'श्रीवासुदेवानंद सरस्वती' आहे असे समजले पण इतर काहीही माहिती नव्हती. श्रीगुळवणी महाराजांचा अनुग्रह झाल्यानंतर समजले की अरे ! हे तर आपले परमगुरु. मग 'आनंदाचे डोही आनंद तरंग' अशी अवस्था झाली. आपल्या शिष्याकडून अनुग्रह देण्यापूर्वीच कितीतरी वर्षे स्वामींचे असे दर्शन व आशीर्वाद मला लाभला होता. संतांचे मार्ग असे अगम्य असतात.

थोरल्या महाराजांचे ब्रह्मावर्ताला चार चातुर्मास झाले. तिथल्या श्रीराममंदिरात त्यांची दररोज प्रवचने होत असत. खरोखर त्या श्रोत्यांच्या भाग्याचे वर्णन करण्यास शब्दही अपुरे पडतील. मनात विचार आला, आपल्याला अशी संधी लाभली तर.... तर लगेच ब्रह्मावर्ताच्या श्रीराममंदिराचे दृश्य दिसू लागले. साक्षात दत्तावतार श्रीवासुदेवानंद सरस्वतींचे प्रवचन चालले आहे आणि त्या भाग्यवंत श्रोत्यांमध्ये मीही एक आहे. प्रवचन संपल्यानंतर मी महाराजांना विचारतो, "महाराज मी गृहस्थाश्रमी प्रापंचिक. आपल्या तपश्चर्येचा, साधनेचा एक कोट्यांशही माझ्याकडून होत नाही.

तरीपण मानवी जीवनाचे रहस्य समजण्यासाठी, परमेश्वराचे स्वरूप समजण्यासाठी जीव तळमळतो. संसार करतानाच परमार्थ कसा साधावा?" महाराज म्हणतात, "अरे, खरी तळमळ आहे ना, मग यश निश्चित मिळेल. ज्यांना कर्मबंधनाने गृहस्थाश्रम प्राप्त झाला आहे, त्यांनाही परमेश्वरप्राप्तीचा योग आहेच. त्यांनी अतिथींचे मनःपूर्वक स्वागत करून त्यांचा सत्कार करावा. आपल्या सद्गुरूंनी दिलेली साधना न चुकता करावी. संतांच्या ग्रंथांचे वाचन व मनन करावे. नामस्मरण तेलाच्या धारेप्रमाणे अखंड चालू ठेवावे. प्रत्येक व्यक्तिच्या हृदयात परमेश्वराचा वास असतो म्हणून सर्वांशी अत्यंत नम्रतेने, आदराने व प्रेमाने वागावे. यासाठीची सुरुवात आपल्या घरापासूनच करावी. आपली मुले, बाळे, लेकी, सुना, भाऊ बहिणी सर्वांना समान प्रेम द्यावे. भेदभाव कल्पांतीही करू नये, अन्याय तर कोणावरही करू नये. अन्यायाला कधीही क्षमा नसते आणि सर्वसाधारणपणे त्यांचे फळ याची देही याची डोळा भागावेच लागते. पूर्वजन्मातील ऋणानुबंध असतात तेच आपले नातेवाईक म्हणून आलेले असतात; हे लक्षात ठेवावे. असे वागले की ग्रहस्थाश्रमांतही परमार्थ साधता येतो." श्रीमहाराजांच्या उत्तराने माझे पूर्ण समाधान होते. मी नमस्कार करून बसतो आणि भानावर येतो तो जाणीव होते की महाराजांच्यावरील लेखाबद्दलच माझे मनन चालले आहे.

आणि आता तर खरोखर मी साक्षात् थोरल्या महाराजांच्या सहवासात आहे. त्यांचे व त्यांच्याबद्दलचे ग्रंथ माझ्या टेबलावर आहेत. त्यांनी लिहिलेल्या काही संस्कृत स्तोत्रांचे मराठी भाषांतर व विवरण करावे असे संकेत होत आहेत. पण महाराजांची इच्छा व अनुज्ञा असेल तरच ते शक्य होईल याची मला पूर्ण जाणीव आहे; आणि खरे तर त्यांनी लिहिलेली स्तोत्रे वाचावी व समजून घ्यावी अशी बुद्धी व्हावी हीही त्यांचीच कृपा आहे.

**प्रा. का. द. समुद्र**
छोटालाल बिल्डींग, पोस्ट ऑफिस समोर, स्टेशन रोड, कल्याण -४२१३०१

## एकाक्षरी व द्व्यक्षरी श्लोक

प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या त्रिशतीकाव्यात एकच अक्षर वापरून एक श्लोक रचला आहे व दोनच अक्षरे वापरून दोन श्लोक रचले आहेत.

तीतातितातीत तात ततततन्तुततीत ते ।।
तत्ता तुता तता तेऽन्तातीततातितता ततः ।।३.६७।।

सुरसासारसंसार सुरासारारिसारर ।।
सूरिसूरेऽसुरारे रैरसारेरं रसोऽसि सः ।।३.६८

द्वन्द्वदावदव देव वेदविद्देवदेव वद वेदवादादवी
वाददावदव देववादविद्द्वन्द्वदोऽवददिदं वदोवदः ।।२.८८।।

(३.६७) या श्लोकात 'दत्त' या शब्दातील फक्त 'त' हे एकच अक्षर वापरले आहे. (३.६८) या श्लोकात 'सुर' या शब्दातील 'स' व 'र' ही दोनच अक्षरे वापरली आहेत. (२.८८) या श्लोकात 'देव' या शब्दातील 'द' व 'व' ही दोनच अक्षरे वापरली आहेत.

**संकलक : सौ. प्रज्ञा मनोहर कुबडे**
३४ रेल्वे लाईन्स, रामलाल चौक, बी१-६ गौरीशंकर सोसायटी, सोलापूर - १.



# मंत्रगर्भरचनेचे नवे प्रवक्ते श्रीस्वामी स्तोत्र-रचना


**डॉ. गु. वा. पिंपळापुरे**

*एम.ए. पीएच.डी. धरमपेठ कॉलेज. संस्कृतचे प्राध्यापक 'प्रज्ञालोक' नागपूर १९९३ पासून संपादक.*


प. प. श्रीवासुदेवानंद-स्वामी-महाराजांनी आद्य शंकराचार्यांच्या पावलावर पाऊल ठेवून सर्वत्र भारतभर परिभ्रमण करून धर्मजागृति केली. धर्मजागृतीचाच एक भाग म्हणून त्या त्या ठिकाणच्या देवता व नद्या यांची स्तोत्रेही त्यांनी रचली. त्यातहि एक वैशिष्ट्य असे की गंगा-कृष्णा-कावेरी-नर्मदा प्रभृति मोठ-मोठ्या नद्यांच्या स्तोत्राबरोबरच लहान लहान पयोष्णी-पिनाकिनी यासारख्या नद्यांची स्तोत्रे देखिल त्यांनी रचली. या स्तोत्र रचनेत श्रीस्वामींचे आणखी एक आगळेपण दिसते ते म्हणजे स्तोत्रांची मंत्र-गर्भता. मंत्र-गर्भ रचना हाच मुळी श्रीस्वामींचा लेखन विशेष असल्याने तो त्यांच्या ग्रंथ-रचनेत व स्तोत्र-रचनेत सहजपणे प्रगट झाला आहे, असे सुद्धा म्हणता येईल. रचना लहान असो की मोठी असो त्यात आपल्या संस्कृतीत पूर्वापार मान्यता पावलेले जे लहानमोठे मंत्र असतील त्यांना गुंफून रचना सादर करणे हा त्यांचा आवडीचा सहज छंद होता. या संबंधीची एक नोंद श्री स्वामींच्या पत्रव्यवहारात आढळते. ते त्यावेळी शृंगेरी पीठाधिपति श्रीशंकराचार्यांच्या दर्शनाला गेले होते. त्या संबंधात श्रीस्वामी म्हणतात -

श्रीजगदगुरुंनी उत्तम प्रेम ठेवले व तुम्ही केलेले ग्रंथ बरोबर असतील तर द्या म्हणून मागितले. नाही म्हणताच तोंडी येणारे स्तोत्र द्या असे म्हटल्यावर मंत्रगर्भित स्तोत्र लिहून दिले. आनंदित झाले. प्राकृत माहात्म्य असू द्या पण संस्कृत पाहिजे असे दोन चार वेळा ते बोलले. तरी दत्तपुराण लिहून देणे तरी ते मोठे आहे. गतवर्षीच केलेली दत्तचंपूची टीका पाठवावी ...... त्यांचे करिता ......... कृष्णालहरी पाठवावी.

नेलोर, मार्ग. शु ।। १ शके १८२९
६-१२-१९०७

हे मंत्र-गर्भ स्तोत्र कोणते हे समजायला आता मार्ग नाही. परंतु मंत्र-गर्भ रचना हा त्यांचा आवडीचा विशेष होता, हे तर स्पष्ट आहे.

वेद-वाङ्मय हे आपले महत्त्वाचे मंत्र-वाङ्मय. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी ब्राह्मणांना मंत्र-विद्येचे माहेर म्हणून जे संबोधिले ते या वेदराशीला अनुलक्षूनच. त्यानंतर क्रम येतो पुराणांचा. त्या पुराण-इतिहास-ग्रंथात महाभारताचा व त्यातील श्रीमद्‌भगवद्‌गीतेचा क्रमांक येतो. प्रस्थान-त्रयीत दहा उपनिषदांबरोबर ब्रह्मसूत्रे व त्याबरोबर श्रीमद्‌भगवद्‌गीतेचा समावेश असतो हे सर्वांना माहीत आहे. या व्यतिरिक्त लहान-मोठे अनेक मंत्र त्या त्या ठिकाणी व्यवहारात उपयोगात आणले जातात. तंत्र-शास्त्र हाहि वैदिक-संस्कृतीचा अविभाज्य भाग आहे. वेद-विहित मार्गाला विरुद्ध असलेल्या काही तंत्राचा श्रीस्वामींनी नामोल्लेख करून अधिक्षेप केला असला तरी अविरुद्ध तंत्रमार्गाला सुद्धा त्यांचा विरोध असेल असे म्हणता येत नाही. उदा. श्री दत्तमाला मंत्रासारखे जे तंत्रप्रोक्त मंत्र आहेत त्यांचा श्रीस्वामींनी अंगीकारच केला आहे. पूर्वापार चालत आलेली ही सारी वैदिक, पौराणिक व तांत्रिक मंत्र-सामग्री जशी श्रीस्वामींना अवगत होती तशी, स्वतः त्यांचा अधिकार मंत्रद्रष्ट्या ऋषींचा असल्याने काही नवे मंत्र देखील त्यांच्या स्मृति-कोषात होते. या सर्व जुन्या नव्या सामग्रीचा उपयोग करून श्रीस्वामींनी ग्रंथरचना किंवा स्तोत्ररचना केली आहे. नर्मदा-लहरीच्या संदर्भात हे मुद्दाम इथे सांगण्याचा उद्देश एवढाच की, ज्या रचनेत वाचकाला किंवा अभ्यासकाला गर्भित मंत्र दिसत नसेल किंवा ओळखता येत नसेल तिथे सुद्धा मंत्र-गर्भता असू शकते हे लक्षात यावे. या विषयावरील सुंदर उदाहरण म्हणजे श्रीदत्तपुराणात आलेली दोन स्तोत्रे.

श्रीदत्तप्रार्थनाचतुष्क (समस्तदोषशोषणम्)

श्रीदत्तापराधक्षमापन स्तोत्र (दत्तात्रेय त्वां नमामि) या दोन्ही स्तोत्रांना

***"निर्विघ्नतामेते स्तोत्रे मन्त्रगर्भे सदा पठनीये ।"***

(मंत्रगर्भ असलेली ही दोन स्तोत्रे विघ्ननिवारणासाठी सदा म्हणावी.) अशी टीप आहे. या स्तोत्ररचनेत मंत्र कोणता हे स्पष्ट दिसत नाही. परंतु मंत्रगर्भ या शब्दावरून तिथे मंत्र असलाच पाहिजे हे उघड आहे. जसा गायक साधे गाणे म्हणू लागला तरी ते तालसुराला धरूनच असते. त्याप्रमाणे श्रीस्वामींचा अधिकार व मंत्रगर्भ रचनेची त्यांची प्रवृत्ति ही लक्षात घेता त्यांच्या सारख्यांच्या बिसाट शब्दांना वेदतुल्य मंत्रमयता लाभली तर ते आश्चर्यकारक मानता येणार नाही.

जिथे सुस्पष्टच मंत्रगर्भता आढळते त्या स्थळांचा जरी विचार केला तरी किती विपुल-प्रमाणात श्रीस्वामींनी मंत्र-विनियोग साधला आहे हे अभ्यासकांच्या लक्षात येईल.

### ऋग्वेदाची प्रतिकृती वेदपादस्तुती

श्रीदत्त-पुराणातील वेद-पादस्तुति हे या रचनेचे पहिले उदाहरण. पहिले या दृष्टीने की इतर साहित्यकृतीमध्ये श्रीस्वामीमहाराज ज्याप्रमाणे संकल्पित मंत्राचे एकेक अक्षर संकल्पित कृतीमध्ये विशिष्ट स्थानी ठेवून पुढे जातात तसे इथे घडत नाही तर उलट; वेदातील एक दोन पदे किंवा पूर्ण चरणच घेऊन ते साहित्यकृति निर्माण करीत आहेत. वेदपादस्तुतीतील हा पहिला श्लोकच बघा.

***अग्निमीळे परं देवं । यज्ञस्य त्वां त्र्यधीश्वरम्***
***स्तोमोऽयमग्रियोऽस्मस्ते । हविस्पृगस्तु शंतमः ॥***

वेदपादस्तुति ॥१॥ दत्तपुराण

यातील जवळपास प्रत्येक शब्दच ऋग्वेदसंहितेतून उचलला आहे.

***अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । ऋ. १.१.१***
***अयं ते स्तोमो अग्रियो हविस्पृगस्तु शंतमः । ऋ. -१६-७***

श्री दत्त-पुराणातील अगदी शेवटचा श्लोक देखील ऋग्वेदाच्या अंतिम मंत्राची प्रतिकृति आहे.

*समानी वोऽस्त्विहाकृतिः समानाहृदयानि वः ।*

*समानमस्तु वो दत्ते मनो नोऽव्यात् त्र्यधीश्वरः। ८-८-६८*

पहिल्या ऋङ्मंत्रातील पुरोहित व ऋत्विज् हे दोन शब्द वगळून तर दुसऱ्या मंत्रातील पदाचा काहीसा अनुक्रम बदलून व आवश्यक तेवढेच एक दोन शब्द घालून वेदपाद स्तुतीतील पहिला श्लोक साधला गेला आहे. वेदपाद स्तुतीतील शेवटचा अडुसष्टावा श्लोक वगळला तर इतर सर्व श्लोकात हेच रचनातंत्र आढळते. अशा रचनेला मंत्रगर्भरचना असेहि नाव देण्याचे कारण नाही. हे वेदमंत्राचे वेगळे पौराणिक संहितीकरण आहे असे फार तर म्हणता येईल. "एकदेश- विकृतम् अनन्यवत्" - (वस्तुत अंशतः बदल केला तरी वस्तू तीच राहते.) असा संस्कृतात न्याय आहे. त्यादृष्टीने सारी वेदपादस्तुति ही एक नवी लहानशी श्रीदत्तसंहिताच आहे असे म्हणता येईल. ऋग्वेदाच्या चौसष्ट अध्यायातील प्रतीकात्मक शब्द निवडून केलेले हे नवे चयन आहे. ते चयनसुद्धा एका वेगळ्या दृष्टीने झाले आहे. ऋग्वेद हा हौत्रवेद आहे हे सर्वांना माहीत आहे. हौत्र-वेद याचा अर्थ श्रौत-यज्ञात येणाऱ्या वेगवेगळ्या देवतांच्या प्रार्थनेसाठी वा आवाहनासाठी असलेल्या स्तुति-रचना. देवताप्रार्थनापर असणाऱ्या या शब्दांना श्रीस्वामीमहाराज आता श्रीदत्ताच्या स्तुतीसाठी उपयोगात आणत आहेत. याचा अर्थ या सर्व विविध शब्दांचे विविध संदर्भ सुटून त्यांना आता एकच संदर्भ प्राप्त झाला आहे, तो संदर्भ आहे श्रीदत्ताचा. तो जुना संदर्भ हा नवा, किंवा तो मूळ हा मात्र आगन्तुक अशा कल्पना अनुभूतीच्या तात्त्विक क्षेत्रात अगदीच गैरलागू होत. अद्वैतवादानुसार एक परमात्माच सत्य असल्याने व तद्व्यतिरिक्त दुसरी वस्तूच नसल्याने विविधता दर्शविणारी सारी नावे वस्तुतः एकाचीच वेगळी नावे असतात. या न्यायाने अग्नि, इंद्र, वरुण इत्यादि देवतांची सारी नावे श्री दत्ताचीच नावे होत. हीच श्री स्वामींची शास्त्रीय भूमिका असल्याने एवढ्या मोठ्या ऋग्वेदातील (एकूण दशसहस्र मंत्र) काही निवडक शब्द हाताशी घेऊन श्री स्वामींनी त्यांचा एकान्वय (श्रीदत्तान्वय) करून दाखविला. सारा ऋग्वेद त्यांना मुखोद्‌गत असल्याने हे त्यांना सहज करता आले हे जसे खरे आहे तसे हे सारे वेगळे संदर्भ वेगळे नाहीतच ही त्यांची विशुद्ध भूमिका असल्यानेही हे घडू शकले. या रीतीचे रचनातंत्र पूर्वी कोणी हाताळले असेल तर माहीत नाही. श्रीमध्वाचार्यांनी ऋग्वेदादि मंत्रांचा सगुण विष्णूपर अर्थ लावून दाखविला आहे. ती त्यांची निश्चितच एक आगळी भूमिका होती. काही अभ्यासकांना जाणवणारे वेद-पुराणातील द्वैत संपविण्याचा श्री मध्वाचार्यांचा हा फार मोठा प्रयत्न होता. काण्व संहितेचे भाष्यकार श्रीअनंतभट्ट यांनी सुद्धा "योऽस्य प्रियः स्यात्तमेतमनुमन्त्रयीत" असा एक श्रुतिसंदेश प्रमाणाला घेऊन कण्वसंहितेतील काही मंत्रांचे सगुणपर अर्थ करून दाखविले आहेत. वेद-पादस्तुतीत मात्र श्रीस्वामींचे पाऊल एका नव्या यापूर्वी न चोखाळलेल्या वाटेने पडत आहे. श्री मध्वाचार्य किंवा श्रीअनंतभट्ट यांच्या तंत्रानुसार एक कर्मपर व दुसरा भक्तिपर असे दोन अर्थ एकाच मंत्राचे होऊ शकतात एवढे आपल्या लक्षात येते. आता या नवीन संहितीकरणाने दोन अर्थाचा प्रश्न मनात येत नाही. येतो तो एकच श्री दत्तरूप अर्थ.

वैदिक शब्द व वैदिक अर्थ त्याच प्रमाणे पौराणिक शब्द व पौराणिक अर्थ ही जोडी आपल्या मनात दृढमूल असल्याने शब्द वैदिक व अर्थ मात्र पौराणिक हा प्रकार चटदिशी मनात उतरत नाही हे खरे आहे. श्री दत्ताच्या वर्णनासाठी पौराणिक भाषाच वापरली गेली पाहिजे हा मनाचा आग्रह असतो हे देखील बरोबर आहे. परंतु "वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो....." सर्व वेदांनी माझेच प्रतिपादन केले आहे (गीता १५) या विधानाचे कुठे तरी समर्थन यावयास नको काय? त्यासाठीच श्रीस्वामीमहाराजांनी हे नवे तंत्र अवलंबिले व वैदिक शब्द घेऊनहि — त्यातहि सर्वात मोठ्या ऋग्वेदातील काही प्रतीकात्मक शब्द घेऊन श्रीदत्तासारख्या अवतार-विग्रहाचे वर्णन कसे होऊ शकते हे समर्थपणे दाखवून दिले. हा नवाच रचनाप्रकार असल्याने व त्याचा मनाला सराव नसल्याने क्षणभर अवघडल्यासारखे होते हे खरे आहे. परंतु ही नवी न मळलेली वाट चोखाळण्यामागची रचनाकर्त्याची भूमिका लक्षात आल्यानंतर मात्र हा क्षणाचा प्रारंभिक अडसर दूर होऊन नव्या जाणीवेने या प्रकाराकडे अभ्यासक पाहू लागतो. हेमाडपंथी रचनेचे स्वतःचे काही वेगळे सौंदर्य असते हे विसरून कसे चालेल?

एकूण श्रीदत्तपुराणातील वेदपादस्तुति मंत्रगर्भरचनेचे उदाहरण नसून नव्या मंत्रमयरचनेचे संस्कृतातील पहिलेवहिले उदाहरण होय असे म्हणता येईल.

## श्रीदत्तमहात्म्यातील मंत्रगर्भतेचे वैचित्र्य

श्रीस्वामींच्या हातून घडलेली मंत्रगर्भरचना आपल्याला पाहायला मिळते ती श्रीदत्तमहात्म्यासारख्या प्राकृत ग्रंथात. या ग्रंथाविषयी श्रीस्वामींचे अभिमत असे आहे -

*विविध धर्मान्वित । ज्ञानभक्ति रस-भरित ।*

*असे हे श्रीदत्तचरित । मूर्तिमंत ब्रह्म की ॥*

*ब्रह्म ते अरूप असून । कोणा न ये दिसून ।*

*करिता उपनिषदांचे श्रवण । मनन-ध्याने मग कळे ॥*

*मंदा विशेषेकरून । नुपजे औपनिषद ज्ञान ।*

*त्याकरिता हे लेखन । करवी अत्रिनंदन कृपाळू ॥*

श्रीदत्तमाहात्म्य ५१.१०४ ते १०६

श्री दत्तमहात्म्याच्या या पुष्पिकेत श्रीस्वामीमहाराज औपनिषदज्ञानाचा मुद्दामच उल्लेख करीत आहेत. सकृतदर्शनी या उल्लेखाचे स्वारस्य तेवढे जाणवत नाही. श्री दत्ताचे चरित्रवर्णन हा या ग्रंथाचा मुख्य वर्ण्य विषय. तिथे उपनिषद्‌ज्ञानाचा संबंध काय असे साधारण मनाला वाटते. सगुण साकार भगवद्‌विग्रह हा वेदाचा किंवा उपनिषद्‌ज्ञानाचा प्रतिपाद्य विषय कसा होऊ शकेल? असे वाटत असते. कारण वेदात कर्म व उपनिषदात निर्गुण-निराकार तत्त्व या दोहोंचे प्रतिपादन होऊन गेल्यावर पुराणांनी भाविक लोकांसाठी सगुण-साकार भगवंताचा महिमा गायन केला आहे हे वर्गीकरण इतके काही मनात रुजून गेले आहे की, उपनिषदांचा सगुण-साकार परमात्मतत्त्वांशी साक्षात् काही संबंध असेल असे मनात येत नाही. हीच कोंडी श्री स्वामी महाराजांना दूर करायची होती. त्यासाठी अनेक तंत्रांचा त्यांनी वापर केला. उपनिषदातील (केनोपनिषद्) उमाख्यान व शिरोळचे भोजन पात्राख्यान एकाच कुमारशिक्षेत त्यांनी गोवले. उमाख्यानात इंद्रापुढे प्रगट झालेले परब्रह्म, शिरोळच्या ब्राह्मण स्त्रीच्या एकान्तप्रेमाने श्रीदत्तरूपात प्रगट झाले असा एकान्वय श्री स्वामींनी मोठ्या कौशल्याने कुमारशिक्षेत साधून ठेवला. उपनिषदातील उमाख्यान व कुमार शिक्षेतील भोजनपात्राख्यान यांच्या या तुल्ययोगितेचा अभ्यासक जर बारकाईने विचार

करतील तर त्यांना उपनिषदातील निर्गुण-निराकार-वादाला श्री स्वामींनी किती कौशल्याने सगुण-साकारतेकडे वळविले आहे हे पाहून आनंद झाल्यावाचून रहाणार नाही. या तंत्राबरोबरच त्यांनी हाताळलेले दुसरे तंत्र श्री दत्तमहात्म्यात आपल्या दृष्टीस पडते. इथे त्यांनी उपनिषदातील माण्डूक्य व ईश ही दशोपनिषदातील दोन लहान उपनिषदे व "अतो देवा" हा मंत्र निवडला. त्यातील प्रत्येक अक्षर श्रीदत्तमाहात्म्याच्या शेवटशेवटच्या अध्यायातून (अध्याय ३९ ते ५१) शेवटपर्यंत तिसऱ्या क्रमाने ठेवले. श्रीदत्तमहात्म्याच्या काही जुन्या मुद्रित प्रतीत ते ठळकपणे छापले आहे. त्यामुळे उपनिषदातील सलग मंत्र वाचता येत असे. काही प्रतीत तो इतर शब्दांच्या आकाराचाच मुद्रित केल्याने असा काही प्रकार श्रीदत्तमाहात्म्यात आहे हेहि अभ्यासकांच्या दृष्टीतून सुटून गेले. सुदैवाने श्रीस्वामींचे सहृदय व साक्षेपी भक्त श्रीवासुदेवराव चोरघडे यांनी या ग्रंथवैचित्र्याकडे लक्ष वेधल्याने आता झिरीच्या श्री सीताराम संस्थानाने छापलेल्या श्री दत्तमाहात्म्यात पुनः ती सोय भाविक वाचकांना उपलब्ध झाली आहे. मंत्रगर्भरचनेचे हे तंत्र किती अवघड आहे व अधिकारी माहात्म्यांना ते किती सहजपणे हाताळता येते ते श्री दत्त माहात्म्यात बघायला मिळते. एकीकडे श्री दत्त माहात्म्यात येणाऱ्या विविध कथा, त्यांचे संविधानक, त्यातील पात्रातील स्वभाववैशिष्ट्ये, कथेचा ओघ या सर्वांचे ओझे लेखणीवर असतांना पुनः तिला उपनिषदातील एकेक अक्षराचा वेच करून प्रत्येक ओवीत तिसऱ्या क्रमांकावर ठेवण्याची कामगिरी सोपविणे तसे सोपे नव्हते व नाही. वेदपादस्तुतीत एक सलग शब्द किंवा एक सलग चरण उचलून ठेवावयाचे होते. त्यापेक्षा ही कामगिरी निश्चित किचकट होती. तिच्या भरीला पडून कथा-वर्णनाचा सारा डोलच मोडून जाण्याचा संभव होता. श्री स्वामींच्या आर्ष प्रतिभेने हे आव्हान अतिसमर्थपणे पेलले व मराठी सारस्वतात एक नवा वाङ्मयबंध निर्माण करून ठेवला. हे तिसरे अक्षर इतर अक्षरासारखेच समजून वाचतांनाहि कोणताहि विरस तर होत नाहीच, उलट इथे दोन उपनिषदे गुंफली गेली आहेत हे मुद्दाम दाखविल्यावाचून लक्षात येत नाही. हेच श्रीस्वामींच्या रचनातंत्राचे अपूर्वत्व होय. संस्कृत भाषेत त्यातहि वैदिक भाषेत अनुस्वार-विसर्गांची होणारी निरंतर आवृत्ति व काही जोडाक्षरे यांचे प्राकृत रचनेत अवधान ठेवून गुंफ साधणे सोपे मुळीच नव्हे. माण्डुक्योपनिषदात ओंकाराच्या चार (साडे तीन) मात्रांचे व त्या अ-उ-म व अर्धमात्रा यांचे व समाधीला धरून चार अवस्थांचे नाते दाखविले आहे. अर्थात हा विषयच गूढ असल्याने त्यासाठी वापरले जाणारे शब्दही साध्या व्यवहारातील नसणारच. अशा अप्रसिद्ध शब्दातील घटक अक्षरांना घेऊन प्राकृत रचना उभी करणे हे महद्दिव्य होय. श्री दत्त महात्म्यातील एकोणचाळीसाव्या अध्यायातील या प्रारंभीच्या सात ओव्या पाहिल्या तरी त्यातून झालेली उपनिषदक्षरांची गुंफण आपले लक्ष वेधून घेईल.

***जो तू ओतप्रोत जगद्रूपी । असती विश्वव्यापी ॥***
***त्वत्कथामृत जो पी । हो का पापी तरी तो तरे ॥१॥***

इत्यादि ९ ओव्या - श्रीदत्तमाहात्म्य अ. ३९

"ओमित्येतदक्षरमिदं" - माण्डुक्योपनिषदातील ही पहिली नऊ अक्षरे या नऊ ओव्यात गुंफली गेली आहेत. ही नुसती अक्षरेच गुंफण्यासाठी ओवण्यासाठी हे ओवीचे माध्यम श्रीस्वामींनी स्वीकारले असेल काय? तसे वाटत मात्र नाही. एक विशिष्ट चमत्कृति या रचना तंत्रानी साधली आहे हे अमान्य करता येत नाही. पण तेवढेच या रचनेचे प्रयोजन नाही. वेदोपनिषदाचा अधिकार शास्त्रमर्यादेनुसार ज्यांना लाभला नाही त्यांनाही श्रुतिमातेच्या जवळ आणण्याची ही शास्त्रपूत योजना आहे. ज्याप्रमाणे औषधाची मोठी मात्रा एकाच वेळी दिलेली ज्यांना चालत नाही त्यांना तीच मात्रा विभागून देतात. तसेच पूर्ण वाक्यरूप वेदमंत्र पठन करण्याचा अधिकार ज्यांना शास्त्र-नियमानुसार लाभला नसेल त्यांनाहि तेच मंत्र अक्षरअक्षर विभागून व ती अक्षरे क्रमाने प्राकृत शब्दांच्या पंक्तीत ठेवून अवगत करून देण्याचा व त्यांना वैदिक धारेत धरून ठेवण्याचा हा मोठा प्रयत्न होता. वेदमार्गाचे रक्षण हे श्री दत्तावताराचे एक उद्दिष्ट सांगितले जाते. या तऱ्हेची मंत्रगर्भ रचना ही त्या उद्दिष्टाची परिपूर्ति होय. दुसरेहि एक उद्दिष्ट या तऱ्हेच्या रचनेच्या पाठीमागे असावे असे श्री दत्तमहात्म्याच्या मागे उल्लेखिलेल्या पुष्पिकेवरून म्हणावेसे वाटते.

सगुणाराधन हा औपनिषद ज्ञानाचा सोपान -

***मंदा विशेषेकरून । नुपजे औपनिषदज्ञान ।***
***त्याकरिता हे लेखन । करवी अभिनंदन कृपाळू ॥***

श्री दत्तमहात्म्य ५१.१०६

असे श्रीस्वामी म्हणतात. इथे औपनिषदज्ञानाचा स्पष्ट उल्लेख आहे. माण्डूक्य व ईश या दोन उपनिषदांतील अक्षरांची गुंफण पूर्ण झाल्यानंतर ग्रंथाच्या शेवटी येणारा उपनिषदाचा - औपनिषदज्ञानाचा उल्लेख बरेच काही अधिक सांगून जातो. हे श्री दत्तचरित मूर्तिमंत परब्रह्म आहे, असे म्हणून लगेच श्री स्वामीमहाराज म्हणतात - ब्रह्म अरूप आहे व कोणाला ते दिसून येत नाही. परंतु उपनिषदांचे श्रवण-मनन-निदिध्यासन केल्यानंतर मात्र ते कळते. हे कळणे सगुण-साकार-रूपाचे असते, हा श्रीस्वामींचा प्रत्यय असल्यानेच श्री दत्तचरित्र मूर्तिमंत परब्रह्म आहे, असा निर्वाळा ते पुष्पिकेत प्रथम देऊन टाकायला विसरत नाहीत. याचा अर्थ सर्वसाधारण वाचक किंवा अभ्यासक समजत असतो त्याप्रमाणे उपनिषदात प्रतिपादन केलेले आत्मतत्त्व निर्गुण-निराकार म्हणजेच काहीतरी शून्याकार तत्त्वासारखे गृहीत-कृत्यासारखे (बिंदू-संकल्पनेसारखे) तत्त्व नसून, मूर्तिरूपात प्रगटणारे ते तत्त्व आहे, असा होतो. निर्गुण-निराकारवादाची व सगुण-साकारवादाची हीच ती अपूर्व सांधे-जोड होय. माण्डूक्य उपनिषदात ओंकाराच्या तीन मात्रांचे वर्णन झाल्यावर ज्या चौथ्या मात्रेचा-प्रपंचोपशम, शिव व अद्वैत या शब्दाने उल्लेख येतो तेच "अव्यवहार्य" आत्मतत्त्व म्हणजेच श्री दत्त होत किंवा ईशोपनिषदात - अकाय (शरीररहित), अव्रण (व्रणरहित), अस्नाविर (स्नावा-शिरा नसलेले), शुद्ध, (अविद्या मलरहित), अपापविद्ध (धर्माधर्मरहित) इत्यादी शब्दांनी स्थूल - सूक्ष्म - कारण देहाच्या अतीत असलेले जे आत्मतत्त्व प्रतिपादन केले ते श्री दत्त होत असा बोध श्री स्वामींना इथे करून द्यायचा आहे. "मंदा नुपजे औपनिषद ज्ञान" असे जेव्हा श्री स्वामी म्हणतात तेव्हा अनधिकारी साधकांना औपनिषदज्ञानाची सगुणोन्मुखता कळत नाही असे त्यांना म्हणायचे आहे. ती उकल करण्यासाठी हे लेखन आहे हा श्रींचा भाव. म्हणूनच त्यांनी मांडूक्य-ईश उपनिषदातील अक्षरांची एका बाजूने श्री दत्तचरित्रात गुंफण करून दुसऱ्या बाजूने सुस्पष्टपणे उपनिषदातील अरूप आत्मतत्त्व व श्री दत्तचरित्रात वर्णन केलेले श्री दत्त-स्वरूप एकच होत असा निर्वाळा दिला आहे. वृद्धशिक्षेत श्री स्वामींनी एकोणपन्नास श्लोकापासून तर अठ्ठावन्न श्लोकांपर्यंत दहा श्लोकात, दशोपनिषदातील प्रतिपादित आत्मतत्त्व म्हणजे श्री दत्त होत असे स्पष्ट वर्णन केले आहे. इथे मात्र ती प्रत्यक्षवृत्ति सोडून परोक्षवृत्तीने

तसेच प्रतिपादन केले. उपनिषद्ग्रंथातून किंवा ब्राह्मणग्रंथातून अनेक ठिकाणी देव परोक्षप्रिय आहेत असे म्हटलेले आढळते. इंद्रच म्हणायचे असतांना ते मुद्दामच इन्द्र असे म्हणतात असे त्या विषयीचे एक उदाहरण ऐतरेयोपनिषदात दिले आहे. (ऐतरेय १-३) त्याच परोक्षप्रियतेची वेगळी दिशा धरून अलीकडच्या काळात श्री स्वामींनी उपनिषदक्षरांची गुंफण प्राकृत काव्यात करून दाखविली. श्री स्वामींची ही भूमिका लक्षात ठेवून जर उद्धृत केलेल्या श्री दत्त चरित्रातील वरील ओव्या - "जो तू ओतप्रोत जगद्रूपी आपण वाचू लागलो तर उपनिषदातील तथाकथित जटिल निर्गुण आशयच भक्तिप्रेमाने कसा ओथंबलेला आहे हे लक्षात येते. किंबहुना तसा तो ओथंबून टाकण्यासाठीच हे अपूर्व तंत्र श्री स्वामींनी हाताळले असे म्हणता येईल.' पूर्वी सारे वेद प्रणव स्वरूपातच होते. पुढे त्यातून सर्व वेदांचा आविष्कार झाला असा वैदिकांचा सिद्धान्त आहे. सारे वेद याचा अर्थ सारे ज्ञानभाण्डारच यातून आविष्कार पावले असा होतो. तर मग भक्त-हृदयाला गहिवरून टाकणारे हे दत्तमाहात्म्यातील (एकूण चाळीस अध्यायातील) विचारच त्या कक्षेतून सुटतील असे समजण्याचे काही कारण नाही. त्यामुळे "ओमित्येतदक्षरमिदं" (हे सारे विश्व) ओम् या अक्षरस्वरूपाचे आहे - या अर्थाची वरील अक्षरे ओवीरूपात क्रमाने घेऊन प्राकृतभाषेत भक्ति-प्रेमाचा जो लाघवी व उत्कट विचार श्री स्वामींनी वरील ओव्यातून मांडला तोसुद्धा ओम् इत्येतक्षरमिदं - या अक्षरसंहतीला विसदृश तर नाहीच उलट एकात्मभावाने तिच्याशी तो विनटला आहे असे कां मानू नये? तात्पर्य, मंत्र-गर्भ रचनेमध्ये केवळ अक्षरगुंफाची चमत्कृति साधण्याची सीमित दृष्टी नाही तर अर्थाचे बहुभवन साधण्याचा द्रष्टिकोण असे मानण्यास अवसर आहे. त्याकरिता, 'हे लेखन करवी कृपाळू !' असे जेव्हा श्री स्वामी म्हणतात तेव्हां उपनिषदांचा अक्षरराशि - किती व्यापक आशय - विस्तार करू शकतो हे दाखविण्यासाठीच श्री दत्ताने श्री स्वामींकरवी प्रभावीपणे रुजू केलेले मंत्र गर्भरचनेचे हे तंत्र आहे असा श्री स्वामींचा आशय दिसतो.

असा तर्क करायला आणखी एक कारण इथेच आठवते. श्री दत्तमाहात्म्याच्या या एकोणचाळीस अध्यायाच्या आरंभी ज्या तऱ्हेचे विस्तृत प्रास्ताविक वाचावयास मिळते तसे ते इतरत्र या ग्रंथात क्वचितच दिसेल. अलर्काची कथा संपून आयुराजाची कथा या अध्यायापासून सुरू होते. माण्डूक्योपनिषदातील अक्षराची वीणसुद्धा इथेच सुरू व्हावी हे केवळ यदृच्छाघटित मानण्याचे कारण नाही. तसे ते असते तर या प्रास्ताविकाची तेवढी इथेच आवश्यकता नव्हती. ग्रंथारंभी जे प्रास्ताविक यावे ते इथे येत आहे. त्यास सुनिश्चित योजकता आहे. निर्गुण-निराकारवाद व सगुण-साकारवाद यांच्या सीमा पुसून टाकण्यासाठी चाललेली धडपड आहे. या प्रास्ताविकातील दहावी व अकरावी ओवी श्री स्वामींच्या मनोगतावर सुस्पष्ट प्रकाश टाकते. ते म्हणतात -

*मानस शुद्ध व्हावया । तुझ्या लीला सोडोनिया ।*
*आम्ही इतर उपाया । सुगम न मानू ॥*
*जे सर्व खल्विदं म्हणोन । असे श्रुतिवचन ।*
*तेही ये अनुभवून । त्वल्लीलासेवन होताची ॥*

श्री दत्त. ३९।१०।११

एकूणचाळीसाव्या अध्यायातील या प्रास्ताविकात श्रीस्वामींनी "सर्व खल्विदं" (ब्रह्म) या श्रुतिवाक्याचा मुद्दामच उल्लेख केला आहे. या वाक्याला अवान्तर महावाक्य म्हणतात आणि हे वाक्य उघड उघडच "ओमित्येतदक्षरमिदं......" या माण्डूक्याच्या वाक्याशी समानार्थक आहे. ओंकाराच्या उपासकाला जो व्यापक अनुभव येतो तोच "सर्व खल्विदं" या वाक्यात प्रतिबिंबित झाला आहे. "ओमित्येतदक्षरं....." हे अनुभूतीचे पूर्वरूप तर "सर्व खल्विदं....." हे उत्तर रूप असेहि इथे म्हणता येईल. याप्रमाणे माण्डूक्य उपनिषदाची अक्षरे गुंफण्याचे निमित्त करून केवढ्या मोठ्या सखोल आशयाचे अवगाहन करण्याचा श्री स्वामींचा भाव आहे हे पाहून मन थक्क होते. इथे दाखविलेला हा अनुबन्ध अर्थातच सर्वांना मान्य होईल असे नाही. त्यांनी निदान उपनिषदातील एकेक मंत्राक्षर किती कौशल्याने श्री स्वामींनी हलुवारपणे घालून हा वाङ्मय जडाव निर्माण केला आहे हे तरी न्याहाळून पाहावे. उदाहरणापुरत्या काही प्रारंभिक ओव्या वर दिल्या आहेतच. परंतु श्री दत्तमाहात्म्यातील शेवटचे तेरा अध्याय व त्यात आलेली मंत्राक्षरे यांचा स्वतंत्रपणे एक शिल्प म्हणून अभ्यास करणाऱ्यांना देखिल सादर कौतुक वाटल्यावरून राहणार नाही. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात त्याप्रमाणे "वऱ्हाडिया लेणी लुगडी" वाट्याला येतातच. मोठ्या साहित्यकृतींचे हेच वैशिष्ट्य होय.

"ओमित्येतक्षरमिदं....." या उपक्रमाने सुरू होणारा मंत्राक्षरांचा गुंफ "विष्णोर्यत्परमं पदम्" या उपसंहाराने संपतो. या उपक्रमोपसंहारातही पाहणाऱ्यांना योजकता दिसल्यावाचून राहणार नाही. इथेही निर्गुणवाद - सगुणवाद यांचे एकात्मीकरण पर्यायाने श्री स्वामीमहाराज सुचवीत आहेत. पण तो विषय वेगळा. केवळ शब्द-शिल्पाच्या दृष्टीनेच विचार करायचा झाल्यास किती कलात्मकतेने ग्रंथाचा व मंत्राक्षर गुंफाचा शेवट श्री स्वामी करीत आहेत ते पाहण्याजोगे आहे.

*कधी पद्मिनी बोलावी भ्रमरा । कधी चंपक फिरवी माघारा ।*
*धरूनी त्या विचारा । एवढा पुरा केला लेख ॥११२॥*
*त्र्यब्धि दंतिक्षिति १८२३ मिते । शालिवाहन शके ।*
*कली अभ्राभ्रख ५०० मिते लिप्रातटे । ग्रन्थोऽयमुद्गतः ॥११३॥*

पद्मिनी कधीतरी भ्रमराला गुंजारव करण्याचे आवाहन करते काय किंवा चाफा गुंजारव करायला आलेल्या भ्रमराला आता बस्स झाले असे कधीतरी म्हणतो काय? पद्मिनी किंवा चाफा काय सुगंधाची लयलूट करणे हाच त्यांचा नित्य-स्वभावधर्म. गुंजारव करणाऱ्या भ्रमरानेच आता ठरवायचे केव्हा थांबायचे ते !!

ओवीचा हा अर्थ गुणगुणत असता इथे पद्मिनी शब्दातील "प" विष्णुपदातील प-काराचे प्रतिनिधित्व करीत आहे हे कधीतरी लक्षात येईल काय? शेवटच्या ओवीतील त्रि+अब्धि -दंति-क्षिति ही पदे तर काल-निदर्शनासाठीच आलेली. त्यातील दंन्ति (दंति) पदातील "दं" विष्णुपदातील अंतिम अक्षराचा निदर्शक आहे हेहि लक्षात येणे सुतराम् अशक्य.

परंतु भाविकांना मोहरे लावावे, त्यांना भक्ति-प्रेमात न्हाऊन टाकत असतांना वेदोपनिषदातील स्वयंभू मंत्राक्षरांचाहि त्यांना संस्कार घडवावा यासाठी अशा गूढ लेखनाची रीत श्री स्वामींनी अंगीकारली.

## सप्तशती गुरु चरित्रातील मंत्रगर्भता

असाच प्रकार सप्तशती गुरुचरित्रात आढळतो. इथे या ग्रंथात मराठीतील गुरुचरित्र ग्रंथाचे सार, सातशे ओव्यात सांगितले असल्याने सप्तशती हे अन्वर्थक नाव श्री स्वामींनी दिले. श्रीमद्‌भगवद्‌गीतासुद्धा

सातशे श्लोकांची आहे. तिलासुद्धा सप्तशती म्हणतात. सप्तशतीगुरुचरित्र व श्रीमद्‌भगवद्‌गीता यांचा असा संबंध श्री स्वामींनी या नामकरणाने आठवून दिला आहे. पूर्वी नातवाला आजोबांचे नाव ठेवण्याची प्रथा होती. परंपरा सातत्यरक्षण हा त्यामागचा उद्देश असे. सप्तशती हे नाव या गुरुचरित्राला देऊन तोच उद्देश श्री स्वामींना साधायचा आहे. गीतेप्रमाणे गुरुचरित्र हे त्रिकांडात्मक आहे, हे त्यांनी इतरत्र दाखविले आहे. एवढेच करून न थांबता श्री स्वामींनी सप्तशतीतील प्रत्येक ओवीतील तिसरे अक्षर श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या पंधराव्या अध्यायातून घेतले आहे व त्याची सुरवात "श्रीभगवानुवाच" या वाक्यापासून केली आहे.

वेद-उपनिषद यांच्या इतकेच श्रीमद्‌भगवद्‌गीतेला महत्त्व आहे हे मागे आपण पाहिले. ते ओळखूनच सप्तशतीगुरुचरित्रात गीतेचा पंधरावा अध्याय गुंफून ठेवण्याचे श्री स्वामींनी ठरविले असावे. त्यातही प्रतीक म्हणून पंधराव्या अध्यायाची निवड करण्यात सहेतुकता आहे. भगवान् आचार्य श्री शंकर पंधराव्या अध्यायाच्या शेवटी म्हणतात -

सर्वो हि गीताशास्त्रार्थोऽस्मिन्नध्याये समासेनोक्तः न केवलं गीताशास्त्रार्थ एव, किं तु सर्वश्च वेदार्थः इह परिसमाप्तः । 'यस्तं वेद स वेदवित् (गीता १५-१) वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः (गीता १५.१५) इति चोक्तम् (गीता भाष्य १५-२०)

गीताशास्त्रातील सारा आशय या अध्यायात संक्षेपाने सांगितला आहे. गीताशास्त्रातीलच आशय नव्हे तर वेदातील सारे मंतव्य इथे सांगून झाले आहे. गीतेत याच अध्यायात म्हटलेहि आहे,

जो त्याला जाणतो तो वेदवेत्ता म्हटला जातो. (१५.१)

सर्व वेदांचा मीच एक प्रतिपाद्य आहे. (१५-१५)

या आचार्य वचनावरून पंधराव्या अध्यायाची महती स्पष्ट होते. अठरावा अध्याय सुद्धा गीताशास्त्राचा संक्षेप होय असे आचार्य म्हणतात. (गीता भा. १८.१) यावरून आचार्यांच्या दृष्टीने पंधरावा व अठरावा अध्याय महत्त्वाचे होत हे उघडच आहे. आणखीहि वेगळ्या दृष्टीने पंधराव्याचे वेगळेपण जाणवते. गीतेतील अठरा अध्यायांपैकी एक पहिला अध्याय सोडला तर इतर अध्यायांचा आरंभ एकतर अर्जुनाच्या प्रश्नाने किंवा भगवंताच्या निवेदनाने सुरू होतो. हे निवेदन पूर्वी आलेल्या आशयातील काही नव्या अंशाचे निरूपण करणारे असते. पूर्वीच्याच पूरक माहिती द्यायची असली तर भगवान् कृष्ण अशा ठिकाणी अर्जुनाच्या प्रश्नाची वाट बघत नाहीत. स्वतःच पुढे सांगायला सुरुवात करतात. इथे पंधराव्या अध्यायात तसेच झाले आहे. अर्जुनाचा नवा प्रश्न नव्हता परंतु श्रीकृष्णाला स्वतः सांगावेसे वाटत आहे. आचार्य म्हणतात —

*... अर्जुनेनापृष्टोऽपि आत्मनस्तत्त्वं विवक्षुरुवाच । (गी. भा. १५.१)*

(अर्जुनाने न विचारता देखील स्वतःचे स्वरूप सांगण्याच्या दृष्टीने भगवान् म्हणतात.)

इथे "आत्मनः तत्त्वम्' हा शब्द फार महत्त्वाचा दिसतो. आत्मतत्त्व हा सामासिक शब्द न वापरता मुद्दाम दोन्ही शब्द इथे वेगळे ठेवले आहेत. त्याचा अर्थ आत्मा कोण व त्याचे स्वरूप काय या दोन्ही अंगांचा इथे प्रामुख्याने विचार आहे, असा होतो. म्हणूनच या अध्यायातील एकूण वीस श्लोकांपैकी आठ श्लोकांत उत्तम पुरुषी रचना करून किंवा त्याला संवादी रचना करून आत्मतत्त्वाचे वर्णन केले आहे.

यद् गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम । १५.६ इत्यादी आठ श्लोक.

या सर्व श्लोकात मी, माझे, मला, माझ्या विषयीचे असेच उल्लेख आहेत. भगवत् तत्त्वाचा उल्लेख करताना असा "मी" वर भर गीतेत मधून मधून आढळतो - तसाच इथे झाला आहे.

आठा व्यतिरिक्त श्लोकातील तिऱ्हाइती वर्णन सुद्धा याच "मी" च्या सुरासी सूर मिळवीत असल्याने पंधराव्या अध्यायाचा एकूण थाटच वेगळा होऊन गेला. या अध्यायाला पुरुषोत्तम योग म्हणतात ते त्यामुळे. इथे सतराव्या व अठराव्या श्लोकात पुरुषोत्तमाचे - भगवंताचे वर्णन आहे. उत्तम पुरुष की पुरुषोत्तम ? पण इथेहि एक गूढ किंवा चमत्कृति घडून गेली आहे. वस्तुतः सतराव्या अध्यायात क्षर व अक्षर याहून वेगळ्या उत्कृष्ट पुरुषाचे-भगवंताचे वर्णन येते. परंतु परमात्मा उत्तम पुरुष असूनसुद्धा प्रसिद्धीला आला तो उत्तम-पुरुष म्हणून नव्हे तर पुरुषोत्तम म्हणून. हे कोणामुळे घडले ? आचार्य म्हणतात —

*पुरुषोत्तम इत्येवं मां भक्तजनाः विदुः ।*

*कवयः काव्यादिषु च इदं नाम निबध्नन्ति । गी. भा. १५-१८*

(भक्त लोक मला पुरुषोत्तम असे ओळखतात. आणि कवि लोक काव्यादि प्रकारात हे गुंफत असतात.)

भक्त व कवि यांच्यामुळे उत्तम व पुरुष या शब्दांनी आपला क्रम बदलला व विग्रह वाक्याऐवजी सामासिक शब्द अस्तित्वात आला. हे जसे त्यामागील कारण तसे हे सारे वर्णन संस्कृत व्याकरणाच्या दृष्टीने "उत्तम-पुरुष" - स्वरूपाच्या रचनेत आले आहे हेहि तेवढेच खरे. उत्तम पुरुषाचा पुरुषोत्तम होण्यास फार काही बिघडले असे नव्हे. परंतु उत्तम पुरुष म्हणण्यात क्षर व अक्षर (सर्व विश्व व त्याची बीजरूप मायाशक्ति) याहून पुरुष हा वेगळा आहे असा भाव (अत्यन्त - विलक्षणः गी.भा. १५-१७) होता, आता तो जाऊन अतीत-भावाला प्राधान्य आले. या अतीतपणामुळे उत्कृष्टता वा ऊर्ध्वतमता (उत्कृष्टत्तमः ऊर्ध्वतमोवा गी.भा. १५.१८) या अंगाला महत्त्व येऊन "पुरुषोत्तम" हा समास तरी होऊ शकला. पुरुषोत्तम म्हणजे पुरुषेषु वा पुरुषाणाम् उत्तमः असा षष्ठी किंवा सप्तमी तत्पुरुष होऊ शकतो. वेगळा हा अर्थ घेताच षष्ठी व सप्तमी विभक्ति व्याकरणदृष्ट्या समर्पक होत नाहीत. तिथे पञ्चमी विभक्ति करावी लागली असती व त्या अर्थानें तो समास कितपत जुळला असता ही शंका आहे. हा सर्व बारकावा काढण्यात उद्देश एवढाच की उत्तम म्हणताना पूर्वी जरी परमात्म्याला वेगळे करण्याची व्यतिरेक दृष्टी होती तरी ती जाऊन तिच्या स्थानी अन्वयाची दृष्टी हळूच आणण्याची ही भक्तजनांची भूमिका आहे हे आचार्यांना दाखवावयाचे आहे. तात्पर्य, उत्तम पुरुष हा व्यतिरेक अनुभव तर पुरुषोत्तम हा अन्वयानुभव होय. अर्थात् व्यतिरेकावर आधारलेला अन्वयानुभव पूर्वी जर व्यतिरेकात्मक अनुभव नसेल म्हणजे क्षराक्षराहून तो वेगळा आहे असे पूर्णपणे आकलन झाले नसेल तर; परमात्म्याची क्षराक्षरात राहून-व्यापून-असणारी उत्कृष्टता लक्षात येणार नाही. तो वेगळा म्हणजे वेगळ्या देशकालात राहणारा असा अर्थ अभिप्रेत नसून क्षराक्षरातच काठोकाठ राहणारा पण क्षराक्षराच्या आभासी स्वरूपाने ओळखता न येणारा असा अर्थ, व्यतिरेक अनुभव नसेल तर येणारच नाही. व्यतिरेक व अन्वय यांचे असे जवळचे नाते आहे. नाण्याच्या दोन बाजू एकमेकाचे स्थान घेऊ शकत नाहीत. परंतु एकावाचून दुसरीला राहता येत नाही हेही तेवढेच खरे. म्हणून प्रथम उत्तम पुरुष व नंतर पुरुषोत्तम हाच क्रम महत्त्वाचा समजला पाहिजे.

*दृश्यासि घेता नच घेववे जे ।*
*दृश्यात राहे अविकारी ते जे ॥*

असे श्रीस्वामींनी एका स्तोत्रात श्रीगुरु स्वरूपाचे वर्णन करताना म्हटले आहे. परमात्मा-श्रीगुरू-क्षराक्षराहून वेगळा असून तो क्षरा-क्षरातीत आहे. उत्तम पुरुष म्हणून का मानता येतो, हे त्यावरून स्पष्ट होते.

पंधराव्या अध्यायाचे हे महत्त्व लक्षात घेऊनच श्रीस्वामींनी श्रीगुरुचरित्रवर्णनात त्याचा गूढ अक्षर संचार करून ठेवला.

श्रीदत्तमाहात्म्यात निर्गुण-सगुणाचे ऐक्य दाखविण्याची दृष्टि ठेवून उपनिषदातील अक्षरांची वीण विणली. इथे गीतोक्त पुरुषोत्तम म्हणजेच श्रीगुरू होत असा भाव पंधराव्या अध्यायाची गुंफण साधून श्रीस्वामींना व्यक्त करावयाचा आहे. दत्तसंप्रदाय हा भागवत संप्रदाय होय, असे श्रीस्वामींनी एका पत्रात स्पष्ट उल्लेखिले आहे. त्याची इथे आठवण होते. पार्श्वभूमीत सिंहाचे चित्र रेखाटून एखादी पुरुषाकृति काढली म्हणजे न सांगता पुरुष-सिंहाची प्रतिमा मनात साकारते तसे श्रीगुरुचरित्र वर्णन करीत असता पुरुषोत्तम योगाचा पंधरावा अध्याय देखिल या शैलीने आठवत राहिला म्हणजे दोहोंचा एकभाव मनात बिंबायला कितीसा वेळ लागेल ? मूळ गुरुचरित्रातील चाळीसाव्या अध्यायातील कानडी स्तोत्र प्रसिद्ध आहे. त्याचा श्रीस्वामींनी केलेला सप्तशती गुरुचरित्रातील सरळ मराठी अनुवाद व त्यात गुंफलेली पंधराव्या अध्यायातील "वेदान्तकृद् वेदविदेव चा (हं)" ही अक्षरे बरोबर वाचून पाहावी म्हणजे दोन प्रवाह एकमेकांत खेळविताना श्रीस्वामींच्या सहज प्रतिभेने दाखविलेली अपूर्वता मनात अधिक भरते. याप्रमाणे सर्वच गीताक्षरांचा सप्तशती चरित्रातील वर्णनाशी असणारा किंवा जाणवणारा अनुबंध अभ्यासकांनी शोधून पाहण्याची आवश्यकता आहे. अक्षर गुंफ करीत असता श्रीस्वामी किती साक्षेपाने अवधान ठेवीत हे सप्तशती गुरुचरित्राच्या शेवटच्या ओवीवरून लक्षात येईल. इथे गुरुचरित्राला आरती जोडून (जय तत्त्वज्ञान निदान... इत्यादी) ग्रंथाचा शेवट केला आहे. शेवट असा :

*तार तत्सत् ब्रह्मार्पण । असो संपूर्णाचरण ।*
*दृढ धरू तव चरण । न मला त्वदन्य शरण ॥*

गीतेच्या पंधराव्या अध्यायात येणारा शेवटचा चरण आहे - "कृत कृत्यश्च भारत"

परंतु गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "ॐ तत्सदिति" असे म्हणून त्या त्या अध्यायाचा नाव वगैरेंचा तपशील येतो. श्रीस्वामींची सूक्ष्म दृष्टी ही की 'भारत' ह्या पदातील त हे अक्षर अन्तिम मानून चालणार नाही. ॐ तत्सत् हाच खरा पंधराव्या अध्यायाचा अन्तिम घटक मानायला हवा. म्हणून श्रीमहाराजांनी "तार तत्सत्" असा शेवट केला. यातील तिसरे "त" अक्षर ज्याप्रमाणे भारत या पदातील 'त' काराचाचे प्रतिनिधित्व करते त्याप्रमाणे ते तत्सद्मधील तकाराचे देखिल प्रतिनिधित्व करते. अर्थात ते तिसरे येण्यासाठी ॐ चा पर्यायवाचक तार शब्द श्रीस्वामींनी ठेवला. श्रीस्वामींची अशी ही अद्भुत मंत्र-प्रतिमा ठायी ठायी प्रगट झाली आहे.

## माघ-मास माहात्म्यातील मंत्रगर्भता

सप्तशती गुरुचरित्रानंतर महत्त्वाचा मंत्रगर्भ ग्रंथ म्हणजे माघ मास माहात्म्य होय. याच्या एकूण तीनशे त्रेचाळीस ओव्या आहेत. यात प्रत्येक ओवीतील पहिले अक्षर वाचले तर श्रीदत्तमालामंत्र वाचून होतो. श्रीदत्तमाहात्म्य व श्रीसप्तशतीगुरुचरित्र या ग्रंथात मंत्राक्षर तिसऱ्या क्रमांकावर येते येथे मात्र पहिल्या क्रमांकावर उपनिषदे व गीता या दोन ग्रंथांना प्रतिनिधित्व दिल्यावर श्रीस्वामींची दृष्टी आता तंत्रात्मक असणाऱ्या मंत्राकडे वळली आहे. माघ मास माहात्म्यात तिलोत्तमा अप्सरा, श्रीकुण्डल-विकुण्डल हे बंधु आणि काञ्चन-मालिनी इ. काही कथा आल्या असल्या तरी प्राधान्याने श्रीदत्त व सहस्त्रार्जुन यांचा तो संवाद असून त्यात उपदेशावर भर आहे. उपदेशाच्या निमित्ताने वैदिक समाजाचे एक समग्र सांस्कृतिक जीवन रेखाटलेले इथे पाहायला मिळते. मूर्तिपूजेपासून तर ज्ञानोत्तर भक्तिपर्यंत जीवनाचे सारे थर इथे आहेत. श्रीदत्तमालामंत्राचा आशय पुष्कळ अंशी कामनिक असला तरी माघमास माहात्म्यात अनायासेच त्याचे सर्वंकष उपदेशात पर्यवसान साधले गेले आहे. याविषयी माघमास माहात्म्याच्या प्रस्तावनेत सविस्तर चर्चा झाली असल्याने इथे त्याची पुनरावृत्ती करीत नाही. हा मंत्र श्रीदत्तपुराणात (तृतीय अष्टक अ. १ श्लोक ५० ते ५७.५) आला आहे.

हा मंत्र फार मोठा व जपादि अनुष्ठानाच्या दृष्टीने सामान्य साधकाच्या आवाक्याच्या बाहेर आहे. श्रीस्वामींनी तो मात्र माघ माहात्म्यात गुंफून सर्वच साधकांची मोठी सोय करून ठेवली ही त्यांची मोठी कृपाच होय. यात अनेक बीजमंत्रांचा समावेश असल्याने तेही साधारण साधकासाठी सुलभ होऊन गेले आहेत. बीजमंत्र सुद्धा किती सहजपणे गुंफता येतात ते माघ माहात्म्यात पाहायला मिळते. ही दोन उदाहरणे पाहा.

"क्रौं" – क्रौंचादि दीपे असती ॥ माघ मा. १०३ ॥

"ऐं" – ऐंद्रीपासूनी अष्ट दिशा ॥माघ मा. १११॥

या व्यतिरिक्त "वौषट्, वषट्, स्वाहा इत्यादी अप्रसिद्ध शब्द सुद्धा ग्रंथाचा ओघ न मोडता कसे गुंफून झाले आहेत ते अभ्यासकांना इथे कळेल.

परंतु यापूर्वी स्पष्ट केल्याप्रमाणे रचना चमत्कृति हे या कृतींच्या मागील प्रयोजन नसून लहान-मोठ्या सर्व साधकांना बरोबर घेऊन चालण्याची कणव हेच येथील महत्त्वाचे प्रयोजन होय.

## श्रीदत्तलीलाब्धिसारातील मंत्रगर्भता

श्रीदत्तलीलाब्धिसार या ग्रंथात मंत्ररचनेचे आणखी एक वेगळेच तंत्र आढळते. इथे ॐकार गुंफला आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या एकूण ओव्या एक सहस्र असून त्या दहा लहरींत प्रत्येकी शंभर ओव्या याप्रमाणे विभागल्या आहेत. या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे एकूण अक्षरे मोजून ठेवली असून ती संख्या २८००० (अठ्ठावीस सहस्र) इतकी दिली आहे. श्रीदत्तपुराणाची सुद्धा अक्षरे श्रीमहाराजांनी टिपून ठेवली असून ती संख्या एक लक्ष बारा सहस्र इतकी होते.

(सद्वादशसहस्राढ्यलक्षा ११२००० क्षरात्मकं त्विदम्)

*श्रोतुर्वक्तुर्दत्तलोकप्रदं तारं पुराणकम् ॥ श्रीदत्तपुराण-शेवट.*

अक्षरसंख्या टिपून ठेवण्यात उघडच प्रस्तुत ग्रंथाची श्रुतितुल्यता श्रीमहाराजांना दर्शवावयाची आहे. आपल्याकडे वेदांची अक्षरसंख्या अबाधितपणे टिकून ठेवण्यासाठीच पद-क्रम-माला वगैरे विकृतींचे साक्षेपी पठन आतापर्यंत होत आले आहे.

श्रीदत्तलीलामृताब्धिसारात श्रीदत्तपुराण किंवा श्रीदत्तमाहात्म्य यातील कथा संक्षेपाने आल्या आहेत. त्यातील शेवटची ओवी ही –

*सानुस्वार जो ओवी या । एक सहस्र ओविया ।*
*तया मध्येची ओवी या । ॐ कारात्मा ॥*

श्रीदत्त लीला - १०.१००

या ओवीचा तेवढा स्पष्ट अर्थ न कळला तरी यात ओंकार गोवला आहे हे काहीसे पुसट कळते. मुद्रित पुस्तकात त्याची त्रोटक सूचना आढळते हे वाचकावर उपकारच होत. ॐकाराची गुंफण करताना श्रीस्वामींचे विशिष्ट धोरण दिसते. पहिल्या लहरीच्या पहिल्या ओवीत सुस्पष्टपणे ॐकाराचा उल्लेख आढळतो. जसे -

*ॐकार ज्याचा वाचक । जगद्धेतू धीप्रेरक ।*
*तोचि देव सच्चित्सुख । एक दत्त ॥ श्रीदत्त. - १.१*

पुढे दुसऱ्या लहरीपासून मात्र प्रत्येक लहरीत पहिल्या ओवीचे अक्षर अनुक्रमे अ, उ, म असे घेऊन पुनः व्युत्क्रमाने म, उ, अ असे घेण्यात आले आहे. यात्रमाणे ओंकाराची पुढील प्रमाणे वीण झाली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| (१) - ॐ | (२) अ | (३) उ | (४) म |
| | (५) म | (६) उ | (७) अ |
| | (८) अ | (९) उ | (१०) म |

याप्रमाणे इथे ॐकाराच्या अक्षरांची क्रमाने दोनदा (२,३,४) (८,९,१०) व व्युत्क्रमाने एकदा (५,६,७) आवृत्ति होते. पूर्ण ॐकाराचे पठन पहिल्या लहरीत पहिल्या ओळीत होते हे वर आलेच आहे. असा गुंफ साधण्यात श्रीस्वामींचा काय उद्देश असेल ते तेच जाणोत. परंतु वर उद्‌धृत केलेल्या शेवटच्या ओवीवरून (सानुस्वार...) श्रीदत्त ॐकार स्वरूप असल्याने या सहस्र ओव्यात ओंकार विणण्यात आला असे श्रीमहाराजांचे मत दिसते. ओवीच्या पहिल्या चरणात ओवी या ही अक्षरे तर तिसऱ्या चरणात ओवीया अशी अक्षरे आहेत. त्यावरून असे श्रीस्वामींना सुचवावेसे वाटते की आपण इथे ओंकार विणला आहे.

ओंकाराच्या साऱ्या मात्रा व त्याही क्रमाने व व्युत्क्रमाने घेण्यातही काही प्रयोजन निश्चित असावे. अकार-उकार-मकार या मात्रांचा जाग्रत्-स्वप्न व सुषुप्ति या अवस्थांशी घनिष्ठ म्हणजे एकात्म संबंध आहे असे माण्डूक्योपनिषदात सांगितले आहे. ''पादा मात्रा मात्राश्च पादाः'' हे माण्डूक्योपनिषदातील गूढवचन विश्वातील या तीन अवस्था जागृति वगैरे व अकारादि मात्रा यांच्यात काहीच अंतर नाही हे दर्शविते. जाणते लोकच त्या विधानाचा खरा खोल अर्थ जाणोत. परंतु एवढे तर स्पष्ट दिसते की या तीन अवस्थांतून मनुष्यमात्राचा प्रवास प्रत्यही चाललेला असतो. ही एक प्रकारची दैनिक सृष्टि-प्रक्रियाच होय. तिच्या क्रमव्युत्क्रमाकडे जर जाणीवपूर्वक लक्ष दिले तर अनायासेच बुद्धि स्थूलाकडून सूक्ष्माकडे व सूक्ष्माकडून स्थूलाकडे वळू लागते. शारीर भाष्यात विपर्ययाधिकरण नावाचे एक स्वतंत्र अधिकरण असून त्यात ज्या क्रमाने सृष्टि उत्पन्न होते त्याच्या उलट क्रमाने जगाचा विलय होतो असे दाखविले आहे. (शारी. भाष्य. २-३-१४) तीच दृष्टी घेऊन श्रीमहाराजांनी इथे ओंकाराचा क्रम व व्युत्क्रम दर्शविला आहे. परमात्मा श्रीदत्त अर्थातच या सर्व अवस्थांच्या पलीकडे आहे. त्यालाच माण्डूक्यात चतुर्थ व अमात्र असे म्हटले. श्रीदत्तलीलामृताब्धिसारातील शेवटच्या ओवीत 'सानुस्वार जो ओवीया' असा उल्लेख येतो तो त्या अंतिम वस्तुसत्तेचा बोध करून देण्यासाठीच आहे असे दिसते. यावर माझ्यासारख्या अनधिकाऱ्याने अधिक लिहिणे योग्य नव्हे. या श्रीदत्तलीलामृताब्धिसारात फलश्रुति म्हणून ज्या अधिकच्या (एक सहस्राहून वेगळ्या) दहा ओव्या श्रीमहाराजांनी दिल्या आहेत त्यात प्रथमच अशी ओवी येते -

*अनधिकारां स्त्री शूद्रा । ॐ कारी भाविका भद्रा ।*
*दुष्ट मानी की भक्त्यार्द्रा । हा धर्मांशु ॥ श्रीदत्तलीला फलश्रुति ॥१॥*

या ओवीचाही नीट अर्थ लागत नसला तरी एवढे उघड दिसते की ओंकाराचा अधिकार नसलेल्या स्त्रीशूद्रांना या रीतीने (श्रीदत्तलीलामृताब्धि ग्रंथ पठनाने)ओंकाराच्या उपासनेमध्ये प्रवेश मिळेल व त्यांचे कल्याण होईल. ''ओंकारी भाविका भद्रा'' या चरणाचा हा अर्थ दिसतो. साधक दुष्ट असो की मानी असो त्याच्या ठिकाणी जर भक्तीचा ओलावा असेल तर त्याच्यासाठी हा ग्रंथ म्हणजे धर्माचा किरण किंवा धर्माचा सूक्ष्मतंतू होय. त्याच्या आधाराने त्यालाही या ओंकार गुंफून ठेवलेल्या ग्रंथाच्या भरवशावर महत्पदाला जाता येईल. ''काळावरी मारी पाद लीलेनीची' असे आत्मविश्वासपूर्वक उद्‌गार श्रीमहाराजांनी इथे काढले आहेत. श्रीस्वामींच्या संपूर्ण ग्रंथात इतकी दीर्घ फलश्रुति कुठेही आढळत नाही व एवढा जोरकस उद्‌गारही कोठे दिसत नाही. ह्या ग्रंथात गुंफल्या गेलेल्या ओंकाराचाही हा प्रभाव श्रीस्वामींना साधकांच्या कानावर घालायचाच होता असे दिसते.

या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य की यात शेवटच्या लहरीत एकाहत्तर ओवीपासून पुढे पहिल्या ओवीतील पहिले अक्षर घेता – ''वासुदेवानंद सरस्वतीमुखे माळवंशी हा निजलीलासिंधु गुरु वदले'' हे वाक्य सिद्ध होते तर तिसऱ्या ओवीतील पहिले अक्षर घेता - ''श्रीक्षेत्रामध्ये गोविंदयतीश्वर प्रसादाने अवधूतपदी ज्याचे मन रमले'' हे वाक्य सिद्ध होते.

पुढे फलश्रुतीच्या ओव्यांतही ओवीचे पहिले अक्षर म्हणजे ''अठराशे एकुणवीस शकि'' हे वाक्य तर तिसऱ्या ओवीतील पहिले अक्षर म्हणजे ''दुष्कालदवतापशान्तये'' हे वाक्य येते. चौथ्या ओवीतील पहिले अक्षर 'हा लीलामृतसिंधू निबंध'' हे वाक्य तर चौथ्या ओवीतील शेवटचे अक्षर (म्हणजे १६) शुचीमासी शीत (सित) पक्षि होय.' हे वाक्य येते. हा सर्व तपशील इथे देण्याचा उद्देश एवढाच की ओंकारात ओवलेला जो हा ग्रंथ एका बाजूने अनाधिकाऱ्यांना सुद्धा महत्पदाला घेऊन जातो (ठसवी जो बोध । खेद न राखी नुरवी भेद ॥) (फलश्रुति-२) तोच ऐहिक दृष्टीने दुष्काळाचा वणवासुद्धा शांत करू शकला ही साक्ष श्रीस्वामींनी नोंदून ठेवली आहे हे सर्वांच्या लक्षात यावे.

श्रीमहाराजांच्या यतीजीवनातील साधारणपणे चोवीस अखंड संचाराचा कालावधी लक्षात घेतला तर अशा अनेक रचना असू शकतात. त्या सर्वांची नोंद झालीच असेल असे निश्चयाने म्हणवत नाही. पण उपलब्ध स्तोत्रात गुंफलेल्या मंत्रांकडे एक दृष्टी टाकली तरी केवढे वैचित्र्य आढळून येते. यात गणानां त्वा, त्र्यंबकं यजामहे, यासारखे श्रुत्युक्त आवाहन मंत्र, दत्तात्रेयाय विद्महे, एकदन्ताय विद्महे, तत्पुरुषाय विद्महे यासारखे श्रीदत्त-गणपति-महादेव या देवांचे प्रसिद्ध गायत्रीमंत्र, दत्तात्रेयो हरिः कृष्ण यासारखे श्रीदत्तात्रयाचे ध्यानमंत्र, ॐ नमस्ते अस्तु भगवन् विश्वेश्वराय, ऐं, ऱ्हीं, श्रीं, क्लीं यासारखे महामंत्र, नर्मदायै नमः प्रातः, विश्वेशं माधवं दुण्ढिं, अयोध्या मथुरा यासारखे नित्य पठनातील स्मारक श्लोक, ॐ नमःशिवाय यासारखा लहानसा षडक्षरी सिद्ध मंत्र, श्रीराम जयराम जयजय राम यासारखा महाराष्ट्रात प्रसिद्ध असलेला वरदमंत्र, गुरुदेव दत्त, शिव चिदम्बर हे सुलभ नाम-मंत्र त्या त्या स्तोत्रांत आपली उपस्थिति लावत आहेत हे दिसून येते. मंत्र गुंफण्याचा श्रीस्वामींचा अधिकार अभूतपूर्व

होता हे या तालिकेवरून कुणाच्याही लक्षात येईल. एक विनायक स्तोत्राचे उदाहरण पुढे ठेवले तरी ही गोष्ट मनात भरते. एकाच स्तोत्रात विनायक, दत्त व महादेव यांचे गायत्रीमंत्र व तेहि रचनाकाराच्या नाममुद्रेसह ओवून दाखविणे हे काम कल्पनाशक्तीच्या बाहेरचे आहे. कारण इथे देवतेच्या गुणवर्णनाला जराही क्षति न पोचू देता हे सारे करायचे असते. काही स्तोत्रात तर श्रीमहाराजांनी देवतेचे समग्र जीवन-चित्रण आपल्यापुढे प्रभावीपणे सादर केले आहे. या संदर्भात दोन स्तोत्रांकडे दोन दृष्टीने अंगुलि-निर्देश करावासा वाटतो. एक मारुतिस्तोत्र व दुसरे समंत्रक श्रीनर्मदा-स्तोत्र. श्रीमारुतिस्तोत्रातील हे पुढील चार श्लोक.

*ॐ नमो वायुपुत्राय भीमरूपाय धीमते ।*
*नमस्ते रामदूताय कामरूपाय श्रीमते ॥१॥*
*मोह-शोक-विनाशाय सीता-शोक-विनाशिने ।*
*भग्नाशोकवनायास्तु दग्धलंकाय वाग्मिने ॥२॥*
*गतिनिर्जितवाताय लक्ष्मण प्राणदाय च ।*
*वनौकसां वरिष्ठाय वशिने वनवासिने ॥३॥*
*तत्त्वज्ञानसुधासिन्धु निमग्नाय महीयसे ।*
*आञ्जनेयाय शूराय सुग्रीवसचिवाय ते ॥४॥*

श्रीमारुतिस्तोत्रातील या पहिल्या चार श्लोकात श्रीस्वामींनी रामायणातील मारुतिरायाची समग्र प्रतिमाच अचूकपणे टिपली आहे असे दिसेल. यातील चतुर्थी-विभक्तीतील प्रत्येक विशेषण मारुतिरायाच्या एकेक वैशिष्ट्याचे चित्रण करीत आहे. वायुपुत्र व आञ्जनेय हे त्यांचा कुलवृत्तान्त सांगतात. भीमरूप, कामरूप, वशी, शूर, गतिनिर्जितवात, धीमत्, श्रीमत्, वाग्मी हे त्यांचे स्वरूप-वैशिष्ट्य व गुण-वैशिष्ट्य यांचा निर्देश करीत आहेत. सुग्रीव-सचिव, रामदूत, सीताशोक-विनाशी, दग्धलङ्क, भग्नाशोकवन व लक्ष्मण प्राणद हे त्यांच्या रामायणातील कामगिरीचा परिचय करून देत आहेत. व नौकस-वरिष्ठ (अरण्य हे ज्यांचे स्थान आहे अशा प्राण्यांमध्ये वरिष्ठ) हे विशेषण व वनवासी हे विशेषण तसे समानार्थक दिसते खरे व त्यातून मारुतिरायांच्या निवासस्थानाचाच केवळ बोध होतो असे वाटते. परंतु थोडा विचार करता त्यात श्रीस्वामींना अधिक काही सुचवावयाचे असावे असा एक विचार मनात येतो. कारण एकदा "वनौकस-वरिष्ठ म्हणून माहिती दिल्यानंतर पुनः वनवासी शब्द त्याच अर्थाने वापरण्यात फारसे स्वारस्य नाही. त्या अर्थाने तो श्रीस्वामींनी वापरला देखील नाही. तो शब्द वेगळ्या कार्य-कारण-भावाचा द्योतक म्हणून श्रीस्वामींना हवा आहे. श्रीमारुतिराय हे तत्त्वज्ञान-महासिन्धु-निमग्न आत्मतत्त्वज्ञानाच्या महासागरात पूर्णपणे अवगाहन करणारे आहेत, असे "वनवासिने" हे विशेषण सांगून झाले की, वशिने (जितेन्द्रिय) वनवासिने ही दोन विशेषणे (संस्कृत व्याकरणाच्या दृष्टीने ही दोन्ही इन् प्रत्ययान्त विशेषणे आहेत. म्हणून त्यांची जोडी देखिल इथे चांगली शोभून दिसते) मारुतिरायाच्या तत्त्वज्ञान सागरातील अवगाहनाचे मर्म सांगत आहेत. जितेन्द्रियता व वनवास शब्दाने सुचविली जाणारी एकान्तप्रियता असल्यावाचून आत्मानंदाच्या सागराच्या तळाशी पोचता येत नाही, हे सुचविण्यासाठीच ही दोन विशेषणे श्रीस्वामींनी अगदी योग्य स्थळी इथे घालून ठेवली आहेत. "वनवासिने" हे विशेषण याप्रमाणे स्थळ-निर्देशक विशेषण (वनौकस-वरिष्ठ या विशेषणासारखे) नसून ते मारुतिरायांच्या ब्रह्मज्ञानपारंगततेचे रहस्य सांगणारे विशेषण आहे. मारुतिरायांचे हेच अंतरंग स्वरूप होय. त्यामुळे ते महीयस्-अधिक मोठे आहेत. वशिने-वनवासिने, तत्त्वज्ञानमहासिन्धुनिमग्नाय महीयसे क्रमाने येणारी ही मारुति-स्तोत्रातील विशेषणे मारुतिरायाच्या अंतरंगजीवनातील चढता आलेख दर्शवितात. एकीकडे मंत्राक्षराची वीण करीत असता दुसरीकडे सखोल आशयाची मांडणीसुद्धा तितक्याच सहजतेने श्रीस्वामींची लेखणी कशी करीत असते ते या उदाहरणाने स्पष्ट व्हावे. मंत्र गुंफनाच्या विषयात सुद्धा प्रस्तुत मारुतीस्तोत्रात एक आगळेपण साधले गेले आहे. श्रीज्ञानेश्वरीचा आरंभ ज्याप्रमाणे "ॐ नमो' या पदसमुच्चयाने होतो तसे इथे झाले आहे. तसे ॐ न मो ही अक्षरे नेहमीच्या तंत्रानुसार प्रत्येक श्लोकाच्या आरंभी पहिले अक्षर म्हणून येतात. परंतु त्यावर समाधान न मानता सुस्पष्टपणे वरील अक्षरे पहिल्याच श्लोकात पहिल्या चरणात घातली आहेत. तंतु जसे उभे व आडवे अशा दोन्ही तऱ्हेने विणावेत तसा हा प्रकार.

ॐ नमो वायु...
मोह शोक

## मंत्रगर्भ नर्मदास्तुति व तात्त्विक आशयाची घडण

मंत्रगर्भ नर्मदास्तुतीचा देखील या दृष्टीने अभ्यास करता येण्यासारखा आहे. "वासुदेवानंद सरस्वतीकृतरेवास्तुति", "नर्मदायै नमः प्रातर्नर्मदायै नमो निशि । नमोऽस्तु नर्मदे तुभ्यं त्राहि मां विषसर्पतः" "अनसूयात्रिसंभूत दत्तात्रेय दिगंबर" । इतकी वाक्ये यात (आठ अनुष्टुभ श्लोकात) गुंफली आहेत, हे मागे दिले आहे. इथे या स्तोत्रात आलेल्या काही भावगर्भ विशेषणांचाच तेवढा विचार करावयाचा आहे. उद्देश हा की विशेषण मालिका जोडून जर नर्मदा माईचे नर्मदा लहरीतील व्यक्तिचित्र न्याहाळले तर ते अधिक सर्वांगपूर्ण होईल. नर्मदा-लहरीतील व नर्मदा स्तुतीतील शेवटचा श्लोक एकच ठेवण्यात श्रीस्वामींचा तोच भाव असावा. हाच तो पुढील श्लोक -

*जय जय शिवकन्ये नर्मदे शर्मदे त्वम् ।*
*जय जय जनमान्ये धर्मदे ऽ धर्मदे त्वम् ।*
*जय जय सुवदान्ये शर्मदे कर्मदे त्वम् ।*
*जय जय भुवि धन्ये भर्मदे वर्मदे त्वम् ॥*

नर्मदा स्तोत्र ९, नर्मदा लहरी - पुष्पिका ३

त्रिधा-कर्म-विशुद्धये - (३) कायिक-वाचिक-मानसिक दोष दूर सारणारी त्रेधा धर्माङ्गमूर्तये, (६) श्रुति-स्मृति-पुराणोक्त धर्माची प्रत्यक्ष मूर्ति, तपोदायै, तपः सिद्ध्यै, (६) तप देणारी (घडविणारी) तपाचे फल देणारी, यज्ञाङ्ग्यै, (६) वासनामोक्षदक्षायै, (७) यज्ञाङ्ग असणारी, वासनेतून सुटका करून देण्यास तत्पर, दयादमस्थैर्यकर्त्र्यै, (३) दया-दम या गुणांना दृढमूल करणारी, तितिक्षुशिवसंधात्र्यै, (८) तितिक्षासंपन्न लोकांचे कल्याण संपादणारी, षड्विषधृते, (७) षड्रिपूंचे हरण करणारी.

साधकांना अंतिम उद्दिष्टाप्रत घेऊन जाण्यासाठी नर्मदामाई किती कष्ट घेण्यासाठी तत्पर आहे याचा सुंदर आलेख वरील विशेषणांनी चितारला आहे. नर्मदा श्रुति-स्मृति-पुराणोक्त सर्व धर्मांची प्रत्यक्ष मूर्ति असल्याने या सर्व अनुष्ठानाचे फळ नर्मदेच्या सेवनाने मिळते. त्यामुळे कायिक-वाचिक-मानसिक दोषांपासून ती साधकाची मुक्तता करते. तपाचे फळ देणारी व तपानुष्ठान घडविणारी ती आहे. रेवा-तीरे तपःकुर्यात् हे वचन प्रसिद्ध आहे. २ त्याचा परिणाम म्हणून दया दम वगैरे सद्गुणांना स्थैर्य लाभते. काम-क्रोध-लोभ-मद-मत्सर या षड्रिपूंना नर्मदामाई उखडून फेकते. तितिक्षूला

कल्याण मिळवून देते. याचा अर्थ तितिक्षेचा तिच्या सान्निध्यात अभ्यास होतो हा आहे. श्रीशंकराचार्यांनी ऐतरेयोपनिषदात मोक्षतीराचे वर्णन करीत असता तेथील ज्ञानाची नाव सत्य-ऋजुता-दान-दया-अहिंसा-शम-दम-धृति या आत्मगुणरूपी पाथेयाने पूर्ण असते, असे म्हटले आहे. सत्यार्जवदान दयाऽहिंसा-शम-दम-धृत्यात्मगुणपाथेयपूर्णज्ञानोडुपे - (ऐत.शां.भा.१-२-१) त्या सर्व आत्मगुणांचा संचय नर्मदेच्या सेवेने हाती येतो. हे सारे आत्मगुण (दया-दम शब्दाने सर्वच आत्मगुणांचा बोध व्हायला प्रत्यवाय असू नये.) ही नर्मदा माईनी साधकांना दिलेली देणगी होय.

नर्मदा माईच्या गळ्यातील गुणमालिकेचा हा दुसरा उजवा सर -

सूक्ष्म-वस्तू-दृशे (२) सूक्ष्म वस्तु पाहण्याचे सामर्थ्य देणारी.

सत्यसंप्राप्तिकारिण्यै (४) सत्याची प्राप्ति करून देणारी.

पुंमोहसहृते (१) मनुष्याचा मोह घालविणारी.

वाक्यार्थायै (२) महावाक्याचा साक्षात् अर्थरूप असणारी.

तत्त्वरूपिण्यै (४) परमार्थ वस्तु स्वरूप असणारी.

चेतःसमाधयै (८) अन्तःकरणाचा विलयस्थान असणारी.

रम्यायै (४) सुन्दर असणारी

दिव्यायै (७) दिव्य रूप असणारी

रत्यै (८) आत्म-प्रेमरूप असणारी

नन्दायै (३) आनन्द स्वरूप असणारी

आत्मगुणांचे संपादन नर्मदामाईच्या कृपेने पूर्ण झाले की तिच्या गुणांचा हा दुसरा आविष्कार प्रत्ययाला येतो. ती सूक्ष्मवस्तूचे दर्शन-सामर्थ्य देते. सत्याची प्राप्ती करून देते. सत्य दर्शनाने पुरुषाच्या मनातील मोह (आजवरच्या असत्य - दर्शनाने उद्भवलेला मोह) दूर होतो. नर्मदामाई सत्याचे दर्शन करून देते याचा अर्थ सत्य हे काही वेगळे वास्तव आहे असा नसून नर्मदामाईचे अन्तःस्वरूप हेच परम सत्य होय. म्हणूनच श्रीस्वामी तिला तत्त्वरूपिणी व वाक्यार्थरूप म्हणतात. ॐ, तत् व सत् असा परब्रह्माचा तीन तऱ्हेने निर्देश होत असतो असे श्रीमद्‌भगवद्‌गीतेत म्हटले आहे. त्याला धरून तत् + त्व म्हणजे ब्रह्मस्वरूप असा अर्थ निघतो. नर्मदामाई त-त्वरूप आहे याचा अर्थ ती परब्रह्म रूप आहे असा होतो. वाक्य म्हणजे महावाक्य. महावाक्यामधील (प्रज्ञानं ब्रह्म, अयमात्मा ब्रह्म, तत्त्वमसि व अहं ब्रह्मास्मि ही चार महावाक्ये) ''तत् त्वम् असि'' - ते तू आहेस - ते ब्रह्म तू आहेस - हे महावाक्य इथे प्रामुख्याने अभिप्रेत आहे. या महावाक्यात साधक जरी अल्पज्ञ व अल्पशक्ति असला व सर्वज्ञ, सर्वशक्ति परमेश्वराहून तो वेगळा वाटत असला तरी तो परमेश्वरासी अखण्ड एकरूप असतो, त्या दोहोत फूट पाडणारी अल्पज्ञ व सर्वज्ञ ही विशेषणेच आगन्तुक होत, असे प्रतिपादित केलेले असते. नर्मदामाई तत्त्वरूप आहे या विधानाचे आता दोन अर्थ करता येतात. ती परब्रह्मरूप हा एक अर्थ व ती वाक्यार्थरूप म्हणजे ''तत्त्वमसि'' या महावाक्याचा साक्षात् अर्थ आहे हा दुसरा अर्थ. हे दोन अर्थ वेगळे मानण्याचे कारण नाही. एकात वस्तूचा निर्देश अभिप्रेत आहे तर दुसऱ्यात आपले त्या वस्तूशी एकतेचे अनुभवाला येणारे नाते अभिप्रेत असते. इतर वाक्यात व तत्त्वमसि महावाक्यात हेच अंतर आहे. इतर वाक्यात वस्तूचा तिऱ्हाइती उल्लेख असतो. तो तिऱ्हाइती भाव तत्त्वमसि महावाक्यात नाहीसा होतो. नर्मदामाई परब्रह्मरूप आहे एवढे सामान्य तिऱ्हाइती ज्ञान आता समाप्त होऊन माझे तिच्याशी ऐक्याचे नाते आहे असा साक्षात्कार तत्त्वमसि महावाक्याने होतो. एकदा तिऱ्हाइती भाव संपला की वस्तूचे ज्ञान हे वस्तूचे ज्ञान म्हणून उरत नाही. ते वस्तूचे प्रेम म्हणून प्रत्ययाला येते. म्हणूनच तिथे मनाची समाधि - विलय होऊ लागते. त्या प्रत्ययाचे स्वरूप श्रीस्वामींनी रम्य, रति, दिव्य व नन्द या चार विशेषणांनी दर्शविले आहे. नर्मदामाईचे स्वरूप रम्य-रमणीय असले तरी कोणत्याही पार्थिव सौंदर्याशी त्याची तुलना करता येत नाही हे दाखविण्यासाठी दिव्य शब्द आला आहे. ती रतिरूप आहे याचा देखील अर्थ तोच आहे. रति व क्रीडा या दोहोत अंतर सांगताना आचार्य म्हणतात क्रीडा बाह्यसाधनापेक्षा। रतिस्तु साधन निरपेक्षा बाह्य विषयप्रीतिमात्रमिति शेषः । (मुण्डक. शां. भा. ३-१-४)

क्रीडा ही बाह्य उपकरणांना धरून होत असते. रतीमध्ये त्याची अपेक्षा नसते. त्याविषयी सामान्य प्रेमभाव असतो. क्रीडारतीमधील हे अंतर लक्षात घेऊन येथील रति शब्दाचा अर्थ लक्षात घ्यावयाचा आहे. नर्मदाताई रतिरूप आहे याचा अर्थ ती निखळ आत्म-प्रेमरूप आहे. तिथे कोणताही बाह्य भाव नाही व त्याची अपेक्षा नाही. परंतु प्रेम करण्यासाठी किमान आवश्यक असलेला बाह्य भावाचा आभास असू शकतो. अशा आभासी बाह्य भावाने जिच्या विषयी आत्म-प्रेम अनुभवास येते अशी ती शुद्ध-रति-रूप, शुद्ध प्रेम रूप आहे. तिलाच श्रीस्वामींनी ''नन्दा'' म्हणजे आनन्दा - अर्थात आनन्द स्वरूप आहे असे म्हटले आहे. शब्दाचे रूप संक्षिप्त करण्याची प्रवृत्ति प्रादेशिक भाषेमध्येच असते असे नाही. संस्कृतातहि ती आहे हे आचार्यांनी सत्यभामा - ''भामा'' या शब्दाच्या उदाहरणाने दाखविले आहे. येथील नन्द शब्ददेखील तसेच आनन्द शब्दाचे संक्षिप्त रूप आहे. नर्मदामाई या प्रमाणे प्रेमरूप व आनन्दरूप आहे.

मन्त्रगर्भ रचनेविषयी लिहीत असता श्रीस्वामींच्या श्रीदत्तात्रेय अष्टोत्तरात नामावली स्तोत्रात त्याची परीसीमा आहे हे पूर्वी लक्षात आले नाही. स्तोत्र २४ श्लोकांचे आहे. आणि मन्त्र मात्र १४ आहेत. मनुस्यूतः ह्या स्तोत्रातील शब्दाकडे लक्ष गेले नाही. त्यातील १४ मन्त्र कोणते ते पुढीलप्रमाणे -

१) नमो भगवते वासुदेवाय

२) नमो भगवते रुद्राय

३) गं. ह्रीं इत्येष सत्स्तवः (इत्यादी फलश्रुतीचा संपूर्ण २४ वा श्लोक)

४) तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात् । (चवथे अक्षर)

५) दिगम्बराय विद्महे अवधूताय धीमहि तन्नो दत्तः प्रचोदयात् । (नववे अक्षर)

६) नारायणाय विद्महे वासुदेवाय धीमहि तन्नो विष्णुः प्रचोदयात् (बारावे अक्षर)

७) नमो भगवते आञ्जनेयाय महाबलाय स्वाहा । (सतरावे अक्षर)

८) रां रामाय नमः । (सतरावे अक्षर)

९) तमेवैकं जानथात्मानमन्या वाचो विमुञ्चथामृतस्यैष सेतुः । (विसावे अक्षर)

१०) ऐं. ह्रीं क्लीं चामुण्डायै विच्चे । पंचविसावे अक्षर

११) द्रां दत्तात्रेयाय नमः । पंचविसावे अक्षर

१२) ॐ नमः शिवायः । पंचविसावे अक्षर

१३) ओ श्रावय, अस्तु वौषट्, यज, ये यजामहे (हे श्रौतकर्मातील व षटकाराचे मन्त्र आहेत.

१४) तत्त्वमसि, खं ब्रह्म, ही महावाक्ये

मंत्राचा हा लेखाजोखा पाहिल्यानंतर किती कठीण मार्ग लिल्या महाराज चालू शकत होते हे दिसून येते. पंचवीस श्लोकांत १४ मन्त्र ही अद्‌भुत गोष्ट आहे. दैवी शक्ति असल्याशिवाय अशी रचना होणे शक्य नाही. विशेषतः 'तमेवैकं जानथ आत्मानमन्या वाचो विमुञ्चथामृतस्यैष सेतुः) हा मुण्डकोपनिषदातील मन्त्र साऱ्या स्तोत्राला व्यापून आहे. दत्तपुराणात महाराज म्हणतात,

***मंत्रा विशेषे करून । गुफजे औपनिषदज्ञान***
***त्याकरिता हे लेखन । करवी अभिनंदन कृपाळू ॥***

श्रीदत्तमाहात्म्य ५१.१०६

उपनिषदात आलेला आशय सगुण दत्तात्रेयापेक्षा वेगळा नाही. हे 'तमेवैकं जानथ' हे वाक्य दत्तात्रेयअष्टोत्तर शतनामस्तोत्रात गुंफून महाराजांनी निर्गुण, सगुणाचे ऐक्य दर्शविले आहे. 'नरा दत्तगुरु हे परब्रह्म आहे' हा श्रीस्वामींचा रोकडा प्रत्यय होता. तो त्यांना भाविकांप्रती संक्रांत करावयाचा होता. 'तमेवैकं जानथ' हा मन्त्र स्तोत्रभर खिळवून श्रीमहाराजांना ते सिद्ध करायचे होते. मन्त्राची गुंफण हा हेतू स्पष्ट दिसतो. परंतु त्यासोबत सगुण, निर्गुण, ऐक्याची संकल्पनाही या स्तोत्रात श्रीस्वामींना राबवायची आहे व तिचेही महत्त्व मन्त्रगर्भ रचनेइतकेच महत्त्वाचे आहे.

नर्मदास्तुतीमध्ये नर्मदेची चाळीसावर विशेषणे केवळ आठ श्लोकांत श्रीस्वामींनी घातली आहेत. त्यातील साधारणपणे निम्म्या विशेषणांचाच वर्गीकरण करून इथे विचार केला. इतर विशेषणे यापैकी कोणत्यातरी एका वर्गात घालून अभ्यासकांना विचार करता येईल.

याप्रमाणे मंत्रगर्भ नर्मदास्तुतीत चित्रित केलेले नर्मदामाईचे रूप पाहूनच पुढे नर्मदालहरी भाविकाने वाचायला हातात घ्यावी. संस्कृतात कधी कधी एका श्लोकात अन्वय पूर्ण होत नाही. त्यासाठी दोन, तीन किंवा पाच श्लोकापर्यंत पोचावे लागते. इथेसुद्धा तसेच काहीसे मानावे. नर्मदामाईची समग्र-मूर्ति नर्मदास्तुति व नर्मदालहरी या दोन काव्यांमिळून साकारते, असेच श्रीस्वामींना अभिप्रेत दिसते. ''जय जय शिवकन्ये'' हा जयजयकार दोन्ही स्तोत्रात एकच ठेवण्यात याहून दुसरी कोणती भूमिका असू शकेल ?

**नर्मदा लहरी**

(प. प. श्रीवासुदेवानन्द सरस्वती महाराज विरचित)

**समीक्षक डॉ. मु. बा. पिंपळापुरे, नागपूर.**


## ऋणनिर्देश

*आमचे हितचिंतक व जाहिरातदार अक्षता कलेक्शन व अक्षता साडी सेंटर यांचे संस्थापक श्री. मदनलालजी अग्रवाल व श्रीमती सुभद्रादेवी अग्रवाल या उभयतांचे दि. २-३-२००४ रोजी दुःखद निधन झाले. त्यासाठ्या वतीने त्यांच्या पवित्र स्मृतीस अभिवादन !*



# परमपूज्य श्रीवासुदेवानंद सरस्वती टेंबेस्वामीकृत स्तोत्रादि संग्रह

**डॉ. श्रीमती कमलताई वैद्य**

*प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींच्या अंतरंग शिष्या. पति निधनानंतर मॅट्रीकपासून एम.ए.पीएच.डी. पर्यंत शिक्षण 'एकनाथी भागवतावरील प्रबंधास' वाङ्मय चर्चा मंडळ बेळगावचे पारितोषिक. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती व गोस्वामी तुलसीदास ही चरित्रात्मक पुस्तके प्रकाशित.*

परम गुरुभक्त पूज्य श्री. वामन दत्तात्रेय गुळवणी ऊर्फ श्रीगुळवणी महाराज यांनी दिनांक २३ जून १९५२ मध्ये हा ग्रंथ प्रथम प्रकाशित केला. श्रीवासुदेवानंद ग्रंथ प्रकाशन मंडळातर्फे पू. टेंबेस्वामी महाराजांचा 'शिक्षा-त्रय हा ग्रंथ प्रथम पुष्प म्हणून प्रकाशित झाल्यानंतर दोन वर्षाच्या आतच द्वितीय-पुष्प म्हणून या ग्रंथाचे प्रकाशन झाले. यांत एकूण पृष्ठ संख्या ४२६ असून काव्य संख्या ४१३ आहे. यांत एकूण पंधरा विभाग आहेत. या सर्वांग सुंदर ग्रंथाचा निदान स्थूल परिचय तरी वाचकांना करून द्यावा या उद्देशाने हा लेख लिहिला आहे. कारण याची महती इतकी आहे की लिहावे तेवढे थोडेच होईल. शिंपीमध्ये सागर साठवावा तसाच हा प्रयत्न आहे. असे कळते की अलीकडे या ग्रंथाची नवीन आवृत्तीही निघाली आहे. तेव्हा हा लेख वाचून त्या ग्रंथाकडे वाचक आकृष्ट व्हावेत एवढी माफक अपेक्षा करावयास हरकत नाही.

**पहिला विभाग** 'श्रीगणेश स्तोत्राणि' हा असून यात चार स्तोत्रे असून सर्व संस्कृत आहेत. पहिले श्रीविनायक स्तोत्र यांत आद्याक्षरे वाचत गेले की 'वासुदेवानंद सरस्वतीकृत विनायक स्तोत्र मिदं समंत्रकं' अशी माहिती मिळते. सर्वच स्तोत्रे वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

**दुसरा विभाग** 'श्रीसरस्वती स्तोत्राणि' यांत दोन स्तोत्रे असून तीही संस्कृतच आहेत. त्यांत सरस्वतीने आपल्या जिव्हाग्रे वसती करावी अशी प्रार्थना महाराजांनी केली आहे. त्यांची स्तोत्रे वाचली की त्यांच्या जिव्हाग्रावर शारदा खरोखरच वसत होती याबद्दल खात्री पटते.

**तिसरा विभाग** पंचायतन महात्म्यानि यांत ६ स्तोत्रे सर्व संस्कृत असून गणेशाचे एक, सूर्याची २, शंकराचे एक, शक्तीचे एक व विष्णूचे एक याप्रमाणे स्तोत्रे असून यावरून श्रीमहाराजांना पंचायतन पूजेबद्दल किती आदर होता याची कल्पना येते. नंतर **चौथा विभाग** 'श्रीशंकर स्तोत्राणि' (क्रमांक १३ ते ३१) यांत एकूण १९ स्तोत्रे आहेत. यात अनादि कल्पेश्वर, मृत्युंजय मंत्रगर्भित स्तोत्र, द्वर्थि रामेश्वर व द्वर्थि षडानन स्तोत्र ही वैशिष्ट्यपूर्ण असून याच विभागात श्रीशंकराचार्य स्तुति आणि श्रीचिदंबर दीक्षित स्तोत्र या शंकरांच्या अवतारांचीही स्तुति केली आहे. तसेच धान्यवाडिका क्षेत्र माहात्म्य आणि वरदा नदीच्या तीरावरील मधुकेश्वराची स्तुति अंतर्भूत असून 'शबर प्रसाद वर्णनम्' यात शिवभक्त शबराची कथा वर्णन केली आहे. ताज्या चिताभस्मासाठी या भक्ताने स्वस्त्रीस सदनासह जाळून ते भस्म शिवास चर्चिले तेव्हा शिव प्रसन्न होऊन त्यांनी त्यास दर्शन दिल्याचे वर्णन केले आहे.

यानंतर 'विष्णुस्तोत्राणि' हा **पाचवा विभाग** येतो. यांत १५ स्तोत्रे आहेत. यांत लक्ष्मीनारायण, दशावतार, नरसिंह, परशुराम, राम, मारुती, श्रीव्यंकटेश, रामकृष्ण चरित्र, श्री मुरलीधर गोपाल अशी विष्णूच्या अवतारांची स्तोत्रेही अंतर्भूत आहेत. यानंतर **सहावा विभाग** 'देवी स्तोत्राणि' यात रेणुका, तुळजापूरवासिनी, अन्नपूर्णा, देवी, अनसूया आणि सरस्वती या सर्व देवतांच्या स्तोत्रांचा उल्लेख आहे.

**सातवा विभाग** 'गंगादितीर्थक्षेत्रस्तोत्राणि' हा असून यांत ४१ स्तोत्रे असून गंगा, यमुना, सरस्वती, गोदावरी, श्रीनर्मदा, क्षिप्रा, वेत्रवती, पयोष्णि, तापी, वेण्या, तुंगभद्रा, चंद्रभागा, श्रीकृष्णानदी, कृष्णा पंचगंगा संगम, वेदगंगा, हिरण्यकेशी, मळप्रभा, घटप्रभा, विश्वामित्री, बाहुदा. करतोया, भार्गवी, पिनाकिनी, कावेरी इत्यादी भारतातील जवळ जवळ सुप्रसिद्ध अशा बहुतेक नद्यांच्या देवतांची स्तुति केलेली आढळते. पू. महाराजांनी सर्व तीर्थक्षेत्रांची पायी यात्रा केली व त्यावेळी त्या त्या ठिकाणी त्या त्या नद्यांच्या देवतांचे साक्षात् दर्शन त्यांना झाले व त्यांनी प्रेमाने त्यांची स्तुति केली असे त्यांच्या चरित्रांतील उल्लेखावरून दिसते. श्रीनर्मदा लहरी यांत (२७ श्लोक संख्या) व श्रीकृष्णालहरी (५३ श्लोक) ही दोन्ही दीर्घ काव्ये असून या दोन्ही नद्यांबद्दल श्रीमहाराजांना विशेष आत्मीयता म्हणा अथवा प्रेमादर वाटत होता हे चरित्रावरूनही जाणवते. विसाव्या शतकातही देवतांचा साक्षात्कार होऊ शकतो हेच यावरून सिद्ध होते. मात्र श्रीमहाराजांसारख्या अलौकिक व्यक्तिच्या बाबतीतच हे संभाव्य आहे. या खेरीज याच विभागात सप्तपुरी व्यंकटेश्वर, कालहस्ति, शिवविष्णुकांची, पक्षितीर्थ, चिदंबर क्षेत्र, अरुणाचल इत्यादी क्षेत्रांतील देवतांची ही स्तुति केलेली असून शिवाय ज्ञानतीर्थ, श्रीसद्गुरु तीर्थ, नृसिंहवाडीजवळील अष्टतीर्थे, नरसिंह वाटिका वर्णन यांचाही अंतर्भाव आहे. ही सर्व स्तोत्रे अत्यंत मधुर आणि भावपूर्ण असून संस्कृतमध्येच रचना केलेली आहे.

यानंतर **आठवा विभाग** वेदान्त स्तोत्रांचा आहे. यांत वेदान्तपर रामायणम्, वेदान्तपर भागवतम्, वेदान्तपर त्रिवेणी, मानसपूजा, ब्रह्मसूत्रम् आणि षट्पंचारिका अशी सहा स्तोत्रे आहेत. **नववा विभाग** श्रीदत्तात्रेय स्तोत्रांचा असून यांत (क्रमांक १०० ते १४४) अशी एकूण ४५ स्तोत्रे आहेत. यांत श्रीदत्तात्रेयांबरोबरच त्यांचे श्रीपाद श्रीवल्लभ आणि श्रीनृसिंह सरस्वती या अवतारांचीही स्तोत्रे आहेत. दोन श्रीदत्तात्रेय अष्टोत्तर शतनाम स्तोत्रे असून दत्तभक्त अलर्क, आयुराजा, सहस्त्रार्जुन यांनी केलेल्या स्तुतिही दिल्या आहेत. औदुंबर पादुका स्तोत्र, श्रीनृसिंह वाडी पादुकाष्टक व श्रीनृसिंह सरस्वती स्तोत्रम् वगैरे स्तोत्रावरून ही स्थाने श्रीमहाराजांना किती प्रिय होती याची कल्पना येते. श्रीदत्तात्रेय प्रार्थनास्तोत्रम्

*''श्रीपाद श्रीवल्लभ त्वं सदैव । श्री दत्तास्मान्पाहि देवाधि देव ॥*
*भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते । घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥'*

हे स्तोत्र अत्यंत लोकप्रिय असून अनेक दत्तभक्तांच्या नित्य उपासनेत याचा अंतर्भाव असल्याचे आढळते.

अद्वैतमालामन्त्रः हे स्तोत्रही महत्त्वपूर्ण असून याच्या पठनाने बाह्य व अंतः शत्रू (कामक्रोधादि विकार) यांचे उच्चाटण, मारण होते असे वर्णिले आहे. नक्षत्र मालिका स्तोत्रांत भगवान दत्तात्रेयांचा अवतार, त्यांची दिनचर्या, त्यांचे भक्त तसेच त्यांचे श्रीपाद श्रीवल्लभ आणि श्रीनृसिंह सरस्वती हे अवतार यांचे वर्णन २७ नक्षत्र मालिकांत (श्लोकात) केले असून श्रीपाद श्रीवल्लभ यांचा उत्सव अश्विनी कृष्ण द्वादशी (गुरुद्वादशीस) तर श्रीनृसिंह सरस्वतींचा माघ कृष्ण प्रतिपदा (गुरुप्रतिपदेस) होतो असे वर्णिले आहे. श्रीदत्तभावसुधारसस्तोत्रम् नावाप्रमाणे भावमधुर असून यांत ११० श्लोक आहेत.

याच विभागात 'मंत्रात्मक श्लोकाः' यांत बारा श्लोक असून सर्व मंत्रात्मक असून ज्यास जी इच्छा असेल त्याप्रमाणे विशिष्ट श्लोकांचा जप केल्यास ते ते फळ मिळते. उदाहरणार्थ - ''नमस्ते शारदे देवि सरस्वति मतिप्रदे । वस त्वं मम जिव्हाग्रे सर्वविद्याप्रदा भव ॥'' याने विद्याप्राप्ति होते. याशिवाय 'श्रीगुरुचरिताध्यायसारांश श्लोकाः' यांत ५३ श्लोक असून त्या एकेकांत गुरुचरित्रांतील एकेका अध्यायाचा सारांश दिला आहे. 'दकारादि श्रीदत्तसहस्त्रनामस्तोत्रम्' यांत १५९ श्लोकांत 'द' अक्षराने आरंभ होणाऱ्या सहस्त्र दत्तनामांचे संकलन केलेले आहे. याशिवाय श्रीदत्त पुराणातील 'बालाशिष', 'श्रीदत्तात्रेय हृदयं' वगैरे अनेक स्तोत्रे वाचताना मति थक्क होते.

या संबंधी असे सांगतात की चिखलदरा पू. श्रीस्वामीमहाराज चातुर्मासानिमित्त असताना सागरचे श्रीभैय्या शास्त्री यांनी महाराजांना एकदा विचारले की 'आपण एवढे संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत तर आपली श्लोक रचण्याची गती तरी काय आहे ?' हे ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे उत्तर दिले की ''माझ्या उजवीकडे व डावीकडे एकेक असे दोन लिहिणारे बसले व त्यांना आलटून पालटून नवीन श्लोक रचून सांगावयाला लागलो; तरीसुद्धा रचित असलेले श्लोक ते दोघेही लिहून घेऊ शकणार नाहीत.'(१) यावरून आपल्याला कल्पना येईलच.

यानंतरच्या **दहाव्या विभागांत** पृष्ठ १९६ ते २६६ यांत 'श्रीदत्तात्रेय षोडशावतार चरितानि' यांत श्रीदत्तात्रेयांच्या १ योगीराज, २ अत्रिवरद, ३ दत्तात्रेय, ४ कालाग्निशमन, ५ योगीजन वल्लभ, ६ लीलाविश्वंभर, ७ सिद्धराज, ८ ज्ञानसागर, ९ विश्वंभरावधूत, १० मायामुक्तावधूत, ११ मायामुक्तावधूत, १२ आदिगुरुचरित, १३ शिवरूपचरित, १४ श्रीदेवदेवतावतार, १५ दिगंबरावतार (३ अध्याय आहेत) व श्रीकृष्णावतार अशी सोळा अवतारांची चरित्रे संस्कृतमध्ये वर्णिली आहेत. अकरावा श्रीमायायुक्तावधूत अवतार याचे तीन अध्याय आहेत. प्रथम अध्यायात जंभासुर पराजय, दुसऱ्या अध्यायात कार्तवीर्यार्जुन चरित्र आणि तिसऱ्या अध्यायात श्रीपरशुरामानुग्रहाचे वर्णन आले आहे. पंधरावा अवतार श्रीदिगंबरावतार यांत प्रथम अध्यायात यदु-अवधूत संवाद (२४ गुरुंचे निरूपण) दुसऱ्या अध्यायात प्रल्हादास उपदेश आणि तिसऱ्यांत साध्य देवांना केलेला उपदेश आहे. यानंतर संक्षेपाने एकाच स्तोत्रांत एकूण २० श्लोकांत सर्व षोडश अवतारांचे चरित्र वर्णिले आहे. यानंतर या ग्रंथातच पृष्ठ २६६ वर सर्व सोळा अवतारांची नावे, जन्म दिवस अथवा प्राकट्य दिन महिना, पक्ष, तिथि, वार, नक्षत्र, याम, मुहूर्तासह व दाने सर्व कोष्टक रूपाने दिले गेले आहे. ते फारच उपयुक्त आहे.

यानंतर याच विभागांत श्रीसत्यदत्तव्रतपूजा (विधि) आणि श्रीसत्यदत्तव्रतकथा एकूण पांच अध्यायांत दिली आहे. श्रीसत्यनारायण व्रताप्रमाणे दत्तभक्तांमध्ये हे श्रीसत्यदत्तव्रतही अत्यंत लोकप्रिय झाले आहे.

यानंतरचा **अकरावा विभाग** असून त्यांत नित्य उपासना क्रम दिलेला आहे. यांत श्रीदत्तात्रेय प्रातः स्मरण स्तोत्रम्, ३ भूपाळ्या, १ प्रातर्भजन, श्रीदत्तप्रबोधस्तव, काकड आरती आणि भजन यांचा समावेश आहे. 'उठि उठि मुनिनंदना । भक्त पातले दर्शना ।' 'पहांटेसि उठोनि भक्त हर्षुनियां चित्तीं । दत्तगुरुप्रति भेटू येती सहस्त्रादिवरती' (यांत सर्व दत्त भक्तांचा नामोल्लेख आहे.) आणि 'उठि उठि बा आत्मया चिन्मया दत्तात्रेया वगैरे सर्वच भूपाळ्या अत्यंत भावमधुर आहेत. तसेच 'काकडे आरती दत्ता तुजला ओवाळूं । प्रेमभावें तुज चरण हृदयीं कवळूं'' ही काकड आरती वेदान्तपर असूनही हृदयस्पर्शी झाली आहे.

यानंतरचा **बारावा विभाग** 'पूजेनंतरच्या आरत्यांचा आहे. यांत गणपतीची एक आरती, सरस्वतीच्या २ आरत्या, नंतर त्रिपुरसुंदरी, लक्ष्मी, यक्षिणी, रेणुका यांच्या आरत्या आहेत. लक्ष्मीची करवीरपूरवासिनीची आरती अत्यंत भावमधुर झाली आहे. याशिवाय श्रीकृष्णेच्या २ आरत्या नंतर श्रीअनसूयादेवी, नर्मदा, सूर्य यांच्या आरत्या नंतर शंकराच्या ४ आरत्या, १ श्रीविष्णूची, १ श्रीरामाची, १ परशुरामाची, १ पंचायतनाची व दक्षिणा मूर्तीच्या दोन आरत्या व भगवत् पूज्यपाद आचार्यांचीही आरती आहे. नंतर **श्रीगुरुव्यासपीठदेवार्तिक्य** ही सुंदर आरती असून नंतर श्रीमौनी स्वामींची आरती आहे. श्रीदत्ताच्या एकूण ११ आरत्या आहेत. याशिवाय उपनिषदाची, (शिरोळ्या) भोजनपात्राची व भैरवाची आरती देऊन 'वेदान्तपर नीरांजनम्' दिलेले आहे. श्रीदत्तांच्या आरत्यांपैकी 'जय तत्त्वज्ञाननिदान । अनसूयात्रिनंदन । त्वपाद पद्‌मावरून । पंचप्राण ओवाळीन ॥ 'अनसूयानंदना तुज ओवाळूं आरती । - - मज निजचरणीं दे रती ॥ ध्रु.॥ 'आरती ओवाळू, अनसूया तनया दत्तात्रेया' 'करितों प्रेमें तुज निरांजन । स्थिरवुनी या मना ॥' वगैरे खूपच लोकप्रिय असून त्यांची गेयता व भावमधुरता लक्षणीय आहे.

यानंतरच्या **तेराव्या विभागात** आरत्यानंतरच्या प्रार्थनांचा समावेश आहे. यांत अत्यंत लोकप्रिय धावा 'उद्धरि गुरुराया । अनसूया तनया दत्तात्रेया' तसेच (गाणगापुर) गुरुस्तुति 'जो सत्य आहे परिपूर्ण आत्मा – तो पूर्ण आनंद गुरु समर्थ । ही गुरुस्तुती नंतर भामिनी षट्पदी (कर्नाटक वृत्त) आणि कामदा वृत्तांतील श्रीगुरुकरुणाष्टक अत्यंत मधुर भावस्पर्शी व लोकप्रिय 'श्रीगुरोनिराकार निर्गुणा । स्वामि सच्चिदानंद कारणा' हे आले आहे. नंतर कामदा छंदातील श्रीदत्त प्रार्थना लक्षणीय आहे. यांत गुरुचरित्रांतील विविध कथांचे संदर्भ देऊन पूज्य श्रीस्वामीमहाराज म्हणतात की माझ्या दारी घेवड्याचा वेल नाही की दारांत वांझ महिषी नाही किंवा मढे ही वाळत पडलेले नाही, मग हे दत्ता, तू कसा बरे येशील ? मला विद्यामद झालेला नाही किंवा कुणी चोरांनी माझे शिरही कापले नाही पण दिवाळीचा सण जवळ आलेला आहे हे मात्र तुला येण्याला योग्य कारण आहे. पण तुला काहीतरी दिल्याशिवाय तू येत नसशील तर हे सर्वस्वच तुझ्या करी अर्पितो ! दत्ता, तुला माझी आण आहे ! जीवनाविण मीन

तसा मी तळमळत आहे तेव्हा कीर्तनी मला पाऊले दाखवा !"

यांत श्रीदत्त दिनचर्या (पृष्ठ ३१६) वर्णिली आहे. यांत श्रीदत्त कधी योगी, कधी भोगी, कधी नग्न, पिशाच्चसे दिसतात असे म्हटले असून ते काशीत स्नान करतात, गाणगापुरी ध्यान, कुरुक्षेत्री आचमन, तर धोपेश्वरी विलेपन करतात. करहाडात संध्या तर कोल्हापूरी भिक्षा घेऊन सारापुरी भक्षण करतात व पंढरपुरात सुगंध सेवन करतात. सायं संध्या पश्चिमसागरी करतात आणि सह्याद्रि शिखरी राहून माहूरपुरी निजतात. पण वास्तविक तो दत्त सर्वदा चित्तगत चित्रांत असतो आणि स्मरतांक्षणी भेट देतो असे म्हटले आहे.

नंतर श्रीदत्ताष्टक व श्रीगंगाष्टकम् यांत श्रीमहाराजांच्या ठिकाणी असलेल्या विनयाची परमावधि झाल्याचे आढळून येते. 'न जाणे मी धर्मा नच विहित कर्मा अवगमा ।। न जाणे मी शर्मा न च विहित आधार महिमा ।। कुकर्मासी कामाकुलित कृतकर्माचि सुभगे । मला तारी गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ।।' अशी एकापेक्षा एक सरस कडवी वाचताना डोळे पाझरू लागतात ! काय आणि किती वर्णावे ? यानंतर श्रीमत् सौभाग्य सुंदरी स्तोत्र, श्रीरेणुकास्तोत्र, त्रिपुरान्तक स्तोत्र अशी तीन स्तोत्रे आहेत नंतर नित्य भजन क्रम यांत प्रथम पंचपदी आणि नंतर अभंग आहेत. यांत करुणरस ओतप्रोत भरला असून दत्ताची करुणा भाकली आहे. 'पाही मजकडे, बापा येई कडे । बालक मी वेडे रडे पुढें ।।' 'आतां वाटे लाज किती पाहूं वाट । उपेक्षिसी मज आज तूं कां ? असे एकापेक्षा एक सरस अभंग आहेत.

काही अभंगातून कवी मोरोपंताची आठवण व्हावी अशी संशयरत्न मालाच प्रगटली आहे ! 'दत्ता, तू का बरे येत नाहीस ? धोपेश्वरी भस्मलेपन करण्यात गुंतला आहेस की कोल्हापूरी भिक्षा घेत आहेस की पंढरीत सुगंध सेवीत आहेस ? किंवा कार्तवीर्य अर्जुन दर्शनास आला आहे की यदू, अलर्क, प्रल्हाद यांच्यापैकी कुणी आला आहे ? किंवा अनघा मायेने कुठे जाता म्हणून विचारले म्हणून दुःशकून मानून येत नाहीस ? दुसरे भक्त आले असतील तर त्यांच्यासाठी दुसरा अवतार घ्यावा ! असे करण्यास आपल्याला उशीर थोडाच लागणार आहे ! वगैरे सर्वच भाव हृदयद्रावक आहेत. 'हे दत्ता कृपावंता, तुला किती बाहू ? तू आला नाही तर दुर्जन हासतील हे लांछन कुणास लागेल बरे ?'

याच विभागात एक अभंग आहे त्याच्यासंबंधी असे वर्णन चरित्रांत आले आहे की श्रीस्वामी महाराजांजवळ एक दत्तमूर्ती द्विभुज, एकमुखी, पंचधातुची प्रवासात नित्य असे. एकदा नर्मदाकिनारी चिखलदा येथे दीपावलीच्या आदल्या दिवशी दत्तप्रभूंनी सांगितले की दीपावलीस अभ्यंग स्नान पाहिजे ! तेव्हा महाराज म्हणाले की मी आपल्याला आधीच सांगितले आहे की मजबरोबर राहावयाचे असेल तर गार पाण्याने स्नान व भस्मलेपन याशिवाय अन्य उपचार करणे मला जमणार नाही ! मग आता हा हट्ट का ? श्रीमहाराजांनी दीपावलीसही गार पाण्याने स्नान घालून भस्म चर्चून मूर्ती जागेवर ठेवली. नंतर भिक्षा आणून नैवेद्य दाखवावा म्हणून तेथे आले तर मूर्ती जागेवर नाही ! तेव्हा मात्र कळले की स्वारी रूसली आहे. भिक्षा तेथेच ठेवून धावत नदीकाठी आले तर पात्रातून लहान मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. म्हणून लगेच पात्रात उडी घेऊन आवाजाच्या दिशेने पोहत निघाले तर एका ठिकाणी प्रकाश दिसला व मूर्तीही दिसली ! लगेच हृदयाशी धरून परत प्रवाहाबाहेर आले ! तोपर्यंत भक्त मंडळी नदीकाठी जमा झाली होती; की एकदम महाराज परत नदीकाठी का आले ? नाईलाजाने महाराजांना झालेली हकिगत सर्वांना सांगावी लागली ! लगेच भक्तांनी सर्व साहित्य आणले व पू. महाराजांनी प्रभूंना अभ्यंग स्नान घालून थाटाने महापूजा केली. त्या वेळी त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहत होत्या व पुढील ओळी मुखांतून बाहेर पडल्या !

*"मित्र मित्र जरि भांडती । तरी पुनः एक होती ।।१*
*दंपतीचा हो कलह । लवमात्र न तुटे स्नेह ।।२।।*
*देवभक्तांचे भांडणें । परभक्तीचें ते ठाणें ।।३।।*
*वासु म्हणे हा विनोद । देतो दत्ता परानंद ।।४।।*

याच विभागांत 'दिगंबरा दिगंबरा । श्रीपादवल्लभ दिगंबरा' हे सुप्रसिद्ध भजनही दिले आहे. यावरून याचे प्रवर्तक श्रीस्वामीमहाराजच असावे असे वाटते.

नंतरच्या **चौदाव्या विभागांत** रविवार पासून क्रमाने सातही वारांची पदे व अभंग देण्यात आले आहेत. शनिवारच्या अभंगात आत्मारामाची स्वानुभूति सीता राजस अहंकाराने हरून गेली आहे. तिच्या सुटकेसाठी साधन सेतु बांधावा, विवेक हनुमंताने लिंग देह रुपी लंका जाळवी व आत्मारामास स्वानुभूति सीता प्राप्त करून द्यावी असे रूपक केले आहे. संतमहिमा मध्ये 'सदा संतापाशीं जावे । त्यांच्या जवळी बैसावे ।। उपदेश ते न देती । तरी ऐकाव्या त्या गोष्टी' त्या गोष्टी म्हणजेच उपदेश मानावा म्हणजे कष्ट नष्ट होतील असा उपदेश केला आहे.

याच विभागात श्रीनृसिंह सरस्वती स्वामींनी केलेली श्रीवासुदेवानंद सरस्वती यांची आरती व त्यांनीच केलेले गुरुस्तोत्रही दिले आहे. नंतर श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी रचित 'भावें नमूं श्रीगुरुच्या पदासी' तसेच 'तापत्रयानें मम देह तापला ही स्तोत्रे व 'शांत हो श्रीगुरुदत्ता । मम चित्ता शमवी आतां ।। २. 'श्रीगुरुदत्ता जय भगवंता ३. जय करुणाघन निजजनजीवनही करुणात्रिपदी दिली आहे. महाराष्ट्राच्या बाहेरही श्रीदत्तस्थानांत ही म्हटली जाते. यानंतर अनेक सुंदर सुंदर अभंग आहेत. किती वर्णन करणार ?

नंतर १५ व्या विभागांत 'पदसमूह' आहे. यांत प्रथम गणपतीची अनेक पदे व नंतर श्रीगणपतीचे ध्यान, आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, चंदन, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, तांबूल, प्रदक्षिणा, नमस्कार, प्रार्थना अशी पूजेतील सर्व उपचाराची पदे येतात. नंतर जगदंबा, श्री अनूसया, देवीची ३, नर्मदेचे १, गंगेचे १, एकादशीचे १, अनादि कल्पेश्वरचे १, पतिव्रतेचे १, महादेवांची ४-५ पदे असून मुरलीधर, राम, मारुती, बालाजी, खंडोबा, नृसिंह, केशव, अग्नी, श्रीपाद श्रीवल्लभ यांची एकेक व दत्तात्रेयांची अनेक पदे आहेत. 'गीत जोगी' हे पद विशेष लक्षणीय आहे.

पद क्रमांक ३८५ मध्ये श्रीदत्तांचा धावा केला असून तेथेही दत्त अजून का बरे येत नाहीत म्हणून संशय रत्नमाला प्रकट केली आहे. यानंतर श्रीदत्तांचे ५/६ पाळणे व 'ये बा दत्ता धांवोनी । मनोजवावरी बैसोनी' तसेच 'कृष्णातीरीच्या वसणाऱ्या ये औदुंबरी बसणाऱ्या' यासारखी मनोहरी भजने दिली आहेत तसेच वेदांतपर स्नानादिकांची पंचपदी वैशिष्ट्यपूर्ण आहे.

यानंतर वेदान्त स्तोत्रांत वेदांत निरूपण गुरुशिष्यसंवाद रूपाने केले आहे. परा पूजा, नवरत्नमाला, चित्तसद्बोध नक्षत्रमाला २७ कडवी

'कुसंगाश्रयें बा स्वयें आत्मघात ।' याने सुरुवात होणारे यांत आपल्याच चित्रास बोध केला आहे. 'आत्मानात्मविचार'चे दोन भाग आहेत. पहिल्यांत १०१ आणि उत्तर भागांत ४२ काव्यसंख्या आहे. यानंतर गुरुमातेने कन्येस (अविवाहीत) केलेला उपदेश व विवाहीत कन्या दीपावलीस माहेरी गुरुमातेजवळ आली असता तिला केलेला उपदेश आहे. यांत एकनाथ महाराजांप्रमाणे दुष्ट बुद्धि सासू, मोह तो सासरा, तामस अहंकार हा रागीट भर्तार वगैरे रूपक केले आहे. यानंतर ब्रह्मचिंतन हे काव्य असून 'ऐतरेयभावार्थरूप' अभंगाचे ३२ गुच्छ सादर केले आहेत व मलप्रभेची आरती व मंगेचे भजन याने ग्रंथाची इतिश्री झाली आहे.

याप्रमाणे या ग्रंथाचा स्थूल परिचय करून देण्याचा प्रयत्न यथामति गुरुप्रेरणेने या लेखांत केला गेला आहे. सूर्याला काडवातीने ओवाळण्यासारखाच हा प्रयत्न असून या निमित्ताने या अनुपम काव्यसंग्रहाचा रसास्वाद घेण्याची सुसंधि प्राप्त झाली हा एक प्रकारे श्रीस्वामी महाराजांचा कृपानुग्रहच झाला आहे ! वाचकही ईश्वररूपच असल्याने सेवा गोड मानून घेतील अशी खात्री आहे.

हरिः ॐ तत् सत्

**डॉ. श्री. कमलताई बा. वैद्य**
उपप्राध्यापक निवास, ब्लॉक नं. ५, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,
मिरज ४१६४१०. फोन नंबर (०२३३) २२३१३२९

---

पुढील पानावर या श्लोकांतील शब्द व अक्षरे सुट्टी करून तक्त्यामध्ये दिलेली आहेत.
त्यांतील सुट्टी अक्षरे एका खाली एक याप्रमाणे उभी वाचत गेल्यास १४ मंत्र तयार होतात.

श्रीदत्तात्रेयाष्टोत्तरशतनामस्तोत्रम्

ॐकारतत्त्वरूपाय दिव्यज्ञानात्मने नमः ।
नमोतीतमहाधाम्न ऐन्द्रयृध्या ओजसे नमः ॥१॥

नष्टमत्सरगम्यायागम्याचारात्मवर्त्मने ।
मोचितामेध्यकृतये ह्रींबीजश्राणितश्रिये ॥२॥

मोहादिविभ्रमान्ताय बहुकायधराय च ।
[redacted] ॥३॥

भवहेतुविनाशाय राजच्छोणाधराय च ।
गतिप्रकंपितांडाय चारुव्यायतबाहवे ॥४॥

गतगर्वप्रियायास्तु यमादियतचेतसे ।
वशिताजातवश्याय मुण्डिने अनसूयवे ॥५॥

वदद्वरेण्यवाग्जालाविस्पृष्टविविधात्मने ।
तपोधनप्रसन्नायेडापतिस्तुतकीर्तये ॥६॥

तेजोमण्यन्तरङ्गायाद्मरसद्मविहापने ।
आंतरस्थानसंस्थायायैश्वर्यश्रौतगीतये ॥७॥

वातादिभययुग्भावहेतवे हेतुहेतवे ।
जगदात्मात्मभूताय विद्विषत्षट्कघातिने ॥८॥

सुरवर्गोध्दृते भूत्या असुरावासभेदिने ।
नेत्रे च नयनाक्ष्णेऽचिच्वंतनाय महात्मने ॥९॥

देवाधिदेवदेवाय वसुधासुरपालिने ।
याजिनामग्रगण्याय द्रांबीजजपतुष्टये ॥१०॥

वासनावनदावाय धूलियुग्वेहसालिने ।
यतिसंन्यासिगतये दत्तात्रेयेति संविदे ॥११॥

यजनास्यभुजेऽजाय तारकावासगामिने ।
महाजवास्पृग्रूपायात्ताकाराय विरूपिणे ॥१२॥

नराय धीप्रदीपाय यशस्वियशसे नमः ।
हारिणे चोज्ज्वलांगायात्रेस्तनूजाय शंभवे ॥१३॥

मोचितामरसंघाय धीमतां धीकराय च ।
बलिष्ठविप्रलभ्याय यागहोमप्रियाय च ॥१४॥

भजन्महिमविख्यात्रेऽमरारिमहिमच्छिदे ।
लाभाय मुंडिपूज्याय यमिने हेममालिने ॥१५॥

गतोपाधिव्याधये च हिरण्याहितकांतये ।
यतीन्द्रचर्या दधते नरभावौषधाय च ॥१६॥

वरिष्ठयोगिपूज्याय तंतुसंतन्वते नमः ।
स्वात्मगाथासुतीर्थाय मःश्रिये षट्कराय च ॥१७॥

तेजोमयोत्तमांगाय नोदनानोधकर्मणे ।
हान्याप्तिमृतिविज्ञात्र ॐकारितसुभक्तये ॥१८॥

रुक्शुङ्मनःस्वेदहते दर्शनाविषयात्मने ।
रांकवाततवस्त्राय नरतत्त्वप्रकाशिने ॥१९॥

द्रावितप्रणताघायात्तःस्वजिष्णुःस्वराशये ।
राजत्त्र्यास्यैकरूपाय मःस्थाय मसुबंधवे ॥२०॥

यतये चोदनातीत प्रचारप्रभवे नमः ।
मानरोषविहीनाय शिष्यसंसिद्धिकारिणे ॥२१॥

गंत्रे पादविहीनाय चोदनाचोदितात्मने ।
यवीयसेऽलर्कदुःखवारिणेऽखंडितात्मने ॥२२॥

ह्रींबीजायार्जुनेष्टाय दर्शनादर्शितात्मने ।
नतिसंतुष्टचित्ताय यतिने ब्रह्मचारिणे ॥२३॥

इत्येष सत्सवो वृत्तोयात् कं देयात्प्रजापिने ।
मस्करीशो मनुस्यूतः परब्रह्मपदप्रदः ॥२४॥

श्री. प. प.श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचित
मंत्रगर्भश्रीदत्तात्रेयाष्टोत्तरशतनामस्तोत्रम् संपूर्णम् ॥

●●●

# ॥ मन्त्रगर्भ श्रीदत्तात्रेयाष्टोत्तरशतनामस्तोत्रम् ॥

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ॐ | कार | त | त्वरूपाय | दि | व्य ज्ञा | ना | त्मने नमः | न | भोती | त | महाधाम्न | ऐं | द्र ध्यां | ओ | जसे नमः ॥ | १ |
| न | ष्टम | त्स | रगम्याया | गं | म्याचा | रा | त्मवर्त्मने | मो | चिता | मे | ध्यकृतये | ऱ्हीं | बीज | श्रा | णितश्रिये ॥ | २ |
| मो | हादि | वि | भ्रमान्ताय | ब | हुकृ | य | धरायच | भ | क्त दुर् | वै | भवच्छेत्रे | क्लीं | बीज | व | रजापिने ॥ | ३ |
| भ | वहे | तु | विनाशाय | रा | जच्छो | णा | धरायच | ग | तिप्र | कं | पितांडाय | चा | रुव्या | य | तबाहवे ॥ | ४ |
| ग | तग | र्व | प्रियायास्तु | य | मादि | य | तचेतसे | ब | शिता | जा | तवश्याय | मुं | डिने | अ | नसूयवे ॥ | ५ |
| व | दद्व | रे | ण्यवाग्जाला | वि | स्पष्ट | वि | विधात्मने | त | पोध | न | प्रसन्नाये | डा | पति | स्तु | तकीर्तये ॥ | ६ |
| ते | जोम | ण्यं | तरज्ञाया | ध्र | रस | ध्र | विहपिने | आं | तरस् | था | न संस्थाया | ये | धर्य | श्रौ | तगीतये ॥ | ७ |
| वा | तादि | भ | यघुग्भाव | हे | तवे | हे | तुहेतवे | ज | गदा | त्मा | त्मभूताय | वि | द्विषत् | षट् | कधातिने ॥ | ८ |
| सु | रव | र्गो | त्पृते भूत्या | अ | सुरा | वा | सभेदिने | ने | त्रे च | न | नयनाक्ष्णेचि | चो | तना | य | महात्मने ॥ | ९ |
| दे | वाधि | दे | वदेवाय | व | सुधा | सु | रपालिने | या | जिना | म | ग्रगण्याय | द्रां | बीज | ज | पतुष्टये ॥ | १० |
| वा | सना | व | नदावाय | धू | लियुग् | दे | हमालिने | य | तिस | न्या | सितगये | द | त्तात्रे | य | ति संविदे ॥ | ११ |
| य | जना | स्य | भुजेऽजाय | ता | रका | वा | सगामिने | म | हाज | वा | स्पृग्रूपाया | त्ता | कारा | य | विरूपिणे ॥ | १२ |
| न. | राय | धी | प्रदीपाय | य | शखि | य | शसे नमः | हा | रिणे | चो | ज्वलांगाया | त्रे | स्तनू | जा | य शंभवे ॥ | १३ |
| मो | चिता | म | रसंघाय | धी | मतां | धी | करायच | ब | लिङ्ग | वि | प्रलम्भ्याय | या | गहो | म | प्रियाय च ॥ | १४ |
| भ | जन्म | हि | मविख्यात्रे | म | रारि | म | हिमाच्छिदे | ला | भाय | मुं | डिपूज्याय | य | मिने | हे | ममालिने ॥ | १५ |
| ग | तोपा | धि | व्याधये च | हि | रण्या | हि | तकान्तये | य | तींद्र | च | र्यां दधते | न | रभा | वौ | षधाय च ॥ | १६ |
| व | रिष्ठ | यो | गिपूज्याय | तं | तुं सं | त | न्वते नमः | स्वा | त्मगा | था | सुतीर्थाय | मः | श्रिये | षट् | कराय च ॥ | १७ |
| ते | जोम | यो | तमाश्राय | नो | दना | नो | द्यकर्मणे | हा | न्याप्ति | मृ | तिविज्ञात्र | ॐ | कारि | त | सुभक्तये ॥ | १८ |
| रु | कूशुष्म | नः | खेदहृते | द | र्शना | वि | षयात्मने | रां | कवा | त | त वस्त्राय | न | रत | त्व | प्रकाशिने ॥ | १९ |
| द्रा | वित | प्र | णतापाया | त्तः | स्वजि | ष्णु: | स्वराशये | रा | जत्या | स्यै | करूपाय | म | 'स्थाय | म | सुबंधये ॥ | २० |
| य | तये | चो | दनातीत | प्र | चार | प्र | भवे नमः | मा | नरो | ष | विहीनाय | शि | ष्यसं | सि | द्धिकारिणे ॥ | २१ |
| गं | त्रे पा | द | विहीनाय | चो | दना | चो | दितात्मने | य | वीय | से | ऽलर्कदुःख | वा | रिणेऽ | खं | डितात्मने ॥ | २२ |
| ऱ्हीं | बीजा | या | र्जुनेष्टाय | द | र्शना | द | र्शितात्मने | न | तिसं | तु | ष्टचित्ताय | य | तये | ब्र | ह्मचारिणे ॥ | २३ |
| इ | त्येष स | त् | स्तवोवृत्तो | यात् | कंदे | यात् | प्रजापिने | मः | स्करी | शो | मनुस्यूतः | प | र ब्र | ह्म | पदप्रदः ॥ | २४ |

इति श्रीमत्परमहंस प. वासुदेवानन्दसरस्वतीकृत मन्त्रगर्भश्रीदत्तात्रेयाष्टोत्तरशतनामस्तोत्रम् ॥



# श्री वासुदेवानंद सरस्वती यांची पत्रे

**वासुदेव गोविंद चोरघडे**

*एम.ए. भाग १, संस्कृत व दर्शन शास्त्राचे अध्ययन, हिंदी भाषेच्या प्राज्ञ आदि परिक्षा उत्तीर्ण. ज्येष्ठ लेखाधिकारी (डाक लेखा) निवृत्त ११ पुस्तके प्रकाशित, २५ ग्रंथांना प्रस्तावना, अनेक पुस्तकांची परिक्षणे. नियतकालिक व वर्तमानपत्रांतून अध्यात्म व इतर विषयांवर विपुल लेखन. आकाशवाणी नागपूर केन्द्रावर अनेक व्याख्याने. आध्यात्मिक ग्रंथांवर नागपूर, बडोदा, पवनार आदि ठिकाणी अध्यात्मिक विषयांवर भाषणे. परिसंवाद, चर्चाशिबीरे यांतून सहभाग, नियमित प्रवचन सेवा. अध्यक्ष भागवत सेवासमिती, अध्यक्ष अ. भा. केन्द्रीय निवृत्त कर्मचारी संघटना, अध्यक्ष ज्येष्ठ नागरीक मंडळ (प.) नागपूर. विविध संस्थांशी संबंध.*

श्री परमहंस परिव्राजकाचार्य वासुदेवानंद सरस्वती यांची पुण्यतिथी आषाढ प्रतिपदेला अनेक ठिकाणी साजरी होते. नागपूर-विदर्भ परिसरात हा उत्सव काही ठिकाणी मोठ्या प्रमाणावर होत असतो. श्री टेंबे स्वामी यांचा कालखंड १३.८.१८५४ ते २४.६.१९१४ जन्मस्थान माणगाव (सावंतवाडी) आणि समाधी गरूडेश्वरी (बडोदा). त्यांनी साठ वर्षाच्या काळात केलेली पदयात्रा आणि प्रचंड ग्रंथरचना हाच एक चमत्कार आहे. या काळात नागपूर - विदर्भाशी त्यांचा संबंध आला. इथे त्यांनी काही काळ घालविला. पवनी मुक्कामी इ.स. १९०९ साली त्यांचा चातुर्मास घडला होता. याच काळात त्यांच्या अनुग्रहाचा, सहवासाचा अनेकांना लाभ झाला. त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन अनेकांनी आपले जीवन सार्थकी लावले.

वासुदेवानंद सरस्वतींची ग्रंथरचना प्रचंड आहे. संस्कृत व मराठीतील त्यांच्या ग्रंथरचनेचा विस्तार पाहिला, त्यातील वेदोपनिषदातील किंवा अन्य शास्त्रातील संदर्भ पाहिले म्हणजे कोणत्याही अभ्यासकाला आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही. अपरिग्रहाचे व्रत कठोरपणे सांभाळीत असताना हे सगळे संदर्भ देणे कसे शक्य झाले असावे, याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाही. आपल्याहातून झालेली ग्रंथरचना ही श्री दत्तप्रभूच्या आज्ञेने झाली असे ते म्हणतात. अपरिग्रहाच्या काळात स्वतःजवळ दौत व टाक बाळगायचा ते अपवाद करीत असे म्हणतात. कोणत्यावेळी व कोणत्या ठिकाणी ही आज्ञा होईल याचा नेम नसायचा. ही प्रचंड ग्रंथरचना प्रकाशात आणण्याचे कार्य काही वर्षांपूर्वी श्री गुळवणी महाराज पुणे यांनी केले. त्यानंतर काही व्यक्तींनी व संस्थांनीही त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध केले. तरीही त्यांचे काही ग्रंथ उपलब्ध नाहीत. काही अप्रकाशितही असावेत.

त्यांच्या अप्रकाशित वाङ्मयाचा महत्त्वाचा भाग म्हणजे त्यांनी लिहिलेली पत्रे, इतरांना सुचविलेले उपासनेचे मार्ग, मंत्रांचे कागद, वेळीच करून दिलेली स्तोत्रे. मंत्रांचे कागद काहींनी आजही कित्येकांनी पैतृक धनाचा वारसा म्हणून जपलेली आहे.

या पत्रांतून ज्ञान-कर्म-उपासना या संबंधी नेमके विवेचन, विविध विषयावरील मार्गदर्शन, प्रापंचिक दुःख मुक्तीचे उपाय, तर आहेतच पण त्याहीपेक्षा महत्वाची गोष्ट म्हणजे या चार-चार ओळींच्या पत्रांनी अनेक सामान्य साधकातून 'निश्चयाचे महामेरू' निर्माण केले आहेत. आयुष्यातील अनेक दुःखाच्या प्रसंगी विपरीत परिस्थितीतही निश्चल आणि शांत असणारे, विपत्तीला धैर्याने तोंड देणारे आणि कटाक्षाने आपला आचार सांभाळणारे धृतिमान साधक निर्माण केले आहेत. या शतकाच्या सुरवातीचा काळ असुरक्षिततेचा होता. प्लेगसारख्या व्याधींनी लोक मृत्युमुखी पडत होते. रोग, दारिद्र्य, अज्ञान यांने व्यापलेले होते. या काळात आपल्या वाट्याला आलेले कर्तव्य चोखपणे बजावणारी, समाधानी, साधक मंडळी निर्माण करण्यात या पत्रांचा महत्त्वाचा वाटा आहे. आज संपन्नता, सुरक्षितता असेल पण समाधान कुठेतरी हरवले आहे. हव्यास वाढलेला आहे. आपण दुबळे असलो, दरिद्री असलो तरी ईश्वराचे आहोत आणि 'गरूडाचिया पिलयासी । सर्प तो कवणेपरी ग्रासी' हा गुरुचरित्रातील आत्मविश्वास या साधक मंडळींचा होता. एका साधकाकडे असलेल्या स्वामींच्या पत्रातील मजकूर असा....

**श्री दत्त**

गोविंद व प्रल्हाद यासी,

नारायण पत्र पावले. परमेश्वरावर निष्ठा ठेऊन सत्कर्म करणे सप्रवृत्त व्हावे. परमेश्वर घडवील कळावे. परमेश्वर भजनी सादर राहावे-नारायण.

आपण ईश्वराचे प्रतिनिधी म्हणून वावरतो आहोत, असा त्यांच्या शिष्यांचा व्यवहार होता. स्वतःच्या जमाखर्चाच्या वहीवर "श्री कुलदैवताचे वतीने ... अमुक ... अशीही नोंद ठेवणारे स्वामींचे काही अनुग्रहित शिष्य होते - सत्कर्म करणे आपल्या स्वाधीन आहे. उगवायचे केव्हा हे कर्मबीजांनी ठरवायचे असते, अशी श्रद्धा असलेली ही मंडळी नागपूर-विदर्भाच्या परिसरात होती. त्यांना वेळोवेळी प्रेरणा देणारी पत्रे अत्यंत उद्बोधक आणि सूत्ररूप आहेत. त्यात अनेक विषय हाताळले गेले आहेत.

स्वामींनी एका पत्रात दिनचर्याच लिहून कळविली आहे. त्या पत्राचे शेवटी ते लिहितात - "मी अत्यंत कूटस्थ, साक्षी, निर्विकार आहे अशी पुनः पुनः भावना करावी- त्रिविध ताप दुःख कोणी छळ केल्यास विषाद मानू नये... जडभार देवावर घालू नये, असे वागावे" - स्वतः सांसारिक असून त्यांचा गृहस्थाश्रम कसा अनासक्त होता याचा प्रत्यय देणारे हे गंगाखेडवरून ६ जून १८९१ ला लिहिलेले पत्र (वैशाख वद्य ३० शके १९१३) - 'श्री चे आज्ञेने उत्तरखेडी जाणे होत असता वै. कृ. १४ शुक्रवारी सौभाग्यवतीस देवाज्ञा झाली. यावर आता भेट होणे प्रारब्धाधीन आहे. परंतु सदैव चरण-कमल हृदयी ठेविले आहे'...

श्री उकिडवे यांना लिहिलेल्या एका पत्रात तर सूत्ररूपाने तत्त्वबोधच उतरला आहे. चित्तात राग, द्वेष, काम, क्रोध, लोभ, मोह, ईर्षा, असूया, दंभ, अहंकार, इच्छा, भक्ती आणि श्रद्धा इत्यादि ज्या वृत्ती निर्माण होतात

त्यातील क्लेशकारक वृत्तीचा उपशम कसा करावा याचे विवेचन पत्रात आहे. थोडक्यात, मत्सर, संतोषाने, ईर्ष्या-तितिक्षेने, असूया-समाधानाने, दंभ-सत्याने, दर्प-सुजनपणाने, स्वमताग्रह-विवेकाने दूर करून संत समागमाने - सत्पुरूष गुरूविषयी श्रद्धा वाढवावी, श्रद्धा - निष्कामसेवेत वाढवावी असा या पत्राचा सारांश आहे.

दि. २३ सप्टें. १८९७ च्या पत्रात कष्टदायक अनुभवामुळे ईश्वरश्रद्धा विचलित होऊ देऊ नये हे सांगताना ते लिहितात, 'बदली झाल्याने गैरसोय झाली असेल परंतु प्रभुसत्ता जशी असेल तसे घडणारच. अंतरातील देवाची बदली न झाली म्हणजे पुरे... (गुजरात) येथून १२ जानेवारी १८९९ रोजी लिहिलेल्या ज्योतिष विषयक मार्गदर्शन असलेल्या पत्रात लिहितात - 'ज्योतिषशास्त्री प्रारब्ध्यापेक्षा प्रयत्न विशेष मानला आहे.' द्वारकेहून २१-१०-१८९९ ला लिहिलेल्या पत्रात गुजराथेतील त्यावेळच्या स्थितीचे वर्णन आहे... झाडावर पान नाही... दिवसानुदिवस फार महागाई होत आहे. गोरगरिबांना गायकवाड सरकारपासून खायला मिळाल्यामुळे या दिवसपर्यंत वाचले... एका परगणेत ही तऱ्हा असे आणखी परगणे बरेच आहेत. काय होईल ते ईश्वर जाणे... लोक पोरांसाठी नवस करीत व ढोरांची चोरीही करीत. तर तेच लोक पोरे ढोरे शहरात सोडून निष्ठूरपणे जातात... हा एक तमाशा निर्विकारत्व साक्षीपणे पाहात पर्यटन करावे... हे ही दोन दिवस आहेत.... दिनरात्री न्यायाने निघोन जातील"

काही पत्रातून वैद्यक शास्त्रासंबंधी मार्गदर्शन आहे. औषध योजना सुचविली आहे. पवनीहून २४-९-१९०९ रोजी बडोदे येथील प्रकाशकार शास्त्र्यांना ते लिहितात, 'अवश्य भावी घडते त्याचा खेद करू नये, अप्रार्थित दुःख नवे येते तसे सुखही देते - दुसऱ्या एका पत्रात १९१३ साली ते कळवितात... प्राप्त झालेले दुःख सहन करणेकरिता विचार करावा - दुःखाचा कोणी भागी नसतो. तथापि, उपयातिक्रम करू नये.'

विविध विषयांच्या अनुभवाचे भांडारच या पत्रात भरलेले आहे. अशी अनेक पत्रे अनेकांच्या संग्रही असतील. काही स्तोत्रे किंवा स्वामींनी करून दिलेली टिपणे असतीलच. ठिकठिकाणी होणाऱ्या या उत्सवाचे निमित्ताने ती एकत्र करता आली तर उपकारकच ठरेल. श्री टेंबेस्वामी कृत 'अज्ञानतिमिर दीपक' नावाचा १९१६ साली छापला गेलेला एक संस्कृत ग्रंथ नुकताच पाहण्यात आला. स्वामींच्या नावाने असलेल्या ग्रंथात त्याचा अन्यत्र उल्लेखही नाही. तेव्हा अशा ग्रंथाचे त्यांच्या अन्य अप्रकाशित वाङ्मयाचे ह्या उत्सवांचे निमित्ताने परिशीलन होणे सर्वांना लाभदायक होईल. पुण्य स्मरणाच्या पर्वकाळी स्वामींना विनम्र अभिवादन.

**श्री. वासुदेव गोविंद बोरघडे**
१६२ शिवकृपा, अभ्यंकर नगर, नागपूर.

**आजि आनंद आनंद । मनी भरला पूर्णानंद ।**
**वाचे बोलता तो नये । बुद्धी बोध स्तब्ध राहे ।**
**नित्यानंद सद्गुरु कृपा । पाहता हरल्या जन्मखेपा ।**

## ग्रंथ निर्मिती स्थळे

| | | | |
|---|---|---|---|
| १. | दत्तपुराण (संस्कृत ग्रंथ) | ब्रह्मावर्त | उ. प्र. |
| २. | गंगेची स्तुती (५ श्लोक) | हरिद्वार | उ. प्र. |
| ३. | नर्मदा स्तुती, नर्मदा लहरी | नेमावर | म. प्र. |
| ४. | दत्त लीलामृत प्राकृत | पेटलावद | म. प्र. |
| ५. | अभंग - मित्र मित्र भांडती | चिखलदरा | म. प्र. |
| ६. | कूर्म पुराण (देवनागरीत) | तिलकवाडा | गुजरात |
| ७. | अनसूया स्तोत्र व पद | अत्रि आश्रम | गुजरात |
| ८. | द्विसाहस्त्री गुरुचरित्र टीका अध्याय ९ | प्रभासपट्टन | गुजरात |
| ९. | द्विसाहस्त्री गुरुचरित्र टीका अध्याय १० नंतर | द्वारका | गुजरात |
| १०. | गुरुचरित्रावर चूर्णिका | द्वारका | गुजरात |
| ११. | सिद्ध सरस्वती स्तुती | सिद्धपूर | गुजरात |
| १२. | कृष्णावेणी पंचगंगा स्त्रोत स्तोत्र | मंडलेश्वर | म. प्र. |
| १३. | वेद स्तुती व ब्रह्मस्तुती | मंडलेश्वर | म. प्र. |
| १४. | दत्त महात्म्य व त्रिशती गुरुचरित्र | महत्पूर | म. प्र. |
| १५. | समश्लोकी गुरुचरित्र व लघुमनन सार ग्रंथ | ब्रह्मावर्त | उ. प्र. |
| १६. | सप्तशती गुरुचरित्र | ब्रह्मावर्त | उ. प्र. |
| १७. | अखंडआत्मा अविनाशी दत्त स्तोत्र | गाणगापूर | कर्नाटक |
| १८. | कृष्णा लहरीं | गाणगापूर | कर्नाटक |
| १९. | करुणा त्रिपदी व दत्तचंपू | नरसी | महाराष्ट्र |
| २०. | साकारता तारका स्तोत्र | बडवाह | म. प्र. |
| २१. | कुमार शिक्षा | हंपी | कर्नाटक |
| २२. | समश्लोकी चरित्रावर चूर्णिका | तंजावर | तामिलनाडू |
| २३. | कृष्णा लहरीवर संस्कृत टीका | तंजावर | तामिलनाडू |
| २४. | युवा शिक्षा, वृद्ध शिक्षा, स्त्री शिक्षा | मुक्त्याला | आंध्रप्रदेश |
| २५. | गोदावरी स्तुती | सप्तगोदावरी | आंध्रप्रदेश |
| २६. | वैनगंगा स्तोत्र | पवनी | महाराष्ट्र |
| २७. | भूतपिशाच्च स्तोत्र | गुर्लहोसूर | कर्नाटक |
| २८. | तुंगभद्रा स्तुती, त्रिपुरान्तकेश्वर स्तोत्र | हावनूर | कर्नाटक |
| २९. | षट्पंचशिका वेदान्तपर स्तोत्र | हरीहर | कर्नाटक |
| ३०. | दत्त महात्मन स्तोत्र | कुरवपूर | कर्नाटक |
| ३१. | श्रीपाद श्री वल्लभ स्तोत्र | कुरवपुर | कर्नाटक |
| | उमरेडकर नाईक यांना यंत्र करून दिले | कुरवपूर | कर्नाटक |
| ३२. | जगदंबा स्तुती | तुळजापूर | महाराष्ट्र |



# स्वामी महाराजांच्या वाङ्मय सृष्टीतील काही विहंगम स्थळे


**डॉ. प्रदीप तराणेकर**

*M.Sc (Geo) Ph. D. (Env Geo) FGGs FmGs. वर्तमान वैदिक विज्ञान व पर्यावरण शोध परिषद, पुणे, प्रमुख अखिल भारतीय त्रिपदी परिवार कार्यकारी प्रमुख जागतिक मराठी ॲकॅडमी मध्यप्रांत विभाग — जनरल सेक्रेटरी वैदिक ते पर्यावरण मानसशास्त्रांचा सखोल अभ्यास गेली २५ वर्षे कार्यरत व विविध सेमिनार मध्ये भाग. सूर संजिवनी संगितोपचार कार्यक्रमाची विशेष दखल व कौतुक १०० च्यावर लेख प्रकाशित ३ पुस्तके प्रकाशित व ५ ऑडियो कॅसेट.*


*''जो शब्दज्ञाने पारंगत, ब्रह्मानंदी सदा डुल्लत,*
*शिष्य प्रबोधनी समर्थ, तोचि श्रीमंत सद्गुरु ॥'' - श्रीमद्*

भागवतातील एकादश स्कंदावरील या प्रसिद्ध टीकाग्रंथात एकनाथ महाराजांनी सद्गुरुची अशी व्याख्या केली आहे. या ओवीत विशेषतः जो शब्दज्ञाने पारंगत असे विशेषण सद्गुरुस लावले आहे त्याचाच संदर्भ फक्त या लेखात घेतला आहे. ह्या न्यायाने जगद्गुरु श्रीआद्यशंकराचार्यांची तुलना करताना त्यांच्या वाङ्मयासारखे तुल्यबल संस्कृत भक्तिवाङ्मय हे श्री. प. पू. वासुदेवानंदसरस्वती टेंबे स्वामी महाराज यांचेच असल्याचे दिसून येते असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. किंबहुना श्रुतिस्मृति पुराणोक्त म्हणून ज्या अध्यात्मिक व धार्मिक वाङ्मयाचे आपण नित्य परिशीलन करीत असतो त्या वाङ्मयकर्त्या ऋषींच्या बरोबरीने संहिता, सूत्र, पुराण, व्रतवैकल्य व स्तोत्रमंत्रांची दैवीरचना थोरल्या महाराजांनी म्हणजे श्रीमद् वासुदेवानंद सरस्वतींनी केलेल्या आहेत हे पाहून शोधकर्ते स्तिमित होतात.

मराठी साहित्यात मराठी व ग्रंथांच्या अनुषंगाने काही प्रमाणात प्रासादिक संस्कृत रचना करणाऱ्या लोकोत्तर विभूति सगळ्यांना ज्ञात आहेत. पण केवळ पाठवाचन केल्याने फलप्रद होणाऱ्या दैवी प्रासादिक रचना आणि थोरल्या स्वामी महाराजांनी केलेल्या दैवी, मंत्रगर्भ, अर्थगर्भ, रससिद्ध आणि विविध अलंकारांनी गुंफलेल्या रचनांमधील फरक हा प्रत्यक्ष अभ्यास करणाऱ्यांना सहज लक्षात येतो. किंबहुना काही ठिकाणी तर ह्या रचनांची कवी कालीदास वा तत्सम कवी यांच्याशी तुलना करण्याचा मोह आवरता येत नाही. अशा ह्या अद्भुत वाङ्मयसृष्टीचे सम्यक दर्शन हे ह्या ठिकाणी थोडे कठीण आहे. पण सहज पांथस्थ दृष्टीने ह्या वाङ्मयसृष्टीत फेरफटका मारताना केवळ नजरेच्या टप्प्यात आलेल्या काही विहंगम स्थळांचा परिचय करून देण्याचा प्रयत्न या लेखात केलेला आहे, ज्यामुळे मूळ ग्रंथरचना वाचण्याचा मोह निर्माण व्हावा.

महापुरुषांच्या वाङ्मयाचे एक वैशिष्ट्य असे असते की त्यांचे वाङ्मय हे सिद्धावस्थेतील अमृतधारेप्रमाणे सामान्यांच्या उपकारासाठी प्रगट झालेले असते. 'बोली अरुपाचे रूप' दर्शविण्याची ग्वाही देणारे असते. वाङ्मयाचे विविधबंध वा शास्त्रांच्या चौकटीतून त्यांचा अभ्यास करणाऱ्यांना जे वेगळेपण त्यांत दिसून येते ते असते, त्या वाङ्मयाला लाभलेला ईशस्पर्श. त्यामुळेच ते अलौकिक ठरते. प. पू. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या वाङ्मयनिर्मितीचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे कुठलेही संदर्भग्रंथ जवळ नसताना संन्यास धर्माचे काटेकोरपणे पालन करून सततच्या पायी प्रवासात नित्यनैमित्तिक साधना करून त्यातून मिळणाऱ्या वेळात आहे त्या स्थितीत (शारीरिक) जिथे असतील तिथे उपलब्ध सामुग्रीच्याद्वारे अद्भुत ग्रंथनिर्मिती. 'कर्ता करविता दत्त' अशी त्यांनी स्वतः ग्वाही दिली आहे. उदा. द्विसाहस्त्री श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ. याचे वैशिष्ट्य म्हणजे टीका लिहिताना मूळ ग्रंथ महाराजांजवळ नव्हता. नुसत्या स्मृतिवर हे ग्रंथलेखन केले आहे. साडेसात हजार ओव्यांचे संपूर्ण गुरुचरित्र दोन हजार संस्कृत श्लोकात आणलेले आहे व यावर चूर्णिका नावाची संस्कृत गद्य टीका लिहिली आहे ती पण तितकीच उत्कृष्ट आहे. महाराज पूर्वाश्रमी माणगावी असताना श्री दत्तप्रभूंनी संस्कृत गुरुचरित्र लिहिण्याची आज्ञा केली. त्या वेळी शके १८०६ (सन १८८४) मध्ये ग्रंथ तयार झाल्यावर संहितेयं द्विसाहस्त्री असे देवांनी सांगितले. दत्तप्रभुंच्या या वाक्याचा संबंध या ग्रंथाशी असावा असे वाटून महाराजांनी या ग्रंथाचे श्लोक मोजले पण संख्या पूर्ण होईना. मग सप्तशतीप्रमाणे उवाच् मंत्र, काही अर्धश्लोकात्मक मंत्र अशा रीतीने गणना केल्यावर 'संहितेय द्विसाहस्त्री' या देवांच्या सांगण्याचे रहस्य महाराजांच्या लक्षात येऊन त्यांना आनंद वाटला. ह्या प्रमाणे देवांनीच ग्रंथाचे नामकरण केले. हा ग्रंथ निर्माण झाल्यावर तब्बल पंधरा वर्षांनी म्हणजे शके १८२१ (सन १८९९) मध्ये ह्यावर संस्कृत टीका प्रभासपट्टण व द्वारका येथे मिळून महाराजांनी पूर्ण केली, व ही टीका मूळग्रंथ समोर नसताना झाली हे सर्वश्रुत आहे. या टीका ग्रंथांत स्वामींनी जागोजागी पूर्व ग्रंथांतील वचने उद्धृत केली आहेत. विविध प्रकारच्या ह्या संदर्भवचन ग्रंथांची संख्या जवळ जवळ १७० पर्यंत येते. ही सर्व संदर्भ वचने स्मरणाधारे दिलेली आहेत. कारण ह्या वचनांचे पाठ प्रचलीत वा उपलब्ध पाठांहून अनेकदा वेगळे आढळतात. विशेषतः उपनिषदे व शांकरभाष्य ह्या बाबतीत ही पाठभिन्नता दिसून येते. याचे वैशिष्ट्य म्हणजे संदर्भग्रंथ जवळ नसताना लोकोत्तर स्मरणशक्तीच्याच आधारे ग्रंथांची नेमकी उदाहरणे उद्धृत केलेली आढळून येतात.

दुसरे उदाहरण म्हणजे महाराजांनी चंपुवाङ्मयात टाकलेली मोलाची भर. महाराजांनी १९०५ साली २१ व्या चातुर्मासी नरसी ह्या गावी ३५१ श्लोकांचे काव्य, गद्य व पद्य ह्यांचे मिश्रण असलेला दत्तचंपू हा ग्रंथ लिहिला आणि संस्कृत वाङ्मयातील एक वेगळा प्रकार हाताळला. दत्तप्रभूंच्या लीलांचे वर्णन करताना आणि धर्मशास्त्र व वेदांताची चर्चा करताना महाराजांनी केलेल्या अलंकाराचे व व्युत्पत्तीशास्त्रांचे प्रयोग हे सहज

कालीदासाच्या साहित्याची आठवण करून देणारे आहेत. व्युत्पत्ती देणे हा विशेष प्रकार असून उदरमंत्र, कृषाकपी बंधु, अक्षयग शांती, दत्तप्रभूंचे वर्णन करताना आनंदकंद, विपत्र, सदकासहना इत्यादी सुंदर अर्थ व व्युत्पत्ती दिल्या आहेत. भगवत्गीता व मुंडकोपनिषद यांचा प्रभाव या ग्रंथावर दिसून येतो. शब्दरचनेत वैशिष्ट्य पाहताना 'हतास्मि दिष्ट (ष्टात) भ्रष्टात्पा रुष्ट एव मे स्मरहा । शरणम् क्वापी न शिष्टं ग्रष्टं कष्टं परं वरं वरणम्' ही रचना किंवा ''पुत्रन्यस्त्रभरोऽप्यलर्क उदरामंत्रो वनं पावनं'' ही शब्दरचना पाहताच किंवा 'अनन्यगति चातकं धनइहाभि वर्षत्यलं तथापि सकलासुधापरितृत्पयेऽलं जलं'' ही रचना पाहताच ग्रंथकाराच्या भाषाशैलीची सखोल व्याप्ती दिसून येते. चंपू वाङ्मय हा भाषाशैली व शास्त्राचा एक अतिशय अवघड प्रकार असून फार कमी लोक ह्याच्या वाटेला जातात. अशा क्षेत्रांत दत्तप्रभूंच्या लीलांचे वर्णन करताना वेदांताधारे आदर्श योग्याचे वर्णन, गृहस्थाश्रम धर्मातील अडचणी व आत्मज्ञानाने प्रकाश हा सिद्धांत महाराजांनी ह्या दत्तचंपूतील तीन स्तबकांद्वारे वा पुष्पगुच्छांद्वारे अतिशय उत्कृष्टपणे ग्रंथाद्वारे मांडला आहे.

महाराजांच्या वाङ्मय वैशिष्ट्याचे आणखी एक उदाहरण म्हणजे त्यांनी दत्तसंप्रदायिकांच्यासाठी, भक्तांसाठी व संशोधकांसाठी निर्माण करून ठेवलेला दत्तपुराण हा ग्रंथ होय. श्रीमहाराजांनी हा संस्कृत ग्रंथ १८९२ साली गंगातीरावर ब्रह्मावर्तक्षेत्री लिहिला व त्यावरील संस्कृत टीका सरस्वती तीरावर सिद्धाश्रमक्षेत्री लिहिली. ही दोन्ही कार्ये दत्तमहाराजांनी स्वतः प्रेरणा देऊन आपणाकडून करवून घेतली असे स्वामी महाराजांनी अन्य ग्रंथात उद्‌धृत केले आहे. ऋग्वेद संहितेची रचना डोळ्यासमोर ठेऊन चौसष्ट अध्याय व आठ अष्टके यांत वर्गीकरण करून महाराजांनी ह्या अद्‌भुत पुराणाची रचना केली. वेगवेगळ्या पुराण व उपपुराण ह्यातून भगवान दत्तात्रेयांच्या कथालीला व श्रुतिस्मृति, वेदांत शास्त्रांतील विविध विषय ह्याद्वारे संकलीतपणे ह्या ग्रंथाद्वारे मांडले. हे करीत असताना वेदांतील कठीण शब्दांचे अर्थ त्यांनी उघड करून अद्‌भुत अशी काही मूलऋचांचे तर काही शब्द स्वतःचे अशी गुंफण करून मंत्रात्मक श्लोकांची निर्मिती केली. थोडे विस्तृतपणे पाहिले तर अष्टक व अध्याय पहिला याचे नाव वेदपाद स्तुती असे आहे. ह्या अध्यायात ६८ श्लोक आहेत. आरंभीच्या पांच श्लोकात 'अग्नी मिळे, अयं देवाय, एताया, अयवा, प्रमन्महे' या आरंभी असलेल्या ऋग्वेद संहितच्या अध्याय १, २, ३, ४, ५ यांतील मंत्रचरणांचा उल्लेख जसा आहे तसाच केला आहे. नंतरचा चरण मात्र स्वरचित आहे. म्हणजे चरणाचा पूर्वार्ध ऋग्वेदातील ऋचेचे शब्द व उत्तरार्धात स्वतःला अभिप्रेत असणारे प्रबोधक शब्द अशी विलक्षण रचना दिसून येते. श्लोक ६५, ६६, ६७ यांचा आरंभ अनुक्रमानुसार इतर तीन वेदांच्या ऋचांप्रमाणे करून उत्तरार्ध रचना स्वकृत आहे. उदा. : 'अग्नी मिळे परं देवं, यज्ञस्य त्वां त्रधिश्वरम्' हे शब्द पहा अथवा 'शन्नो देवी प्रसादात्ते संतु धीवृत्तयोऽनिशम' ही रचना पहा. ह्यावरूनच महाराजांचे मंत्रगर्भ श्लोकरचनेचे अद्‌भुत रचनाकौशल्य दिसून येते. ह्या विशिष्ट ग्रंथात सम्यकपणे १०८ दत्तात्रेयांची नावे आलेली आहेत. त्यांत काही पूर्वापार रूढ असलेली तर काहींची नव्याने निर्मिती केलेली आढळते. गीतेचा प्रभाव दर्शविणारी रचना 'कर्ता विकर्ता दाताहं भोक्ताच सुखदुःखयो' किंवा नाविद्यात् कुतो भेदः केन योगः परात्मनः' असे प्रयोग दिसून येतात. तृतीय अष्टकातील सप्तम अध्यायाच्या शेवटचे काही श्लोक संक्षेपाने गर्भोपनिषदाची आठवण करून देते, तर सप्तम अष्टकातील चतुर्थोध्याय हा स्मृतीसंग्रह दर्शविणारा आहे. ह्यातूनच श्रीस्वामीमहाराजांची सिद्धप्रज्ञा प्रगट झालेली आहे.

महाराजांच्या वाङ्मय सृष्टीतील एक वैशिष्ट्यपूर्ण स्थळ म्हणजे 'समश्लोकी गुरुचरित्र' हा ग्रंथराज. समश्लोकी गुरुचरित्र हे मराठी भाषेतील गुरुचरित्राचाच संस्कृतमध्ये केलेला अनुवाद आहे. मराठी भाषा सर्व प्रांतातील लोकांना समजणार नाही म्हणून ह्या संस्कृत गुरुचरित्राची रचना केली आहे असे ह्या ग्रंथाच्या प्रास्ताविकात श्रीमहाराजांनी सांगितले आहे. 'महाराष्ट्रीय भाषां तु न सर्व विषयोचित्ता । अतः सुगमया देववाच्येदं तन्यते मिदमं ।' मराठी गुरुचरित्र वाचणे, समजणे ज्यांना शक्य नाही त्या विद्वान परप्रांतियांसाठी हे गुरुचरित्राचे सम्यक रूपांतर आहे. गंगा किनारी ब्रह्मावर्तास असताना प्लेगची साथ आली व गांव ओसाड झाले. अशा वेळेस प्रभू आज्ञेप्रमाणे रोज २०० ते २५० श्लोक या प्रमाणे ४० दिवसात हा ६७५० श्लोकांचा ग्रंथ पूर्ण झाला. ह्याप्रमाणे अत्यंत प्रतिकूल परिस्थितित ह्या सिद्धग्रंथाची रचना झाली, जो पुढे इतरांना उपकारक ठरला. मूळ मराठी गुरुचरित्राप्रमाणे ह्या ग्रंथाचेही ५१ अध्याय आहेत. विशेष म्हणजे ह्या ग्रंथातील संस्कृत भाषा रचना अत्यंत सुलभ असल्यामुळे ती सर्वांना समजण्यासारखी आहे. विशेषतः मराठी भाषिक लोकांना, ज्यांना संस्कृत भाषेचा अभ्यास करण्याची इच्छा आहे त्यांना भाषा संवर्धनाच्या दृष्टीने देखील हा ग्रंथ अतिशय उपयुक्त व ज्ञानवृद्धी करणारा आहे. दत्तपुराण व दत्तचंपू ह्या ग्रंथात संस्कृत अलंकार व भाषाशास्त्राचा उत्कृष्ट आविष्कार दर्शविणाऱ्या महाराजांनी ह्या ग्रंथात तितक्याच समर्थपणे सर्व सुलभ, सोपी शब्दरचना करून ह्या ग्रंथाची निर्मिती केली आहे. मराठी भाषेतील म्हणींचे सुंदर, संस्कृत रूपांतर, तर क्वचित सुभाषित वजा वाक्ये ह्या भाषांतरात आलेली आहेत. सर्वपरिचित गुरुचरित्रातील चौदाव्या अध्यायातील एक ओवी, 'गरुडाचिये पिलयासी, सर्प तो कवणे परीग्रासी, गुरुकृपा होय ज्यासी, त्यासी यवन करील काय ॥' ह्याचा संस्कृत अनुवाद समश्लोकीत 'ग्रसिष्यति कथं सर्पो, गरुडस्थार्भकानपि, तथा गुरुकृपायुक्तं यवनः किं करिष्यति ॥' असा दर्शविलेला आहे. ह्यावरूनच महाराजांच्या सहज सुलभ भाषांतर वैशिष्ट्याची कल्पना येईल. 'कारे रजका कोठे अससी' ह्याचे रूपांतर देखील 'रे रजकानुगक्व तिष्ठसि' इतके सुलभपणे केलेले आहे. अशा प्रकारचे सरस्वती गंगाधरांच्या मराठी गुरुचरित्राच्या तोडीस तोड असे संस्कृत रूपांतर, अतिशय अल्पकालावधीत मूळ ग्रंथातील अर्थाला कुठेही धक्का न लागू देता, सुंदर सुलभ भाषेत केलेले हे लेखन महाराजांच्या वाङ्मयीन कौशल्याचे एक कसब म्हणावे लागेल. मराठी ग्रंथाला जगन्मान्य संस्कृत भाषेत पोहोचवून ह्या निमित्ताने या ग्रंथाला मराठी भाषेच्या पलीकडचा अभ्यासक, वाचकवर्ग मिळवून देण्याचे महत्कार्य या ग्रंथाने केले आहे यात शंकाच नाही.

महाराजांच्या वाङ्मय सृष्टीतील अजून एक आगळेवेगळे स्थळ म्हणजे श्रीगुरुचरित्र त्रिशती काव्य हे होय. स्वामींनी गुरुचरित्राचा विषय हाताळताना सर्वच वैशिष्ट्यपूर्ण लेखनाकृतींचा अवलंब केला. त्यांत यमक, अर्थालंकार, अर्थांतरन्यास, अनुप्रास, इ. अलंकार शास्त्रांतील प्रसिद्ध अलंकारांचे मोहक दर्शन घडविले. ह्या विविध अलंकारांचे जणू दालनच त्रिशती काव्यात उघडलेले दिसून येते. उदाहरणादाखल मार्गशिर्ष, सोमवार, पौर्णिमा ह्याचे वर्णन करताना स्वामींनी,

*'मार्गे मार्गप्रदो मार्गशीर्षे ऽ भूच्युत्ति मार्गितः ॥'*

*'सौम्यः सौम्यदिनेः पूर्णः पूर्णमास्या निशामुखे ॥'*

अशी शब्दयोजना केली आहे.

ह्या काव्यमणीहाराचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे महाराजांनी सहजपणे स्तुतीस्तोत्र लिहिताना उपनिषद, ब्रह्मसूत्रे वा गीतेतील महावाक्यांची केलेली पखरण जशी त्यांच्या संपूर्ण वाङ्मयात दिसून येते. त्यातील एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे, 'अणोरणियान् महतोमहियान्' ह्या श्रुतीवाक्याच्या स्तुतीवचनांत केलेला उपयोग होय. त्रिशती काव्याच्या एका श्लोकांत श्रीपाद श्रीवल्लभांची स्तुती करताना, ''अणीरविम्ने महतो महिम्ने, श्रीपादनाम्ने परत्वसीम्ने ।' - अशी शब्दरचना केली आहे. तर पुनरावृत्ती व अर्थांतर यांचा अद्भुत संगम असणारे श्लोक तर ठळकपणे सहजता दिसून येतात. उदा -

*'भक्तोऽभक्तोकरता ऽकरता नमस्ते नमस्ते प्रसीद प्रसी ॥*

*स्मरामी स्मरामित्रपादंत्रपावं न मन्ये त्वदन्योशितारं गुतारम् ॥'*

अथवा

*'वनजतुसतु वनजतु सतु यदि वा सुखरतु सतु नखरतु सतु वा ॥'*

असे अनेक श्लोक मूळ ग्रंथात आहेत ते अभ्यासकांनी जरुर पहावेत. मात्र ह्या त्रिशती काव्याचा कळस म्हणजे ज्याला पंडिती काव्य असेच म्हणतात त्या चित्रकाव्यबंधाचा महाराजांनी सम्यक उपयोग करून प्रदर्शित केलेल्या स्तुतीस्तोत्राचा साहित्यालंकार होय. चंपूकाव्याची अथवा चित्रकाव्याची रचना करताना रचनाकर्त्यांना केवळ अभिनव कल्पनाचातुर्य व शब्दभांडार ह्याचेच सम्यकज्ञान पुरेसे नसून चित्रकाव्य रचताना संस्कृत भाषेतील कोशवाङ्मयावर अमाप प्रभुत्व असावे लागते. किंबहुना बौद्धिक कसरतीच्या बळावर वाचकांना स्तिमित करण्याचे सामर्थ्य चित्रकाव्याच्या कर्त्यास असते अशी संस्कृत चित्रकाव्याची महती आहे. महाराजांनी त्रिशती काव्यात ह्या अद्भुत चित्रकाव्याच्या दोन बंधांचे दर्शन घडविले आहे. ह्यात पहिला बंध हा सर्वतोभद्र बंध आहे. हा त्रिशती काव्यातील १०५ वा श्लोक असून ह्याची लेखनपद्धती सर्वतो भद्र मंडलाप्रमाणे चौकोनी आहे. (सर्वतोभद्र मंडळांत चौसष्ठ घरे दर्शवतात.) त्यातील शब्दरचना येणेप्रमाणे -

।। 'साकारता तारकासा ।।

।। कापिसाररसापिका ।।

।। रसायमेमेयसार ।।

।। तारमेययमेरता ।।'' सहज कुतूहल म्हणून याचे वाचन केले तर साकारता-तारकासा, कपिसार रसापिका, रसायमे मेयसार, तारमेय यमेरता, अशा चार ओळींचा हा श्लोक होय. विशेष म्हणजे ह्या चित्रकाव्यात उजवीकडून डावीकडे, डावीकडून उजवीकडे जरी वाचले तरीही शब्दबोध तोच आहे. आणि उजवीकडून वरून खाली व परत वर तसेच डावीकडून वरूनखाली व परत वर असे वाचले तरीही शब्दात फरक पडत नाही. हेच कर्त्याचे रचना कौशल्य आहे. पण ह्या ठिकाणी कवींनी केवळ अक्षरांचे सर्वतोभद्र मंडळ तयार केलेले नाही. तर ह्या मोजक्याच शब्दातून जो अर्थ प्रगट केला आहे त्यामुळेच ह्या श्लोकाला वैशिष्ट्य प्राप्त झाले आहे. अन्वयार्थाने, 'हे । अमेय । सारतारमेय । तारका सारसापिका साअपि साकारता मे रसाय (भवतु)' असा बोध होतो. भावार्थाने 'प्रत्यक्ष प्रमाणांनी अगम्य असणारा ईश्वर (अमेय) वेदसारभूत प्रणवाच्या उपासनेने गम्य आहे. (सारतारमेय) वेदपुराणांतील प्रसिद्ध दत्तस्वरूपे भवसागरांतून तारणारी (तारका) व भक्तांना आनंद देणारी (सारसापिका) ही सर्व रूपे सगुणरूपे (साकारता) मला परमानंद देवोत (मेरसाय) असा अर्थ स्पष्ट होतो.

तद्वतच ह्याच ग्रंथातील १०६ वा श्लोक हा 'मुरजबंध' ह्या चित्रकाव्य बंधात बांधलेला आहे. तो येणेप्रमाणे -

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | व | रं | श्री | व | रं | वं | दे |
| श्री | व | रं | श्री | क | रं | वं | दे |
| दे | व | रं | श्री | ध | र | सं | तं |
| नृ | व | रं | श्री | प | रं | स | तं - |

अन्वयार्थाने, श्रीवरं देवरं सन्तं सतं नृवरं श्रीपरं अवरं श्रीवरं श्रीकरं श्रीधरं वंदे वंदेच. भावार्थाने - ईश्वर अनेक अवतार धारण करून भक्तांचे अज्ञान दूर करतो व स्वरूपाची प्राप्ती करून देतो. (श्रीवरं देवरं संतं संतं) सारी त्याचीच रूपे असतात आणि त्याच्याहून श्रेष्ठ काही नाही. (नृवरं श्रीपरं अवरं) अशा ब्रह्मा (श्रीकरं) विष्णु (श्रीधरं) व महेश (श्रीवरं) स्वरूपी दत्तात्रेयाला महाराज स्तुतीयुक्त वंदन करतात. (वंदे वदेच) ह्या वैशिष्ट्यपूर्ण चित्र काव्यबंधात रं, श्री, रं या अक्षरांची मालाहाराप्रमाणे बांधणीही पाहणाऱ्यांचे लक्ष वेधून घेते.

महाराजांच्या वाङ्मयभांडारांत मराठी भाषेत ओवीबद्ध केलेल्या स्वकृत ग्रंथांत एखादा संस्कृत श्लोक किंवा ऋचाच नव्हे तर संपूर्ण स्तोत्र सूक्त किंवा उपनिषद ह्यांचेही पठण ग्रंथवाचनाबरोबर व्हावे अशी रचना केलेली दिसते. ह्याचे श्रेष्ठ उदाहरण म्हणजे श्री सप्तशती गुरुचरित्र हा ग्रंथ होय. याला ग्रंथराज म्हणावेसे वाटते कारण त्याद्वारे महाराजांनी सश्रद्ध भाविकांना स्त्रीपुरुष वा ज्ञातीभेद न ठेवताना सर्वकष सोप्या पद्धतीने गुरुचरित्राचे ज्ञानभंडार व फलप्राप्तीची योजना खुली करून दिली. साहित्यिकदृष्ट्या विशेष म्हणजे ह्या ग्रंथातील प्रत्येक ओवीमधील तिसरे अक्षर घेतले तर श्रीमद्भगवद् गीतेचा संपूर्ण पंधरावा अध्याय तयार होतो. हे झाले एक उदाहरण.

दुसरे उदाहरण म्हणजे श्रीदत्तमाहात्म्य हा प्रासादिक वरद ग्रंथ होय. कारण याही ग्रंथाचा सप्ताह वाचन करण्याच्या पद्धतीने काम्यार्थ पाठ करण्याचा प्रघात आहे. ह्या ग्रंथातील काव्यगुण विषयक चर्चा बरीच व्यापक होऊ शकते, पण ग्रंथाच्या त्रेचाळीसाव्या अध्यायातील ९२ व्या ओवीपासून पन्नासाव्या अध्यायातील ७५ व्या ओवीपर्यंत सलगपणे प्रत्येक ओवीच्या तिसऱ्या अक्षरांवर खूण करत गेलो आणि मग ती अक्षरे सलगपणे लिहून काढली तर भद्रं कर्णेभी श्रृणयाम् देवा ह्या शांतीपाठापासून सुरुवात होऊन संपूर्ण ईशावास्य उपनिषद व त्याच्या शेवटी शुक्लयजुर्वेदी शाखेचा शांतीपाठ पूर्ण मंद, पूर्ण मिदं हा संपूर्ण आलेला दिसून येतो. ह्यावरूनच मराठी ओवीतसुद्धा सुप्तमंत्र कसे मालामंत्राप्रमाणे गुंफलेले असतात व त्यामुळे मराठी काव्यसुद्धा कसे मंत्रात्मक ठरते हे कळून येते. यावरून महाराजांच्या अद्भुत वाङ्मय कौशल्याची प्रचिती येते.

ह्या ग्रंथात महाराजांच्या ओघवत्या भाषाशैलीचे आगळे वेगळे दर्शन होते ते त्यांच्या कर्णमधुर मराठी ओवीबद्ध शब्दरचनेमुळे. उदा. -

*जसा कां प्रळयकालीन, उठे सांवर्तक घन,*

*सहाय होतां पवन, करी गर्जना तयांपरी ॥ अ. २०/१४ ओवी*

*राम हा वडवानळ, प्रज्वळता प्रबळ,*

*अर्जुनसैन्यसमुद्र केवळ, जाळीसकळ क्षणार्धे ॥अ.२१/२८ ओवी*

*राम हा अगस्ती क्षोभला, सैन्यसागर शोषिला,*
*रायाचा संशय फिटला, उठला मग तत्क्षणीं ॥ अ. २१/२१ ओवी*

महाराजांच्या ह्या वाङ्मय सृष्टीतील बुद्धीला स्तिमित करणारे एक स्थळ म्हणजे त्यांचा स्तोत्रादि संग्रह. ह्या ग्रंथभांडाराबरोबरच महाराजांनी स्फुट काव्य, स्तोत्रे, पदरचना ह्यांची जी निर्मिती केली तो स्तोत्रादि संग्रह हा एकमेव ग्रंथ देखील त्यांच्या साहित्याच्या उत्तुंगतेची ओळख पटविण्यास समर्थ आहे. स्तोत्रादिसंग्रह हा ग्रंथ म्हणजे महाराजांच्या वाङ्मय प्रतिभेचा व कवित्व कौशल्याचा अभिनव अविष्कार आहे. विविध देवतांची स्तुती, नानाविध तीर्थक्षेत्रे, पवित्र नद्या, ह्यांच्या स्तुतीस्तोत्रांबरोबरच महाराजांनी केलेले आरत्यांपासून, साकी, पाळणा, आर्या, अभंग, भारुडांपर्यंत विविध काव्य प्रकार महाराजांनी ह्यात समर्थपणे हाताळलेले दिसून येतात.

महाराजांचे हे स्फुटस्तोत्र वाङ्मय गेय आहे. महाराजांच्या साहित्य वैशिष्ट्याप्रमाणे बऱ्याचशा स्तोत्रांत त्यांनी महत्त्वाच्या मंत्रांचा (सप्तशती व दत्तमाहात्म्यात वर दाखविल्याप्रमाणे) समावेश केला आहे. गणेश, शिव, अन्नपूर्णा इ. देवतांच्या स्तुतीतील काही अक्षरे ठराविक क्रमाने घेतली असता त्या देवतांचा गायत्री मंत्र तयार होतो. ह्या वैशिष्ट्यपूर्ण स्तोत्र संग्रहातील गणेशदेवतेच्या विविध स्तोत्रांतील विनायक स्तोत्र हे तर अद्‌भुतच म्हणावे लागेल. विनायक स्तोत्रातील प्रत्येक ओळीचे पाचवे अक्षर घेतले तर, 'दत्तात्रेयाय विघ्न हे, अवधूताय धीमहि, तं नो दत्तः प्रचोदयात् ॥' हा दत्तगायत्रीमंत्र तयार होतो. त्याच स्तोत्रातील प्रत्येक ओळीचे बारावे अक्षर घेतले तर ''तत्पुरुषाय विघ्नहे, महादेवाय धीमहि तं नो रुद्रः प्रचोदयात् ॥'' असा शिवगायत्रीमंत्र तयार होतो. नववे अक्षर घेतले तर 'एकदंताय विद्महे, वक्रतुंडाय धीमहि तं नो दंती प्रचोदयात' असा गणेश गायत्रीमंत्र तयार होतो. यापेक्षा अद्‌भुत रचना कौशल्य ते काय असेल ?

ह्या स्वामीमहाराजकृत प्रासादिक स्तोत्र संग्रहाचा मुकुटमणी असे पुराणप्रसिद्ध विष्णुसहस्त्रनामाच्या तोडीचे आणि स्वतःच्या प्रचंड शब्दकोशाचे दर्शन घडविणारे श्री दकारात्मक श्रीदत्त सहस्त्रनामस्तोत्र हे अवलोकन केल्याशिवाय महाराजांच्या वाङ्मय सृष्टीची परिक्रमा पूर्ण होणार नाही. 'पंडितांना भागवतै परिक्षा' अशा न्यायाने भागवतधर्माच्या अभ्यासू पंडितांना, 'विष्णुसहस्त्र नामाचे वैशिष्ट्य व थोरवी सांगावयाची गरज नाही. त्यातील एक हजार नामनिर्देशांद्वारेच व्यासांच्या उत्तुंग कल्पनाशक्तीचे दर्शन होते. त्या धर्तीवर मग पुराण वाङ्मयांत इतर सहस्त्र नामाचे प्रयोग झाले आहेत. पण ते फारसे प्रचलीत नाही. मात्र दकारादी दत्तसहस्त्र नामाचा प्रयोग हा ह्या करिता अभिनव म्हणावा लागेल की केवळ वेगळी सहस्त्रनामे नव्हे तर 'द' ह्याच आद्याक्षराने सुरुवात करून द, दा, दि, दी, दे, दं, दः, ह्या बाराखडीतच नाम कल्पून क्रमशः सहस्त्रनामांचा अविष्कार, लेखन व काव्यसंपादन करण्यात आले आहे. संपूर्ण संस्कृत वाङ्मयात असा प्रयोग अत्यंत दुर्मिळ असा दिसून येतो. ज्यांनी विष्णु सहस्त्रनामांवरची भाष्ये व मोरोपंतांचे अद्‌भुत वेगवेगळ्या रामायण लेखनाचे प्रयोग पाहिले असतील त्यांनाच ह्या विलक्षण शब्द कौशल्याची व शब्दसामर्थ्य शक्तीची जाणीव होऊ शकते. ही जाणीव ज्याला झाली त्याला महाराजांच्या वाङ्मयीन विलक्षण प्रतिभेची आपोआप जाणीव होऊन तो नतमस्तकच होईल. अशी थोरवी ह्या दकारात्मक श्रीदत्त सहस्त्र नामावलीची आहे.

याप्रमाणे श्रीमद्‌वासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी महाराजांच्या वाङ्मय सृष्टीत कुतूहलाने फेरफटका मारताना दृष्टीक्षेपात आली आणि जेवढी प्रज्ञादृष्टीत सामावून घेता आली तेवढीच विहंगम स्थळे वाचकांसमोर ठेवण्याचा हा प्रयत्न आहे. स्वामी महाराज यांनी रचलेले नऊ संस्कृत ग्रंथ, सात मराठी ग्रंथ, चारशेच्या जवळ लहानमोठी स्तोत्रे व पाच हजाराच्या जवळपास पद्य इतक्या विपुल साहित्य भांडारांचा परामर्श घेणे हे एक-दोन ग्रंथांचे वा एकदोन दशकांचेही कार्य नव्हे. तेव्हा एका लेखांत त्याचा अंश तरी कितीसा येणार. पण सूर्यकिरणांच्या एकाच कवडश्यावरून त्याची तेजस्विता व प्रकाश जसा दृष्टीगोचर होतो तसाच हा एक प्रयोग आहे.

म्हणून महाराजांच्याच शब्दात ही वाङ्मदर्शन यात्रा क्षणभर थांबवतो.

भूतदया आणि क्षमा भूषण लेवून.....
करिं धरिं हे सोज्ज्वळ, ।
*मति सोन्याचे ताट । अंतरि धरी ज्ञानेंद्रिय रत्नदीप थाट ।*
*घे सोऽहंभाव ती सोज्ज्वळ आरति । ओवाळी एक भक्ति ।*
*भावाने निगुति । ओवाळणी घे तू विश्व अमोलिक ।....*
*त्रितापवावानल पोळितो मला । दत्ता कृपासाञ्जलि दे नमू तुला ॥*
(दिपावली प्रसंगी मुलीला उपदेश - स्तोत्रादीसंग्रह)
इति शुभम्.

**डॉ. प्रदीप तराणेकर**
८९/९, स्नेहलता गंज, इंदूर (मध्य प्रदेश) फोन : २५४५०२४



## स्वामी महाराजांचे चतुर्मास - '२३ चातुर्मास' पुढे दर्शविलेल्या ठिकाणी झाले

| नं. | इसवी सन | शक | प्रदेशाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | १८९१ | १८१३ | उज्जयनी |
| २ | १८९२ | १८१४ | ब्रह्मावर्त |
| ३ | १८९३ | १८१५ | हिमालयातील पहाडी |
| ४ | १८९४ | १८१६ | मुलूख म्हणजे बदरीनारायण |
| ५ | १८९५ | १८१७ | बदरीकेदार, गंगोत्री, अशा ठिकाणी असावा. खात्रीलायक बातमी मिळत नाही. |
| ६ | १८९६ | १८१८ | हरिद्वार |
| ७ | १८९७ | १८१९ | पेटलाद (मालवा) |
| ८ | १८९८ | १८२० | तिलकवाडा |
| ९ | १८९९ | १८२१ | द्वारका |
| १० | १९०० | १८२२ | चिखलदरा |
| ११ | १९०१ | १८२३ | महतपूर (मालवा) |
| १२ | १९०२ | १८२४ | ब्रह्मावर्त |
| १३ | १९०३ | १८२५ | ब्रह्मावर्त |
| १४ | १९०४ | १८२६ | ब्रह्मावर्त |
| १५ | १९०५ | १८२७ | नरसी |
| १६ | १९०६ | १८२८ | बढवाणी |
| १७ | १९०७ | १८२९ | तंजावर (संध्यामठ) |
| १८ | १९०८ | १८३० | मुक्त्याला (कृष्णातीर) |
| १९ | १९१० | १८३१ | पवनी |
| २० | १९११ | १८३२ | हावनूर |
| २१ | १९१२ | १८३३ | कुरुगड्डी |
| २२ | १९१३ | १८३४ | चिखलदरा |
| २३ | १९१४ | १३३५ | गरुडेश्वर |
| | | १८३६ | समाधि |





# कर्मयोगी - श्री वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज

**श्रीमती सुशिला मोडक**

*एम. ए. बी. एड्. सेवासदन ज्युनिअर कॉलेजमध्ये नोकरी कीर्तन, प्रवचन करतात. श्री वासुदेव निवास (पंचराजसह) अंकाचे संपादकत्व, काही अध्यात्मिक लेख प्रकाशित.*

भारतभूमी ही पुण्यभूमी आहे, कारण ती संतांची भूमी आहे. अनादि काळापासून संत-सत्पुरुष यांची अक्षय्य परंपरा भारतात चालत आलेली आहे. संतांनीच ही संस्कृती वाढविली आणि रक्षण केली.

गेल्या शे-दीडशे वर्षात जीवनाच्या सर्वच क्षेत्रात अशी अवतारी नररत्ने भारतात या काळात प्रगट झाल्याचे आढळते. श्री. प. प. श्री वासुदेवानन्दसरस्वती स्वामी महाराज तथा श्री टेंबेस्वामी महाराज यांचे अवतारकार्यही भारताला ललामभूत, स्वाभिमानास्पद असेच आहे. अशा योगी अवतारी पुरुषांच्या संचाराने सामान्य जनात जीवननिष्ठा बळावते.

सिद्धावस्थेपर्यंत पोचलेल्या कर्मयोगी श्री. प.प. श्री स्वामीमहाराजांचे सामाजिक जीवन जवळून पाहिल्यास त्यांनी सर्व सामाजिक सुखदुःखांचा अनुभव घेतला, एवढेच नव्हे तर त्यांच्या वाट्यास येणारी दुःखेही तीव्र स्वरूपाची असल्याचे काही वेळा दिसून येते आणि ती दुःखे समाजासाठी त्यांनी सोसली.

तुका -

*"तुका म्हणे तोचि संत। सोशी जगाचे आघात॥"*

श्री.प.प. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या जीवनाचे अवलोकन केले असता त्यात निश्चित असे काही भाग पाडावे लागतात.

१) पूर्वभाग - श्री स्वामी महाराजांच्या जीवनाचा अभ्यास त्यांच्या विवाहापर्यंतचा (श. १७९७)

२) तेथून श्री माणगावी दत्तमूर्तीची स्थापना.(श. १८०५)

३) गृहस्थाश्रमाचे आचरणाचा आरंभ व गृहत्याग (श. १८११) त्यालाच जोडून पत्नीचे निधन व संन्यासग्रहण (श. १८१३) आणि अखेर संन्यासी जीवन.

गीतेला जो योग सांगावयाचा आहे तो 'योगः कर्मसु कौशलम्' हाच. कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून कर्म करणे याचा अर्थही कर्ता अंती ब्रह्मरूप होऊन त्याच्या संघाताकडून कर्म घडत राहणे. गीतेला जो संन्यास सांगावयाचा तो हाच. ब्रह्मत्वाला पावल्यावर कर्म टाकून स्वस्थ बसणे ही गीतेची अंतिम ध्येयस्थिती नव्हे. गीता ही दिव्यकर्म करीतच राहावे असा संदेश देणारी आहे असे श्री ज्ञानेश्वरांनी काढलेले गीतेचे सार आहे.

गीतेच्या या वरील तत्त्वाप्रमाणे श्रीस्वामीजींचे जीवन म्हणजे शुद्ध नैष्ठिक आचरण आणि कठोर तपश्चर्या असे आहे. श्री स्वामीजींचे वडील दत्तउपासनेसाठी वारंवार गाणगापुरास जात. त्यामुळे या काळात श्री वासुदेवानंदसरस्वती स्वामींच्या अल्पस्वल्प भिक्षुकीचाच आधार होता. मात्र ही यजमानकृत्ये करताना स्वतःला बंध होणार नाही याचे कटाक्षाने श्री स्वामीजींनी पालन केले. परान्न त्यांनी केव्हाच घेतले नाही. यजमानांचे जे काही कार्य असेल ते यथाशास्त्र करून घरी यावे आणि घरी येऊन स्वहस्ते पाकसिद्धी करून नैवेद्य, वैश्वदेव करून अन्नग्रहण करावे असा श्रीस्वामीजींचा नियम होता. गृहस्थांची श्राद्धादि कोणतीही कार्ये शास्त्रदृष्ट्या निर्हेतुक नसतात. अशा कर्मानंतर आत्मशुद्धीकरता प्रायश्चित्ते सांगितली आहेत. अशा कर्मातही श्री स्वामीजींनी निर्लिप्तत्व राखले, याला त्यांच्या साधनेच्या आणि शास्त्रशुद्ध आचरणाच्या दृष्टीने फार महत्त्व आहे.

*"एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च।*
*कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम्॥१८.६॥*

परंतु हे पार्थ आपली सर्व कर्मे आसक्ति (कर्तृत्वमद) आणि फलेच्छा सोडून केली पाहिजेत असे माझे ठाम व उत्तम मत आहे. (असे समज)

या गीतातत्त्वाप्रमाणे श्री स्वामीजींनी फलाची इच्छा सोडून व देहाचा अहंकार टाकून कर्मे केली आणि श्री भगवान गोपालकृष्णाने सांगितलेल्या गीतातत्त्वाचे अक्षरशः पालन केले. यावरील माउलींचे भाष्य फारच गोड आहे.

*श्री ज्ञानदेव - ऐसी हे हातवटी। घेऊनि जे क्रिया उठी।*
*आपुलिया आपण गाठी। लाहेचि तो॥*
*म्हणोनि फळी लागु। सांडोनि देहसंगु।*
*कर्मे करावी हा चांगु। निरोपु माझा।* (१८.१७४.७५)

श्री स्वामीजी यानंतर नरसोबाच्या वाडीला जाऊ लागले. त्यांना श्रीदत्त उपासनेत श्री दत्तात्रेयांनी आध्यात्मिक उच्चकोटीला नेले. आणि हे भक्त-देव तादात्म्य श्री दत्तात्रेयांनी माणगावी येण्याची व भक्ताची सेवा स्वीकारून त्याचे माऊलीच्या वात्सल्यभावाने कौतुक पाहण्याची इच्छा व्यक्त केली. श्री स्वामीजींचे सर्व व्यवहार श्रीदत्तात्रेयांच्या आज्ञेने होत असत.

माणगाव येथे श्री दत्तमंदिराची उभारणी झाल्यानंतर शके - १८०५ वैशाख शुद्ध पंचमीस या मंदिरात श्रीदत्तमूर्तीची विधिपूर्वक अर्चन होऊन स्थापना झाली. नृसिंहवाडीचे दत्तपूजाअर्चनाचे सर्व सोहाळे माणगावी होतच असत. त्याशिवाय माणगावी देवापुढे येणारी सर्व चीजवस्तू वाडीच्या कारणी लावत असत. श्री पुढील फळे, खारका इ. भक्त-सेवकांना प्रसाद म्हणून देत. धन-धान्याचा उपयोग नित्य अतिथि- अभ्यागत, संन्यासी यती यांच्या पुढीसाठी होई. रोख पैसे, नाणी वाडीला पाठविले जात. यावरून असे दिसून येते की श्रीस्वामीजी विहित कर्मच पण ईश्वरार्पण बुद्धीने करीत असत.

*"आधी ते करावे कर्म। कर्ममार्गे उपासना।*
*उपासका मिळे ज्ञान। ज्ञाने मोक्षचि लाभतो।*

प्रथम निर्हेतुक सत्कर्माचरण, त्याने चित्तशुद्धी, नंतर ज्ञानप्राप्ती आणि त्यानेच मोक्षसुख. चित्तशुद्धीकरता कर्म कसे करावे हे भगवान श्रीकृष्ण सांगतात,

*"तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ ।*
*ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्मकर्तुमिहार्हसि ॥"*
*"शास्त्राधारे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे ।"*

अशा कळकळीने श्री स्वामीजी सत्कर्माचरण करीत असत.

श्रीस्वामीजींवर पंचक्रोशीतल्या अहंमन्य लोकांनी अभिचारिक प्रयोगही केला. त्यांनी हे सर्व कष्ट सोसले एवढेच नाही तर 'शठं प्रति शाठ्यं' पेक्षा 'शठं प्रति सत्यं' असेच त्यांचे वागणे असे. "समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।" या गीतेच्या श्लोकाचे पूर्णत्वाने आचरण श्री स्वामीजींच्या ठिकाणी दिसते.

श्री ज्ञानदेव -

*"जो खांड़ावया घावो घाली । कां लावणी जयाने केली ।*
*दोघां एकचि सावली । वृक्ष दे जैसा ॥" (१२,१८)*
*जो सबाह्यसंगु । सांडोनिया लागु ।*
*एकाकी असे आंगु । आंगी सूनी ॥ (१२.२०६)*

म्हणजेच 'अंतस्त्यागी बहिःसंगी' असे अंतर्बाह्य संगरहित श्रीस्वामीजी होते.

श्री स्वामीजींचे माणगाव दत्तमंदिरातील नित्योपासना, महोत्सव, गृहस्थाश्रम हे जीवन पाहिले म्हणजे श्रीस्वामी हे एक ईश्वरप्राप्त पुरुष होते.

"लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि ॥ (अ. ३.२०) या प्रसिद्ध श्लोकावर लिहिताना श्रीज्ञानदेव म्हणतात - अर्जुना एवढ्याकरिता प्राप्त पुरुषाने कर्माविषयी कळकळ बाळगावी.

श्री ज्ञानेश्वर -

*"देखे प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।*
*तयांही कर्तव्य असे उरले । लोकांलागी ॥" (अ. ३.१५५)*

श्री स्वामीजींसारखे महापुरुष नैष्कर्म्य अवस्थेला प्राप्त झाले होते, तरी त्यांच्यावर लोकोद्धाराची जबाबदारी असल्यामुळे, अज्ञानी जनांना स्वतः कर्माचे आचरण करून मार्गदर्शन करण्यासाठी त्यांनी कर्माविषयी एवढी आस्था, कळकळ बाळगली.

श्री ज्ञानदेव म्हणतात -

*एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती ।*
*तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ (अ. ३.१५८)*
*हे ऐसे असे स्वभावे । म्हणोनि कर्म न संडावे ।*
*विशेषे आचरावे । लागे संती ॥ (अ. ३.१५९)*

श्री स्वामीजींचे प्रत्येक कर्म, कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून असल्यामुळे कर्मनिष्ठ कर्माला नाहिसे केले. श्री स्वामीजींनी कर्माची हातवटी जाणून 'चांद्रायण' व्रतासारखे अवघड व्रताचे आचरण करून, बांधणारे कर्मच मोचक केले असेच म्हणावे लागेल.

*"तैसी एके हातवटिया । कर्मे केली धनंजया ।*
*बंधकेचि सोडवावया । मुख्ये होती ॥ (१८.१६४)*

## संन्यासाश्रम

वैशाख वद्य १३ श. १८१३ मध्ये श्री स्वामीजींच्या पत्नी सौ. अन्नपूर्णाबाई श्रीचरणी विलीन झाल्या. पत्नीचे और्ध्वदेहिक आटोपून चौदाव्या दिवशीच शास्त्रीबुवांनी गंगाखेडला संन्यासग्रहण केला. शास्त्रीबुवा विश्वाचे झाले एवढेच नव्हे तर सर्व कसोटीत संपूर्ण उतरून श्री. प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती झाले.

श्री प.प. श्री वासुदेवानंद सरस्वती स्वामीजींनी संन्यासग्रहण केल्यानंतर त्या आश्रमात आसेतु हिमाचल यात्रा या सर्व संचारात श्री महाराजांनी आचारधर्माची शिकवण देऊन प्रसार केला. स्वतःही कडक पथ्ये सांभाळली. उपासना अखंड चालवून अनेकांना सन्मार्गी लावले.

श्री स्वामीजींच्या भारत संचारात श्रीरंग मुक्कामी (श. १८२९) शृंगेरीमठाचे शंकराचार्यांनी महाराजांची ओळख करून देताना काढलेले उद्‌गार - " शिष्यमंडळी हो, तुम्ही आज येथे आलेल्या या महान संन्याशांना ओळखले नाही. करिता दोन शब्द त्यांच्याबद्दल आम्ही सांगतो. हे प्रत्यक्ष दत्तप्रभूच - मातापित्यांच्या अत्यंत पुण्याईने त्यांच्या पोटी आले. आद्य शंकराचार्यांप्रमाणेच हे धर्मसंस्थापनेचे कार्य करीत आहेत. वर्णाश्रमधर्माचे पालन कडकडीतपणाने हे करीत असून अनेक लोकांचा उद्धार यांच्याकडून झालेला आहे. आसेतुहिमाचल पायानेच सर्व यात्रा करून यांनी कर्म, उपासना व ज्ञान यांचा अधिकारी जीवांना उपदेश करून त्यांना कृतार्थ केले आहे. करिता यांना पूर्ण आयुष्य लाभून यांच्या हातून धर्मस्थापनेचे कार्य नित्य घडो, एवढीच परमेश्वराजवळ आमची प्रार्थना आहे." श. १८१३ वैशाखमध्ये संन्यासग्रहणापासून श. १८३६ आषाढ शु. प्रतिपदेस अवतार समाप्तीपर्यंतच्या महाराजांच्या सर्व संचाराचे सूत्र आचार्यांच्या वरील शब्दात स्पष्ट होत आहे.

संन्यास ग्रहण केल्यानंतरसुद्धा स्वदेहापुरता दक्षिणी ब्राह्मणाकडून भिक्षा घेण्याचा कडक नियम पाळला. तरी आर्तजिज्ञासू कोणीही जरी असला तरी त्याला विन्मुख केले नाही. काही मुस्लिम आर्तांना तर कुराणातील जप-पठण सांगितले. पार्शी संकटग्रस्तांना मुक्त केले. श्री महाराजांच्या या सर्व संचारात आचार शुद्धीवर मोठा कटाक्ष होता. कर्म कधीच थांबत नाही, असा गीतेचा सिद्धान्त आहे. त्यामुळे कर्म करावेच 'कुरु कर्मैव' असा गीतेचा आग्रह आहे. या तत्त्वाला अनुसरून श्री स्वामीजी ब्राह्मणांनी संध्यादि नित्य कर्मे करावी याबद्दल ते आग्रही असत. अनेक आर्तांना त्यांनी स्वतः नित्य कर्मे शिकवून नंतर मग संकटमुक्ततेसाठी उपासना, जप, मंत्र यांची योजना केली.

*आणि मी माझे ऐसी आठवण । विसरले जयाचे अंतःकरण ।*
*पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥ (५.२०)*

गीता ही मी, माझे, 'प्रकृतीशी तादात्म्य' यांचा त्याग सांगते. कर्माचा त्याग सांगत नाही. 'जेथ संन्यासिला संकल्प तुटे । तेथेचि योगाचे सार भेटे ।' (६.५३) श्री स्वामीजींच्या कर्मयोगात संन्यास संकल्पाचा आहे व खरे संन्यासी तेच की ज्यांचा संकल्प सुटला. म्हणून संन्यास व कर्मयोग, एकच असे श्री स्वामीजींच्या जीवनात दिसते. प्रबळ अशा तऱ्हेचा आत्मलाभ होऊन सुद्धा श्रीस्वामीजी नैष्कर्म्य स्थितीचा अनुभव घेऊन जगाकरिता कर्म करीत राहिले. त्यांना, अशा लोकांना श्री ज्ञानेश्वर 'वडील' म्हणतात.

श्री ज्ञानेश्वर -

*'परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त ।*
*अनुष्ठाने जगा देत । वडिल जे ॥' (१७.८६)*

नैष्कर्म्य होण्याचा मार्ग गीता सांगते -

*'असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।*
*नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ (१८.४९)*

नित्य, नैमित्तिक, काम्य, निषिद्ध व प्रायश्चित्त अशी पाच प्रकारची कर्मे आहेत.

कर्म टाकून नैष्कर्म्य होता येत नाही हा गीतेचा सिद्धांत आहे. या तत्त्वाला अनुसरून श्री स्वामीजींनी विहित कर्म आपल्या वर्णाला व आश्रमाला, शास्त्रांनी सांगितलेले, उचित असे कर्म पाहून केले. आणि ते सुद्धा 'मा फलेषु कदाचन' असे ईश्वरार्पण बुद्धीने केले. नित्य, नैमित्तिक कर्मेही त्यांनी ईश्वरार्पण बुद्धीने केली. आणि त्यामुळे श्री स्वामीजी मोठ्या उच्च भूमिकेला प्राप्त झाले. किंबहुना ते 'प्राप्त पुरुष, अवतारी महात्मा होते. निषिद्ध व काम्य कर्मे त्यांच्या जीवनात नाहीतच. नित्य, नैमित्तिक कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करीत असल्यामुळे 'भर्जित बीजासारखे' उत्तर जन्माला कारणीभूत नाही. तात्पर्य, उत्तर जन्माला कारणीभूत होणारे ज्याला 'क्रियमाण' म्हणतात ते कर्म श्रीस्वामीजींकडून झालेच नाही. अशा रीतीने ईश्वरार्पण बुद्धीने केलेले कर्म हीच श्रीस्वामीजींची ईश्वराची परम सेवा.

### श्रीस्वामीजींचा ब्रह्मकर्म व धुरेचा योग

श्री दत्तात्रेयांच्या अनुज्ञेने ईश्वरार्पण बुद्धीने कर्म करणे हे श्री स्वामीजींच्या जीवनाचे प्रमुख अंग होय. कर्म ब्रह्मरूप होण्यास मुळात कर्ताच म्हणजे कर्तेपणाच नाहीसा व्हावा लागतो. ईश्वरार्पण बुद्धीने कर्म करण्याचे हेच अंतरंग आहे. कर्ताच नाहीसा होऊन कर्मच ब्रह्मरूप ही जी कर्मयोगातील अंतिम पायरी आहे ती श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी सातत्याने दिसते. कारण 'मी', 'माझे' आणि 'मला' हे शब्द त्यांच्या जीवनात कोठेच कधीच दिसत नाहीत. अशा रीतीने कर्ताच नाहीसा होऊन निर्माण होणारा 'फलत्याग' ज्या योगात घडतो असा 'धुरेचा योग' श्रीस्वामीजींच्या जीवनात चढत्या, वाढत्या उत्कर्षाने दिसतो. श्री ज्ञानेश्वर म्हणतात-

*"अर्जुना हा फलत्यागु । आवडे कीर असलगु ।*
*परि योगामाजी योगु । धुरेचा हा ॥ (१२.१३४)*

निष्काम कर्म करणाऱ्या श्रीस्वामीजींचा संन्यास हा ज्ञानप्रधान होता. कर्ममार्ग हा इहलोकी अभ्युदय, परलोकी उत्तमगति व अंती निःश्रेयस प्राप्त करून देणारा आहे असे आपल्या ('आचारः प्रथमो धर्मः।') आचरणावरून श्री स्वामीजींनी स्पष्ट जगाला दाखविले. श्रीदत्तप्रभूंच्यात नाहीसे होऊन श्री स्वामीजी कर्म करीत राहिले, हा मोठा योग आहे. कर्मयोग पर्वताचे हे शिखर आहे. गीतेला या दिव्यकर्मापलीकडे काही सांगावयाचे नाही.

श्री ज्ञानेश्वर -

*'तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।*
*पूजा केली होय अपारा । तोषालागी ॥ (अ. १८.९१७)*
*तियें पूजें । रिझलेनि आत्मराजें ।*
*वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥ (अ. १८.९१८)*

तात्पर्य, श्री स्वामीजींनी, स्वकर्मकुसुमांनी पूजा त्या सर्वांतर्यामी असलेल्या श्रीदत्तप्रभूंची केली. त्या पूजेने संतुष्ट झालेल्या श्रीदत्तात्रेयांनी 'वैराग्यसिद्धिरूपी' प्रसाद त्यांना दिला. या ईश्वराच्या अनुग्रहाने स्वामींचा स्नेह कोठेच गुंतलेला दिसत नाही. भोगून प्राचीन संपले, नवीन 'क्रियमाण' नाही अशी कर्मसाम्यदशा म्हणजेच परमगति जी 'नैष्कर्म्यसिद्धी' ती श्री स्वामीजींना प्राप्त झाली. आत्मसिद्धीचा

*'परिणामींचा निर्वाळा । अनुष्ठित ये फळा । अनुष्ठिता ॥'*

असा प्रांजळ कर्मयोग श्रीस्वामीजींनी आचरण करून सर्वसामान्यांपुढे कर्मयोगाचा आदर्श ठेवला.

श्री. प.प. श्री वासुदेवानंदसरस्वती स्वामीजींचे ज्ञानातून स्फुरलेले सर्व वाङ्मय आजही आर्त जिज्ञासूंना मार्गदर्शन करीत असून त्यांना अनुग्रह लाभ होत आहे.

*'तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।*
*प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥' (भ.गी. ७.१७)*

ह्या श्लोकावर श्री ज्ञानेश्वरमहाराजांनी

*'आणि ज्ञानाचेनि उजाळे पणे । मी आत्मा ऐसे तो जाणे ।*
*म्हणौनि मीहि तैसेचि म्हणे । उचंबळला सांता ॥ '(७.११७)*

असे सुंदर भाष्य केले आहे. श्री स्वामीमहाराजांसंबंधी असेच म्हणता येईल.

श्री शंकराचार्य म्हणतात-

*सत्संगत्वे निःसंगत्वम् निःसंगत्वे निर्मोहत्वम् ।*
*निर्मोहत्वे निश्चलतत्त्वम् ।*
*निश्चलतत्त्वे जीवन्मुक्तिः ॥'*

श्री. प.प. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज या जीवनमुक्ताच्या नित्य पुण्यस्मरणाने व त्यांच्या पूर्णकृपेने सत्संगत्वापासून जीवनमुक्तावस्थेपर्यंत जाण्याचा प्रयत्न करूया । त्यासाठी त्यांच्याचरणी नतमस्तक होऊन त्यांच्याच शब्दात एकच प्रार्थना करूया -

*"नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता । त्वत्तो देव त्वं शरण्योऽक हर्ता ।*
*कुर्वात्रेयाऽनुग्रहं पूर्णराते । घोरात्कष्टात् उद्धरास्मान् नमस्ते ॥"*

॥ इति शम् ॥

**श्रीमती सुशीला मोडक**
१६२९, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०



# प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वती (टेम्बे) स्वामीमहाराजांचा लोकसंग्रह


**डॉ. व्या. व्यं. देशमुख**

*एम.बी.बी.एस. एम.डी. (पॅथॉलॉजी) १२ वर्षे प्राध्यापक सरकारी वैद्यकीय महाविद्यालय साडेसात वर्षे बहारीन सरकारचे सल्लागार त्रत्र १९ वर्षे संचेती हॉस्पिटल व लोकमान्य हॉस्पिटल येथे व्यवसाय. १५-२० मराठी लेख प्रकाशित. श्रीवासुदेवानंद सरस्वती महाराजांवर वेबसाइट. वैद्यकीय विषयांवर १५ लेख भारतात व भारताबाहेर प्रकाशित. एम.डी. विद्यार्थ्यांचे भारतात व भारताबाहेर गाईड.*


*सक्ताः कर्माण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।*
*कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥३-२५॥ भ. गी.*

प. प. श्रीगोविंदस्वामींच्या महासमाधीनंतर श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने वाडी सोडून पत्नीसह उत्तरेकडे जाताना गंगाखेड मुक्कामी महामारीच्या उपद्रवाने सौ. अन्नपूर्णा मातुःश्रींच्या मृत्यूनंतर चौदा दिवसांनी 'अनाश्रमी न तिष्ठेत' या शास्त्रवचनाला अनुसरून श्रीस्वामीमहाराजांनी चतुर्थाश्रम घेतला. श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेच उज्जैन येथे श्रीनरसिंह सरस्वतीकुलोत्पन्न श्रीसमर्थसंप्रदायाचे प. प. श्रीनारायणानन्द सरस्वती स्वामीमहाराज यांच्याकडून दंड ग्रहण केला. त्यानंतर श्रीदत्तप्रभूंची आज्ञा झाली की "सर्वत्र वर्णाश्रमलोप झालेला आहे. तरी सर्व भरत खंडांत पायीच संचार करून सर्व लोकांना उपदेश करावा व धर्ममार्गाची स्थापना करावी." इथून तेवीस वर्षे या आज्ञेचे निष्ठेने पालन करीत श्रीस्वामीमहाराजांनी भारतभर परिभ्रमण केले.

श्रीस्वामीमहाराज हे एक अवतारी व कारणिक, जन्मसिद्ध कोटींतील पुरुष होते. त्यांना स्वतःसाठी प्राप्य असे काहीच नव्हते. "नानवाप्तमवाप्तव्यं" (भ.गी. ३-२२) ह्या उक्तीप्रमाणे त्यांच्या सर्व जीवनाचे उद्दिष्ट केवळ श्रीदत्ताज्ञेने धर्मसंस्थापनेचे कार्य करणे एवढेच होते. यालाच लोकसंग्रह असे नाव आहे.

**'लोकसंग्रह'** म्हणजे केवळ लोक गोळा करणे नव्हे, तर लोकांना उन्मार्गापासून निवृत्त करून परमेश्वरोन्मुख करणे, अध्यात्म मार्गावर स्थिर करणे. लोकसंग्रहाचा एक मुख्य भाग म्हणजे लोकांपुढे स्वधर्माचरणाचा आदर्श स्वतःच्या जीवनांतून लोकांसमोर ठेवणे. श्रीस्वामीमहाराजांच्या आचारनिष्ठेचा आपण याच दृष्टीने विचार केला आहे. 'यद्यदाचरति श्रेष्ठ तत्तदेवेतरे जनाः' या भगवदुक्तीनुसार ज्ञानी पुरुषानेसुद्धा तत्परतेने विहित कर्मांचे अनुष्ठान केले पाहिजे. आरंभी उद्‌धृत केलेल्या गीतावचनाचे हेच सार आहे. 'मार्गाधारे वर्तावे । जन हे मोहरे लावावे । अलौकिक नोहावे । लोकांप्रती । (ज्ञानेश्वर महाराज)' तसेच 'आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासी । बोलिले जे ऋषि । साच भावे वर्तावया' (संत तुकाराममहाराज) ही संतवचनेही हेच सांगतात.

उपजत एकांतप्रिय अशा या संन्याशाला केवळ श्रीदत्तप्रभूंच्या आदेशानुसार जन्मभर सतत लोकांच्या गर्दीत राहावे लागलेले आपण पाहतो. "अरतिर्जनसंसदि" (भ.गी. १३-१०) ह्या मूळ वृत्तीमुळे स्वामीमहाराजांनी क्वचित् या गर्दीला उबगून प्रभूंशी कलहहि केलेला आहे. याच कारणाने श्रीस्वामीमहाराज सहसा एकटेच प्रवास करीत. मंडळी अति प्रेमाने कधी कधी महाराजांच्या निषेधाला न जुमानता मागे येत. अशा वेळी कधी समजुतीने, कधी क्रोधाने, कधी शापाचा धाक दाखवून तर क्वचित् सिद्धींचा अवलंब करून ते स्वतःची सोडवणूक करून घेत.

असाच डाकोरहून शिनोरास जाताना रामशास्त्री प्रकाशकारांनी महाराजांची गाडीने जाण्याची आज्ञा असताना पायी बरोबर जाण्याचा आग्रह धरला. तेव्हा महाराजांनी मागे वळून 'आता तू मागे फिरतोस की नाही' म्हणत असा काही क्रोधाचा आवेश आणला की मुकाट्याने रामशास्त्री मागे फिरले. दोन दिवसांच्या प्रवासानंतर ते शिनोरला पोचले तर गावातील मंडळींनी श्रीस्वामीमहाराज दोन दिवसांपूर्वीच संध्याकाळी तेथे आल्याचे सांगितले.

महाराज गलगलीहून जाताना तेथील वैष्णव मंडळींना उशीरा का होईना त्यांची योग्यता लक्षात आल्याने ते महाराजांना राहण्याचा आग्रह करू लागले. त्यांना नकार देऊन महाराज मार्गस्थ झाले असता ते त्यांच्या पाठीमागे येऊ लागले. ते पाहून महाराजांनी रस्त्यात एक रेषा काढली आणि सांगितले की, 'जर ही रेषा ओलांडून याल तर तुमचा वंशक्षय होईल.' मग मात्र कुणाचीही पुढे येण्याची हिंमत झाली नाही.

आळंदीला श्रीमहाराज श्रीज्ञानेश्वर माऊलींच्या दर्शनाला जात असताना असाच लोकांनी स्पर्शदर्शनाचा आग्रह धरला तेव्हा श्रीमहाराजांनी त्यांना प्रथम मूठभर जोंधळे आपल्या पायावर घालायला सांगितले. स्वामीमहाराजांच्या पायांचा स्पर्श होतांच त्या जोंधळ्यांच्या लाह्या फुटल्या; हे पाहतांच लोकांनी दुराग्रह सोडून महाराजांची वाट मोकळी करून दिली.

शके १८२८ च्या चैत्रांत श्रीस्वामीमहाराज काशीला गेले होते. तेव्हा पंचक्रोशी यात्रेत काही यात्रेकरूंनी पूर्वसूचना देऊनही तीर्थश्राद्ध न करता महाराजांना भिक्षा घातली. नैवेद्य दाखवून तो घास महाराजांनी तोंडात घालताच तो घशातच अडकला व महाराजांना यात्रा सोडून लगेच वाडीचा रस्ता धरण्याची आज्ञा झाली. त्यावेळी सहयात्रींनी त्यांना जाऊ न देण्यासाठी त्यांना गराडा घातला. पण त्या ५०-७५ माणसांतून श्रीस्वामीमहाराज एकदम अदृश्य झाले ते प्रयागलाच प्रकटले.

बरेचदा लोकांचा संपर्क टाळण्यासाठी महाराजांनी मुद्दाम वस्तीपासून संपर्क दूर मुक्काम केला तर तिथेही गर्दी व्हायचीच. एकदा तर प्रभूंनी त्यांना स्पष्टच सांगितले की, 'अरे, तू कोठेहि गेलास तर लोकांची गर्दी होणारच. मग (वस्ती) जवळच का रहात नाहीस ?" स्वामीमहाराजांची

बहुतेक चातुर्मासाची ठिकाणे शहरापासून दूर, पावसाळ्यात तर दुर्गमच अशी होती. उदा. कुरुगड्डी, नरसी इ. पण तियेही लोकांची झुंबड व्हायचीच. आपण महाराजांची दिनचर्या पाहिली तर अगदी भल्या पहाटेपासून मध्यरात्र उलटून गेली तरी एकांत असा महाराजांना मिळत नसे. महाराजांचे वैयक्तिक जीवन कितीही कडक असले व ते सतत सोवळ्यांतच रहात असले तरी त्यांच्याकडे येणाऱ्या सर्वांना मुक्तद्वार असायचे. अर्थात् पाठ, प्रवचन इत्यादी चालू असताना कुणी आल्यास वाट पहावी लागे तेवढीच. तिथे कसलाही भेदभाव नसायचा. सर्वांची विचारपूस आत्मीयतेने करून त्यांच्या प्रापंचिक, वैचारिक, पारमार्थिक अडचणींवर उपाय सांगितले जात. पारशी, मुसलमान इत्यादी परधर्मीयांनासुद्धा तिथे मज्जाव नव्हता. इतरांप्रमाणे त्यांनाही स्वामीमहाराजांनी आपल्या कृपाछत्राखाली घेताना यत्किंचितही भेदभाव केला नाही. खाजगीत किंवा एकांतात मात्र ते कुणालाही भेटत नसत. जे काही बोलायचे असेल ते सर्वासमक्ष बोलावे असा दंडक होता. राजेरजवाडे यांनाही त्याप्रमाणेच भेटता येई.

असे असूनही स्वधर्माप्रमाणे आचार न ठेवणाऱ्या हिंदूंना, विशेषतः ब्राह्मणांना स्वामी महाराज दर्शन देत नसत. केस ठेवणारे, स्नानसंध्यादि आचार न पाळणारे ब्राह्मण किंवा अनाधिकार आचार करणारे अब्राह्मण, सकेशा विधवा अशा व्यक्ती पुढे येताच महाराज तोंड फिरवीत. त्यांनी आचारात योग्य ती सुधारणा केल्यावरच त्यांना दर्शन होई. बऱ्याच व्यक्तींना आचारधर्माचे शिक्षणही महाराज स्वतः जातीने देत.

अर्थातच महाराजांची परीक्षा पाहणारे, त्यांच्याशी वादविवाद करणारे, त्यांना भोंदू ठरवू पाहणारे किंवा प्रसंगी त्यांच्याशी भांडणारेही लोक त्यांच्याकडे येत. अशा मंडळींना आगाऊच ओळखून त्यांच्याकडे महाराज दुर्लक्ष करीत. एकदां बढवाईला एका राजेसाहेबांच्या आगमनाची वर्दी देणाऱ्या कारभाऱ्याला त्यांनी "वेड्याच्या दर्शनाचा काय उपयोग? हे इथे आलेले लोक वेडे आहेत. हाही त्यांतलाच एक वेडा आहे. तरी तुम्ही अशा वेड्यांच्या नादी न लागता घरी जाऊन सुखाने रहा" अशा परखड शब्दांत त्यांच्या वृत्तीची जाणीव देऊन परत पाठविले होते. तद्वतच वादविवाद करणारा एक आर्य समाजी महाराजांच्या मौनाने चिडून जाऊन अद्वातद्वा बोलू लागल्यावर ते शांतपणे त्याला म्हणाले, "एवढाच आमच्यावर राग असेल तर आम्हांला मारून समाधान करून घ्या." तो आर्यसमाजी खरोखरच महाराजांवर हात उगारतो तोच समोरच्या माडीवरील एका भक्त स्त्रीने ते पाहून आरडाओरडा केला त्याला घाबरून तो पळून गेला. अशाच महाराजांवर चिडलेल्या एका वावदूकावर महाराजांच्या एका भक्ताने मंत्रप्रयोग करून त्याची वाचाच बंद केली. कांही वेळाने महाराजांनीच त्या भक्ताला सांगून मंत्र परत घेवविला.

असे काही लोक सोडले तर श्रीस्वामीमहाराजांकडे येणाऱ्या लोकांची विभागणी आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू आणि ज्ञानी अशा चार प्रकारांत करतां येईल. ह्यापैकी आर्त आणि अर्थार्थी ह्यांचा विचार एकत्र करता येईल. कारण प्रतिकूल परिस्थितीतून सुटका मागणारे (आर्त) आणि कांही तरी कामना धरून येणारे ह्या दोघांनाही प्रापंचिक स्थितीत सुधारणा अपेक्षित असते. सर्व कामनांचे मूळ प्रपंचातील काही तरी न्यूनता पूर्ण करण्यांतच असत नाही का? अर्थातच अशाच लोकांचे प्रमाण श्रीस्वामीमहाराजांकडे गर्दी करणाऱ्यांत अधिक होते.

**आर्तत्राण**

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा धांवता जरी आढावा घेतला तरी त्यांत त्यांनी झेललेल्या दुःखांचेच प्रमाण सुखाच्या तुलनेत अधिक दिसते. ह्या अवस्थेबद्दल त्यांनी कधी चुकूनही तक्रार केल्याचे किंवा प्रतिकूल परिस्थितीला विरोध केल्याचे दिसत नाही. अनाक्रोश, अप्रतिकारपूर्वक प्रारब्ध सहन करण्याकडेच महाराजांचा कटाक्ष होता. तो इतका की प्लेग, महामारी (कॉलरा), महारोग (लेप्रसी), श्वेतकुष्ठ, सर्पदंश आणि आभिचारिक प्रयोगाने कुणीतरी आयुष्यभर मागे लावलेली संग्रहणी (dysentery) अशा विकारांनी, अनेक वेळा प्राणसंकटसुद्धा आले तरी, औषध किंवा इतर कोणताहि उपाय त्यांनी केला नाही. इतरांच्या आग्रहास्तव क्वचित् कधी औषध घेतले तर एकदम विपरीत परिणाम होई व आग्रह करणाऱ्या व्यक्तीने देवांची क्षमा मागून पुन्हां असे न करण्याचे मान्य केल्यावरच महाराजांना आराम पडे. काही प्रसंगी केवळ देवांच्या आज्ञेनेच कांही औषध घेतल्याचे दिसते. ही झाली शरीरस्वास्थ्याची गत. इतर प्रापंचिक परिस्थितीची अवस्थाही अशीच होती. गृहस्थाश्रमांत आर्थिक विवंचना, पत्नी व माता यांच्यातील वैमनस्य, असूयेने व द्वेषाने लोकांनी केलेले उपद्रव यांना सतत तोंड द्यावे लागले. श्रीमहाराजांनी त्यांचा उपयोग वैराग्याच्या जोपासनेसाठीच केला.

संन्यासाश्रमांत त्यांनी सोसलेले कष्ट तर वाचूनच अंगावर कांटा उभा रहावा. भिक्षेचे कडक नियम होते व नित्य संचार यांमुळे सारखे उपास घडायचे तरी दहा वीस मैलांची चाल चालूच राही व नित्य पुढे येणाऱ्या आर्त जिज्ञासूंच्या समाधानांत यत्किंचितही कसूर होत नसे. नरसीच्या चातुर्मासाअखेर क्षौराच्या वेळी मंडळींच्या आग्रहाने येथील न्हाव्याने सहज महाराजांच्या पायांतले कांटे काढले ते एकवीस भरले ! संकेश्वर पीठाचे शंकराचार्य झालेले श्रीशिरोळकर स्वामी ब्रह्मावर्ताला श्रीस्वामीमहाराजांच्याजवळ असतांना उन्हाळ्याचे दिवस होते. गंगेचा प्रवाह क्षीण झालेला व कांठापासून अर्धा-पाऊण कि.मी आत गेलेला. श्रीमहाराजांना संग्रहणीमुळे वारंवार शौचाला जावे लागे. प्रत्येक वेळी स्नान होत असे. दुपारच्या वेळी तापलेल्या त्या वाळूकडे पहायलाही नको वाटे. अशा त्या नदीच्या पात्रांतून शांतपणे उघड्या पायांनी वाळू तुडवीत जाऊन स्नान करणारे स्वामीमहाराज पाहून विदेहावस्था कशी असते त्याचे साक्षात् दर्शन घडे ! श्री शिरोळकर स्वामी म्हणतात की अशा ब्रह्मज्ञानी सत्पुरुषांचे दर्शन, संभाषण इत्यादींनी आपण धन्य झालो !

हे सर्व इथे सांगण्याचे कारण की स्वतःच्या सुखदुःखाविषयी इतके उदासीन असणारे महाराज दुसऱ्याच्या दुःखाने मात्र कळवळून जात. सतत पुढे येणाऱ्या सर्व मंडळींच्या अडचणी केवळ आत्मीयतेने ऐकूनच ते घेत असे नाही तर त्याला योग्य तो सल्ला, औषध, मंत्र, यंत्र अशा त्यांना अवगत असलेल्या विविध उपायांनी व स्वतःच्या तपःसामर्थ्यानेही समोरच्या व्यक्तीच्या दुःखाचा परिहार ते करीत. त्यांच्याकडे आलेली व्यक्ति सहसा विमुख गेल्याचे उदाहरण सांपडत नाही. वैदिक परंपरेत मनुष्यजीवनांत त्रिविध तापांचे प्रतिपादन आहे. १. आध्यात्मिक, २. आधिभौतिक व ३. आधिदैविक.

**आध्यात्मिक** ताप म्हणजे शारीरिक पीडा होत. व्याधि म्हणजे स्थूल शरीराचे विकार व आधि म्हणजे मानसिक पीडा. अक्षरशः हजारो लोकांना

श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या वैद्यकाच्या ज्ञानाच्या साह्याने व्याधिमुक्त केले आहे. हे आपले ज्ञान त्यांनी योग्य अधिकारी पुरुषांना मुक्त हस्ताने दिलेलेही आहे. उदाहरणार्थ कोलगांवचे श्री. गणेशपंत सातवळेकर व नसरापूरचे श्री. गंगाधरपंत वैद्य. कांही कांही चातुर्मासाच्या ठिकाणी सांथींचा प्रादुर्भाव झाला असतां त्यांनी मोठ्या प्रमाणांवर औषधी तयार करवून त्या गरजू लोकांना वाटल्या. कांही रुग्णांना दुर्लभ वनस्पती शोधून किंवा प्रयत्नपूर्वक मिळवूनही त्या पुरवीत असत. आजही कांही लोकांकडे हे महाराजांचे औषधोपचाराचे ज्ञान परंपरेने उपलब्ध आहे असे ऐकिवात आहे. त्यांच्या सहकार्याने ते प्रसिद्ध होणे सर्वांना लाभदायक ठरेल.

बऱ्याच वेळा केवळ औषधींनी गुण येत नसल्यास ते योगिक उपचारही सांगत. पोटदुखी व अन्नद्वेष ह्यांनी गांजलेला एक ब्राह्मण महाराजांना शरण आला. त्याला महाराजांनी विपरीतकरणी करायला सांगितली. त्याने त्याची पोटदुखी जाऊन भूक इतकी वाढली की त्याची बायको त्याच्या भुकेला आळा घालण्याची विनंती करू लागली. प.पू श्री गुळवणीमहाराजांना गरुडेश्वर येथे ताप येऊ लागला तेव्हा त्यांना श्रीस्वामीमहाराजांनी मयूरासन करायला सांगितले. त्याने त्यांना लगेच आराम पडला. ही दोन उदाहरणे आहेत. असे शेकडो लोकांचे अनुभव आहेत.

औषधोपचार व योगिक उपायांखेरीज श्रीस्वामीमहाराज दैवी उपासनाही सांगत. उदा. औदुंबर, देऊळ किंवा गुरुचरित्राच्या पोथीला प्रदक्षिणा. रोगाच्या गांभिर्याच्या प्रमाणांत ह्या उपायांची तीव्रता व कालमान असे. चिखलधाला एक ब्राह्मण पोटांत अन्न ठरेना म्हणून महाराजांकडे आला. तो अत्यंत क्षीण झाला होता. महाराजांनी हे कुलदेवतेच्या सेवेत खंड पडल्याने झाले असल्याचे सांगून त्याला दत्तमंत्र व देवीमंत्र यांचा जप सांगून काही औषधही दिले.

पूर्वाश्रमांत माणगांव येथे महाराज असता, सावंतवाडीचे सबनीस यांचा मुलगा आजारी पडला तेव्हा महाराजांनी (तेव्हाचे वासुदेवशास्त्री) त्यांना मुलाची पत्रिका पाहून गोप्रदान करावयास सांगितले. सबनीस यांनी शास्त्रीबुवांना नकळत त्यांचे बंधू सीताराम यांना बोलावून दक्षिणापूर्वक गोप्रदान केले. परिणामी, सीताराम यांना घरी येताच सपाटून ताप आला. शास्त्रीबुवांना ही हकीकत कळतांच त्यांनी सीतारामाची आपल्याला न विचारता गोप्रदान घेतल्याबद्दल चांगली हजेरी घेतली व ती गाय दुप्पट दक्षिणा देऊन दुसऱ्या ब्राह्मणाला देऊन टाकल्यावर सीतारामाचा ताप उतरला.

श्रीस्वामीमहाराजांच्या देहविसर्जनानंतर गरुडेश्वरी समाधिमंदिराच्या कामांत सहभागी एका कामगाराच्या पायाला सूज येऊन तो दुखायला लागला. चालणेसुद्धा अवघड झाल्याने देवाचे काम आपल्या नशिबांत नाही अशी निराशा वाटून तो घरी परतण्याचा विचार करू लागला. त्याच दिवशी सकाळी तो सरकत सरकतच शौचाला जात असतां एक भगवे वस्त्र व कौपीन धारण केलेला संन्यासी त्याला भेटला. त्याने त्याला एक जवळचे झुडुप घरी नेऊन ते बारीक वाटून ते पायाला लावून शेक करायला सांगितले. त्याप्रमाणे करतांच दुसऱ्याच दिवशी त्याची सूज नाहीशी होऊन त्याला चालता येऊ लागले व तो कामावरही हजर झाला. त्याची हकीकत ऐकून तेथील अधिकाऱ्याने त्याला महाराजांचे चित्र दाखवतांच तेच मला भेटलेले बाबाजी असल्याचे त्याने सांगितले.

असे आणखीही असंख्य प्रसंग त्यांच्या आयुष्यांत घडलेले आहेत. विस्तारभयास्तव इथे फक्त कांही प्रातिनिधिक उदाहरणेच दिली आहेत.

या संदर्भात श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्त्रीच्या (द्वि.सा.) टीकेत (२३:३०-३१) उद्धृत केलेले वचन विचारणीय आहे. **"पूर्वजन्मकृतं पापं व्याधिरूपेण पीडते । तच्छांतिरौषधैर्दानैर्जपहोमसुरार्चनैः ॥"** सर्व व्याधींचा उगम पूर्वार्जित पापकर्मात आहे. त्यांचा (व्याधींचा) उपशम करण्यासाठी औषधे, दान (सत्पात्री), जप, यज्ञ, देवसेवा ह्या उपायांनी होतो. ह्याला श्रीमहाराजांनी स्वतःची एक पुस्ती जोडली आहे. **"साधुदृष्ट्यापि सर्वांघहतिदक्षया"** (द्वि.सा.) २३:३०). संतांच्या कृपाकटाक्षाने सर्वच पापांचा नाश होतो तर व्याधींचा नाश होईल यांत काय संशय? श्रीमहाराजांच्या आश्रयाला येणाऱ्या सर्व आर्त व्याधिपीडितांच्या रोगपरिहारांत त्यांची कृपादृष्टि हेच कारण इतर सर्व (औषधादिक) कारणांपेक्षा महत्त्वाचे होते यांत संशय नाही.

**आधिभौतिक** ताप म्हणजे पंचमहाभूतांच्या प्रकोपाने होणारे अनर्थ. भूकंप, पूर, आग, विद्युत्पात, वादळ इत्यादि यांची उदाहरणे होत. प.प. श्रीदीक्षितस्वामी यांची पुतणी सीताबाई हिला नवऱ्याने भिलवडीला एक शेत देऊन विभक्त ठेवले होते. ती स्वतःच शेती करून त्यावर गुजराण करीत असे. तिची श्रीमहाराजांवर मोठी निष्ठा होती. महाराज वाडीला आले असतांना त्यांची चरणधूलि सीताबाईंनी एका डबीत भरून ठेवली होती. तिच्या शेतावर एकदा खळ्यांत धान्य मळून तयार झाले असता एकदम मोठा पाऊस येऊन सर्व धान्याची नासाडी होणार असे दिसू लागले. सीताबाईंनी लगेच महाराजांचे स्मरण करून ती डबीतली पायधूळ त्या खळ्याभोवती टाकली व "मी या संकटांतून मुक्त झाल्यावर वाडीला येऊन ब्राह्मण समाराधना करीन. मला एवढे अन्नदान महाराजांनी द्यावे" अशी प्रार्थना केली. महाराजांच्या कृपेने तिच्या खळ्यावर पावसाचा एक थेंबही न पडून तिच्या धान्याचे संरक्षण झाले. तिच्या ब्राह्मणसमाराधनेच्या वेळी महाराज वाडीला होते व त्यांनी तिथे भिक्षा घेऊन तिचे समाधान केले.

गरुडेश्वरी नर्मदाकाठी गोकुळाष्टमीच्या भजनाच्या वेळी पैलतीरावर एकदम आभाळ येऊन जोराचा पाऊस सुरू झाला व आता तो इकडेही येऊन भजन थांबवावे लागणार अशी चिन्हे दिसू लागली. तेव्हा महाराजांनी पावसाची चिंता न करता भजन चालू ठेवण्यास सांगितले. मध्यरात्रीपर्यंत भजन करून मंडळी आसऱ्यांत आल्याबरोबर बाहेर धो धो पाऊस सुरू झाला. व महाराज म्हणाले "हा घ्या मघाचा पाऊस !"

असाच प्रसंग एकदा माणगांवला एका गुरुद्वादशीला घडला. प्रसादाला उघड्यावरच पाने टाकलेली आणि एकदम ढग येऊन जोराचा पाऊस पडणार असे दिसतांच महाराज म्हणाले, "तो (पाऊस) ही तुमच्यासारखाच प्रसादाला आला आहे. एक मोठा नैवेद्य त्याला वाढा." त्याप्रमाणे करतांच सभोवार मुसळधार पाऊस पडत असतांही प्रसादाच्या जागेवर थेंबसुद्धा पडला नाही व प्रसादाचा कार्यक्रम निर्विघ्न पार पडला. बढबाईच्या चातुर्मासानंतर वाडीकडे जातांना सीतारामबुवा व गांडाबुवा सनावदपर्यंत बरोबर होते. तेथे वडिलांची तिथि असल्याने सीतारामबुवांनी, "आज पाऊस येणार आहे, करिता तुम्ही गांवांत जाऊन स्वयंपाक करा" या महाराजांच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून घाटावरच स्वयंपाक केला. श्राद्धकर्म होते न होते इतक्यात पाऊस सुरू झाला व सर्वांच्या जेवणावरच गदा आली. गांडाबुवांनी त्यावेळी महाराजांची क्षमा मागितल्यावर पाऊस बंद होऊन जेवणे झाली. असे आणखीही बरेच प्रसंग सांगतां येतील.

**आधिदैविक** पीडा म्हणजे देवतांच्या कोपाने होणाऱ्या पीडा. देवयोनीत देवांबरोबरच असुर, राक्षस, गंधर्व, यक्ष, नाग, किन्नर तसेच पिशाचादि

योनीचाही समावेश होतो.

देवता साधारणतः ईश्वराच्या विधानांप्रमाणे आपापले विहित कार्य करत असतात. मनुष्यांशी त्यांचा संबंध मुख्यतः त्या त्या व्यक्तीला त्याच्या बऱ्यावाईट परिपक्व कर्मांची फळे देण्यापुरताच असतो. विशिष्ट प्रकारच्या परिस्थितीसाठी त्या त्या विशेष देवतेची आराधना करून आपल्याला इष्ट तो बदल करून घेता येतो. अर्थात् सर्व देवता तत्त्वतः परमेश्वराच्याच विभूति असल्याने ईश्वरी उपासना उदा. कुलदेवता अथवा इष्टदेवता यांची सेवा हीसुद्धा दैवी अनुकूलता प्राप्त करून देऊ शकते. महामारीच्या साथीचा प्रतिकार अभिषेकाने कसा होतो ह्यासंबंधी श्रीमहाराजांचे उद्‌गार वर आलेलेच आहेत. परंतु सर्वसाधारण माणसाला आपल्या अडचणींचे आधिदैविक कारण अथवा त्यासाठी उपाय यांचे काहीच ज्ञान नसते. आणि क्वचित् असा उपाय समजलाच तर तो योग्य रीतीने करणेही त्याच्या शक्तीपलीकडचेच असते. इथेच साधुसंतांच्या मार्गदर्शनाचे आणि कृपेचे महत्त्व आहे. ते पारदर्शी महात्मे समोर येणाऱ्या शरणागताच्या सद्यःस्थितीचे नेमके आधिदैविक कारण जाणतात. त्यावर अचूक उपायही जाणतात आणि तो उपाय करण्याचे बळही भक्ताला आपल्या कृपेने देऊ शकतात. नरसोबावाडीला महाराज असतांना महामारीची साथ आसपासच्या गावांतून येण्याची शक्यता दिसू लागली. तेव्हा महाराजांनी श्रीदत्तपादुकांवर संततधार धरायला सांगितले. यासंबंधी कांही मंडळींनी महाराजांना विचारले की, "महामारीच्या साथीवर अभिषेकाचा कसा परिणाम होतो?" तेव्हा महामारी इत्यादि साथी ह्या मृत्युरूप परमेश्वराच्या शक्ति असून, संततधार इ. शास्त्रविहित उपायांनी त्या मृत्युरूप परमेश्वराचा संतोष होतो व त्याच्या शक्तीचेही उपशमन होते असे सांगितले.

श्री वासुदेव ठाकुर नांवाचे एक गृहस्थ वाडीला महाराजांचेकडे आले व आपल्या पत्नीच्या आजारपणाबद्दल त्यांना विचारले. तेव्हा महाराजांनी त्यांना त्यांच्या पूर्वजांच्या समाधीची योग्य देखभाल होत नसल्याचे हे फळ आहे असे सांगितले. ठाकुर यांनी आपल्या गावी जाऊन त्या समाधीची जागा शोधून, तिची डागडुजी करून नित्य पूजाअर्चेचीही व्यवस्था केली. तेव्हा त्यांच्या पत्नीची प्रकृती हळूहळू सुधारली.

कधीकधी ग्रहांच्या शांतीचाही सल्ला महाराज देत. एकदा एका गृहस्थाची संतती वाचत नव्हती. महाराजांच्या आज्ञेने त्याने मंगळाचे व्रत करतांच त्याची संतती जगू लागली.

**पिशाच्चयोनि** ही देवयोनीत गणलेली असली व देवयोनीप्रमाणे त्यांना बऱ्याच अमानुष शक्ती असल्या तरी त्या अमंगळच मानल्या गेल्या आहेत. कांही पापकर्मांचे फळ, सूडाची भावना किंवा अतृप्त वासना (बहुतेक अर्थ आणि काम या संबंधीच्या) जीवाला ही योनि प्राप्त करून देतात. पिशाच्चांचे स्थान भूलोकाच्या लगत वर असलेला भुवर्लोक आहे. त्यांचा संबंध ऋणानुबंध असलेल्या मानवांशीच येतो आणि ते नाना प्रकारच्या पीडा देऊ शकतात. अर्थात् विशेष शक्ति किंवा सिद्धी असलेल्या व्यक्तीच हे ओळखू शकतात. पूर्वाश्रमांत श्रीमहाराजांचा संबंध सावंतवाडीच्या विष्णुपंत आणावकर या गृहस्थाशी आला. त्यांना त्यांच्याच एका पूर्वजाच्या पिशाच्चाचा संचार होत असे. हा पिशाच्च सर्व शास्त्रांचा ज्ञाता असून भूत, भविष्य, वर्तमान अचूक सांगे. तो विद्वान ब्राह्मण असून त्याच्या हातून अजाणतां गोहत्या झाली; पण त्याने ही गोष्ट कुणाला सांगितली नाही व कांही प्रायश्चित्तही घेतले नाही. मृत्यूनंतर यमाच्या दरबारांत त्यांना ह्या पापाचे फळ म्हणून व्याघ्र योनि किंवा पिशाच योनि असे पर्याय दिल्यावर त्यांनी ज्ञान असणारी पिशाच्च योनि स्वीकारली. या योनीत २५० वर्षांहून अधिक काळ त्याने काढला होता व तो अनेक पिशाच्चांवर अधिकारी असल्याने त्याला कुठलेही सर्व ज्ञान होत असे. अनेक आर्त लोकांना त्याने संकटांत साह्य केले होते. श्रीस्वामीमहाराजांनाही त्याने अनेक वेळा अचूक मार्गदर्शन केले होते.

माणगांवला श्रीदत्तप्रभूंचे वास्तव्य झाल्यापासून पिशाच्चग्रस्तांची गर्दी श्रीस्वामीमहाराजांकडे होऊ लागली. शेकडो पिशाच्चांना स्वामीमहाराजांनी मुक्ति दिल्याची उदाहरणे आहेत. अर्थात् हे लोकोपकारक कार्य करणाऱ्या व्यक्तीलाही पिशाच्चापासून धोका संभवतो. माणगांवांतच एका मराठा स्त्रीला एका समर्थ पिशाच्चाची इतकी पीडा होती की कधी कधी त्याने सोसाट्याच्या वाऱ्याच्या रूपाने तिला वर आकाशात घेऊन जावे. तिच्या संरक्षणासाठी महाराजांनी तिला एक यंत्र गळ्यांत बांधायला दिले तेव्हा त्या पिशाच्चाचे तेथे कांही चालेना. त्याच रात्री त्या पिशाच्चाने चिडून वासुदेवशास्त्रींचा गळा दाबायला सुरुवात केली. दत्तस्मरणाने थोडे बरे वाटते तोच मातुःश्री काय गडबड आहे ते पहायला आल्या. त्यांच्याकडून खुणेनेच तांदूळ मागून घेऊन दिग्बंधन केल्यावर तो त्रास कमी झाला. हा आत्मसंरक्षणाचा विधि प्रयोगाच्या सुरुवातीलाच न केल्याने असे झाले.

पिशाच्चेही माणसाप्रमाणे कावेबाज असतात व फसवून घात करतात. असाच एक माणगांवला पिशाचपीडित माणूस सेवेला राहिला होता व त्याची व्यथा बरीच कमीही झाली होती. पण त्या पिशाच्चाने त्याला त्याचा मालक मेल्याचे स्वप्नांत सांगून त्याला तिकडे जायला प्रवृत्त केले. महाराजांनी "हे स्वप्न पिशाच्चाचे आहे" असे सांगूनही त्याने माणगांव सोडले व ही संधी साधून त्या पिशाच्चाने त्याचा बळी घेतला. ब्रह्मावर्तात एका मुलाला आपल्या अस्पृश्य आईकडे जाण्यासाठी हट्ट करायला प्रवृत्त करून, महाराजांनी दिलेले यंत्र काढायला लावले व त्याचा घात केला. ह्याच पिशाच्चाने तिला तिच्याच शरीरांत प्रवेश करून सांगितले की, माझा दीड रुपया देणे तू दिला नाहीस म्हणून मीच तुझा हा मुलगा मारला व तुझ्या नवऱ्यालाही मीच भ्रष्ट (मुसलमान) केले. तुझ्या मोठ्या मुलाला वेड लावून तुझा गर्भपातही मीच केला आहे." यावरून पिशाच्चांची सूडभावना केवढे भयानक स्वरूप धारण करू शकते ते लक्षांत येईल.

शारीरिक व्याधींचा प्रादुर्भाव हे पिशाच्चांच्या पीडेचे एक मुख्य स्वरूप आहे. हावनूर येथील चातुर्मासांत, एका वैष्णव स्त्रीला तिचा भाऊ घेऊन आला. लग्नानंतर काही दिवसांतच तिचे सांधे आखडून तिला चालणे-फिरणेच काय पण उठणे-बसणेही शक्य होत नव्हते. श्रीमहाराजांनी त्या स्त्रीकडे पाहतांच खरा प्रकार जाणला व आपल्या कमंडलूतील पाणी तिच्या अंगावर शिंपडले. लगेच त्या पिशाच्चाचा संचार होऊन "मी जातो, मी जातो" असे ती ओरडू लागली. त्या पिशाच्चाला त्या दुष्ट योनीतून मुक्ति देण्याचे श्रीमहाराजांचे आश्वासन मिळतांच ते पिशाच्च त्या स्त्रीला सोडून गेले व ती उठून चालत आपल्या घरी गेली. असे अनेक चमत्कार श्रीमहाराजांच्या कृपेने सतत घडून जात.

एक श्रीमंत गृहस्थ वाडीला महाराजांकडे आपल्या व्याधिग्रस्त पत्नीला घेऊन आला. त्याला महाराजांनी त्याच्या पूर्वजांनी ऋण न फेडल्याने पिशाच्च पीडा होत आहे असे सांगून त्याला तेवढे पैसे त्या पिशाच्चाप्रीत्यर्थ ब्राह्मणभोजनांत खर्च करण्यास सांगितले. तेवढ्या पैशांची ब्राह्मण समराधना झाल्यावर त्या स्त्रीचे आरोग्य उत्तम झाले.

दक्षिणेत बनवासी येथे एका गृहस्थाने महाराजांकडे येऊन सांगितले की त्याने नवीन घर बांधताच एक पिशाच्च पूर्वसूचना देऊन ते घर पाडून टाकत असे. श्रीमहाराजांनी त्याला काही धार्मिक अनुष्ठान सांगितले ज्याच्या योगे त्याचे घर टिकून राहिले.

आळंदीकर नांवाच्या एका ब्राह्मणाला, चोरांच्या टोळीने बलीदानाच्या पौरोहित्याची दक्षिणा म्हणून काही सोन्याचे दागिने दिले. त्यांच्या पत्नीने ते अंगावर घालताच ती वेडे चाळे करू लागली. दहा वर्षे अनेक प्रयत्न करून निराशा पदरी पडल्याने ते गाणगापूरला श्रीदत्तसेवेसाठी गेले. तेथे त्यांना श्रीदत्तप्रभूंनी "मी वासुदेवानंद सरस्वती ह्या नावाने गरुडेश्वरी वास्तव्य करीत आहे" असा दृष्टांत दिला आणि दुसऱ्याच दिवशी गाणगापूर सोडायची आज्ञा दिली. त्याप्रमाणे ते गरुडेश्वरी आले व स्वामीमहाराजांच्या कृपेने त्यांच्या आज्ञेप्रमाणे त्या पिशाच्चाच्या मुक्तीसाठी कार्य करून कृतार्थ झाले.

आंध्र प्रदेशांत कोगूर गांवी श्रीपादशास्त्री अय्यर नांवाचे गृहस्थ आपल्या वहिणीला घेऊन महाराजांकडे आले. ती वारंवार बेशुद्ध पडत असे. डॉक्टर-वैद्य आदि सर्वांचे उपाय निष्फळ झाले होते. महाराजांनी ही पिशाच्चबाधा असल्याचे सांगता शास्त्रीबुवांनी पिशाच्चयोनीचे अस्तित्त्व आपल्याला मान्य असले तरी मनुष्ययोनीचा त्याच्याशी संबंध येतो हे पटत नसल्याचे सांगितले. "तो संबंध असतो की नाही हे तुम्ही प्रत्यक्षच पहा" असे सांगून महाराजांनी त्यांना एका विटेवर एक मंत्र लिहून मंत्राचा जप विटेपुढे धूप घालून रोज एकवीस वेळा करायला सांगितला. तसे करतांच महाराजांच्या सांगण्याप्रमाणे बरोबर एकवीस दिवसांनी ते पिशाच्च बोलूं लागले व त्याने आपल्याला ही योनि प्राप्त होण्याचे व त्यांच्या बहिणीस त्रास देण्याचे कारणही शास्त्रींना सांगितले. पुढे आपली जाण्याची इच्छा नसतांही श्रीमहाराजांचा ताप सहन होत नसल्याने आपण जात असल्याचे सांगून आपल्यासाठी विशिष्ट कार्य करायला सांगितले. ते कार्य करतांच शास्त्रींच्या भगिनी त्या आजारापासून मुक्त झाल्या. अशा रीतीने पिशाचयोनीचे अस्तित्त्व व त्यांचा मनुष्यांशी येणारा संबंध यांचा सप्रयोग वस्तुपाठ करून श्रीस्वामीमहाराजांनी अय्यरशास्त्रींची खात्री पटवली.

पिशाच्चबाधेचे आणखी एक स्वरूप म्हणजे संततीनाश होय. मंडलमहापूर येथील भैरवप्रसाद नांवाच्या एका माणसाची पांच मुले पिशाच्चबाधेने गेली. तेव्हा तो महाराजांना शरण आला. त्यांनी त्याला नारायणबळी करून विष्णुसहस्रनामाचे पाठ व कांही प्रायश्चित्तही सांगितले. त्यायोगे त्याची संतती जगू लागली.

अशा अनेक लोकांनी श्रीमहाराजांच्या कृपेने आपापली कार्ये सिद्ध केली. अर्थात् कांही लोकांनी अश्रद्धेने त्यांची आज्ञा पाळली नाही व ते आपल्याच नाशाला कारणीभूत झाले. महाराजांच्या कृपाछत्रांतील एका मुलीच्या यजमानांनी महाराजांच्या आज्ञेविरुद्ध सासरच्या मंडळींच्या, पत्नीच्या विरोधाला न जुमानता शांति होण्यापूर्वीच आपल्या मुळावर जन्मलेल्या मुलाचे दर्शन घेतले. परिणामी एका वर्षाच्या आंत क्षयाने मृत्यू ओढवून घेतला.

आपल्याकडे येणाऱ्या सर्व जनांच्या प्रापंचिक अडचणीत एवढे लक्ष घालून त्या दूर करण्यासाठी इतके अथक परिश्रम महाराजांसारख्या विरक्त संन्याशाने कां करावेत असा प्रश्न साहजिकच पडतो. समर्थ म्हणाल्याप्रमाणे "मुळीच नासका" अशा प्रपंचाविषयी स्वतः पूर्णपणे उदासीन असूनही ही सगळी उठाठेव महाराजांनी कां बरे केली असेल? महाराजांचे प्रेमी व अधिकारी वेदान्ती सांगलीचे एकसंबेकर शास्त्री यांनाही नेमका हाच प्रश्न पडला होता. त्यांनी महाराजांना तसे स्पष्ट विचारलेही की "आपल्यासारख्या संन्याशाला हा खटाटोप कशासाठी?" श्री महाराजांनी त्यांना त्यांचे सरळ उत्तर दिले नाही. पुढे एकदां बोलता बोलता त्यांना विचारले की, "कां हो शास्त्रीबुवा, तुम्हांला कांही उपाधि नसतांना तुम्ही संन्यास कां नाही घेत?" शास्त्रीबुवा म्हणाले, "आमचे हे देहप्रारब्ध आहे त्याला इलाज नाही." महाराज लगेच म्हणाले तुम्हाला तेवढे देहप्रारब्ध आणि दुसऱ्याला ते नाही की काय?" शास्त्रीबुवांपुरते हे कदाचित् त्या प्रश्नाचे उत्तर असेलही. पण आपल्याला ह्याचे अधिक समर्पक आणि समाधानकारक स्पष्टीकरण महाराजांच्या द्विसाहस्री ग्रंथांत आढळते. अर्थात् स्वतःचे महत्त्व प्रकट करणारे हे उत्तर महाराजांच्या मुखांतून प्रकट होणे शक्यच नव्हते.

*ईदृश्योऽलौकिका लीला कृता भक्तिविवित्सया । भजेयुर्मां कथमपि लोका इत्याशयोऽस्य तु ॥४९॥*

*लोके प्रत्युपकारित्वं समीक्ष्य भगवान्विभुः । लौकिकानंदजनकां चमत्कृतिमिहाकरोत् ॥५०॥*

*हेतुनानेन तल्लोका भजन्ति भगवत्पदम् । भजनादेव निर्धूतमला यान्ति मुमुक्षुताम् ॥५१॥*

सायंदेवाला यवनभयापासून मुक्त केल्याची कथा सांगून झाल्यावर श्रीमहाराजांनी दत्तावताराचे नित्य कार्य विशद करणारे हे श्लोक लिहिले आहेत.

"यासारख्या अलौकिक लीला (श्रीदत्तप्रभूंनी) भक्तिमार्गाच्या विकासासाठी केल्या. कोणत्याही प्रकाराने लोकांना आपल्या भजनी लावणे एवढाच त्यांचा हेतु (असतो). लोकांची प्रत्युपकाराची भावना पाहून, त्यांना संतोष देणारे (असे कांही) चमत्कार प्रभु इथे दाखवितात. ह्या कारणाने (कां होईना) त्यांची ईश्वरचरणी भक्ति जडेल आणि त्या भजनाने (अष्टविध भक्तीने) त्यांचे मनोमल धुतले गेले की सहजच मोक्षाची तीव्र इच्छा (मुमुक्षा) त्यांच्या चित्तांत प्रकट होईल" ही ज्ञानाची पहिली पायरीच होय. इथूनच पुढे अभ्यास-वैराग्यांच्या साधनांनी गुरुकृपा होऊन पुढे जीवनमुक्तीचे ते अधिकारी होतील अशा अर्थाचे श्लोक आले आहेत. म्हणजेच केवळ ऐंद्रिय सुखाच्या मागे धावून जन्ममरणाच्या फेऱ्यांत भ्रमणाऱ्या जीवांना भक्तीची गोडी लावण्यासाठी भगवान त्यांच्या प्रापंचिक जीवनांत अनुकूल असे कांही चमत्कार घडवतात ते त्यांची आसक्ती वाढवण्यासाठी नव्हे तर त्यांच्या चित्तांत ईश्वरप्रेमाचे बीज रुजविण्यासाठी ! ह्याचेच नांव लोकसंग्रह आणि हेच स्वामीमहाराजांच्या समर्पित, अविश्रांत, निःस्वार्थ जीवनाचे रहस्य होय.

कांही प्रापंचिक अर्थाच्या, म्हणजेच कामनेच्या प्राप्तीद्वारा परमेश्वराच्या भक्तीला लागलेला अर्थार्थी भक्त हा भक्तिमार्गाचा पहिला टप्पा होय. या अवस्थेत परमेश्वर हे साध्य किंवा ध्येय नसते तर प्रापंचिक सुखाचे एक साधनच अशी भावना असते. आपल्या सांसारिक जीवनाला पुष्टि देणारा, त्यांतील उणीवा भरून देऊन त्याला पूर्णता देणारा प्रभु अशीच ईश्वराविषयी श्रद्धा असते. परमेश्वर हा अत्यंत दयाळू व सर्वसामर्थ्यसंपन्न असला तरी आपल्या भक्तांनी कायम विषयांच्या भोगांत मग्न रहावे हे त्याला (म्हणजेच श्रीगुरूंना) अभिप्रेत नाही. शिवाय कर्मसिद्धान्त हा सृष्टीच्या मुळाशीच निगडित असल्याने त्यापासून कुणालाही मोक्षाशिवाय सुटका नाही. मोक्ष हा आत्मज्ञानाशिवाय संभवत नाही. तसेच आत्मज्ञान हे वैराग्याशिवाय लाभत नाही. असे असल्याने परमेश्वर या अर्थार्थी भक्ताला केवळ संसारांत

रमूं देत नाही. त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणे प्रत्येक जीवाला, त्यांत भक्तही आलेच, सुखदुःखांना सामोरे जावेच लागते.

अशा रीतीने सुखदुःखाचे आघात झेलीत जाणारा हा आर्त भक्त ह्या द्वंद्वातूनच पूर्णपणे सुटण्याची म्हणजेच मोक्षाची इच्छा करूं लागतो. पापपुण्य भोगून त्यांचा जसा जसा क्षय होतो तसतशी चित्तशुद्धी होते व मुमुक्षा प्रकट होते. चित्तशुद्धीच्या प्रमाणांत ही मुमुक्षा तीव्र होत जाते. हा भक्त **जिज्ञासू** या संज्ञेला प्राप्त होतो. अशा परिपक्व भक्ताला परमेश्वर मग सद्‌गुरूंची भेट घडवून देतो. अर्थात् अर्थार्थी आणि आर्त भक्तापेक्षां यांची संख्या कमीच असते. असे शेकडो जिज्ञासू भक्त श्रीस्वामीमहाराजांकडे येत असत. यांच्यात वय, लिंग इत्यादि विविधता तर होतीच पण सर्वांत महत्त्वाची विविधता होती ती त्यांच्या आध्यात्मिक अधिकाराची. आध्यात्मिक अधिकार हा शब्द इथे विशिष्ट अर्थाने योजला आहे. प्रत्येक साधकाचा एक स्वतंत्र, वेगळा असा अधिकार असतो. ह्याच्याशी त्याच्या मोठेपणाचा कांही संबंध नसतो. त्या साधकाची पूर्वीची जन्मांतराची साधना, प्रगती आणि प्रकृती यांच्या समुच्चयाला अधिकार म्हटले आहे. ह्या त्याच्या अधिकारानुसारच श्रीस्वामीमहाराज त्यांच्याकडे येणाऱ्या भक्तांना त्यांचा हा अधिकार नेमका ओळखून भावी पारमार्थिक वाटचालीचे मार्गदर्शन करीत असत. सर्वच साधकांना एकच साचेबंद साधन उपकारक होईल असे नाही. प्रत्येक साधकाचा एक आपलाच मार्ग असतो असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

श्रीमहाराजांचे आध्यात्मिक ज्ञान किती विशाल होते हे सांगणेच अशक्य आहे. योगमार्गाच्या अनेक साधनांची त्यांना केवळ माहितीच नव्हती तर त्या प्रत्येक साधनांचे अनुभवपूर्ण दिग्दर्शन करून त्या त्या साधकाला आपल्या ध्येयापर्यंत पोचविण्याचे सामर्थ्य त्यांच्याकडे होते. उपासना, तंत्र, हठयोग, वैदिक कर्ममार्ग, अष्टाङ्गयोग, ज्ञानमार्ग ह्या सर्व मार्गांचे साधक स्वामीमहाराजांकडे येऊन कृतार्थ झालेले आहेत. त्यापैकी काहीच ज्ञात आहेत. त्यातही बहुवंशी साधक आपले आध्यात्मिक जीवन गुप्तच ठेवत असल्याने ही माहिती अगदी मर्यादित स्वरूपाचीच असणार. तरी त्यांच्या चरित्राचा व कांही आठवणींचा मागोवा घेतला तर थोडीशी कल्पना येऊ शकेल.

### भक्तिमार्ग

सर्वसाधारणतः श्रीमहाराजांनी अधिकांत अधिक उपदेश केला असेल तर तो भक्तिमार्गाचा. त्यांतही विशेषतः श्रीदत्तप्रभूंच्या भक्तीचा. श्रीदत्तसंप्रदाय हा श्रीभागवतसंप्रदायांतर्गत आहे अशी श्रीमहाराजांची भूमिका होती. त्यांची भूमिका तर यापेक्षांही अधिक उदार व समन्वयाची होती. हिंदु (वैदिक) धर्मातील संप्रदायांची तर सोडाच पण जैनादिक भारतीय व पारसिक, मुसलमान वगैरे भारताबाहेरच्या संप्रदायांचीही त्यांनी उपेक्षा केली नाही. त्या त्या धर्मातील भक्तांना त्यांच्या धर्मग्रंथांतील उपासना ते देत असत. तसे अनुभवही साधकांना येत व त्या उपासना वंशपरंपरेने आजतागायत करणारी परधर्मीय कुटुंबेही पाहण्यांत येतात.

भक्तिमार्गात भावाला महत्त्व आहे. भाव म्हणजे परमेश्वराविषयी एक विशिष्ट प्रेमसंबंध. स्वामी, पूज्य, सखा, बंधु, पति, त्राता, कैवारी, प्रियकर असा कुठलाही एक भाव ईश्वराविषयी धारण करून तो वाढवणे याचे नांव भक्तिमार्ग. ह्या भावांत महत्त्व आहे ते अनन्यतेला, सातत्याला आणि तीव्रतेला, भावाच्या बळानेच ईश्वर आकळतो असे सर्व वेदशास्त्र-संतांचे सांगणे आहे. या मार्गात आचारासंबंधी फार कडक नियम नाहीत. भक्ताच्या भावाच्या दाढ्याचे व निश्चयाचेच प्राधान्य आहे. 'भावांत फरक करूं नये' असे श्रीस्वामीमहाराज सांगत. याची एक हकिकत पाहण्यासारखी आहे. नरसी (शके १८२८) चा चातुर्मास झाल्यावर वाशीमवरून महाराज कारंजा येथे आले व तेथे काळ्या मारुतीच्या मंदिरांत मुक्काम केला. तेथील पुजाऱ्यांचा असा नियम होता की मारुतीला नैवेद्य दाखवला की लगेच तो खाऊन टाकायचा व मग पूजा समाप्त करायची. त्या दिवशी श्रीमहाराजांच्या उपस्थितीमुळे त्यांना संकोच वाटून त्यांनी नैवेद्य भक्षण केला नाही. इकडे श्रीमहाराज ध्यान करीत असता श्रीमारुतीरायच ध्यानात आले व आपल्याला खायला पाहिजे अशा अभिप्रायाने मुख पसरून उभे राहिले. ही गोष्ट महाराजांनी पुजाऱ्याला सांगतांच त्यांनी लगेच तो नैवेद्य खाऊन टाकला. मग मात्र श्रीमारुतिराय श्रीमहाराजांच्या ध्यानात आले नाहीत. यावर महाराजांनी त्या पुजाऱ्यांना सांगितले की, 'देवाला भक्ति फार प्रिय आहे. तरी तुम्ही कोणाचीही भीड न धरता आपल्या नियमात व भावनेत बदल करू नका.'

भक्तिमार्गात सर्व वर्णाच्या, सर्व आश्रमाच्या एवढेच नव्हे जातिधर्माच्या साधकांना प्रवेश आहे. **'अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥'** (श्रीमद्‌भगवद्‌गीता ९:३०) या भगवदुक्तीला अनुसरून मनापासून संसाराला विटलेल्या कोणत्याही जीवाची श्रीस्वामीमहाराज उपेक्षा करीत नसत. सरस्वतीबाई नावाच्या एका वेश्येला उपरति होऊन ती वाडीला येऊन देवाची सेवा करीत होती. ती चांगली गायिका असल्याने श्रीदीक्षित स्वामींनी तिला नित्य देवापुढे करुणात्रिपदी म्हणायला सांगितले होते. एकदा श्रीस्वामीमहाराजांच्या मुक्कामात त्या बाईनी त्यांच्यापुढे करुणात्रिपदीचे उत्तम तालासुरासहित गायन केले. त्यांचा भाव पाहून श्रीमहाराजांनी त्यांना 'भावें नमूं श्रीगुरुंच्या पदासी' हे श्रीगुरुस्तोत्र लिहून दिले व काही ध्यानाभ्यासहि सांगितला. पुढे सरस्वतीबाईनी आमरण श्रीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे साधन करून मानवजन्माचे सार्थक करून घेतले.

असेच एक उदाहरण श्रीस्वामीमहाराजांच्या शिनोर येथील मुक्कामात घडले. जगला नावाचा एक कोळी जातीतला तरुण. घरच्या लोकांनी त्याचे लग्न ठरवताच पळून निघाला तो शिनोरला येऊन जवळ जवळ विदेही अवस्थेत येऊन राहिला. शीतोष्णादि द्वन्द्वे सहन करीत तो जडभरताप्रमाणेच तिथे दोन वर्षे राहिला होता. एकदा श्रीमहाराज घाटावरून स्नान करून येत असता जगलाने दोन्ही हात पसरून त्यांच्या मार्गात उभे राहून त्यांना अडविले. श्रीमहाराजांनी त्याच्याकडे एक वेळ पाहून त्याला बोलले, 'तू इथे राहतोस काय ? रात्री मार्कंडेयाच्या मंदिरांत ये.' असे त्याला बोलून महाराज मुक्कामी आले. संध्याकाळी त्यांनी सर्वांना सांगितले की आज रात्रीपासून गीता सांगावयाची आहे. रात्री प्रवचनाला सुरुवात होण्यापूर्वी वेळेवर येऊन जगला एका कोपऱ्यात बसला. असा क्रम रोज सुरू झाला. पुढे गीतेचे १७ अध्याय सांगून झाल्यावर 'यापुढे आपल्याला काही ऐकावयाचे नाही' असे सांगून तो निघून गेला. यापुढे एक-दोन महिन्यांतच त्याने आपली देहयात्रा संपवली. हे **'तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन'** (भ. गी. ६:४३) ह्या योगभ्रष्टाच्या गतीविषयक भगवंतांच्या आश्वासनाचे प्रत्यक्ष उदाहरण आहे. प्रारब्धकर्मानुसार हीन जातीत जन्म झालेल्या जगलाला पौर्वदेहिक संस्कारांमुळे

लहान वयांतच विरक्ति होऊन तो मोक्षप्राप्तीसाठी प्रयत्न करू लागला. श्रीमहाराजांसारख्या दत्तावतारी पुरुषांची गांठ पडून त्यांचा अनुग्रह झाला आणि त्याच्या आयुष्याचे सार्थक झाले.

भागवत धर्मात श्रीमद्‌भागवताचे जे स्थान तेच श्रीदत्तसंप्रदायांत श्रीगुरुचरित्राचे आहे. ह्या ग्रंथाच्या पठणाने श्रीदत्तप्रभूंची कृपा सहस्त्रावधि भक्तांनी प्राप्त करून घेतली, घेत आहेत व घेतील. इंदोरचे **प. पू. नानामहाराज तराणेकर** यांनी या ग्रंथराजाच्या पठणाने व आपल्या तीव्रसंवेगी भक्तीने श्रीमद्वासुदेवानन्द सरस्वती यांची कृपा संपादन केली. आपल्या दीर्घ आयुष्यात श्रीस्वामीमहाराजांच्या शिष्यांनी मोठ्या प्रमाणात सर्व भारतातच नव्हे तर जगभर श्रीदत्तभक्तीचा प्रचार केला आहे. परंतु हा ग्रंथ मराठी असल्याने महाराष्ट्राबाहेरच्या दत्तभक्तांना त्याचा हवा तेवढा लाभ होत नव्हता. ह्या त्रुटीचा परिहार करण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांकडून श्रीदत्तप्रभूंनी 'श्रीगुरुचरितम्' (द्विसाहस्त्री) व 'श्रीगुरुसंहिता' (समश्लोकी) हे ग्रंथ करून घेतले. त्यामुळे श्रीगुरुचरित्राचा 'तारक व अव्यय ग्रंथात्मा' अखिल भारताला उपलब्ध झाला.

असा हा भक्तियोग 'सुलभ, गोमटा' असला तरी श्रीतुकारामोक्तिप्रमाणे 'उपतिष्ठे पूर्वपुण्यें' ! अंतःकरणांत ईश्वराविषयी कुठल्याही नात्याने प्रेमाचाच काय पण द्वेषाचाही उदय होण्याला पूर्वपुण्यच पाहिजे. अनेक जन्मांच्या कर्मानुष्ठानाने चित्तशुद्धी झाल्यावरच भक्तीची वाट सापडते. त्यासाठी कर्मयोगाचाच आश्रय सर्वसाधारण मुमुक्षूंना घ्यावा लागतो.

## कर्मयोग

संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण असे कर्माचे तीन विभाग आहेत. अनेक जन्मांच्या कर्माचा कोष अशा संचितांतून परिपक्व (फलाभिमुख) झालेल्या एका जन्माच्या कर्माला प्रारब्ध असे नाव आहे. आणि मानवी जीवनांत आपण प्रत्यही जे नूतन कर्म करतो त्याला क्रियमाण म्हणतात. अर्थात् नवीन कर्म करताना आपण सावधगिरी बाळगली तर हे क्रियमाण सर्व पुण्यात्मकच होऊ शकते. ह्यासाठी परमेश्वरप्रणीत शास्त्राने काही कर्म विहित केले आहे. म्हणजेच प्रत्येक मानवाला आपल्या वर्णाश्रमांना अनुसरून काही आवश्यक कर्म निर्धारित केले आहे. हे न केले तर तो प्रत्यवाय दोष होतो. ('नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ॥३:८॥', 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥१८:४५॥' भ. गी.) इतर (काम्य) कर्मातील काही भाग निषिद्ध केला आहे. ह्या कर्माने मनुष्याची अवनति होते. हे निषिद्ध कर्म सोडून इतर काम्य कर्माची माणसाला मुभा आहे. ह्या सर्व कर्माच्या शिवाय आणखीही काही कर्मे वर्णिलेली आहेत. इष्ट, पूर्त, शांति, पुष्टि, यज्ञ इत्यादि कर्मे पुण्यप्राप्ति, पापक्षय, प्रापंचिक लाभ इत्यादि उद्देशांनी सांगितली आहेत. तसेच केवळ पारमार्थिक प्रगतीसाठी निरनिराळ्या आध्यात्मिक शास्त्रांनी निर्देशित केलेली कर्मे आहेत. ह्या कर्माच्या योगे संचित कर्माचाही नाश होऊन जीव या कर्मचक्रातून मुक्त होतो. हाच कर्मयोग होय. कोणत्याही साधकाचा मार्ग इथूनच सुरू होतो. कर्मयोगाकडे दुर्लक्ष करून परमेश्वरप्राप्तीचा विचार करणे शक्य नाही. यासाठी श्रीस्वामीमहाराज नेहमी सांगत, 'प्रजाजनांनी राजाचे कायदे पाळले म्हणजे राजाला जसा संतोष होतो, तसाच संतोष शास्त्रनियम पाळल्याने ईश्वराला होतो. करिता शास्त्राज्ञेप्रमाणे वागून ईश्वराची सेवा करा व आपले कल्याण करून घ्या.'

ह्याच कारणाने श्रीमहाराजांनी विहित कर्माच्या आचरणाचा कटाक्ष स्वतःच्या जीवनात दाखवून दिला व आपल्याकडे येणाऱ्या सर्वांनाच विशेषतः ब्राह्मणांना त्याचे पालन करण्यास प्रवृत्त केले. तशी श्रीदत्तप्रभूंची त्यांना आज्ञाच होती. केस राखणाऱ्या ब्राह्मणांना किंवा सकेशा विधवांना त्यांचे दर्शनही मिळत नसे. तसेच पंचमहायज्ञ न करणाऱ्या ब्राह्मणाच्या घरी ते भिक्षा घेत नसत. पण त्यांना शरण आलेल्यांना ह्या मार्गाचे शिक्षण देण्यासाठी किंवा त्यांच्या अनुष्ठानांत साह्य करण्यासाठी ते सतत झटत असत. आसेतुहिमाचल त्यांनी कर्म मार्गावर स्थिर केलेली ब्राह्मण कुटुंबे त्यांच्या ह्या कार्याची आजही साक्ष देत आहेत. इथे एकदोन प्रातिनिधिक उदाहरणे पाहता येतील.

श्रीमहाराजांच्या उज्जैनी येथील पहिल्याच चातुर्मासानंतर महत्पूर येथे काही दिवस राहून महाराज सारंगपूर येथे आले. तेथे लोकांच्या आग्रहाने काही दिवस मुक्काम झाला. तेथे केशवराव नावाचा एक पुण्याकडचा विधुर ब्राह्मण आपल्या आईबरोबर राहत असे. तो देवी डॉक्टर होता. प्रथम पत्नी अत्यंत सुशील व विरक्त असून तिचा एक मुलगाही होता. तो अत्यंत लहान वयात आपल्या ईश्वरभक्तीने लोकांना प्रिय झालेला. कोणी योगभ्रष्ट पाच वर्षांच्या वयांतच एका जटाधारी बुवाच्या भेटीनंतर, दुसरे दिवशी स्नानोत्तर गावातील सर्व लोकांना बोलावून त्यांना परमेश्वराचे स्मरण नित्य ठेवून सन्मार्गाने वागण्याचा उपदेश केला व 'सदा सर्वदा योग तुझा घडावा' हा श्लोक म्हणून देवाला नमस्कार करून त्याने शांतपणे देह सोडला. त्याच्या आईनेही अजिबात शोक न करता सर्वांना प्रपंचाच्या नश्वरतेची जाणीव करून देऊन, आपणही सहा महिन्यांनी पंढरपूर येथे देह ठेवणार असल्याचे सांगितले व तसेच झालेही. अंतकाळी तिने पतीला त्याचा द्वितीय विवाह मोरोपंतांच्या घराण्यातील मुलीशी होऊन त्याचा वंश तिच्यापासून वाढेल असे सांगितले. केशवरावाचा विरोध असताही तो विवाहसंबंध घडला. इतक्या विलक्षण घटना स्वतःच्या घरांत घडूनही केशवरावाचा नास्तिकपणा काही गेला नाही.

असा हा सर्व ब्रह्मकर्माचा त्याग केलेला केशवराव श्रीमहाराजांच्या मुक्कामात आईच्या सांगण्यावरून महाराजांना भिक्षेला बोलावण्यास गेला. तेव्हा श्रीमहाराजांनी स्पष्टच सांगितले की, 'तू ब्राह्मणासारखा दिसतसुद्धा नाहीस, तुझ्या घरी नैवेद्य-वैश्वदेव काहीसुद्धा होत नाही तरी तुझ्या घरी आपण भिक्षेसाठी येणार नाही.' यावर केशवराव याने आपण पुण्याचे कऱ्हाडे ब्राह्मण असल्याचे व आपण ब्रह्मकर्म करीत नसलो तरी भिक्षेच्या दिवशी कुणाकडून करवून घेऊ असे सांगितले. त्यावर महाराज अधिकच रागावले व अशा लोकांचे आपण तोंडही पहात नाही तेव्हा जेवण तर दूरच असे सांगून त्याला पाठविले. या प्रसंगी उपस्थित लोक महाराजांना बोलले 'महाराज ! केशवराव अत्यंत दुष्ट मनुष्य आहे... तो आता परत येणार नाही.' यावर महाराज म्हणाले, 'थांबा, काय होते ते पहा. केशवराव परत आलाच पाहिजे.'

महाराजांच्या निर्भत्सनेने तापलेल्या केशवरावाने घरी जाऊन ही हकीकत आईला सांगितली. आई उलट त्याच्यावरच रागावली व म्हणाली, 'महाराज घरी भिक्षेला येत नसतील तर आम्ही कसले ब्राह्मण !' आता मात्र केशवरावला उपरति झाली व काही करून महाराजांना आपल्या घरी भिक्षेस आणावयाचेच असा निश्चय करून तो परत महाराजांकडे आला. साष्टांग नमस्कार करून तो महाराजांना बोलला, 'मी महादोषी आहे. आपण दया करून

मला पदरात घ्या. यापुढे आपण सांगाल तसे मी वागेन.' त्याची ही नम्र व कळकळीची विनंती ऐकून उपस्थित मंडळींना आश्चर्य वाटले. हा केवळ सत्संगाचा महिमा होय. स्वतःच्या पत्नी व मुलाच्या अलौकिक मृत्यूंनीसुद्धा न गेलेला नास्तिकपणा श्रीमहाराजांच्या निर्भत्सनेने जाऊन तो त्यांना शरण आला. कोणत्याही प्रापंचिक कामनेने किंवा आर्तीने नव्हे तर स्वतःच्या उद्धाराच्या भावनेने जिज्ञासू होऊन केशवराव आता आला होता. त्याच्या पाठोपाठ त्याची आईसुद्धा तिथे आली. तिने विनंती केली की, 'आपण याला ब्रह्मकर्म शिकवून तो तसे वागू लागला की मग आमच्या घरी भिक्षा घ्यावी.' ही विनंती महाराजांनी मान्य केली व सारंगपुरांत राहून केशवरावला संध्या, पूजा, वैश्वदेव इत्यादी नित्य ब्रह्मकर्म शिकवले व त्याप्रमाणे तो वागू लागला एवढेच नव्हे तर नित्यकर्म केल्याशिवाय पाणीसुद्धा पिईनासा झाला. अर्थात् महाराजांनी त्याच्या घरी भिक्षा घेतली हे सांगायला नकोच.

असंख्य लोकांना महाराजांनी ब्रह्मकर्माचे तसेच याज्ञिकादि कर्मकांडांचे शिक्षण दिले आहे. त्याचप्रमाणे वेदवेदांगांचे शिक्षणही त्यांनी अनेकांना दिले. काही अधिकारी मंडळींना दुर्लभ, लुप्तप्राय अशा वेदविद्येचे दान केले. उदाहरणार्थ पाथरीच्या चौधऱ्यांचे पुरोहित आप्पादेव व आण्णादेव यांना त्यांच्या दीर्घकाळच्या इच्छेप्रमाणे गोपेगांवी अरण्यांत सतरा दिवस राहून लिंबाच्या झाडाखाली आरण्यकांची संथा केली. डाकोरला रामशास्त्री प्रकाशकर यांना एका वर्गाच्या जटा, घन, पंचसंधि, माला, रथक्रम, दंडक्रम इत्यादी विकृतींची संथा दिली. **ब्र. भू. पू. श्रीसीताराममहाराज** ह्या पूर्वाश्रमींच्या बंधूंकडून ब्रह्मावर्त येथे गायत्रीपुरश्चरण करून घेतले तसेच त्यांच्याकडून राजूर येथे एक संहितास्वाहाकारहि करून घेतला. कुरुगड्डीच्या चातुर्मासानंतर मराठवाड्याच्या भागांत संचार करताना वीस स्वाहाकार, दोन चातुर्मास्य याग व दोन ठिकाणी श्रीदत्तपादुकांची स्थापना अशी कार्ये झाल्याचे वर्णन आहे. कुडुत्रीचे शंकरशास्त्री गुळवणी यांचे बंधू (**प. पू. योगिराज श्रीगुळवणीमहाराज**) यांच्याकडून औदुंबर येथे श्रीदत्तमालामंत्राचे अनुष्ठान करून घेतले. तसेच हावनूर येथील मुक्कामांत स्वामीमहाराजांनी त्यांना श्रीविष्णुसहस्रनामाची व श्रीमद्‌भगवद्‌गीतेची संथा देऊन दहा दिवस संपूर्ण गीतेच्या अठरा अध्यायांवर पाठ दिले.

अशा रीतीने कर्मयोगाच्या अधिकारी जिज्ञासू भक्तांना श्रीस्वामीमहाराजांनी शास्त्रशुद्ध असे मार्गदर्शन तर केलेच पण अत्यंत प्रतिकूल अशा कलिकाळांतही त्या त्या साधकांकडून त्यांची संकल्पित कार्ये सुसंपन्न करून त्यांच्या पारमार्थिक प्रगतीला चालना दिली.

## अष्टांग योग

चित्तशुद्धिसाठी कर्मयोगांतर्गत उपासना व अनुष्ठानाप्रमाणेच योगमार्गातील प्रक्रियांचीही योजना आहे. निरनिराळ्या प्रकृतीच्या व परिस्थितीच्या साधकांना विविध उपासना परमेश्वराने निर्मिल्या आहेत. त्यांत पतञ्जलीप्रणीत अष्टांग योग ही एक प्रमुख साधनपद्धती आहे. ह्या योगाची यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी आठ अंगे आहेत. निर्विकल्प समाधी हे साध्य मानले तर सविकल्प समाधीला आठवे अंग समजतात. यमनियम हे सर्व धर्मपंथांच्या व सर्व उपासनापद्धतींच्या आचारांना मूलभूत आहेत. म्हणूनच श्रीस्वामीमहाराज म्हणतात, **'भक्तिक्रियाज्ञानयोगान्मुक्तिरुक्तापि तत्त्रयम् । क्षेमं साष्टाङ्गयोगान्तर्गतं वैयमतोऽत्र गो ॥'** भक्ति, कर्म आणि ज्ञान अशा तीन योगांना मुक्तिसाधनेत गणले आहे. त्यांचा अष्टांगयोगांत समावेश केला की मग वाद रहात नाही. अशा यमनियमांनी आत्मयमन (शिस्त) करून, आसनाने स्थैर्य प्राप्त करावे, प्राणायामाने दोषशोषण करावे, प्रत्याहाराने इन्द्रियजय, धारणेने पापनाश व ध्यानसमाधींनी आत्मैक्य साधावेत असे श्रीस्वामीमहाराज श्रीदत्तपुराणांत सांगतात. (५:५:३-४). योग हा सर्व मानवजातीला भक्तिमार्गाप्रमाणेच खुला आहे. पण योग्य मार्गदर्शक (सद्‌गुरु) नसेल तर इथे धोके फार आहेत.

श्रीस्वामीमहाराजांनी अनेक साधकांना त्यांच्या अधिकारपरत्वे योगाचे शिक्षण दिले आहे. अगदी प्राथमिक शुद्धिक्रियांसाठी ते खेचरी मुद्रेपर्यंत सर्व योगप्रक्रियांची सिद्धि शिष्याच्या अधिकाराप्रमाणे करून दिलेली दिसते. त्यांच्या योगमार्गातील शिष्यांपैकी एक प्रमुख श्री. गांडाबुवा (**प. प. श्रीयोगानंद सरस्वती**) होत.

वाठार (कोल्हापूर) या गांवचे **नरहरी दिवाण** यांना त्यांचे गुरु नरहरीमहाराज यांनी योगाभ्यास शिकण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांकडे पाठविले. महाराजांनी त्यांना योगाभ्यासाची माहिती देऊन पैठण येथे जाऊन त्याप्रमाणे अभ्यास करण्यास सांगितले. तेथे एका अग्निहोत्रीबुवांच्या आग्रहाने ते संस्कृत शिकू लागले. पुढे ते महाराजांच्या दर्शनाला आल्यावर महाराजांनी त्यांना तो नाद सोडून 'सांगितलेला अभ्यास करून मोक्षलाभ करून घे' असे बजावले. हेच दिवाण पुढे अष्ट्याचे दत्तमहाराज म्हणून प्रसिद्ध झाले. श्रीस्वामीमहाराज यांच्या आणखी काही योगमार्गातील अधिकारी शिष्यांत **श्रीसीताराम महाराज टेंब्ये, योगिराज, श्रीगुळवणी महाराज, श्रीरंगअवधूत महाराज, श्री. बाळासाहेब वैद्य**, मेलसा येथील **श्री. गोविन्द पंडित** अशी काही नावे उल्लेखनीय आहेत. प. पू. योगिराज श्रीगुळवणीमहाराजांनी हठयोगाचा पूर्ण अभ्यास केला होता व त्यांना खेचरी मुद्रा सिद्ध होती. यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या समाधीनंतर त्यांच्याच आज्ञेने बंगालचे सुप्रसिद्ध संन्यासी प. प. श्रीलोकनाथ तीर्थ (त्या वेळी स्वामी चिन्मयानन्द) यांच्याकडून शक्तिपातविद्या ग्रहण केली व भारतभरच नव्हे तर विश्वभर त्या विद्येचा प्रसार केला व अद्यापि करीत आहेत.

## ज्ञानयोग

वेदांतशास्त्राच्या संप्रदायनिष्ठ अनुशीलनाने आत्मसाक्षात्कार करून घेण्यालाच ज्ञानयोग म्हणतात. अर्थात् वेदांतशास्त्रांत साधक अधिकारी साधनचतुष्टयसंपन्न असावा लागतो. नित्यानित्यवस्तुविवेक (विचार), इहामुत्रभोगविराग (वैराग्य), शमादि षट्क (शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा व समाधान) आणि तीव्र मुमुक्षा ही चार साधने ज्याने जन्मजन्मांतरीच्या तपाचरणाने प्राप्त केली आहेत तोच वेदान्तश्रवणाचा अधिकारी होय. अनधिकाऱ्यावर वेदान्तश्रवणाचा विपरीत परिणाम होऊ शकतो. सावंतवाडीला पूर्वाश्रमात महाराजांच्याकडे एक ब्राह्मण आला होता. तो क्षयरोगाने पीडित असून सर्व उपाय थकल्यावर एका सद्‌गृहस्थाच्या सांगण्याने त्याने गुरुचरित्राचे वाचन सुरू केले होते. त्याने त्याची प्रकृति बरीच सुधारली. पण पुढे तो वेदान्ताचे श्रवण करू लागला; पण तो अनधिकारी असल्याने त्या श्रवणाचा प्रतिकूलच परिणाम होऊन कर्माविषयी अश्रद्धा झाली आणि त्याने सर्व आचार सोडला. त्याच्या क्षयाने पुनश्च उचल खाल्ली. त्यावर उपाय विचारायला तो महाराजांकडे आला. महाराजांनी त्याची ब्राह्मण जातीत जन्मूनही वेदान्ताच्या मागे लागून सर्व नित्यकर्मे टाकल्याबद्दल निर्भत्सना करून त्यानेच देवांची

अवकृपा होऊन क्षयाने जोर धरला आहे असे सांगितले. शेवटी 'आता तुम्ही तुम्हाला वेदान्त सांगणाऱ्या गुरुकडे जाऊन निरोगी व्हा' असा निरोप दिला. निराश झालेला तो ब्राह्मण परत गेला व काही दिवसांतच मरण पावला. तेव्हा ज्ञानयोग हा सर्वांसाठी नाही. आपल्या सर्व साधुसंतांनी वेदान्ताच्या सार्वजनिक प्रसाराला विरोध दर्शविला आहे.

अशा अधिकाऱ्याने श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा सद्‌गुरुंना शरण जावे व वेदान्ताचे - मुख्यतः चार महावाक्यांचे **श्रवण करावे** असे शास्त्र सांगते. ह्याने परोक्ष ज्ञान होते व संशय व असत्त्वावरणाचा (ईश्वर असूंच शकत नाही असा भ्रम) क्षय होतो. त्यानंतर केलेल्या श्रवणाचे **मनन** करून अभानावरण (ईश्वर असूनही भासत नाही) क्षीण करावे. त्यानंतर त्याच महावाक्यार्थाचे ध्यान म्हणजे निदिध्यासन करून त्याच्या परिपक्वावस्थेत मन ध्येयाकार झाले की समाधी अर्थात् साक्षात्कार असा साधारण क्रम आहे. साक्षात्कारानंतरही ज्ञानाच्या दृढीकरणासाठी वासनाक्षयादि अभ्यास सांगितले आहेत. अर्थातृच ह्या मार्गाचे अधिकारी विरळाच. श्रीमहाराजांकडून वेदान्ताचे श्रवण करण्याचे महद्‌भाग्य ज्यांना लाभले त्यांत बडोद्याच्या **श्री. रामशास्त्री प्रकाशकरांचे** स्थान विशेष आहे. नरसोबावाडीजवळील शिरोळ येथील **शंकरराव कुळकर्णी** घरची स्थिति उत्तम असूनही लहान वयांतच विरक्त झाले. संतवाङ्‌मयांचे वाचन बरेच केले. एकदा काशीस जाणे झाले असता त्यांना योगाभ्यासाची इच्छा झाली व तारकमठांत महाराजांच्या जवळ राहिलेले प्रज्ञानानंद सरस्वती यांच्याकडून स्वामीमहाराजांचे नाव समजले. लगेच ब्रह्मावर्तास येऊन महाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्यांनी इच्छा त्यांच्या कानांवर घातली. महाराजांनी त्यांच्या इच्छेला अनुसरून त्यांना षट्‌क्रिया शिकविल्या. नंतर त्यांना सांगितले की 'खरा आनंद वेदान्ताच्या अभ्यासावाचून मिळणे शक्य नाही; पण वेदान्तग्रंथ संस्कृतमध्ये आहेत.' तेथे शंकरशास्त्री दर एकादशीस, महाराजांनी लिहून दिलेल्या वेदान्तपर आख्यानांवरून कीर्तन करीत. शंकररावांनी महाराजांच्या जवळ राहून संस्कृत शिकण्याची तयारी दर्शविली. पण त्यासाठी महाराजांनी त्यांना नारायणशास्त्री एकसंबेकर यांच्याकडे पाठविले. तेथे संस्कृत शिकून वेदाध्ययन केले व काही शास्त्राभ्यासही झाला. याच काळात महाराजांनी त्यांना स्वहस्ते लिहिलेली ब्रह्मसूत्रभाष्याची पोथी श्री. दीक्षित महाराजांमार्फत पाठविली होती. कालांतराने शंकरशास्त्री शृंगेरीला गेले व न्याय-वेदान्तादि शास्त्राभ्यास करून परत आले. थोड्याच दिवसांत त्यांना संकेश्वरच्या जगद्‌गुरुपीठावर बसण्याचा योग आला. महाराजांनी ब्रह्मसूत्रभाष्याची पोथी देण्यांत हाच योग ध्वनित केला अशी यांची श्रद्धा ते वारंवार बोलून दाखवीत असत.

## ॐकारोपासना

ॐ हे एक अक्षरच ब्रह्मस्वरूप असून त्याचा परमेश्वर स्मरणपूर्वक उच्चार करून प्राण त्यागणारा उपासक परमपद पावतो, एवढेच नव्हे तर अज्ञसुद्धा संसारबंधनातून मुक्त होतो हा औपनिषदिक सिद्धान्त महाराजांनी दत्तपुराणांत (५:७:७-१४) प्रतिपादला आहे. त्यानंतरच मृत्यूच्या चिन्हांचे निरूपण आहे. आप्पा निगडीकर हा ब्राह्मण महाराजांबरोबर त्यांच्या आज्ञेविरुद्ध ब्रह्मावर्ताला येऊन राहिला होता. पुढे तेथे प्लेगची साथ सुरू झाली व आप्पाला प्लेग होणार असे महाराजांना देवांचे सांगणे झाले. तेव्हा महाराजांनी त्यांना प्रत्यक्ष न सांगता मृत्यूची चिन्हे फक्त सांगून ठेवली. आप्पाला ती चिन्हे दिसू लागताच त्याने महाराजांना आपल्याला संन्यास घेण्याची इच्छा असल्याचे सांगितले. लगेच महाराजांनी त्याला आतुर संन्यास देऊन त्याच्याकडून प्रेषोच्चार करवून घेतला. शेवटी दीर्घप्रणवाचा उच्चार करीत असताच आप्पांनी देह ठेवला. त्या वेळी लिहिलेल्या एका पत्रांत महाराजांनी 'हे मरण योग्यांनासुद्धा दुर्मिळ' असे उद्‌गार काढले आहेत.

## संन्यासमार्ग

वरील उदाहरणांत स्वामीमहाराजांनी आप्पांना अंतकाळी आतुर संन्यास दिल्याचे दिसते; एरवी मात्र महाराजांनी कुणालाही संन्यास दिल्याचे आढळत नाही. शके १८३० मध्ये सीताराममहाराजांना हरिहर येथे संन्यास घेण्याबद्दल दृष्टांत झाल्याने ते कोगूर येथे महाराजांकडे आले व तेथील महाराजांचे भक्त ब्रह्मानंद सरस्वती यांच्यामार्फत ही गोष्ट त्यांच्या कानावर घातली. महाराजांनी गीतेतील 'उद्धरेदात्मनात्मानं' या श्लोकाच्या माध्यमांतून आपला नकार कळविला. अनधिकारी व्यक्तीला संन्यास देण्याच्या ते विरुद्ध होते. तीव्र मुमुक्षा, प्रखर वैराग्य व नितांत गुरुभक्ति असेल तरच तो खरा संन्यासाचा अधिकारी होय. मंडलेश्वरला महाराज असताना तेथे गुरुस्वामी (श्रीनारायणानंद सरस्वती) येऊन राहिले होते. त्यांच्याबरोबर त्यांचे एक शिष्य होते. घरांतून भांडून आलेल्या त्यांना गुरुस्वामींनी संन्यास दिला होता. एकदा भिक्षेहून येताना एका गृहस्थाची माळच त्यांनी चोरून आणली. तेव्हा महाराज म्हणाले, 'अनधिकारी माणसाला संन्यासदीक्षा दिली असता अशी स्थिति होते. अशा माणसाला तुरुंगांत घालावे.'

## श्रीनृसिंह सरस्वती (दीक्षित) स्वामीमहाराज

नृसिंहवाडीच्या परिसरांतील सदलगा या गांवचे श्री. नारायण लक्ष्मण दीक्षित यांना त्यांच्या वडिलांनी लहानपणीच पूर्वाश्रमीच वाडी येथे महाराजांच्या स्वाधीन केले होते. महाराजांनी संध्येपासून सर्व नित्यकर्म तर नारायणाला शिकवलेच पण गीता, विष्णुसहस्त्रनाम, स्वशाखोपनिषद् रुद्र, पुरुषसूक्त इ. अभ्यासही करून घेतला. नारायणाची सात्त्विक वृत्ती पाहून त्याला वासुदेवमननाच्या रूपाने वेदान्तशास्त्राची ओळख करून दिली. पुढे प्लेगच्या साथीत पत्नी, मुलगा व मुलगी असे सर्व कुटुंबच बळी पडले व स्वतः दीक्षितशास्त्रींनाही प्लेग झाला. त्या वेळी मरणोन्मुख अवस्थेत त्यांनी आतुर संन्यास घेतला. त्यांची कठोर परीक्षा घेऊन वाडी मुक्कामी त्यांना श्रीस्वामीमहाराजांनी दंड दिला व 'नृसिंह सरस्वती' हा पट्ट दिला. संन्यासधर्माचे सर्व सविस्तर शिक्षणही महाराजांकडून दीक्षितस्वामींना मिळाले. पुढे वाडीत राहूनच श्रींची पूजा, उत्सव इत्यादी देवकार्य करीत राहायला सांगितले. स्वामीमहाराजांना दीक्षित स्वामींचा फार अभिमान होता. त्यांची योग्यता आपल्यापेक्षाही अधिक असल्याचे ते सांगत. बरीच वर्षे वाडीत राहिल्यावर सद्‌गुरुंची आज्ञा संपादन करून तीर्थयात्रेच्या निमित्ताने त्यांनी वाडी सोडली. वाडीसमोरच कृष्णेच्या पैलतीरावर त्यांनी 'श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठ' ही संस्था स्थापन केली. हेच **ब्रह्मश्री प. पू. श्रीदत्तमहाराज कवीश्वर** यांचे सद्‌गुरु होत. त्यांच्याच पुढाकाराने अलीकडे ह्या पीठाचे बांधकाम झाले आहे व प. प. दीक्षीत स्वामींच्या संकल्पाप्रमाणे कृष्णेवर घाटही बांधून झाला आहे. श्रीदीक्षितस्वामी महाराजांची समाधी अयोध्या येथे आहे.

**डॉ. वा. व्यं. देशमुख**
नटराज सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११०५२.



# प. पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामींचा धर्मविचार

**प्रा. अजित कुलकर्णी**

*बी. ए. (तत्वज्ञान) एम्. ए. (तत्वज्ञान) (समाजशास्त्र) रजिस्ट्रार बी. एम्. सी. सी. कॉलेज पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध गेली ३० वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान - श्री ज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद इ. गाढा अभ्यास, शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक, श्रीमद् जगद्गुरू शंकराचार्य (पुरी) धर्म भूषण पदवी (१९९६)*

प. पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामींची शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी (१५० वे) असल्याने पू. स्वामींचा एकूण धर्मविचार काय आहे, याचा मागोवा या लेखातून आपण घेणार आहोत.

भारतीय संस्कृतीत व तत्त्वज्ञानात धर्मविषय संवेदनशील आहे. सध्याच्या आपल्या भारतीय राज्यघटनेने "निधर्म" राज्य संकल्पना स्वीकारली असली तरी धर्म विषयात समाज व लोक अत्यंत जागृत आहेत. त्यामुळे दत्तावतारी पू. स्वामीजींची भूमिका समजून घेणे उचित होणार आहे.

भारतीय तत्त्वज्ञानात मानवी जीवनात पुरुषार्थ विचार मांडला आहे. त्यात धर्म, अर्थ, काम व मोक्ष ही याची बैठक. धर्मानी अर्थ मिळवावा. काम सेवन करावा आणि जीवनाची सांगता मोक्षानी करावी. यात धर्म प्रथम मांडला आहे. पू. स्वामीजींचा भर हा आचारावर आहे. ते धर्माबद्दल असे म्हणतात -

***धर्म सनातनं मृत्यौ प्राप्तेऽपि न परित्येजेत्***
***धर्मार्चितो यथा तुष्येदीश्वरो न तथाऽन्यथा ॥***

कुमारशिक्षा - १७

मृत्यू जवळ आला तरी, सनातन धर्माचा त्याग करू नये. धर्माचरणानेच ईश्वर संतुष्ट होवू शकतो, बाकी कशानेही होत नाही. तसे पाहता धर्माचरण ही एक उपासना ते समजत होते. यामुळे स्वधर्माचरणाने ईश प्रसादाची प्राप्ती होते. इच्छा, भय अथवा लोभासाठी धर्माचरण सोडू नये. यातून एक गोष्ट निश्चित आहे की धर्म हा नित्य आहे. त्याचा त्याग अथवा अस्वीकार मनुष्य जीवनाला अहितकारक आहे. तो नित्य कसा तर जीवाला जन्म व मृत्यू हा प्रवास अखंड सुरू आहे. पण धर्म मात्र स्थिर आहे. ज्याप्रमाणे राज्यशासनात शासनकर्त्यांत बदल होतो, पण व्यवस्थेत बदल नसतो तसा धर्म आहे. या व्यवस्थेत कमी-अधिक बदल कालपरत्वे होत असतात. त्यामुळे धर्म हा समाज नियमनासाठी आहे. अशी ही धर्म व्यवस्था सनातन आहे. म्हणूनच सनातन म्हणजे, नित्य नूतन वाटणे, म्हणजे सनातन होय.

## धर्माचे प्रयोजन

धर्माबद्दलचे प्रयोजन असे मानतात की

***एष आदेशः । एषः उपदेशः । एतदनुशासनम् ॥***

धर्म पालन करणे हाच आदेश आहे. हाच उपदेश आहे. हेच एक नियमनाचे साधन आहे. तेव्हा अशा प्रकारच्या धर्माचरणाने काय होते तर,

***धर्मेणेशार्पितेनाशु जायते पापसंक्षयः ।***
***उत्पद्यते ततो ब्रह्मज्ञानं मोक्षस्ततो भवेत् ॥***

कुमारशिक्षा - ८

धर्माचरणाचे पालन करून ईश्वराला जे समर्पण केले जाते. त्याने त्या जीवाचा पापनाश वा पापक्षय होतो, त्यानंतर ब्रह्मज्ञानाचा उदय होतो व मोक्ष प्राप्त होतो.

ब्रह्मज्ञानाचे आड पाप येत असते. त्यामुळे ब्रह्मज्ञान व परमात्म्याचे ज्ञान होत नाही. म्हणून जीवदृष्टीने प्रथम पाप हे नष्ट होण्याची गरज आहे.

दत्तपुराण या ग्रंथात पू. स्वामीजी म्हणतात -

***ईश्वराराधनधिया स्वधर्माचरणात्सताम्***
***ईशप्रसादस्तद्रूपः सुलभश्चात्र सद्गुरुः ॥***

मनुष्याने ईश्वराची आराधना बुद्धीने स्वधर्माचरण केले पाहिजे. त्यामुळे ईशप्रसाद होतो आणि त्यामुळे ईश्वरस्वरूपी सद्गुरुची भेट सुलभपणे होते.

पू. स्वामीजींच्या मते, भारतीय संस्कृतीतील आश्रमव्यवस्था ही मनुष्याच्या वैयक्तिक उन्नतीसाठी आहे, तर वर्णव्यवस्था समाज स्वास्थ्यासाठी आहे. परंतु सांप्रत काळात याचा लोप असला तरी तत्त्वांचा लोप होत नसतो, वा महत्त्व कमी होत नसते.

वेदातूनच धर्माची निर्मिती आहे - 'वेदोऽखिलो धर्म मूलं' ! त्यामुळे श्रुति स्मृती पुराणे हे धर्माचरणातून अभ्युदय व निःश्रेयकारक मार्ग दाखवित असतात. मानवी जीवनात मोक्षधर्माची उपासना घडावी हे पू. स्वामीजींच्या कार्याचे वैशिष्ट्य दिसते. त्यामुळे श्रीगुरुचरित्रम् या ग्रंथात शास्त्रनिष्ठा, गुरुसेवा आणि आत्मानुभव या माध्यमातून मोक्षधर्माचा विचार मांडला आहे.

## धर्माची वैविध्यता

भारतीय धर्म विचार विविधांगांनी विकसित होतो. अमुक एक गोष्ट म्हणजे धर्म नव्हे. धर्म दोन प्रकारे कार्य करतो. एक अंतरंग विकास, हा चित्तशुद्धीसाठी आहे. सद्विवेक निर्माण होण्यासाठी आहे. आणि समाजधारणेसाठी, कुटुंबासाठी कर्तव्य हा धर्मविचार पू. स्वामीजींनी स्विकारला आहे. त्याला अनुसरून आचारधर्माला पू. स्वामींनी प्राधान्य दिले आहे.

वर्णाश्रम धर्माचे स्वरूपात पू. स्वामीजींनी धर्म व नीति याचे नियमित पालन व्हावे, जीवनात शिस्त यावी, यासाठी धर्मपालनाचे महत्त्व मानले

आहे. पू. स्वामींचे धर्मविचार व आचार पाराशरस्मृती, मनुस्मृतीला अनुसरूनच आहेत. त्यामुळे वर्णाश्रम धर्मपालन, पतीव्रता धर्म, पुत्र धर्म, राजधर्म, सेवकधर्म, साधारणधर्म, विशेषधर्म इ. धर्मविचार त्यांच्या साहित्यातून प्रकट झालेले दिसतात. पू. स्वामीजी द्विसाहस्त्री या ग्रंथात सांगतात -

***आचार आद्या धर्मो नुः सुखदस्तूभयत्र सः ।***
***श्रुतिस्मृति पुराणोक्ताचरणं विष्णुचिंतनम् ॥***

द्विसाहस्त्री १८.२३

मानवी जीवनात श्रुतिस्मृती पुराण यांनी जो आचार सांगितला आहे त्याचे पालन करणे हा आचार धर्म आहे. हेच विष्णुंचे चिंतन आहे. यात 'सवडशास्त्र वा सवडसिंधू' असू नये. मानवाकडून अनाचार वा स्वैराचार घडू नये अशी पू. स्वामींची इच्छा होती.

पू. स्वामीजींच्या विचारात असे लक्षात येते की, मानवी जीवनाचे नियोजन, मार्गदर्शन या सर्वांचा पाया हा धर्म आहे. त्याचे पालन व नियोजन करणे म्हणजेच धर्मपालन करणे होय आणि हीच खरी ईश्वरी सेवा घडू शकते.

याच पायाभूत विचाराच्या अनुषंगाने पू. स्वामीजींनी प्रपंच व परमार्थ याकडे धर्मविचाराने पाहिले असल्याने यात वैविध्यता आहे. या अवताराच्या कार्याच्या दृष्टीने लक्षात येते की, मनुष्याने धर्माचरण करताना आत्मस्वरूपाची ओळख, सद्‌गुरुची ओळख, त्याचे कार्य करणे, यातून ईश्वराची ओळख होणे, त्याचे ज्ञान होणे याचे नाव म्हणजे 'श्रीदत्तोपासना' किंवा 'त्रिमूर्तीची' उपासना होय. पू. स्वामीजींच्या मते धर्मपालनाने चित्तशुद्धी, ज्ञानप्राप्ती, वैराग्य व मोक्षप्राप्ती होवू शकते.

धर्मविषयी ज्ञान व्हावे म्हणून श्रीदत्तपुराणात अ. ८ मध्ये अलर्क, सहस्त्रार्जुन यांना भगवान दत्तात्रेयांनी राजधर्माचा उपदेश केला आहे.

दत्तमहात्म्य याविषयी स्वामीजी म्हणतात -

***विविध धर्मान्वित । ज्ञान भक्तीरस भरित ।***
***असे हे श्री दत्तचरित । मूर्तिमंती दत्त ब्रह्म ॥***

द. म. ५१.१०४

येथे स्वामीजी व्यक्त करतात की विविध प्रकारचे धर्म आहेत. त्याला अनुसरून ज्ञान भक्तीरसाचे श्रीदत्तचरित्र म्हणजे मूर्तिमंत ब्रह्मरूप आहे. कार्तवीर्य, अलर्क, यदु, आयु सारख्या भक्तांना उपदेश देताना ते सांगतात दत्तपुराण ग्रंथात आहे -

***स्ववर्णाश्रमिणो ये च स्वाचारनिरताः सदा ।***
***शीलवत्योऽपि नार्यश्च नाकपृष्ठे वसन्ति ते ॥ ७.३.१४***

जे स्वतःच्या वर्ण आश्रमानुसार स्वतःचा आचार नेहमी करतात ते आणि शीलवान् स्त्रियाही स्वर्गावर आरूढ होऊन राहतात.

***आचारप्रभवो धर्मो विभुस्तत्प्रभुरच्युतः ।***
***तुष्टेऽस्मिन्नु भवद्धीशे भक्तानां दुर्लभं किमु ॥ ७.६.१३॥***

धर्म हा आचाराने उत्पन्न होणारा आहे. त्यानेच त्या व्यापक अच्युत परमेश्वराची प्राप्ती होते. ऐहिक व पारलौकिक ऐश्वर्याचा स्वामी संतुष्ट झाला असता भक्तांना काय दुर्लभ आहे ?

***अद्रोहः सर्वभूतानां मनोवाक्यकायकर्मभिः***
***स्ववर्णाश्रमधर्मोक्ताचरणं पापवारणम् ॥७.६.९***

काया, वाचा मनाने केलेल्या कर्मांनी सर्व प्राणिमात्रांचा द्रोह न करणे व स्वतःच्या वर्णाश्रमाने कथन केल्याप्रमाणे आचरण करणे हे पाप निवारक आहे.

***सत्यमेव प्रवक्तव्यं न चौर्यं यस्य कस्यचित् ।***
***शक्त्या पात्रे प्रदातव्यं संत्याज्या विषयस्पृहा ॥७.६.१०॥***

खरेच बोलावे, कोणाचेही काही चोरू नये, यथाशक्ती सत्पात्री दान करावे, विषयांची इच्छा त्यागावी.

***अयमेव परो धर्म इदमेव परं तपः***
***इयमेव परा पूजा विष्णोर्विश्वात्मनो हरेः ॥७.६.११॥***

हाच श्रेष्ठ धर्म आहे, हेच श्रेष्ठ तप आहे, हीच विश्वात्मा विष्णूची श्रेष्ठ पूजा आहे.

या पदसंग्रहातील आत्मानात्मविचार या पदात पू. स्वामी म्हणतात -

***स्वधर्मानुष्ठान हेचि तप । स्वाध्याय म्हणजे गुरु मंत्र जप । मानसी करिता***
***अमूप । तात्काळ मिळतसे ॥४२॥***

पू. स्वामीजींच्या जीवनातील वैशिष्ट्य होते. साक्षात दत्तप्रभू हे त्यांच्याशी बोलत असत व त्यांच्याच आज्ञेने हे कार्य, हे साहित्य प्रकट होत आहे. त्यामुळे पू. स्वामींच्या हातून हे जे विचारधन आहे ते खुद्द भाग्यवान दत्तात्रेयांचे समजावयाला हरकत नाही.

## धर्माचरणाचा प्रभाव

मनुष्य व समाज यात धर्माचा अतूट संबंध आहे. धर्माचरणाने नीति विकसीत होवू शकते. म्हणून धर्म नीतिविषयी आदेश देते, त्यामुळे धर्माचे अनुशासन घडू शकते. धर्मात तीन सूत्रे आहेत. एक आचार, व्यवहार व प्रायश्चित. त्यामुळे मनुष्याचे नित्य आचरण, नैमित्तिक आचरण व सामाजिक व्यवहार उत्तम घडू शकतो.

धर्मातील विधिनिषेधांनी मनुष्य जीवनात परिवर्तन घडते. नम्रता, कृतज्ञता, आत्मीयता, समर्पणभाव, सेवावृत्ती, शांतपणा, संतोष, समाधान यांनी मनुष्य जीवनात सद्‌गुणांची वाढ होते. धर्मावरील श्रद्धेने मनुष्याचे आत्मिक बळ वाढू शकते.

धर्माचरणाने आपोआप नीतिचा अंगिकार होत असतो आणि धर्मानी अर्थ प्राप्ती करावी व त्यातून कामाची पूर्तता करून मानवी जीवनात अभ्युदय करावा तर निःश्रेयसाने मोक्ष प्राप्ती करून घ्यावी. म्हणून गरुडपुराणातील एक वचन सांगत असत.

***धर्मात्संजायते ह्यर्थो धर्मात्कामोऽभिजायते ।***
***धर्म एवापवर्गाय तस्माद्धर्मं समाचरेत ॥***

धर्मानी अर्थ प्राप्त करावा, तेव्हाच धर्मानी काम पूर्ण होते, तें धर्मानी सर्व साध्य होते, तेव्हा धर्माचे सदैव आचरण करावे. यासाठी मनुष्याचे जीवन पारमार्थिक व्हावयाचे असेल तर "आचार प्रभवो धर्मः ।' हे लक्षात घेवून अर्थ व काम संदर्भात आचार व विचार हे धर्माधिष्ठीत राहील हे पहावे. याविषयी जागृत असावे. या धर्माचरणाचा प्रभाव कशात आहे तर,

***यथोक्ताचारिणः सर्वे जितकामा जितेंद्रियाः ।***
***स्वकर्मनिरता यान्ति ब्रह्मलोकमकल्मषम् ॥दत्तपुराण ७.३.१५॥***

धर्माने, शास्त्राने कथन केलेल्या आचारानुसार वागून जे कामाला जिंकून, जितेंद्रिय होऊन स्वतःच्या कर्मामध्ये रमून जातात ते निष्पाप अशा ब्रह्मलोकाला जातात.

असा धर्माचरणाचा प्रभाव पू. स्वामीजी सांगतात, तसेच, पू. स्वामीजींच्या मते श्रुतीस्मृती हे धर्माचे नेत्र आहेत. म्हणजे धर्म विषयात श्रुती व स्मृतींवर त्यांची अत्यंत श्रद्धा होती हे दिसून येते.

पू. वासुदेवानंद स्वामींचे मागणे:

*धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिम् । सत्संगाप्तिं देहि भुक्तिं च मुक्तिम् ।*

*भावासक्तिं चाखिलानन्दमूर्ते । घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥*

येथे भगवंताकडे पहिले मागणे आहे. 'धर्मे प्रीतिं' हे भगवंता जर काही द्यावयाचे तर धर्मविषयी प्रीति उत्पन्न होऊ दे. धर्मविषयी मनुष्याला अत्यंत प्रेम असावे. मानवी जीवनात आपण येतो तेव्हा आचार, विचार व उच्चार हे अत्यंत प्रेमाने करता यावे यासाठी हे पहिले मागणे आहे.

धर्मनिष्ठा ही फार मोठी शक्ती आहे. या धर्मपालनासाठी तशी सद्बुद्धीही असावी लागते. सद्बुद्धीशिवाय धर्माचरण निष्ठेने होत नाही. अनेक जन्म साधना करून ईश्वराची कृपा संपादन करावी. यातून कर्मफलाचा क्षय घडतो. धर्माचरणाने बुद्धीवर संस्कार होणे गरजेचे आहे. यासाठी सद्गुणांचे आचरण घडावे. तेव्हा उत्तम संस्कार होतात. तसे पाहिले तर जीव अल्पज्ञ आहे. त्याला स्वतंत्र सामर्थ्य नाही. जीवाच्या केवळ प्रयत्नाने याची सिद्धी होत नाही.

पू. स्वामीजींच्या विचारात एक विकासक्रम आहे. धर्माचे ज्ञान हवे ही इच्छा हवी. तसे सद्गुणाचे आचरण व संस्कार घडावेत, त्याने बुद्धीचे शुद्धीकरण होते. धर्माचरण समर्थपणे होते. या धर्माचरणासाठी बुद्धी स्थिर असावी लागते. तेव्हा ती सन्मती होत असते. यासाठी धर्माचरण करण्यासाठी चिकाटी, धैर्य व उत्साह आवश्यक असतात. धर्मविषयक आचारविचार प्रत्येकाने यथायोग्य ठेवावयास हवा यासाठी पू. स्वामी ही प्रार्थना करतात.

### समारोप :

धर्माला सर्वात मोठा आधार हा श्रद्धेचा आहे. मानवी जीवनात धर्मविषयी श्रद्धा असेल तरच त्याची अनुभूती येवू शकते. यावर पू. स्वामीजी म्हणतात

*भजेत्सलक्षणं धर्मं श्रद्धाभक्तियतो नरः ।*

*ब्राह्मणस्तु विशेषेण यतोस्मै श्रेष्ठ्यमर्पितम् ॥ द्विसहस्री १८.३१॥*

तेव्हा मनुष्याने उत्तम प्रकारे धर्मपालन, श्रद्धा व भक्तीयुक्त अंतःकरणाने करावे. ब्राह्मणांनी विशेष म्हणजे सर्व कर्म समर्पित भावाने करावे यातच श्रेष्ठत्व आहे.

धर्म म्हणजे 'मला वाटते म्हणून.....' नाही तर ऐहिक व पारलौकिक कल्याणासाठी याची गरज आहे हा विचार त्यांनी सांगितला आहे.

अलिकडच्या काळात पू. श्रीधरस्वामी महाराज यांनी असे धर्माचरण ठेवून एक आदर्श प्रस्थापित केला होता.

**प्रा. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, नवीन मराठी शाळेसमोर, पुणे ४११०३०.
फोन : २४४८७०३०



## श्रीमत् परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांची प्रश्नावली

### प्रश्नावलीसंबंधी खुलासा

श्री महाराजांनी तयार केलेली प्रश्नावली लोकोपकारार्थ एका प्रसिद्धिनिरपेक्ष सज्जन गृहस्थांनी दिली. ती येथे प्रसिद्ध केली आहे. ही पहाण्याची पद्धती पुढीलप्रमाणे आहे.

मनातील कामना पूर्ण होण्याकरिता सद्गुरुची प्रार्थना करून पुढील पानांवर दिलेल्या प्रश्नावलीतील कोणत्याही एका अक्षरावर पृच्छकाने बोट ठेवावे. नंतर ज्या अक्षरावर बोट ठेवले असेल त्याच्या पुढील अक्षरापासून अक्षरे मोजण्यास आरंभ करावा. असे मोजताना प्रत्येक अठरावे अक्षर एका कागदावर लिहून ठेवावे. याप्रमाणे प्रथम ज्या अक्षरावर बोट ठेवले असेल त्या अक्षरापर्यंत अठरा अठरा अक्षरे मोजावीत व प्रत्येक अठरावे अक्षर क्रमाने कागदावरच मांडून ठेवावे. या अठराव्या अक्षरांचा मिळून एक मराठी श्लोक तयार होतो व त्यात दत्तमाहात्म्य वाचावे, कृष्णालहरी वाचावी, पंचपदी करावी, करूणात्रिपदी म्हणावी इत्यादी रूपाने कामनापूर्ण होण्याकरिता काही साधन सांगितले जाते. श्रद्धापूर्वक त्याप्रमाणे वाचून सर्वांनी आपली इष्टसिद्धी सद्गुरुकृपेने करून घ्यावी.

### सूचित साधनांचे स्पष्टीकरण

(१) 'श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज' असा जप करावा व श्रीटेंबेस्वामीमहाराज यांचे चरित्र वाचावे.

(२) समश्लोकी गुरुचरित्राचे दोन सप्ताह वाचावेत.

(३) दत्तमाहात्म्याचा नेमाने रोज एक अध्याय वाचावा.

(४) द्विसाहस्त्री गुरुचरित्राचा एक सप्ताह करावा.

(५) श्रीदत्तपुराण नेमाने रोज वाचावे.

(६) श्रीदत्तभावसुधारसस्तोत्र रोज संपूर्ण वाचावे.

(७) दत्तकाव्य व श्रीकृष्णालहरीतील श्लोक रोज होतील तितके वाचावेत.

(८) श्रीसप्तशती गुरुचरित्राची दहा पारायणे करावीत.

(९) श्रीटेंबेस्वामीमहाराजांनी रचलेला कोणताही एक ग्रंथ वाचावा.

(१०) दत्तचंपू ह्या ग्रंथातील श्लोक रोज होतील तितके वाचावे.

(११) अर्थासह शिक्षात्रयी ग्रंथ वाचावा.

(१२) पंचपदी संध्याकाळी वाचावी.

(१३) श्रीदत्तलीलामृताब्धिसार ग्रंथातील रोज एक अध्याय वाचावा.

(१४) करुणात्रिपदी सकाळी, दुपारी व संध्याकाळी म्हणावी.

(१५) सत्यदत्ताची ओळीने तीन पौर्णिमेला पूजा करावी.

(१६) तिसऱ्या किंवा सोळाव्या श्रीदत्तावताराचा जन्मोत्सव साजरा करावा.

(१७) दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा या मंत्राचा एक लक्ष जप करावा.

(१८) "मां पाहि भगवन् दत्त" हा मंत्र सतत पहावा.

(प्रश्नावलीचा तक्ता पुढील पानांवर पहावा.)

| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री | वा | सु | दे | वा | नं | द | स | र | स्व | ती | स्वा |
| २ | त्त | प्त | चि | स्थ | जे | नं | ना | री | त्ले | स | व | पा |
| ३ | ला | त्रि | पू | रा | चिं | हि | दे | स | का | तो | सं | अ |
| ४ | वा | प्त | र्य | इ | क | न | पा | गु | सु | द | त्र | पं |
| ५ | ठ | रू | दे | त्त | यी | घ | ल | म्ह | त्य | वा | दु | व |
| ६ | त | ण | द | सो | स्सा | न्द | यीं | न | द्धी | द्धी | रीं | च्या |
| ७ | चिं | स | का | वा | द | स्म | ज | त्रा | ग्रं | स | जी | किं |
| ८ | री | चीं | थ | प्रे | वा | वा | ष्टा | रू | मा | जी | रि | र्थ |
| ९ | पे | णा | नें | द | अ | ना | का | की | दे | व | तू | ता |
| १० | म | गु | इ | य | पु | र्त | ति | र्त | ण | रि | सु | प |
| ११ | अं | नें | ता | वा | मा | रो | री | दी | पू | ता | शा | तां |
| १२ | तु | त | र्णि | र | क्ष | अ | रि | था | नी | र | री | सा |
| १३ | ती | अ | द | द्वि | श्री | प्रा | श्री | क | वा | को | प्रा | हो |
| १४ | कृ | री | ची | ण | प्त | इ | द | नो | ई | त्या | त्र | ष्ट |
| १५ | त्त | र | ल | ज | हा | दे | स | तें | हा | स्त्री | त्त | हे |
| १६ | फ | हि | त्य्य | गु | पु | इ | ह | द्ध | म | र्य | त्व | म |
| १७ | री | चि | नो | वा | रें | ना | मृ | ज्ञा | ना | ला | तां | ने |
| १८ | ता | पू | पू | भा | ल | र | ते | तीं | नें | था | तें | चीं |
| १९ | ठे | थिं | वा | स | या | द | वा | इ | का | चिं | ये | सं |
| २० | चि | ष्ट | र्य | ता | थें | र | र | प्मा | थि | ष्ट | गं | त्त |
| २१ | ग्रं | सें | तां | सि | ब | मा | श्वा | क | श्वा | दू | य | व |
| २२ | स | रि | सु | र | र | सु | ष्ट | सु | ल | रि | ह | तु |
| २३ | ये | खे | ली | शी | ची | ला | हा | या | सं | हो | पा | ता |
| २४ | भ | घ | ग | य | क | ज | रीं | था | नी | र | री | सा |
| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |

| १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मी | ज | य | ति | त | मां | वा | चि | खें | ई | रो | द | १ |
| सु | तां | हो | ल | नि | ना | का | श | ला | चि | शि | दे | २ |
| व्य | ती | वा | त्तें | क्षा | गा | गीं | का | जीं | अ | ति | भ | ३ |
| ज | लीं | स | थ | त | ग | ह | के | सं | ष्ट | टें | सु | ४ |
| द | दो | सि | सि | सा | ये | क | च | वा | चं | सा | प | ५ |
| री | रि | ने | पू | र्थ | दी | शी | सी | त्त | ळा | ध्य | त्त | ६ |
| इ | क | ने | पू | प | प्रा | तु | म | ळ | सु | त्त | र | ७ |
| नी | श्लो | जी | दे | हे | चिं | ते | आ | तो | में | ची | प | ८ |
| भी | व | को | ज | ल | थें | क्षा | त्रि | ती | त्ता | ष्टा | क | ९ |
| ज | प | न | व | द | री | ना | रू | टा | ती | रा | का | १० |
| क | क | कु | भ्य | क | अ | त | द | त | चि | न | प | ११ |
| रीं | हा | री | शि | सें | री | ला | री | मा | ते | री | शी | १२ |
| श्री | म | हो | त्या | मं | इ | स | ल | त्त | सा | म | प्त | १३ |
| त्य | भ्य | मा | ह | ह | आ | ष्णा | ता | त | के | का | ल | १४ |
| ल | शु | जा | का | म | का | ली | थ | का | यं | ज | भ | १५ |
| ला | तु | म | ति | प | य | ला | ये | ने | रु | रा | ष्ट | १६ |
| हो | हा | मा | क | णा | वा | प्रे | त्ता | भा | नो | हो | पू | १७ |
| में | नें | वें | हे | ई | ती | थ्वी | र्ण | तीं | वें | क्ष | क्षी | १८ |
| सा | ष | सा | इ | दि | द | वी | ता | षीं | प्तश्र | चा | त्त | १९ |
| वि | का | वि | हें | वें | भा | तां | सा | हो | कां | सं | क्षी | २० |
| इ | घे | ई | क | दे | ल | थ | नि | सा | द्ध | र | ता | २१ |
| तो | श्च | धु | चि | कृ | सु | अं | शी | नी | हो | चे | घा | २२ |
| त | वृ | म | द | व | र | क | र | क | अ | न | ह | २३ |
| रीं | हा | री | शी | से | री | ला | रीं | मां | ते | रीं | शीं | २४ |
| १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | |

## सूचित साधन

श्री वासुदेवा हृदयी चिंतुनी कामना करी
ती सत्य सफला होते ठेवी विश्वास अंतरी ।।१।।
वाचिता सप्तके दोन 'समश्लोकी गुरुकथा'
अलभ्य तेहि ये हाती चिंता का करशी वृथा ।।२।।
सुखे हो कार्यसंसिद्धी काळजी देई टाकुनी
'दत्तमाहात्म्य' नेमाने वाची विश्वासुनी मनी ।।३।।
देईल तो इष्ट सिद्धी वासुदेव यतीश्वर
'द्विसाहस्त्री' गुरुकथा सप्ताहे दूर हो दर ।।४।।
वारोनि संकटे सारी दत्त हेतू पुरा करी
'श्रीमद्दत्तपुराणा' ते वाचा वरचेवरी ।।५।।
नंदना अनुसूयेच्या स्मर चिंतार्त का असा
प्राप्त आहे इष्ट वाची 'दत्तभावसुधारसा' ।।६।।
'दत्तकाव्य' पाठकरी जरी ते भीति अंतरी
'श्रीकृष्णालहरी' प्रेमे वाचिता इष्ट ये करी ।।७।।
'सप्तशती गुरुचरित्राची' आवर्तने दहा
करिता शुद्ध चित्ताने इष्ट साधे सुखे रहा ।।८।।
रचिला वासुदेवाने ग्रंथ तो कोणता तरी
वाचीत जा मनोभावे कार्य होईल लौकरी ।।९।।
स्वस्थ चित्ते 'दत्तचंपू' सप्रेमे जरी वाचिशी
कोणते कार्य बा नोहे चिंता का करिशी अशी ।।१०।।
ती जे 'शिक्षात्रयी सार्थ जी वाचील सुमानसे
प्राप्तकाम त्वरे होई येथे संदेहची नसे ।।११।।
स्वानंदे गा पंचपदी किंवा पद्ये परोपरी
होईल कामना पूर्ती संरक्षील तुला हरी ।।१२।।
मीनालागी जल तशी इष्टापेक्षा जरी तुला
'श्रीदत्तलीलामृताब्धीसार' ग्रंथ तो हा भला ।।१३।।
जरी त्रिकाली म्हणसी 'करुणात्रिपदी' तरी
मनोरथ तुझा पूर्ण षण्मासे निश्चया धरी ।।१४।।
यत्ने पूजी 'सत्यदत्त' नेमाने तीन पूर्णिमा
होईल कामनापूर्ती साधिता साधुसंगमा ।।१५।।
तिसरा अथवा सोळा पूजी दत्तावतार ते
त्या त्या जयंतीला भावे इष्टसिद्धचि होय ते ।।१६।।
तव चिंतित दुःसाध्य परी अष्टादशाक्षरी
मंत्र हा जपता लक्ष दिगंबर कृपा करी ।।१७।।
मां पाहि भगवद्दत्त प्रार्थना करीता अशी
इष्ट दे भय ने रक्षी दत्त माता सुता जशी ।।१८।।

**(ग्रन्थावलीतील तयार होणारे अठरा श्लोक)**



## हारबद्ध श्लोक

***वन्देऽहं देवदेवं श्रुतिमतिगतिदं साङ्गयोगप्रगम्यं***
***पारावाराभरागाग्र्यरिकिरिहरिमाइलावंक वत्तवक्षम् ॥***
***श्रेयज्ञं यज्ञयज्ञं सुखरपरवं पारदं रम्यरम्यं***
***पातारं तारतारं खलबलबलनं श्रीवरं वक्रवक्रम् ॥३.१०२॥***

प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या श्रीगुरुचरित्र त्रिशती काव्यातील हा श्लोक आहे. हा श्लोक स्रग्धरा वृत्तात आहे. प्रत्येक चरणात २१ अक्षरे असून या वृत्ताचे गण म र भ न य य म आहेत व यति ७, ७, ७ आहेत. या श्लोकात १२ फुलांचा एक हार गुंफला आहे. प्रत्येक चरणात सात सात अक्षरांचे तीन गट आहेत. असे श्लोकात बारा गट होतात. उदाहरणार्थ आपण पहिला गट पाहू.

वं दे हं दे व दे वं

या गटात दुसरे, चौथे व सहावे अक्षर समान आहे. सम क्रमांकांची अक्षरे समान आहेत. यात सात अक्षरांची रचना फुलामध्ये खाली दाखविल्याप्रमाणे आहे.







सम क्रमांकांची तीन समान अक्षरे फुलाच्या मध्य भागात ठेवून, विषम क्रमांकांची चार अक्षरे चार पाकळ्यांमध्ये ठेवली आहेत. अशा बारा फुलांचा हार तयार होतो.

**संकलक : सौ. प्रज्ञा मनोहर कुबडे**

३४ रेल्वे लाईन्स, बी१-६ गौरीशंकर सोसायटी, सोलापूर - ४१३००१.

## सर्व उपदेशाचे सार

१) मुक्तीचा लाभ करून घेणे हे मनुष्य जन्माचे कर्तव्य आहे.

२) त्याकरिता प्रथम मन स्थिर व्हावे या उद्देशाने वर्णाश्रमविहित धर्माचे यथाशास्त्र आचरण झाले पाहिजे.

३) वेदान्ताचे श्रवण, मनन, निदिध्यासन नित्य करावे.

४) मुख्यतः लक्षपूर्वक श्रवणाने मनातील आसक्ती कमी होईल.

५) सात्त्विक प्रवृत्तीनेच मानवाची उन्नती होते.

६) सात्त्विक प्रवृत्ती होण्याकरिता आहार हा हित, मित व मेध्य म्हणजे पवित्र असण्याकडे लक्ष दिले पाहिजे.

७) आपली प्रकृती सात्त्विक झाली आहे हे ओळखण्यासाठी खूण अशी की, स्वधर्मावर दृढ श्रद्धा बसून स्नान-संध्या, देवपूजा, पंचमहायज्ञ हे वेळेवर करणे. अतिथि सत्कार, गोसेवा, मातापितरांची सेवा ही हातून घडणे, कथा-कीर्तन, भजन-पुराण यांचे श्रवण होणे. सर्वांबरोबर गोड बोलणे, दुसऱ्याचे नुकसान होईल असे न वागणे, स्त्रियांनी सासरी राहून सासरा व इतरही वडील माणसे यांच्या आज्ञेत पतीची दृढ निष्ठेने सेवा करणे इ. गुण आपल्यामध्ये येणे. आपली प्रकृति सात्त्विक बनल्याची ही चिन्हे आहेत.

८) उदरनिर्वाह व्यापार, शेती, नोकरी, कोणताही व्यवसाय केला तरी वेदविहित कर्म व गुर्वाज्ञापालन कधीही सोडू नये.

९) स्वकर्म केले तरच अन्तःकरण शुद्ध होते.

१०) अन्तःकरण शुद्ध झाले तर उपासना स्थिर होते.

११) उपासना स्थिर झाली तर मनाला शांती मिळते.

१२) आणि मनाची गडबड थांबली म्हणजे आत्मज्ञान होऊन मोक्षाचा लाभ होतो.

या प्रमाणे जो वागेल तो शेवटी पूर्ण सुखी होईल.



# दत्तसंप्रदायाचे कैलासलेणे
# प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे स्वामी) महाराज


**डॉ. सौ. सुनीता ज. जोशी, डॉ. ज. वा. जोशी**

*'दत्त संप्रदाय, अद्वैत वेदान्त आणि श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे स्वामी) महाराज यांचे समग्र वाङ्मय' या विषयावर प्रबंध लेखन, लेखमाला, आणि ग्रंथ निर्मिती. महाराष्ट्र शासनाच्या 'आदिवासी बोलीभाषा प्रकल्पांतर्गत विविध आदिवासी बोलीभाषेतून शैक्षणिक साहित्य निर्मिती. 'अर्वाचीन संतगाथा' या ग्रंथाचे संपादन (डॉ. ज. वा. जोशी यांच्या समवेत) भारतीय तत्वज्ञान, संत साहित्य इ. संदर्भातील परिसंवाद, चर्चासत्रे लेख इ.*


## भारतीय मोक्षविद्या आणि श्रीदत्तसंप्रदाय

ऋषींचे प्रज्ञान आणि संतांची भावदृष्टी हा भारतीय अध्यात्मदर्शन आणि साक्षात्कारदर्शन यांचा गाभा आहे. त्यांच्यामुळेच प्राचीन आणि मध्ययुगीन काळापासून ते आत्तापर्यंत भारतीय मोक्षविद्येचा परममंगल भागीरथीप्रवाह प्रवाहित राहिला आहे. यामध्ये 'त्रिगुणात्मक त्रयमूर्ती' आणि 'गुरूणां गुरुः । योगिनां चक्रवर्तीः ।' अशा श्रीदत्तात्रेय देवतेचे महत्त्व आणि प्रियता बहुतांश सर्व साधनप्रणालीत दिसते. त्याचे कारण ज्ञान आणि मोक्ष प्रदायक असा विश्वात्मक ईश्वराचा हा शाश्वत गुरू - अवतार आहे.

महाराष्ट्रात मराठी श्रीगुरुचरित्र ग्रंथातील श्रीपाद श्रीवल्लभ आणि श्रीनृसिंहसरस्वती या श्रीदत्तावतारांशी संबंधित अशी श्रीदत्तोपासना विशेष रूढ आहे. मात्र मार्कण्डेय पुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, श्रीमद्‌भागवत अशा प्राचीन संहिता, दत्तात्रेयोपनिषद्, अवधूतगीता, गुरुगीता, त्रिपुरारहस्य आदि संहितातील श्रीदत्तात्रेयांच्या दिव्य लीलाचरित्रांचे निर्देश लक्षात घेतले, त्याचप्रमाणे यदु, अलर्क, प्रल्हाद, परशुराम, सहस्रार्जुन इत्यादी महान भक्तांच्या चरित्रांचे अवगाहन केले तर त्यांच्याशी गुरू पदाने निगडित अशा श्रीदत्तात्रेयांचे प्राचीन कालापासून आत्तापर्यंत सातत्याने टिकलेले माहात्म्य लक्षात येते.

प.प. श्रीमद्‌वासुदेवानंदसरस्वती (टेंबे स्वामी) महाराज यांनी अशा सर्व उपलब्ध संदर्भांच्या आधारे श्रीदत्तपुराण, श्रीदत्तमाहात्म्य, इत्यादी विख्यात ग्रंथांची रचना केली. श्रीगुरुचरित्राधारित ग्रंथांची रचना केली. विविधांगी स्तोत्ररचना केली. दत्तभक्तीस आणि परमार्थास पोषक अशा शिक्षात्रयमूसारख्या ग्रंथाची रचना केली. त्याचप्रमाणे संन्यासपूर्व आणि संन्यस्त जीवनात त्यांनी उत्कट दत्तभक्तीचा परम आदर्श उभा केला. या सर्वातून भारतीय मोक्षविद्येतील दत्तभक्तीचे, दत्तसंप्रदायाचे माहात्म्य स्पष्ट झाले. श्रीस्वामीमहाराजांचे जीवन, कार्य, वाङ्मय आणि जीवनदृष्टी म्हणजे भारतीय मोक्षविद्येतील मध्यवर्ती धारा असलेल्या दत्तभक्तीचा, गुरुभावसाधनेचा समग्र, एकात्म आणि समन्वयी असा प्रभावी आविष्कार आहे. दत्तसंप्रदाय आणि भारतीय मोक्षविद्या यांचा ज्ञानकोश आहे. साहजिकच त्यांचे जीवन, कार्य, वाङ्मय आणि जीवनदृष्टी यांचे यथार्थ वर्णन श्रीदत्तसंप्रदायाचे कैलासलेणे असे करावे लागेल.

भारतीय मोक्षविद्या आणि साक्षात्कारदर्शन यांचे स्वरूप बहुमिती आहे. या प्रज्ञानगंगेत अनेक विचारप्रवाह आहेत, भूमिका आहेत. वेदवेदान्तप्रणीत आत्मविद्या, ब्रह्मविद्या हा त्यातील एक प्रमुख प्रवाह ! श्रीमत् शंकराचार्य यांनी अद्वैत वेदान्त दर्शनाद्वारे तो प्रभावीपणे स्पष्ट केला. श्रीगुरुचरित्रातील (अ १२) संदर्भानुसार श्रीनृसिंहसरस्वतींची, श्री टेंबेस्वामीमहाराजांची गुरुपरंपरा ही शांकरवेदान्ताचीच आहे. श्रीस्वामी महाराजांनी आपल्या ग्रंथातून तिचे अंतरंग स्पष्ट केले.

आगमोक्त तंत्रविद्या, काश्मीर शैवदर्शनातील शिवाद्वयदृष्टी यांचे अधिष्ठान मुख्यतः अद्वैत भावदृष्टीचे आहे. श्रीदत्तात्रेय हे तंत्रविद्येचेही अधिष्ठाते आहेत. नाथसंप्रदायालाही ते गुरुस्थानी आहेत. श्रीस्वामीमहाराजांनी तंत्रसाधनेतील गूढता, बाह्य क्रियाकांडावरील भर इत्यादी दूर करून श्रीदत्तात्रेयांच्या एकाक्षरी ते मालामंत्रापर्यंत मंत्रोपासना, त्याचप्रमाणे लययोग, हठयोग, ध्यानयोग साधना यांची दृष्टी विविध ठिकाणी विशद केली.

नवविधाभक्ती आणि अमृतरूपा प्रेमलक्षणा भक्ती यांच्या आधारे भारतीय भक्तिसाधना उभारली गेली. श्रीमद् भागवत, भगवद्‌गीता, भक्तिसूत्रे हे तिचे आधार आहेत. मध्ययुगीन, अर्वाचीन संतांचे कार्य आणि साहित्य यामधून भक्तिसाधनेचा उत्कर्ष दिसतो. जनार्दनस्वामी, संत एकनाथ अशा मध्ययुगीन व्यक्ती, माणिकप्रभू, पंतमहाराज बाळेकुंद्रीकर, निरंजन रघुनाथ इत्यादि अर्वाचीन संत यांनी दत्तभक्तीचा उत्कर्ष प्रकट केला. श्रीस्वामीमहाराजांनी ज्ञानपूर्व साधनभक्ती आणि ज्ञानोत्तर अभेदभक्ती यांची विविध परिमाणे आपल्या साहित्यातून दाखविली आहेत.

योगसाधना हा आत्मानुभूतीचा प्रयोगसिद्ध मार्ग आहे. पतंजलीप्रणित अष्टांगयोग कष्टसाध्य आणि प्रयत्नसाध्य आहे. मात्र भगवत्कृपा आणि तत्त्वरूप सद्‌गुरुकृपा यामुळे जर देवात्मशक्ती कुंडलिनीचे जागरण घडले, शक्ति-संचार साधना प्राप्त झाली तर ब्रह्मात्मैक्य अनुभव वा शिव-शक्ती सामरस्यी अनुभूती सहजसुलभ होते. ही गुरुमार्गदृष्टी किंवा कृपायोग आहे. श्रीगुरुदत्तात्रेय तिचे अधिष्ठान आहेत. श्रीदत्तोपासना आणि गुरुभावसाधना यांचे ते रहस्य आहे. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांची तत्त्वदृष्टी विविध ठिकाणी व्यक्त केली आहे. कर्म, भक्ती, योग, ज्ञान हा मोक्षसाधनविचार काम, अर्थ, धर्म, मोक्ष हा चतुर्विध पुरुषार्थविचार हाही भारतीय मोक्षविद्येचा गाभा आहे. श्रीस्वामीमहाराजांनी त्या विषयीची प्रमेयदृष्टीही आपल्या ग्रंथातून व्यक्त केली आहे.

हे सारे लक्षात घेतले तर सिद्धान्त आणि साधना, प्रमेय आणि प्रचीती अशा उभय दृष्टीने श्रीस्वामीमहाराज हे अर्वाचीन काळातील भारतीय मोक्षविद्येचे महान प्रवक्ते आहेत, हे दिसून येते. मध्ययुगीन काळात

श्रीमत् शंकराचार्यांनी जे कार्य केले, तसेच कार्य श्रीमद् वासुदेवानंदांनी केले आहे असे दिसून येते.

'बहुजन हिताय, बहुजनसुखाय, आत्मनो मोक्षार्थं भिक्षु परिव्रजरव' हा आदर्श श्रीमत् शंकराचार्य आणि श्रीस्वामीमहाराज अशा संन्यस्त जीवन्मुक्त महापुरुषांनी उपदेश आणि उदाहरण या दोन्हीतून व्यक्त केला. भारतीय मोक्षविद्येतील सर्व प्रवाहांचा एकात्म आणि समन्वयी प्रत्यय घडवला. विशुद्ध परमार्थदृष्टी, खडतर संन्यस्त जीवन, ज्ञानोत्तर लोकसंग्रह, ज्ञानीभक्ताची अभेदभक्ती या सर्वांचे आदर्श उदाहरण मध्ययुगात जसे श्रीमत् शंकराचार्यांमध्ये दिसते तसे अर्वाचीन काळात श्रीस्वामीमहाराजांमध्ये दिसते.

श्रीनृसिंहसरस्वतींनी संन्यस्त जीवन आणि लोकसंग्रहात्मक भूमिकेतून लोककल्याण यांचा परमादर्श प्रकट केला. श्रीगुरुचरित्रातील त्यांच्या दिव्यलीलांतून हे दिसून येते श्रीस्वामीमहाराजांनी श्रुतिस्मृतिपुराणोक्त अशा भारतीय धर्मदृष्टीचे प्रबोधन अर्वाचीन काळात करून श्रीगुरुंची थोर परंपरा सजीव, साकार केली. व्यास, वाल्मिकी, वसिष्ठ या प्राचीन व्यक्ती, श्रीशंकराचार्य, गोरक्षनाथ, श्रीज्ञानेश्वर ही मध्ययुगीन उदाहरणे आणि श्रीस्वामीमहाराजांचे अर्वाचीन काळातील जीवनकार्य पाहिले म्हणजे भारतीय अध्यात्म आणि साक्षात्कारदर्शन यांचे समृद्ध ऐश्वर्य दिसते. भारतीय ब्रह्मविद्येचे शब्दशिल्प साकार होते. विशेषतः श्रीदत्तात्रेयप्रणीत समन्वयी मोक्षसाधनमार्गाचे विलोभनीय कैलासलेणे दिसते. अशा थोर परंपरेचे पुनःस्मरण आणि त्याप्रकाशात श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनकार्याचे अवलोकन, त्यांच्या जीवनदृष्टीचे अनुसंधान व्हायला हवे. मोक्षविद्येचे आनंदयात्री यादृष्टीने भक्त, साधक आणि उपासक यांनी ते डोळस श्रद्धा आणि साधननिष्ठा भूमिकेतून करायला हवे.

## श्रीस्वामीमहाराजांची दिव्य ग्रंथसंपदा

श्रीस्वामीमहाराजांची ग्रंथरचना हा त्यांचे समाधिज प्रज्ञान, ऋतंभरा प्रज्ञा यांचा आविष्कार आहे. प्राचीन ऋषी आणि भारतीय संत यांची प्रतिभा, रसानुभूती आणि परतत्त्वस्पर्श यांचे एकात्म दर्शन घडविणारी ही वाङ्मयसंपदा आहे. उत्कट दत्तभक्तीतून 'अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी' अशारीतीने ती व्यक्त झाली. 'सर्वभूतहिते रतः' अशा जीवनमुक्ताची ही वाणी आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या समग्र ग्रंथांचे सलग, सुसूत्रपणे क्रमशः आणि कालबद्धरीतीने प्रकाशन व्हावे, साधक, उपासक आणि अभ्यासक यांची सोय व्हावी याकरता प.पू. सद्गुरू श्रीगुळवणीमहाराज यांच्या अध्यक्षतेखाली ग्रंथमाला प्रकाशन समिती स्थापन करण्यात आली. सर्व थरांतून अर्थसहाय्य लाभले. प्रमुख संपादन-कार्य प.पू. दत्तमहाराज कवीश्वर यांनी सांभाळले. इ.स. १९५१ च्या विजयादशमीस प्रथम ग्रंथ प्रकाशन आणि इ.स. १९५४ मधील श्रीस्वामीमहाराजांच्या जन्मशताब्दी समारंभप्रसंगी अखेरच्या ग्रंथाचे प्रकाशन अशा सुमारे चार वर्षांच्या अल्प कालावधीत समितीने द्वादश खंडात्मक बृहत्-प्रकाशन-प्रकल्प पूर्ण केला. त्यामुळे ही दिव्य ग्रंथसंपदा सर्वांपुढे प्रथमच एकत्रितरूपात समोर आली आणि 'इत्येषा वाङ्मयी पूजा' सफळ संपूर्ण झाली. सर्व खंडांना प.पू. गुळवणीमहाराज यांची अध्यक्ष / प्रकाशक म्हणून प्रस्तावना आहे. भाषांतर, संपादन, प्रस्तावना अशा स्वरूपात त्यावेळच्या महनीय व्यक्तींचे योगदान लाभलेली ही ग्रंथमाला पाहताना दिसते.

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथमं पुष्पम् | : शिक्षात्रयम् | : ग्रंथ प्रस्तावना | - श्रीराजेश्वरशास्त्री द्रवीड |
| | | कुमारशिक्षा | - पं. विष्णुशास्त्री खरे |
| | | युवशिक्षा | - पं. श्रीपादशास्त्री जेरे |
| | | वृद्धशिक्षा | - पं. आत्मारामशास्त्री जेरे |
| द्वितीयं पुष्पम् | : स्तोत्रादिसंग्रहः ग्रंथप्रस्तावना ढुंढिराज वक्रतुंड कवीश्वरमहाराज | | |
| तृतीयं पुष्पम् | : सप्तशतीगुरुचरित्रसार, श्रीदत्तलीलामृताब्धिसार, माघमाहात्म्य, स्त्रीशिक्षा, प्राकृतमनन, आत्मचिंतन, आणि श्रीनृसिंह सरस्वतीदीक्षितमहाराजकृत स्तोत्रसंग्रह ग्रंथ प्रस्तावना श्रीकल्याण श्रीपाद कुलकर्णी | | |
| चतुर्थ पुष्पम् | : श्रीदत्तमाहात्म्यः ग्रंथप्रस्तावना | | - श्री. बाळशास्त्री हरदास |
| पंचमं पुष्पम् | : श्रीगुरुचरित्रकाव्यम् : प्रथम शतक | | : पं. श्रीपादशास्त्री कवीश्वर |
| | | द्वितीय शतक | : पं. वामनशास्त्री जेरे |
| | | तृतीय शतक | : पं. ईश्वरशास्त्री दीक्षित |
| | वृत्तालंकार विवरण | : पं. श्रीपादशास्त्री तापस | |
| | श्रीदत्तचंपू | : पं. रामचंद्रशास्त्री जेरे | |
| | एकूण ग्रंथप्रस्तावना | : पं. श्रीपादशास्त्री तापस | |
| षष्ठं- | | | |
| सप्तमचपुष्पम् | : श्रीदत्तपुराणम् | : ग्रंथप्रस्तावना | : पं. अनंतशास्त्री फडके |
| अष्टं-नवमंचपुष्पम् | : श्रीगुरुचरितम्(द्विसहस्त्री) : | ग्रंथप्रस्तावना | : पं. हरिरामशास्त्री शुक्ल |
| | द्विसाहस्त्री नाममहात्म्य- धुंडिराज मोरेश्वर माहूरकर | | |
| दशमं-एकादशंच | : श्री गुरुसंहिता (समश्लोकी गुरुचरितम्) | | |
| पुष्पम | ग्रंथप्रस्तावना | : भालचंद्रशास्त्री उप्पिनबेटगिरी | |
| द्वादशे पुष्पम् | : श्रीगुरुदेवचरित्र, वेदनिवेदनिस्तोत्र, श्रीकृष्णालहरी, पंचपाक्षिक, कीर्तनाख्याने. | | |
| | वेदनिवेदनिस्तोत्रस्य भूमिकाः विनायकशास्त्री टिल्लू | | |
| | पंचपाक्षिक प्रस्तावना : नारायणशास्त्री वाडीकर, हनुमंत बाळाजी भिडे | | |
| | कीर्तनाख्याने प्रस्तावना : नारायण लक्ष्मण जहागिरदार, हरिदास, सिंदखेडकर. | | |

श्रीस्वामीमहाराजांच्या या एकूण वाङ्मयात संस्कृत अनुवाद, प्रबंधात्मक मांडणी, श्लोकात्मक आणि ओवीबद्ध रचना, स्फुट काव्य, संवाद अशी विविध रूपे दिसतात. संतरचनातील स्तोत्रे, पदे, अभंग, धावा, पाळणा, प्रातःस्मरण, शेजारती, प्रार्थना पसायदान असे बहुमिती रूप दिसते. प्राचीन आर्य वेद-पुराण वाङ्मय, सूत्र आणि भाष्यग्रंथ, अभिजात संस्कृत काव्यरचना या सर्वांवरील श्रीस्वामींचे प्रभुत्व या वाङ्मयात दिसते. प्राकृत, पारमार्थिक मराठी शैलीची वैशिष्ट्ये दिसतात. त्यांच्या चतुरस्त्र, सर्वस्पर्शी, विश्वात्मक भावानुभूतींचा परिचय घडतो. साहजिकच 'या समचि हा' अशी तयांची वाङ्मयीन श्रेष्ठता जाणवते. अशा ग्रंथांचे माहात्म्य स्पष्ट करताना प.पू. गुळवणीमहाराज म्हणतात, 'साधनमार्गाचे व्यवस्थित ज्ञान संपादन करून त्याप्रमाणे प्रत्यक्ष आचरण करणे हाच खरा ज्ञानाचा उपयोग आहे आणि सद्ग्रंथांचा प्रचारही खरा हाच आहे. (प्रस्तावना, द्विसाहस्त्री गुरुचरित्र) भारतातील प्रमुख विद्याकेंद्रे, धर्मतीर्थे असा सुदूर आणि सर्वत्र असा

श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथांचा प्रसार व्हावा, संप्रदायसंवर्धन आणि आत्मज्ञान याकरता त्यांचा उपयोग व्हावा ही श्रीमहाराजांची यथार्थ अपेक्षा पूर्ण होणे महत्त्वाचे आहे. त्यादृष्टीने विविधांगी, विधायक प्रयत्न आणि कार्य ही श्रीस्वामीमहाराजांची वाङ्मयीन भावपूजा म्हणता येईल.

## श्रीवासुदेवानंदसरस्वतींची जीवनदृष्टी

भारतीय जीवनात 'मोक्ष' हे परमसाध्य मानले गेले आहे. या मोक्ष विज्ञानाच्या दोन बाजू आहेत. एक सैद्धांतिक, तेच तत्त्वज्ञान होय. दुसरी आचरणात्मक, तोच धर्म होय. श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनदृष्टीमध्ये सिद्धान्त आणि व्यवहार, तत्त्वज्ञान आणि धर्म यांचा समन्वय आहे. पुरुषार्थ चतुष्ट्य, मोक्षसाधनचतुष्ट्य यांचा समन्वय साधणारी श्रीस्वामीमहाराजांची जीवनदृष्टी म्हणजे एकात्म साक्षात्कारदर्शन आहे.

श्रीस्वामीमहाराजांनी सत्पात्र, अधिकारी व्यक्तींपुढे मोक्षमार्गाचे अनेक पर्याय समोर ठेवून त्यांचे तत्त्वज्ञानात्मक निराकरण केले आहे. तत्त्वज्ञानाचे कार्य, जीवनाचे प्राप्तव्य काय आणि प्राप्तिसाधन कोणते याचे मार्गदर्शन करणे हे असते. श्रीस्वामीमहाराजांनी अद्वैत वेदान्ताच्या भूमिकेचा पुरस्कार केला आहे. त्याबाबतीत ते म्हणतात, (द. पु. १.३-७-१२)

१) पदार्थविवेचनाने मुक्ती प्राप्त होत नाही, तर ती स्वात्मज्ञानाने प्राप्त होते.

२) कर्मठाला मोक्ष प्राप्त होत नाही. जो ब्रह्मविद् तोच परमपद प्राप्त करतो.

३) जे प्रत्येक शरीरातील आत्मा वेगळा मानतात, ते मुक्ती प्राप्त करू शकत नाहीत, तर 'एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः । एकदा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत् । या श्रुतीच्या मार्गदर्शनानुसार मोक्ष प्राप्त होतो.

४) अखण्डैकरसलाभात् मोक्ष प्राप्त होतो. योगाने प्राप्त होणाऱ्या केवळ क्षणिक दुःख निवृत्तीने तो प्राप्त होत नाही.

मोक्षप्राप्तीसाठी आवश्यक असणारा साधनक्रम प्रत्येकाने पूर्ण करावयास हवा. या साधनक्रमात १) ईश्वरार्पण बुद्धीने स्वधर्माचरण २) त्यामुळे ईशप्रसादस्वरूप सद्गुरुप्राप्ती ३) सद्गुरुकृपेने प्रतिबंधक्षय ४) आणि त्याद्वारा मोक्षविज्ञानप्राप्ती या गोष्टींचा समावेश होतो. श्रीस्वामीमहाराज म्हणतात,

***मोक्षो ज्ञानं विना न स्यान्न । ज्ञानं सद्गुरुं विना । सद्गुरुं ? कृपया विना कोपीह विन्दति ॥ द. पु. १.३.४७ ॥***

श्री स्वामी महाराजांची भूमिका अद्वैत वेदान्ताची असल्यामुळे सर्वज्ञ, सर्वशक्तीमान, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, असे परब्रह्म हीच परम सत्ता असल्याचे सांगून श्री स्वामी महाराज म्हणतात,

***जे सत्यज्ञान अनंत । ब्रह्म एक सर्वोचित ।***
***भ्रमे नामरूप निश्चित । असती कल्पित ब्रह्मावरी ॥......***
***सच्चिदानंद ब्रह्म खास । तें असे अखंडैकरस ।***

आत्मा हा देह, इन्द्रिये, मन, प्राण, अहंकार या सर्वांहून भिन्न असून तो अशोक, विशुद्ध, सर्वकारण, अव्यक्त, अचिन्त्य, अनन्त, अमल, शिव असा आहे. पण अविद्येमुळे तो स्वतःचे हे मूळ स्वरूप विसरतो आणि स्वतःला कर्ता, भोक्ता, ज्ञाता, सुखी, दुःखी समजतो तो पंचकोशविलक्षण असतानाही देहोपाधींचा अध्यास घडतो.

जीवाचे स्वरूप स्पष्ट करीत असताना स्वामीमहाराज म्हणतात,

***स्थूलदेह अन्नमयकोश । लिंगदेही तीन कोश ।***
***प्राणमय मनोमय विज्ञानमय । आनंदमय कारणदेही ॥***
***स्तोत्रादिसंग्रह ४०७.५३***

स्वतःचे पंचकोशविलक्षण स्वरूप जेव्हा जीवाला कळते, त्यावेळी तो मुक्त होतो. जन्म, अस्तित्व, विकास, बदल, क्षय आणि नाश या अवस्थांशी देहाच्या तादात्म्यामुळे जीव आपले तादात्म्य कल्पितो. परंतु ज्ञानी या भ्रमापासून मुक्त असतात. त्यामुळे जन्ममरणाच्या दुःखापासून ते मुक्त असतात. स्वामीमहाराज म्हणतात,

***अत एव ज्ञानवन्तो न तुष्यन्ति हि जन्मतः ।***
***यद्वा मृत्युङ्गतस्यापि दुःखं कुर्वन्ति नैव ते ॥***
***समश्लोकी २१.१४***

सृष्टिरचनेचे रहस्य सांगत असताना, श्रुत्याधारित अद्वैत वेदान्ताची भूमिका विशद करताना श्रीस्वामीमहाराज म्हणतात (दत्तपुराण १.३.१९-२७)

'एकमेवाद्वितीयम्' परमात्मा हाच प्रारंभी होता. 'बहुस्यां प्रजायेयम्' या स्वसंकल्पानुसार तो शुद्धसत्त्व मायेच्या आश्रयाने जगताचे निमित्तकारण झाला. तमःप्रधान मायेच्या उपाधीने पांचभौतिक जगताचे तो उपादानकारण झाला. जगत् आणि जीव सर्ववस्तुनियामिका अशा पराशक्तीच्या, प्रकृतीच्या आधीन असतात. जीवाचे प्राचीन कर्मसंस्काराधीनत्व ही प्रकृती होय. ज्यावेळी विषयस्मरण, रागद्वेषनिर्मिती होते, तेव्हा जीव कर्मप्रवृत्त होतो. रागद्वेष दूर व्हावेत याकरताच ईश्वरभजनादी मार्गांचा उद्देश आहे. ज्यावेळी सर्वप्रकारच्या उपाधी दूर होतात, त्यावेळी जीव-ईश्वर भेदही संपतात आणि स्वस्वरूप ज्ञानस्थितीमध्ये बंधमोक्ष हे भेदही रहात नाहीत हे स्वामीमहाराजांनी पुढील शब्दात सांगितले आहे -

***जेवी मायोपाधीने आत्मा शिव । अविद्योपाधीने अनात्मा जीव ।***
***दोन्ही उपाधी जाता स्वयमेव । परमात्मा परब्रह्म मी ॥***
***अज्ञानोपाधि किंचिज्ज्ञ जीव । मायोपाधि सर्वज्ञ जीव ।***
***दो उपाधींचा होता अभाव । ना जीव ना शिव परमात्मा ॥***
***असे मी सच्चिदानंद । नित्य शुद्ध, बुद्ध निर्भेद ।***
***नित्यमुक्त परमानंद । अनंत वेदवेद्य मी ॥***

स्तोत्रादिसंग्रह ४०७.७७,७९,८२

अशी ही नित्यमुक्त अवस्था प्राप्त होण्यासाठी कर्म, भक्ती, योग आणि ज्ञान या मोक्षचतुष्ट्याचा अवलंब करायला हवा. म्हणूनच वर्णाश्रमोचित धर्माचरण, गुरुसेवा, पूजापाठ, जप यावर शास्त्रामध्ये भर दिलेला आढळतो. हे कर्म म्हणजे साधनभक्तीच आहे. त्या अर्थाने 'ईश्वराराधनधिया स्वधर्माचरणात् सतां' अशा शब्दांत श्रीस्वामीमहाराजांनी ज्ञानप्राप्तीसाठी भक्तियुक्त कर्माचा पुरस्कार केला आहे. मात्र मोक्षस्थितीत, जीवन्मुक्त अवस्थेत सर्व भेद ओलांडले जातात, द्वंद्वात्मकता संपते.

***ऐक्य स्फूर्ति झाली । भक्ति तुणावली ।***
***आता सीमा झाली । कैवल्याची ॥ स्तोत्रादि संग्रह ४०४.१६***

या अवस्थेत उपास्य, उपासक, उपासना हा त्रिपुटी भेद मावळतो. त्यानंतर निर्माण होणाऱ्या अवस्थेचे वर्णन करताना स्वामीमहाराज म्हणतात,

***जसे पाषाणाचे कोरिले देऊळ । पाषाण केवळ देव त्यात ।***
***देवा तुझी आता कशी करू पूजा । न दिसेचि दुजा आज मज ।***

*अशी ही सहजस्थिती देवपूजा । तुज अधोक्षजा हे आवडो ।*
*हेचि सर्व आत्मनिवेदन होय । होई ब्रह्ममय सर्व कर्म पूर्वोक्त । १७.३४*

भारतीय उपासनेचे अधिष्ठान अशी ही अद्वैतदृष्टी आहे. ईश्वराची नामरूपे जरी अनंत असली तरी समग्रता आणि सर्वात्मकता हेच ईश्वरी दिव्यानुभूतीचे परमदर्शन आहे. त्यामुळे भारतीय उपासनाप्रणाली ही अनेक देवतावादी नसून, ही अनंत नामरूपे असलेल्या सर्वेश्वराची आहे. 'उपासनांना कार्यार्थ ब्रह्मणो रूपकल्पना' ही भूमिका त्यामागे आहे. ही व्यापक भूमिका लक्षात घेऊन श्रीस्वामीमहाराज म्हणतात, की विष्णु, गणेश, सूर्य, शक्ती आदी सर्व ईश्वरी नामरूपे तत्त्वतः भिन्न नाहीत. एकाच सगुण परब्रह्माचे हे विविध दिव्य आविष्कार आहेत. त्यामुळे एका दैवताची भक्ती आणि अन्य दैवतांच्या वा त्यांच्या भक्तांचा द्वेष योग्य नाही. तो अशास्त्रीय आहे. एकाची अनन्यभावाने उपासना केली तरी अन्य दैवते संतुष्ट होतात. ज्याने त्याने आपल्या आवडीप्रमाणे भेदबुद्धी न ठेवता उपासना करावी.

*एकोऽजः पञ्चधा जातः कुतो भेदोऽस्ति दैवतेः ।*
*यथारुचिरीश्वरः सेव्यो नान्यथा भेदमाचरेत् ॥ स्तोत्रादिसंग्रह*

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदत्तात्रेय हे विष्णु, शिव, गणेश, सूर्य, शक्ती आदि रूपधारक अज, अनंत असे हृदयस्थ सद्गुरु आहेत. (द्विसाहस्री : श्रीगुरुस्तुती - १.१) या भूमिकेत समन्वय दृष्टीच प्रकट केली आहे. भारतीय जीवनदृष्टीमधील आध्यात्मिक आणि सांस्कृतिक एकात्मतेचे हे अधिष्ठान आहे.

हे अधिष्ठान सुदृढ करण्याकरिता श्रीस्वामीमहाराजांनी चतुर्विध पुरुषार्थ समन्वय केला आहे. नीतिशुद्ध आचार, धर्म्य मार्गाने अर्थसंचय, धर्माशी अविरोधी कामनापूर्ती असे ऐहिक जीवन हे पारमार्थिक मोक्षप्राप्तीचे साधन आहे.

*आचारप्रभवो धर्मो, धर्मेणार्थं च साधयेत् ।*
*कामं तदविरोधेन मोक्षोऽतः सुकरो भवेत् ॥ कुमारशिक्षा - १६*

अशा जीवनामुळे समत्व, सामाजिक सामंजस्य निर्माण होते, टिकून राहते.

श्रीस्वामीमहाराजांची ही जीवनदृष्टी यथार्थपणे समजून घेतली तर आज दिसणारा धार्मिक श्रद्धेचा क्षय नाहीसा होईल. धर्माची पिछेहाट थांबेल. आजचा माणूस भौतिकदृष्ट्या सुधारला आहे पण संस्कारांच्या दृष्टीने अविकसित आहे. निसर्गावरचे स्वामित्व वाढले आहे. पण दुष्ट प्रवृत्तींची मानसिक गुलामगिरी टिकून आहे. सुखाची साधने वाढली आहेत पण आंतरिक स्वानंदाचे साध्य हरवले आहे. अशा वेळी आंतरिक दिव्यता जागृत व्हावी, सर्वहित बुद्धीने कार्य घडावे याकरिताच स्वामींनी आपले सारे जीवन व्यतीत केले. आपली जीवनदृष्टी आपल्या साहित्यातून प्रकट केली. भारतीय अध्यात्म परंपरा आणि साक्षात्कार दर्शन यांच्या संदर्भातील त्यांच्या जीवनदृष्टीची व्यापक वैशिष्ट्ये त्यातून स्पष्ट होतात. शांकरवेदान्त आणि ब्रह्मसूत्र परंपरा हे त्यांच्या तत्त्वज्ञानाचे आणि जीवनदृष्टीचे अधिष्ठान आहे. त्यातील कर्म आणि स्वधर्मविषयक भूमिकेमागे धर्मसूत्रे आणि स्मृतिग्रंथ यांची थोर परंपरा आहे. म्हणूनच स्वामींची जीवनदृष्टी म्हणजे एकात्म साक्षात्कारदर्शन आहे.

## श्रीवासुदेवानंद सरस्वतींचे दत्तसंप्रदायास योगदान

श्रीस्वामीमहाराजांनी दत्तसंप्रदायाच्या विकासासाठी आणि प्रसारासाठी अथक परिश्रम घेतले आहेत. त्यांचे हे परिश्रम विविधांगी आहेत. साहजिकच दत्तसंप्रदायास लाभलेले त्यांचे योगदानही विविधांगी आहे.

स्वामीमहाराजांच्या पूर्वी 'गुरुचरित्र' हा मराठी भाषेतील ग्रंथ हाच काय तो दत्तसंप्रदायाचा वाङ्मयीन आधार होता. तोही केवळ पारायणापुरताच मर्यादित होता. खरे तर भगवान् श्रीदत्तात्रेयांची उपासना, श्रीदत्तभक्तीची परंपरा प्राचीन आहे. भारतातील विविध संप्रदायांच्या उपासनेत दत्तभक्तीला मध्यवर्ती स्थान आहे. जाबालदर्शनोपनिषद्, अवधूतोपनिषद्, भिक्षुकोपनिषद्, शाण्डिल्योपनिषद्, दत्तात्रेयोपानिषद् इत्यादींमध्ये श्रीदत्तात्रेयांचे स्वरूप, ध्यान, मंत्रोपासना यांचे विवेचन आहे. पण त्याकडे दुर्लक्ष झाले होते. श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्री, दत्तपुराण, शिक्षात्रयम्, स्तोत्रादिसंग्रह यांसारख्या ग्रंथांची निर्मिती करून दत्तसंप्रदायास अद्वैत वेदान्ताच्या जीवनदृष्टीचे व्यापक अधिष्ठान प्राप्त करून दिले. साक्षात्कारी जीवनदृष्टीस आवश्यक असणारे नीतिशास्त्र सांगितले आणि दत्तसंप्रदायाला नैतिक अधिष्ठान लाभले. सर्वात्मभावाच्या भूमिकेतून दत्तभक्तीचे सर्वकष आणि सर्वस्पर्शी स्वरूप प्रकट झाले. ज्ञानभक्तीची मर्मदृष्टी मिळाली. थोडक्यात श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदत्तात्रेय देवतेला मांत्रिक आणि तांत्रिक यांनी निर्माण केलेल्या प्रदूषणापासून, कर्मठांच्या सकाम उपासनेपासून मुक्त केले. दत्तभक्ती ही एक पंथनिष्ठ उपासना नाही तर अद्वैत वेदान्ताच्या मुख्य प्रवाहाचा तो भाग आहे हे दाखवून दिले. हे दत्तसंप्रदायाला स्वामीमहाराजांचे वाङ्मयीन योगदान लाभले असे म्हणता येईल.

श्रीस्वामीमहाराजांनी दत्तसंप्रदायाच्या पौराणिक आणि ऐतिहासिक अशा सर्व काळातील दत्तात्रेयांच्या लीलावतारांचे एकात्मीकरण केले. आतापर्यंत श्रीपाद श्रीवल्लभ आणि श्रीनृसिंह सरस्वती या अवतारांशी दत्तोपासना रूढ होती. योगिराज, अत्रिवरद, दत्तात्रेय, कालाग्निशमन, योगिजनवल्लभ, लीलाविश्वंभर, सिद्धराज, ज्ञानसागर, विश्वंभर, मायायुक्त, मायामुक्त, आदिगुरु, शिवरूप, देवदेव, दिगंबर, कृष्णश्यामकमलनयन या षोडशावतारांच्या कथा आणि श्रीसत्यदत्तव्रतपूजा स्वरूपात त्यांची सगुणोपासना स्वामींनी रूढ केली. त्यामुळे यदु, अलर्क, प्रल्हाद, परशुराम, नहुष, कार्तवीर्य या महान् दत्तभक्तांचे जीवन प्रकाशात आले. हेही स्वामीमहाराजांचे महत्त्वाचे योगदान आहे.

नृसिंहवाडी, औदुंबर, गाणगापूर, कारंजा, माहुर या महाराष्ट्रातील तसेच कुरुगुड्डी, गिरनार ही अन्य प्रांतातील दत्तोपासनेशी संबंधित पवित्र तीर्थक्षेत्रे आहेत. पण तेथील मंदिरांच्या व्यवस्थेत त्रुटी होत्या, गोंधळ होता. या तीर्थक्षेत्रांची चैतन्य जागृती, त्या ठिकाणच्या आचार-व्यवहारातील, दैनंदिन कार्यक्रमातील सुधारणा हे महत्त्वाचे कार्य स्वामी महाराजांनी केले. आज प्रसिद्ध दत्तक्षेत्रात म्हटली जाणारी 'शांत हो श्रीगुरुदत्ता' ही करुणात्रिपदी त्यांचीच ! मंदिरांच्या सुव्यवस्थेबरोबरच त्यांनी भारतभर केलेल्या यात्रांतून व चातुर्मासातून दत्तभक्तीचे बीजारोपण व संवर्धन केले. दत्तसंप्रदायाचे भारतभर संघटन व संवर्धन हे स्वामींचे मोठे योगदान आहे.

मुख्यतः सद्गुरुभक्ती ही दत्तभक्ती होय. सद्गुरु म्हणजे त्या त्या जीवाला ज्ञानमोक्षाकरता लाभलेले वा प्राप्त झालेले (दत्त) ईश्वरी रूप होय. 'गुरुस्वरूपविज्ञानं तद्भक्तिः प्रेमलक्षणा' हे तर गुरुचरित्राचे सार आहे. गुरुभक्ती आणि दत्तभक्ती यांची एकरूपता ज्याप्रमाणे स्वामी महाराजांनी

विशद केली आहे, त्याचप्रमाणे त्यांच्या दत्तसंकल्पनेत सर्व श्रुतिस्मृतिपुराणोक्त देवतांचा एकात्मभाव प्रकट झाला आहे. श्रीमद् शंकराचार्यांप्रमाणे समन्वयी भक्तीची दृष्टी देण्याचे कार्य त्यांनी केले आहे.

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने विचार केला तर श्रीनृसिंह सरस्वती दत्तात्रेयांची परंपरा ही गौडपादाचार्य, शंकराचार्य विद्यारण्य यांची म्हणजे अद्वैत वेदान्ताचीच आहे. (श्रीगुरुचरित अध्याय ११) अद्वैत जीवनदृष्टी ही भारतीय तत्त्वज्ञानाची मध्यवर्ती विचारधारा आहे. श्रीस्वामीमहाराजांनी श्रुतिस्मृति पुराणोक्त अशा या अद्वैत-वेदान्त दृष्टीचा आविष्कार आपल्या सर्व ग्रंथांतून केला आहे. त्यामुळे उपासनामार्ग, साधनमार्ग, तत्त्वज्ञान, धर्म, संस्कृती यांचा विचार करता श्रीस्वामी महाराजांना अभिप्रेत असणारा दत्तसंप्रदाय ही समन्वयी जीवनदृष्टी आहे, समग्रतेचे तत्त्वज्ञान आहे. त्याची साक्षेपी आणि मर्मग्राही मांडणी हे दत्तसंप्रदायास लाभलेले श्रीस्वामीमहाराजांचे महान् योगदान आहे.

## दत्तावतार श्रीस्वामीमहाराज

परमार्थ साधनेची वाटचाल पार्थिवतेकडून परतत्त्वाकडे, ऐहिकाकडून पारलौकिकाकडे, लौकिकाकडून अलौकिकाकडे होत असते. बद्ध, मुमुक्षु, साधक या अवस्था पार करीत सिद्ध आणि सद्‌गुरुपद प्राप्त अशा श्रीस्वामीमहाराजांसारख्या जीवन्मुक्त महापुरुषाच्या जीवनात षड्गुणैश्वर्य ईश्वराची स्वरूप लक्षणे प्रकट होत जातात. ईश्वरेच्छा किंवा निमित्तमात्र असे त्यांचे जीवन 'उरलो उपकारापुरता' अशा केवळ लोककल्याणासाठी समर्पित झालेले दिसते. त्यांचे सारे जीवनच ईश्वरी लीला वा दिव्यक्रीडा असते. अनन्य आणि उत्कट भक्तीने प्रारंभ होणारे त्यांचे जीवन 'झाला देवोचि भक्तु' अशा परमस्थितीत येते. भगवंतच भक्तरूपाने वावरतो. त्या वेळी प्रकट होणारे सारे वाङ्मय 'आला अवतरविते मंत्र अक्षरे इये ।' असे मंत्रसामर्थ्य प्राप्त, आत्माविष्कारी, श्रुतिसाहित्यच होते. मंत्राक्षरत्व लाभलेले साहित्य आणि ईश्वरी लीला बनलेले जीवन दुरित, दुःख, पाप, प्रमाद अशा अशुभांचे निवारण करते. दैवी संपदेची पर्जन्यवृष्टी करते.

हे सारे पाहून आणि अनुभवून तत्कालीन आणि समकालीन अशा सत्पुरुषांनी, प्रज्ञावंत अभ्यासकांनी श्रीस्वामी महाराजांचे दत्तावतारी विभूतिमत्व आपल्या अभिप्रायातून व्यक्त केले आहे.

विख्यात महापंडित श्रीराजेश्वरशास्त्री द्रवीड एका प्रस्तावनेत म्हणतात, 'यद्यदविभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ।' या गीतेच्या वाक्यावरून श्रीमहाराज हे ईश्वरावतार आहेत हे सिद्ध झाले असता, रामकृष्णादी अवतार हे कलियुगाच्या पूर्वीच गुप्त झाले आणि भगवान् दत्तात्रेय हे मात्र आजही आहेत. या वर्णनावरून श्रीमहाराज हे साक्षात् भगवान् दत्तात्रेय स्वरूप आहेत ही अत्यंत रहस्यभूत गोष्ट आज आम्ही प्रकाशित करीत आहोत.' (शिक्षात्रयम् - प्रस्तावना).

श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः विविध मोक्षसाधनांचा अवलंब करीत धर्म, ज्ञान, वैराग्यसंपन्न जीवन प्राप्त केले आणि स्वानुभूति सिद्ध अशा आपल्या ग्रंथातून वेदान्त, धर्म, भक्ती, योग यांची सिद्धान्त रहस्ये प्रकट केली. श्रीहरिरामशास्त्री शुक्ल द्विसाहस्त्रीच्या प्रस्तावनेत म्हणतात, 'श्रीमद्भिः साक्षाद्भगवतो गुरोर्दत्तास्यावतारभूतैः' प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामिचरणैः संस्कृतभाषायां निबद्धस्य गुरुचरित्राभिधस्य ग्रन्थरत्नस्य सुपरिष्कृतं संस्करणमिदं पाठकानां पुरत उपस्थाप्यते ।'

ब्रह्मश्री श्रीदत्तमहाराज कवीश्वर यांचे वडील श्रीढुंढिराज शास्त्री कवीश्वर यांनी स्तोत्रादिसंग्रहास प्रस्तावना लिहिली आहे. त्यामध्ये त्यांनी प. प. ब्रह्मानंद स्वामींचा श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथांविषयीचा अभिप्राय दिला आहे. ते म्हणतात, 'महाराजांचे ग्रंथ पाहिले म्हणजे, महाराज हे प्रत्यक्ष शंकराचार्य, विद्यारण्यच आहेत असे वाटते.'

श्रीस्वामीमहाराज साक्षात्कारसंपन्न ईश्वरी विभूती, प्रज्ञासंपन्न तत्त्वज्ञ जसे होते, त्याचप्रमाणे त्यांची उत्कट दत्तभक्ती, भक्तिसाधनेवर त्यांनी दिलेला भर आणि भगवत्प्रेमाने ओथंबलेले संस्कृत पदे, अभंग इत्यादी साहित्य यातून त्यांचे संतस्वरूपही प्रभावाने व्यक्त झालेले दिसते. 'श्रीसमर्थ रामदासस्वामी महाराजांच्या कालानंतर विद्वत्ता व वैराग्यादि सद्‌गुणांनाही भूषविणाऱ्या संतांचे नाव सांगावयाचे झाल्यास श्रीवासुदेवानंद सरस्वतीमहाराज यांचेच नाव प्रामुख्याने सांगता येईल.' असे श्री. कल्याण श्रीपाद कुलकर्णी यांनी म्हटलेले आहे. (प्रस्तावना - तृतीय पुष्पम् पृ. १६).

श्रीदत्तपुराणाच्या प्रस्तावनेत श्री. अनंतशास्त्री फडके म्हणतात, 'स्वामिचरणाः साक्षाच्छ्रिदत्तात्रेयाणामेशावतारा इति ।... श्रीस्वामीपादांश्च साक्षात् श्रीदत्तात्रेयाभिन्नान् मन्यन्ते स्म ।' (पृ. १६-१७)

पं. विनायक शास्त्री टिल्लु यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या विख्यात 'श्रीवेदनिवेदनिस्तोत्रां'ची भूमिका स्पष्ट करताना, त्यांच्याविषयीचा आदर व्यक्त करणारे अष्टक लिहिले आहे. त्यामध्ये श्रीस्वामीमहाराजांच्या वाङ्मयाची प्रयोजने आणि त्याचे श्रुतितुल्य माहात्म्य स्पष्ट केले आहे.

*आर्तानामार्तिनाशायार्थार्थिनामर्थसिद्धये ।*
*जिज्ञासूंनां विबोधाय ज्ञानिनामात्मतृप्तये ॥*
*श्रीताद्वैतसुसिद्धान्नसुधयाऽऽप्याययज्जगत् ।*
*संस्कृतैः प्राकृतैर्गीतिर्भजनैर्विविधैरिह ॥ (द्वादश पुष्पम् पृ. १६)*

इतर प्रज्ञावंत अभ्यासकांनीही त्यांच्या प्रस्तावनांतून श्रीस्वामी महाराजांचे दिव्य विभूतितत्व आणि त्यांची दिव्य वाङ्मयसंपदा याविषयी गौरवाचे अभिप्राय दिलेले आहेत.

असे असले तरी स्वतः श्रीस्वामीमहाराजांची भूमिका अनन्यशरण, सर्वसमर्पित अशा उत्कट भक्ताची आहे. त्यांचा संचार, लेखन, कार्यसंकल्प हे सारे भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या आंतरिक आदेशाने होत असे. त्यांनी आपल्या ग्रंथांतून श्रीगुरुदत्तात्रेयच हे सारे करवून घेत आहेत, आपण निमित्तमात्र आहोत, अशी भावना व्यक्त केली आहे.

*श्रीदत्तेनोदिता टीका वासुदेवसरस्वतीम्*
*निर्मितीकृत्य विभुना चरितस्य गुरोर्वरा ॥ दत्तपुराण*
*तो हा परमात्मा श्रुतिगेय । नरसिंहसरस्वती दत्तात्रेय ।*
*परब्रह्म सच्चिदानंदमय । निरामय अद्वितीय तो ॥*
*तोचि रची हा ग्रंथ । निमित्तमात्र वासुदेव येथ ।... दत्तमाहात्म्य*

या आणि अशा उद्‌गारातून श्रीस्वामीमहाराजांसारख्या ज्ञानीभक्ताचे अंतरंग व्यक्त होते. 'सर्वाभूती भगवद्‌भाव' । 'सर्वत्र समदर्शिनः' ही जशी त्यांची लक्षणे आहेत, दैवी संपदेचा उत्कर्ष जसा त्यात दिसतो त्याचप्रमाणे भगवद्‌स्थिती प्राप्त होऊनही, अभेदस्थितीत भगवद् भजनात रमण्याची उत्कटताही त्यातून प्रकट होते. भगवंताने भक्तरूपात भक्तीचा सोहळा अनुभवणे हीच परमार्थाची पूर्णता आहे.

प्रज्ञावंत अभ्यासकांना ग्रंथरचनांच्या अभ्यासात श्रीस्वामी महाराजांची

दत्तस्वरूपता जाणवली. तशा प्रत्यक्ष अनुभूतींचेही उल्लेख अनेक ठिकाणी आहेत. प. पू. सद्‌गुरु श्री गुळवणी महाराज यांना श्रीस्वामी महाराजांच्या, हावनूर येथील चातुर्मासात, पवित्र सान्निध्याचा लाभ झाला. तेथून निघताना श्रीचरणांना वंदन करून, 'पुनः या चरणांचे दर्शन केव्हा ?' असे विचारले असता, श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःकडे बोट दाखवून एकमुखी, व्यांघ्रांबरधारी, दत्तस्वरूपात त्यांना दर्शन दिले व 'हेच निरंतर चित्तात ठेव' असे सांगितले. श्रीगुळवणी महाराजांनी ते दिव्यदर्शन स्वहस्ताने चित्रित केले आहे.

अधर्माच्या प्रदूषणांचे निवारण आणि श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माचे संवर्धन, संस्कार प्रबोधन हे ईश्वरी कार्य आहे. अर्वाचीन काळात, दत्तसंप्रदायाच्या संदर्भात, श्रीस्वामीमहाराजांकडून ते प्रभावीपणे घडले. त्यांचा यतिवेष हे अपरिग्रह, तपश्चर्या आणि मोक्षसाधना यांचे प्रतीक आहे. त्यांचा हातीचा दंड हा धर्म आणि संस्कृतिविषयक तर्कदुष्ट कुबुद्धीचे निवारण करण्यासाठी आहे आणि कमण्डलूतील जल हे सर्वमंगलकारक सद्‌गुरु तीर्थ आहे. त्यांचे यथार्थ व हृद्य वर्णन पुढील श्लोकात आले आहे.

*जितेन्द्रियगणाग्रणीरविरतः परे ब्रह्मणि*
*कलौ श्रुतिपथावनेऽमितनयोऽवतीर्ण स्वयम् ।*
*करात्तसुकमण्डलुः कुमतखण्डने दण्डभृत्*
*पदप्रणतवत्सलो जयति वासुदेवो यतिः ॥*

## श्रीगुरुः शरणम्ः

श्रीदत्तसंप्रदायाच्या संदर्भात विशाल वाङ्मयसंपदा, प्रज्ञानघन चतुरस्त्र व्यक्तिमत्त्व असलेल्या आणि प्रभावी कार्य केलेल्या श्रीस्वामीमहाराजांसारख्या दिव्य विभूतीचा अभ्यास करण्याची संधी लाभली ही देवाची कृपाच होय ! आम्हा उभयतांना ती लाभली पूर्ववयात, कौटुंबिक वातावरणात दत्तभक्तीचे संस्कार लाभले. प. पू. श्रीगुळवणी महाराजांसारख्या परम दत्तभक्त आणि परम गुरुभक्त अशा महद् विभूतीचा सद्‌गुरु अनुग्रह लाभला. अभ्यास, लेखन, चिंतन आणि सांस्कृतिक कार्य यामध्ये प्राचीन भारतीय विचार, परंपरा आणि ग्रंथसंपदा यांचा अभ्यास घडला. संतसहवास आणि संतविचार कार्य यांचाही परिचय घडला.

विशेषतः श्रीस्वामीमहाराजांची समग्र ग्रंथसंपदा प्रथम पीएच.डी. प्रबंध नंतर लेखमाला आणि त्याआधारे ग्रंथलेखन (डॉ. सौ. सुनीता जोशी, दत्तावतार श्रीवासुदेवानंद सरस्वती महाराज, वाङ्मय संपदा आणि जीवनदृष्टी, वासुदेव प्रकाशन - १९९३). हे कार्य साधना आणि अभ्यास दोन्ही दृष्टींनी उभयतांना पोषक आणि प्रेरक ठरले. यानंतर प. प. श्रीस्वामीमहाराजांच्या 'श्रीदत्तभावसुधारसस्तोत्रम्' या श्रीदत्तात्रेयचरित्र सारभूत रचनेवर मूलग्राही विवरण भाष्य लिहिण्याची संधी लाभली. त्यामुळे भारतीय भक्तिसाधना आणि संतांची भावदृष्टी या मागील आल्हादिनी सिद्ध महायोगाचे योगरहस्य - अधिष्ठान स्पष्ट करता आले. (आल्हादिनी दिव्य भक्तीच्या अमृतधारा - डॉ. ज. वा. जोशी, सद्‌गुरु सेवा मंदिर, येऊर, ठाणे, १९९९) यामुळे श्रीस्वामीमहाराजांचे ज्ञानीभक्त, तत्त्वचिंतक अशा महान् अर्वाचीन संतांचे जीवनकार्य आणि जीवनदृष्टी समजण्यास बहुमोल मदत झाली.

सध्या नागपूर, अमरावती, पुणे, बडोदा येथील उच्चस्तरीय विद्याकेंद्रातून श्रीस्वामीमहाराजांवर प्रबंध लेखन, प्रकाशन इ. कार्ये होत आहेत. त्यांच्यावर आधारित (web-site) संकेतस्थळही इंटरनेटवर उपलब्ध आहे. हे सारे आनंददायी आहे.

भारतीय विद्या आणि प्राच्यविद्या क्षेत्रातील व्यक्तिंकडून हे आणि असे अभ्यास मोठ्या प्रमाणावर होणे आवश्यक आहे. माहिती तंत्रज्ञानाची अद्ययावत साधने, माध्यमे आणि यंत्रणा याद्वारा ही कार्ये प्रभावीपणे घडणे सर्वांनाच कल्याणप्रद आहे. राष्ट्रीय आध्यात्मिक वाङ्मय आणि जागतिक अध्यात्म-विचार या दृष्टीने पाहता श्रीदत्तपुराण, सभाष्य द्विसाहस्त्री, स्तोत्रादि संग्रह, शिक्षात्रयम् अशा रचनांचा सर्व स्तरात प्रसार व्हावयास हवा. त्याचे कारण श्रुतिस्मृतिपुराणोक्त भारतीय धर्मदृष्टी आध्यात्मिक सिद्धान्त आणि मोक्षप्राप्तीची साधना यांची भूमिका-सूत्रे श्रीस्वामीमहाराजांनी अशा रचनातून स्पष्ट केली आहेत. सांस्कृतिक अस्तिमेचा शोध आणि विकास सांस्कृतिक विचारधनाचे भान आणि संरक्षण या आजच्या समस्या आहेत. जेव्हा अस्मिता आणि भान यांचा विसर पडतो त्या वेळी राष्ट्रीय चरित्र आणि चारित्र्य, यांचे प्रश्न निर्माण होतात. त्यादृष्टीने श्रीस्वामीमहाराजांचे जीवनकार्य, साहित्य आणि जीवनदृष्टी हा आज सर्वांना उपलब्ध असा मार्गदर्शक दीपस्तंभ आहे. त्यादृष्टीने त्यांचे संस्मरण अगत्याचे ठरते.

महापुरुषांचा स्थूलदेह हा सगळ्यांसारखाच जन्म, व्याधी, जरा या प्रकृतीच्या नियमांनी बांधलेला राहतो. मात्र त्यांची साधना आणि अनुभूती, रचना आणि कार्य, भूमिका आणि प्रभाव यांनी तयार होणारी त्यांची यशःकाया मृत्युंजयी असते. आनंदयात्री म्हणून त्यांनी केलेली जीवनसाधना इतरांना आपापल्या जीवनाच्या वाटचालीत आनंदयात्री होण्यात प्रेरक आणि मार्गदर्शक असते. श्रीस्वामीमहाराजांनी आपली आनंदयात्रा भगवान श्रीदत्तात्रेयांच्या सर्वस्पर्शी भक्तिमध्ये पूर्ण केली. त्यांच्या आंतरिक आदेशाने सर्व घडले. पूर्ण झाले. आत्मानुसंधान, सद्‌गुरु सेवा आणि भगवद् भक्ती प्रथम ज्ञानप्राप्तीसाठी आणि ज्ञानोत्तर अवस्थेत कृतज्ञता म्हणून प्रत्येकाने सांभाळावी असे त्यांचे मार्गदर्शन आहे.

*आजीवितं त्रयः सेव्याः वेदान्तो गुरुरीश्वरः ।*
*आदौ ज्ञानाप्तये पश्चात्कृतघ्नत्वनिवृत्तये ॥ दत्तपुराण*

वस्तुतः आत्मा, सद्‌गुरु आणि ईश्वर यांची ही त्रिमूर्ती उपासना आहे. त्रिमूर्तिस्वरूप श्रीदत्तात्रेयांच्या 'पवित्राणां पवित्रं मङ्गलानां च मङ्गलं' अशा श्रीपादुकांशी ज्यांचे जीवन समर्पित होते, त्यांना 'धन्य मी कृतार्थ मी' हा अनुभव येतो. त्या दृष्टीने सर्वांचे सर्व जीवनव्यवहार हीच श्रीदत्तसेवा व्हावी ही अपेक्षा.

*कृतिः सेवा गतिर्यात्रा स्मृतिश्चिंता स्तुतिर्वचः ।*
*भवन्तु दत्त मे नित्यं त्वदीया एव सर्वथा ॥ दत्तभावसुधारसस्तोत्र ४२*

ही श्रीचरणी प्रार्थना !

**डॉ. सौ. सुनीता ज. जोशी, डॉ. ज. वा. जोशी**
'संवाद' २८/३२७, गंगानगर, प्राधिकरण, निगडी, पुणे - ४११०४४.
दूरध्वनी क्रमांक ०२०-७६५३८७२

---

**स्मरण तुझे मन नित्य असावे भावे तव गुण गावे ।**
**अनासक्तीचे मी वागावे ऐसे मन वळवावे ।**

---

### १. करुणात्रिपदी - (उद्धवा शांतवन कर.)

शांत हो श्रीगुरुदत्ता मम चित्ता शमवी आतां ॥ध्रु.॥ तूं केवळ माता जनिता, सर्वथा तूं हितकर्ता ॥ तूं आप्त स्वजन भ्राता, सर्वथा तूंची त्राता ॥ चाल ॥ भयकर्ता तूं भयहर्ता ॥ दंडधर्ता तूं परिपाता ॥ तुजवांचुनि न दुजी वार्ता ॥ तूं आर्ता आश्रय दत्ता ॥ शांत हो. ॥१॥ अपराधास्तव गुरुनाथा, जरि दंडा धरिसि यथार्था ॥ तरि आम्ही गाउनि गाता, तव चरणीं नमवूं माथा ॥ चाल ॥ तूं तथापि दंडिसि देवा ॥ कोणाचा मग करुं धावा ॥ सोडविता दुसरा तेव्हां । कोण दत्ता आम्हां त्राता ॥ शांत. ॥२॥ तूं नटसा होउनि कोपी, दंडितांहि आम्ही पापी ॥ पुनरपिही चुकता तथापी, आम्हांवरि न च संतापी ॥ चाल ॥ गच्छतः स्खलनं क्वापि ॥ असें मानुनि नच हो कोपी ॥ निजकृपालेशा ओपि ॥ आम्हांवरि तूं भगवंता ॥ शांत. ॥ तव पदरीं असतां ताता, आडमार्गी पाउल पडतां ॥ सांभाळुनि मार्गावरता, आणिता न दुजा त्राता ॥ चाल ॥ निज बिरुदा आणुनि चित्ता ॥ तूं पतीतपावन दत्ता ॥ वळे आतां आम्हांवरता ॥ करुणाघन तूं गुरुनाथा ॥ शांत हो. ॥४॥ सहकुटुंब सहपरिवार, दास आम्ही हें घरदार ॥ तव पदीं अर्पु असार, संसारा हित हा भार ॥ चाल ॥ परिहरिसी करुणासिंधो ॥ तूं दीनानाथसुबंधो ॥ आम्हां अवलेश न बाधो ॥ वासुदेवप्रार्थित दत्ता ॥ शांत हो श्रीगुरुदत्ता. ॥५॥

### २. पद (चाल - इस तनधनकी.)

श्रीगुरुदत्ता जय भगवंता ॥ तें मन निष्ठुर न करीं आतां ॥ ध्रु. ॥ चोरें द्विजासी मारितां मन जें, कळवळलें तें कळवळो आतां ॥१॥ पोटशुळानें द्विज तडफडतां, कळवळलें तें कळवळो आतां ॥२॥ द्विजसुत मरतां वळलें तें मन, होकीं उदासीन न वळे आतां ॥३॥ सतिपति मरतां काकुळति येतां, वळलें तें मन न वळे कीं आतां ॥४॥ श्रीगुरुदत्ता त्यजिं निष्ठुरता, कोमल चित्ता वळवीं आतां ॥५॥

### २. पद

जय करुणाघन निजजनजीवन, अनसूयानंदन पाहिं जनार्दन ॥ ध्रु. ॥ निज अपराधें उपराठी दृष्टी, होउनि पोटीं भय धरूं पावन ॥१॥ तूं करुणाकर कधीं आम्हांवर, रुससी न किंकर वरद कृपाघन ॥२॥ वारी अपराध तूं मायबाप, तव मनीं कोपलेश न वामन ॥३॥ बालकापराधा गणे जरि माता, तरि कोण त्राता देईल जीवन ॥४॥ प्रार्थी वासुदेव पदीं ठेवीं भाव, पदीं देवो ठाव देवां अत्रिनंदन ॥५॥



# 'ज्ञानभारती प. प. श्री वासुदेवानंदसरस्वती टेंबे स्वामी महाराज विरचित श्रीदत्तलीलामृताब्धिसार, माघमहात्म्य, स्त्रीशिक्षा या लघुग्रंथांचा अल्प विमर्श'

**डॉ. सौ. रजनी पतकी**

*बी.ए., एम.ए., पी.एच.डी., संस्कृत वाङ्मयातील उपासना, निरनिराळ्या परिषदांत, शोध निबंध वाचन, ३ पुस्तके प्रकाशित, वेगवेगळ्या मासिकांत ८० लेख प्रकाशित, आकाशवाणी व इतर ठिकाणी व्याख्याने, सहकार मोरया गोसावी न्यास चिंचवड, श्री हरिकीर्तनोत्तेजक सभा, पुणे.*

"आजीवनं त्रयो सेव्याः वेदान्तोगुरुरीश्वरः।" या उक्तीचे परिपालन ज्या महात्म्यांनी निष्ठेने केले त्यात अग्रक्रमाने परमहंस परिव्राजकाचार्य श्री वासुदेवानंदसरस्वती टेंबे स्वामी महाराज (श्री स्वामी महाराज) यांचे नाव येते. पं. श्री. राजेश्वरशास्त्री द्रविड, श्री. अनंतशास्त्री फडके, संत श्री दासगणु महाराज यासारख्या ज्ञानीभक्तांना श्री स्वामी महाराज दत्तात्रेयांप्रमाणे भावले. तसेच ते दत्तात्रेय अवतार म्हणून मान्यताही पावले. श्री स्वामी महाराज आद्य शंकराचार्यांप्रमाणे प्रतिभासंपन्न असून त्यांचे संस्कृत भाषेवर प्रभुत्व होते. त्यांनी श्रीव्यासमहर्षिप्रमाणे विपुल ग्रंथसंपदा संपन्न केली. श्रीस्वामीमहाराजांच्या वाङ्मयसंपदेवर काठावर बसून नजर टाकली तरी दृष्टि खिळून रहाते, मन अ-मन होते, वाणी स्तब्ध होते. त्यांच्या समग्र ग्रंथसंपदेचे परिशीलन करणे तर अवघडच आहे पण निदान परिचय करून घेण्याचा मोह नक्कीच होतो. एरवी 'मोह' हा विनाशकारी दुर्गुण म्हणून बाजूला टाकावा असे शिकविले जाते पण हा 'मोह' लौकिक गोष्टींबाबत नसून 'ज्ञानमोह' आहे व तो अज्ञानांधःकाराला दूर सारणारा ज्ञानदीप असल्याने त्याचे स्वागत करायला हरकत नाही. यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या श्री दत्तलीलामृताब्धिसार, माघमाहात्म्य व स्त्रीशिक्षा या छोटेखानी पण आशयगर्भ ग्रंथांचा अल्प विमर्श करण्याचा प्रयत्न येथे केला जात आहे.

## श्रीदत्तलीलामृताब्धिसार

असे म्हणतात की सज्जन मनुष्याने घराभोवती सुशोभनासाठी व रोजच्या देवपूजेसाठी पुष्पवाटिका लावाव्यात; रस्त्यावरील काटेरी झुडपे काढून बारमाही फुलणारी झुडपे लावावीत, रखरखत्या वैराण जागी ताप दूर करण्यासाठी छाया देणारे वृक्ष लावावेत; जनमानसातील अज्ञानांधःकार दूर करण्यासाठी ज्ञानदीप लावावा. या तीन्ही प्रकारे व्यष्टि, समष्टि व विश्वकल्याण साधले जाते. या सज्जनांना अधिकार भेदाप्रमाणे कुलदीपक, समाजसेवक व अवतारी पुरुष म्हटले जाते. आपापल्या अधिकारानुसार सज्जन माणसे असे काम अनादिकालापासून करत आली आहेत. अशाच अधिकारी व्यक्तिंपैकी तिसऱ्या प्रकारचे म्हणजे अवतारी असे श्री टेंबे स्वामी महाराज यांनी सर्वसामान्यांना सहजप्राप्त व्हावा असा ज्ञानमार्ग, योगमार्ग, कर्ममार्ग व भक्तिमार्ग प्रसृत केले आहेत. हे चारी मार्ग श्रीस्वामीमहाराजांच्या 'दत्तपुराण' या ग्रंथात समाविष्ट आहेत. या ग्रंथाची मांडणी पुराणपद्धतीची असून त्यात सर्व विषय विस्ताराने आले आहेत. ते समजण्यासाठी निष्ठेने अभ्यास करणे आवश्यक आहे. या विषयांना प्रारंभिक म्हणून त्यातील विभाग ज्या लहान लहान ग्रंथांतून विश्लेषण केले गेलेले दिसतात त्यात दत्तमाहात्म्य (नवविध भक्ति-उपासना), दत्तचम्पू (गद्य-पद्यात्मक काव्य) व श्रीदत्तलीलामृताब्धिसार (श्रीदत्तात्रेयांचे प्रमुख शिष्य व शिकवण) हे तीन ग्रंथ आहेत. हे तीन ग्रंथ वाचणारा उपासक दत्तपुराणाचे परिशीलन करण्यास योग्य होईल अशी खात्री वाटते. या तीनपैकी श्रीदत्तलीलामृताब्धिसार येथे विचारात घ्यायचे आहे.

श्रीदत्तलीलामृताब्धिसार या शीर्षकातच त्यातील विषय समजतो. खरे तर श्रीदत्तात्रेय यांचा जन्म, कर्म दिव्य असून त्यांना अवतार समाप्ती नाही त्यामुळे त्यांचे जीवन हे सागराप्रमाणे धीरगंभीर, असीम, ना अंत ना पार असे आहे. त्यांच्या या जीवनसागराचा वेध अंशात्मक रीतीने प्रस्तुत ग्रंथात घेतला आहे. त्यासाठी श्रीस्वामीमहाराजांनी स्वयंप्रज्ञ व सिद्धहस्त लेखणीतून त्या असीम सागराच्या दहा लहरी व त्याचे प्रत्येकी शंभर असे एकूण एक हजार स्पंद शब्दबद्ध केले आहेत. या दहा लहरीतील विषयांची विभागणी कथा, उपासना, योग, मंत्र, व्रत व तत्त्वज्ञान अशी करून त्याचा थोडक्यात परिचय करून घेता येईल.

## श्रीदत्तलीलामृताब्धिसारातील कथा

या ग्रंथाच्या दहा लहरीतून प्रथम श्रीदत्तात्रेयांची जन्मकथा व त्यांची दिनचर्या दिली आहे. दत्तजन्मकथा पैठणमधील कौशिकाच्या संदर्भाने सुरू होते. कौशिकाचा अनाचार, कौशिक पत्नीने त्याची केलेली सेवा, कौशिकास मांडव्य ऋषींचा शाप, कौशिक पत्नीने केलेले सूर्य स्तंभन, सति अनसूयेने ते सोडवून कौशिकास दिलेले जीवनदान हा भाग येथे आहे. सति अनसूयेवर प्रसन्न होऊन देवांनी तिला वर दिला व त्यांच्या प्रभावाने ब्रह्मांशाने सोम, विष्णूच्या अंशाने दत्तात्रेय व शंकरांच्या अंशाने दुर्वासांचा जन्म झाला. सोम चंद्रलोकी गेला, दुर्वास परिव्राजक झाले व दत्तात्रेय माता-पित्यांपाशी राहिले असा कथाभाग येथे आहे.

दत्तात्रेयांची दिनचर्या अशी

*ज्याचे सह्यगिरि स्थान । माहुरी करी शयन ।*
*नित्य भागीरथी स्नान । तुंगापान ॥*
*कुरुक्षेत्री आचमन । करहाटांत संध्या ध्यान ।*
*कोल्हापुरी भिक्षाटन । नित्य करी ॥*
*पंढरीसी विलेपन । तारापुरी भोजन ।*
*स्मरताची आगमन । शीघ्र करी ॥ (१.७५-७८).*

यानंतर कार्तवीर्य अर्जुन (१ ते ३ लहरी), इंद्राला बृहस्पतीने सांगितलेल्या सात कथा - विष्णुदत्त कथा (२ री लहरी), भृगुपुत्र ऋचिक व गाधीपुत्र विश्वामित्र कथा (४ थी लहरी), जमदग्नि - परशुराम कथा (५ वी लहरी), प्रल्हाद व अवधूत भेट (६ वी लहरी), अलर्क कथा (७ वी लहरी), आयुकथा (८ व ९ वी लहरी), यदु-अवधूत संवाद (१० वी लहरी) अशा विविध कथा आल्या आहेत. या दत्तभक्तांच्या कथा असून त्यातून प्रत्येकाने कोणत्या प्रकारची भक्ती केली ते स्पष्ट होते. या भक्तीचा प्रकार दत्तमाहात्म्यात विशद केलेला असल्याने तो पुन्हा येथे सांगितला नसावा. दत्तमाहात्म्यानुसार ते प्रकार असे -

कार्तवीर्ये केली स्मरण भक्ति । अलर्काने वंदनभक्ति । आयुराजाने दास्यभक्ति । सख्यभक्ति परशुरामे ।। विष्णुदत्ते केले सेवन । यदूने केले अर्चन । वेदधर्मे केले कीर्तन । दीपके श्रवण श्रीदत्ताचे ।। सर्वस्वात्मनिवेदन । कित्येक भक्तांनी करून । श्रीदत्ती तल्लीन होऊन । निर्वाणस्थान घेतले ।। (द.मा १.१३.१५).

या सर्व कथा गुरुदत्तात्रेयांचे माहात्म्य व त्यांच्या भक्तीचा प्रभाव दर्शवितात. या कथा सांगताना श्रीस्वामी महाराजांनी विविध उपासना दिल्या आहेत.

## श्रीदत्तलीलामृताब्धिसारातील उपासना

या ग्रंथात मुख्यतः दत्तभक्ति असली तरी गुरु-शिष्य संवादात योगसाधना, मंत्र, व्रत यांचेही विवेचन आले आहे. ते थोडक्यात असे -

योगसाधना - श्रीगुरुंनी कार्तवीर्य अर्जुनाला अष्टांग योग सांगितला आहे. (तृतीय लहरी १८-५१). तो असा -

दहा यम - अहिंसा, दुर्मैथुन करू नये, सरलता, धैर्य, शौच, सर्वांवर कृपा करावी, क्षमा करावी. परिमित आहार घ्यावा, सत्य वदावे, अस्तेय.

दहा नियम - देवगुरू नामजप, पूजा, वेदांताचा नित्य अभ्यास, गुरुवाक्यावर विश्वास, कृच्छ्रादि व्रताचा अवलंब, कर्मावर श्रद्धा, दैवलाभ संतोष, दान, निंदा नको, सर्व विष्णूस अर्पण.

आसन - श्रीस्वामी महाराजांनी येथे बद्धपद्मासन व सिद्धासन सांगितले आहे. बद्धपद्मासन म्हणजे उजवा पाय डाव्या मांडीवर, डावा पाय उजव्या मांडीवर, मागून विरुद्ध हातांनी पायाचे अंगठे धरावेत, नासाग्री दृष्टी धरावी. सिद्धासन म्हणजे भ्रूमध्यावर द्रष्टि, डावी टाच गुदावर, त्यावर उजवी टाच, हनुवटी छातीवर लावणे, दर्भ अथवा चर्मवस्त्रावर एकाग्रतेने बसणे.

प्राणायाम - डाव्या नाकपुडीने सोळा अंक मोजेपर्यंत श्वास घेणे, हनुवटी छातीवर दाबून त्याच्या चौपट कुंभक करणे, उजव्या नाकपुडीने बत्तीस आकडे होईपर्यंत श्वास सावकाश सोडणे. याच्या विरुद्ध पुन्हा प्रक्रिया करणे. हा विपरीत शुद्धनाडी अभ्यास आहे. यात कुंभक तीन वेळा वीस-वीस आकड्याने वाढवायचा. उत्तम प्राणायाम झाल्यास ब्रह्मरंध्रात प्राण जातो. तो दोन पळे पाच विपळे तेथे टिकला की कुंडलिनी जागृत होते.

प्रत्याहार - कुंडलिनी पंचवीस विपळे ब्रह्मरंध्रात टिकली की प्रत्याहार होतो. धारणा - दोन घडींचा काळ धारणा करावी. (दत्तमाहात्म्य १४ अ. पहावा)

ध्यान - अहोरात्र मनन ध्यान करावे, निद्रा त्यागावी, विक्षेप नको, द्वैतभान मिथ्या आहे, मी साक्षी आहे असे नित्य ध्यान करावे.

समाधी - ध्येयाकार मन झाले की समाधी लागते, स्वप्रतीती येते पूर्णानंद मिळतो.

असे झाल्यावर योग्याला सिद्धि आड येतात, त्यांच्यापासून सावध रहावे. योगभ्रष्ट झाल्यास जन्मांतरी (पुढील जन्मांतून) मोक्ष मिळतो. योग्यास विघ्न आल्यास ब्रह्माबरोबर मुक्ति मिळते, विघ्न न आल्यास जीवनमुक्ति मिळते.

दत्तभक्तीच्या कथा व योगसाधनेबरोबरच श्रीस्वामी महाराजांनी अनेक मंत्र सांगितले आहेत.

मंत्र - १) सव्याहृति बीजत्रय लावून महामृत्युंजय म्हणतात. ॐ ह्रौं जुं सः ॐ भूर्भुवस्वः असे सुरुवातीला व शेवटी घेऊन त्र्यंबकं यजामहे... हा मंत्र म्हटल्यास मृतालाहि जीवत्व येते असे श्रीस्वामीमहाराजांनी म्हटले आहे (१.३१).

२) द्रां (दत्तात्रेय बीज) हे चिरंजीव करणारे बीजाक्षर आहे. (१.३२).

३) बाळंतपण सुखरूप होण्यासाठी मंत्र -

देवा सप्तवध्रि भिता । नायमाना सोडा आता । गर्भा माता न शिणता प्रसूत हो ।। (८.४५). दत्तमहात्म्यात याबद्दल पुढील श्लोक आहे -

वचोदःशृणुतं दस्त्रौ सप्तवध्रिं च मुञ्चत ।

नायमानमृषिं भीतं दशमास्यं यथासुखम् ।। (द.मा ४०.८४).

याचा अर्थ टीपणीत दिला आहे तो असा. 'हे अश्विनीकुमार हो, हे वचन ऐका, सप्तधातुवेष्टित सोडा, प्रार्थना करणारा दहा महिन्यांचा सुटो.' (तळटीप पान ३२४,षष्ठम आवृत्ती).

४) प्रस्वापिनी मंत्र - दुसऱ्याला झोप आणणारा मंत्र. याचा फक्त उल्लेख आहे. मंत्र दिलेला नाही.

५) भूतबंधन करणारा मंत्र - 'ॐ हुं फट्' एवढाच उल्लेख आहे. या बरोबर प्रस्तुत ग्रंथात कांही व्रतेही दिली आहेत.

व्रते - १) पुत्रप्राप्तीसाठी व्रत (१.५२-५९). यात सप्तमीला सूर्य, रुद्र, सप्तमातृका यांची पूजा व होम, पुत्रवती स्त्रीची पूजा करून तिला अशी प्रार्थना करावी - "ग्रहर्क्षेंद्र दोष वारी । जीवत्पुत्रा हो नारी । कोणी बोलाते न मारी । तारी हरी ।।" या मंत्राने त्या स्त्रीला अभिषेक करावा व त्या ब्राह्मणसवाष्णीला भोजन दक्षिणा द्यावी.

२) मैत्रेयी अनंत व्रत - हे व्रत एक वर्षाचे आहे. ते स्पष्ट रीतीने दिलेले नाही. (१. ५९-६० ओव्या पहाव्यात.)

उपासना करणाऱ्यास ज्ञान घेणेही जरुरीचे आहे. श्रीस्वामीमहाराजांनी प्रस्तुत ग्रंथात ज्ञानही दिले आहे ते असे -

## श्रीदत्तलीलामृताब्धिसारातील तत्त्वज्ञान

प्रस्तुत ग्रंथात मदालसा, श्रीगुरुदत्तात्रेय व महर्षि नारद यांच्या मुखातून ज्ञानविवेचन आले आहे. तसेच सर्गही दिला आहे; यात विश्वोत्पत्तीचे टप्पे दिले आहेत. लहरी पाच ओव्या ८० ते १०० मध्ये मदालसा आपल्या पुत्रांना जन्मतःच स्वस्वरूपाचे ज्ञान कसे देते ते सांगितले आहे. हे जीवाच्या साक्षीत्वाचे, मूळ तत्त्वाचे, अकर्तृत्व - अभोक्तृत्वाचे ज्ञान आहे. लहरी सात ओव्या ६६ ते ७४ मध्ये दत्तात्रेयांनी अलर्काला अभ्यास दिला आहे. तो असा " मिताहारी राहून आत्मचिंतन कर, यम-नियमादि पालन कर, जीव ब्रह्म असून तो अविद्येने मलीन झालेला असतो; जसे सोन्यावरील मल

अग्नीच्या तापाने जातो तसे जीव योगाने विशुद्ध होतो." इत्यादी. लहरी नऊ ओव्या पाच ते पंचवीसमध्ये नारद आयुराजाला ज्ञान देतात. ते म्हणतात, 'हे शरीर, पुत्र, पत्नी सर्व नश्वर आहे. मुख्य अजर-अमर असा आत्मा तू आहेस' इत्यादि. यात ते जीवाचे साक्षीत्व, निर्विकारत्व, अलिप्तता, सर्वानंदात्व, परमात्मत्व इत्यादिचे ज्ञान येते. लहरी तीन ओव्या २ ते १७ मध्ये सर्ग दिला आहे यात माया, पंचभूते, पंचतन्मात्रा, त्रीगुणापासून इंद्रियोत्पत्ती, इन्द्रियाधिष्ठात्री देवता, स्थूल देह, लिंग देह, पंचकोश यांची माहिती देऊन त्यातून मुक्त होता येते असे सांगून अष्टांग योगाचा अभ्यास करण्यास सांगितले आहे.

अशाप्रकारे या लघुग्रंथाची मांडणी करून श्रीस्वामी महाराजांनी दशम लहरीत अलंकार गुंफला आहे. त्यात प्रत्येक ओवीच्या पहिल्या अक्षरांतून "वासुदेवानंद सरस्वती मुखे मालवदेशी हा निजलीलासिंधु गुरू वदले" असे ते सांगतात. प्रत्येक ओवीच्या तिसऱ्या चरणाच्या पहिल्या अक्षरांतून "श्री क्षेत्रामध्ये गोविंद यतिश्वर प्रसादाने अवधूतपदी मन रमले" अशी आपल्या गुरुंप्रती कृतज्ञता व्यक्त केली गेली आहे.

ग्रंथ पठणाची फलश्रुती शेवटी दिली आहे. यातील प्रत्येक ओवीच्या पहिल्या अक्षरांनी "अठराशे एकुणीस शक" ही कालगणना दिली आहे तर तिसऱ्या चरणाची अद्याक्षरे "दुकालदवताप शांतये" असे फल सांगतात.

श्रीस्वामी महाराजांनी यद्यपि ओवी बांधणी सोप्या शब्दांतून केली असली तरी अंतिम पद्यात भाषालाघव दर्शविले आहे. ही लेखनशैली हे त्यांचे वैशिष्ठ्य आहे. त्यांच्या इतर ग्रंथांतूनही ईशावास्योपनिषद्, गीतेचा पंधरावा अध्याय, दत्तमाला मंत्र इत्यादि वाङ्मय ओव्यांच्या आद्य, मध्य व अंतिम अक्षरांतून गुंफलेले आढळते.

श्रीदत्तलीलामृताब्धिसार हा सहस्र ओव्यांचा ग्रंथ दत्तपुराणाचा सारांश म्हणून समजाऊन घेतल्यास दत्तपुराणाचे अवगाहन करावयास सोपे जाईल.

## माघमाहात्म्य

मकरार्क माघमाहात्म्य असे विशेषत्वाने उल्लेखिलेल्या या प्रकरण ग्रंथात यद्यपि तीनशे त्रेचाळीस (३४३) ओव्या असल्या तरी "चोदनालक्षणार्थो धर्मः ।" हे मीमांसेचे वचन मध्यवर्ती घेऊन स्वधर्मकर्मसाधना सांगण्यासाठी हा ग्रंथ गुंफला गेला आहे; असे दिसते. योग, ध्यान, ज्ञानसाधना करणे प्राप्त परिस्थितीमुळे ज्यांना शक्य होत नाही त्यांना सत्कर्म करून आत्मोन्नती साधण्याची प्रेरणा मिळणे आवश्यक असते. प्रत्येकजण आनंदासाठी झटत असतो तथापि शाश्वत आनंद फक्त आत्मज्ञानानेच मिळतो हे जाणणाऱ्या ऋषि-मुनींनी सर्वांना नित्य नैमित्तिक कर्माचरणातून ज्ञानसाधना करण्यासाठी लागणारी चित्तशुद्धी मिळावी म्हणून विशेष कर्माचरण नेमून दिले आहे. त्यासाठी कांही पर्वकाळांची योजना केली आहे. याबाबत श्रीस्वामी महाराज म्हणतात -

*ज्ञाने च मोक्ष होतो खास । परंतु ते न पापियास ।*
*लाभे म्हणोनि पापह्रास । शास्त्र खास करवी असे ॥*
*न होता पापक्षालन । न लाभे ज्ञानसाधन ।*
*साधनाविना न ठसे ज्ञान । म्हणोन योजी शास्त्र हे ॥ (मा. ३३,३४)*

म्हणून शास्त्राने ग्रहणपर्वकाळ, संक्रांतिपर्वकाळ, सिंहस्थपर्वकाल याच बरोबर पहाटे केले जाणारे कार्तिकस्नान व मकर राशीला सूर्य असताना सूर्योदयाच्या वेळी केले जाणारे माघस्नान इत्यादींचा समावेश केला आहे. आत्ताच्या जलदगतीच्या जीवनात असे पवित्र काल गाठणे कठीण आहे तथापि 'इच्छा असेल तर मार्ग दिसेल' हेहि खरे आहे. त्यामुळे माघमाहात्म्यासारख्या ग्रंथांतून जिज्ञासा निर्माण करण्याचे कामही केले गेले आहे व त्याबाबतचे शंकासमाधानही केले गेले आहे.

माघमाहात्म्य हा ग्रंथ श्रीगुरुदत्तात्रेय व कार्तवीर्य अर्जुन यांच्या संवादातून साकार झाला आहे. माघमहिन्याचा विशेष काय आहे ते सांगताना श्रीगुरु कार्तवीर्याला म्हणतात -

*हा माघ अघनाशन । सूर्योदयी करता स्नान ।*
*सर्व पातक परिहारून । अढळ स्थान घेतसे ॥ (३२)*

हे माहात्म्य मनी ठसण्यासाठी त्यातील कथा, उपासना व स्वधर्माचरण मार्गदर्शन तसेच ग्रंथमांडणीविशेष याची थोडक्यात माहिती घेता येईल.

## माघमाहात्म्यातील कथा

या ग्रंथात प्रामुख्याने ऋचीका ब्राह्मणी, हेमकुंडलपुत्र व ब्रह्मराक्षस या तीन कथा आहेत.

१) ऋचीका ब्राह्मणी कथा - ऋचीका नावाची एक बालविधवा कपिला व रेवा संगमात साठ माघस्नाने करते. सदाचरणाने रहाते. सद्बुद्धी ठेवते. कृच्छ्रादि व्रते करते. मृत्युसमयी तिला विष्णूचे ध्यान लागते. विष्णुलोकात जाते. ती तिलोत्तमा अप्सरा होते. सुंदोपसुंदांना मारते, तिच्या महान् कार्यामुळे ती सूर्यलोकात गेली व तेथे ब्रह्मानंदात विहार करते आहे.

२) हेमकुंडलपुत्रकथा - हेमकुंडल या धनिकाचे अविचारी पुत्र श्रीकुंडल व विकुंडल अत्यंत अनाचारी होते. मृत्युनंतर विकुंडल वैकुंठात गेला. दोघेही अनाचारी असताना एकाला वैकुंठप्राप्ती कशी झाली याबाबत यमदूतांनी कांही माहिती दिली आहे. त्यात विकुंडलास माघस्नान कसे घडले याची घटना येते.

३) ब्रह्मराक्षस कथा - कांचनमालिनी या अप्सरेने त्रिवेणीसंगमात माघस्नान केले त्याच्या पुण्याच्या अंशाने एक ब्रह्मराक्षस मुक्त झाला. या कथा माघस्नानाने मिळणाऱ्या पुण्याचे उदाहरण म्हणून दिल्या आहेत. तथापि त्याबरोबर उपासनाही आवश्यक असल्याने श्रीस्वामीमहाराजांनी त्याही निर्देशिल्या आहेत.

## माघमाहात्म्यातील उपासना

या ग्रंथात माघस्नानाबरोबर मंत्रउपासना, पूजा व व्रतेही दिली आहेत.

मंत्रउपासना - या ग्रंथाच्या रचनेतच श्रीस्वामीमहाराजांनी दत्तात्रेयाचा मालामंत्र गुंफला आहे. प्रत्येक ओवीचे पहिले अक्षर सलग वाचत गेले असता हा मंत्र म्हटला जातो. हा मंत्र श्रीदत्तयंत्रातील आहे. या यंत्रातील बाहेरील बत्तीस पाकळ्यांच्या कमळानंतर ज्या दोन वर्तुळाकार मेखला येतात त्यांच्यामध्ये हा मंत्र आहे. याचे तीन भाग आहेत.

१) ॐ नमो भगवते दत्तात्रेयाय, स्मरणमात्र संतुष्टाय, महाभय निवारणाय, महाज्ञानप्रदाय, चिदानंदात्मने, बालोन्मत्त पिशाचवेषाय, महायोगिनेऽवधूतायाऽनसूयानंदवर्धनायात्रिपुत्राय ।। या मंत्रात दत्तात्रेयांची गुणवैशिष्ट्ये आहेत. दत्तयंत्रात यापुढे 'सर्वकर्मफलप्रदाय' असे आहे ते या ग्रंथात नाही.

२) ॐ भवबंधविमोचनाय, आं असाध्यसाधनाय, ऱ्हीं सर्वविभूतिदाय, क्रौं असाध्यकर्षणाय, ऐं वाक्प्रदाय, क्लीं जगत्त्रयवशीकरणाय, सौ सर्वमन-

क्षोभणाय, श्रीं महासंपत्प्रदाय, ग्लौं भूमंडलाधिपत्यप्रदाय, द्रां चिरंजीविने वषट् वशीकुरु वशीकुरु वौषट्, आकर्षय आकर्षय हुम्, विद्वेषय विद्वेषय फट्, उच्चाटय उच्चाटय ठः ठः, स्तंभय स्तंभय खेम् खेम् (खः खः), मारय मारय नमः ॥ या मंत्रात बीजाक्षरे योजिली आहेत. त्यांचे स्वतंत्र माहात्म्य आहे. यात वशीकरण, आकर्षण, द्वेषनिवारण, उच्चाटन याचेही मंत्र आहेत.

३) परमंत्र परयंत्र परतंत्राणि छिंधि छिंधि, ग्रहान्निवारय निवारय. व्याधीन् विनाशय विनाशय, दुःखं हर हर, दारिद्रं विद्रावय विद्रावय, देहं पोषय पोषय, चित्तं तोषय तोषय, सर्वमंत्र स्वरूपाय सर्वयंत्रस्वरूपाय सर्वतंत्रस्वरूपाय सर्व प्लव स्वरूपाय, ॐ नमो महासिद्धाय स्वाहा । या मंत्रात अरिष्टनिवारण, परबाधा निवारण, दुःखनाशन, निरोगता, मानसिक आरोग्य याचे मंत्र असून 'ॐ नमो महासिद्धाय स्वाहा' हा एक महत्त्वाचा मंत्र आहे.

या तीन मालामंत्रांव्यतिरिक्त ४) ॐ नमो नारायणाय (ओवी ७७), ५) 'द्रां' हा दत्तबीजमंत्र (१५५), ६) ग्लौं बीजाक्षराचा लाभ (१४४), ७) हंस जप (२८६), ८) तारक मंत्र (३०३) असे मंत्र मिळून एकूण आठ मंत्र यात गुंफले आहेत.

या मंत्रांचे माहात्म्य येथे देणे विस्तारभयास्तव अवघड आहे. तथापि ॐ नमो भगवते दत्तात्रेयाय, ॐ नमो स्मरणमात्र संतुष्टाय असे स्वतंत्र मंत्रही यातून तयार होतात. जाणकारांकडून अधिक माहिती घ्यावी.

श्रीस्वामीमहाराजांनी काही पूजा दिल्या आहेत.

पूजा - १) अतिथीपूजा -

***नष्टदुष्ट न म्हणावा । यथाशक्ती तोषवावा ।***
***अतिथीप्रसादे ये देवा । दया भावार्थि याची ॥***
***क्षोभविता अतिथीसी । देवपितर तयासी ।***
***शापिती तो कष्टेसी । नरकवासी होतसे ॥ (१३१, १३२).***

२) शाळीग्रामपूजा - ओव्या १४२ ते १५२ मध्ये शाळीग्राम पूजा दिली आहे.

***दास होवूनी विष्णूचे । नाम घेती फुका वाचे ।***
***अर्चन करिती शालग्रामाचे । स्थान त्यांचे वैकुंठी ॥ (१४२)***

असे सांगून शाळीग्राम उपासनेने इष्ट प्राप्ती होते, महाकाळाच्या ग्रासातून सुटका होते. वैष्णवांमध्ये श्रेष्ठत्व मिळते असे फलही दिले आहे. तसेच अभिषेक पूजेच्या तीर्थप्राशनाने पातक संपते हे सांगून कोणता शाळीग्राम चांगला तेहि येथे दिले आहे.

मंत्र, पूजा याबरोबर उपासनेत व्रतांचाही समावेश आहे.

व्रत - ओव्या १५२ ते १५७ मध्ये एकादशी व्रत दिले आहे.

***दान यज्ञ तपाहून । एकादशी व्रत जाण ।***
***उपवासे करी पावन । पाप जाळून मानवा ॥ (१५३)***

असे सांगून एकादशी निराहार किंवा फलाहार करून करावी, रात्री भजन-जागर करावे. द्वादशीला पारणे करावे इत्यादि नमूद केले आहे.

श्रीस्वामीमहाराजांनी या ग्रंथात स्वधर्माचरणही प्राधान्याने सांगितले आहे.

## माघमाहात्म्यातील स्वधर्माचरण मार्गदर्शन

श्रीगुरुदत्तात्रेयांनी कार्तवीर्यास स्वधर्म सांगताना प्रथम भारत देशाचे माहात्म्य सांगितले आहे -

***क्रौंचादि द्विपे असती । तेथे कर्मे न घडती ।***
***जंबुद्विपी पुण्ये होती । आर्यावर्ती विशेष ॥ (१०३)***

उपासकाने हे ध्यानात घेऊन नित्यकर्म करावे. ते विकुंडलाच्या मिषाने खालीलप्रमाणे निर्देशित केले आहे.

प्रातःस्नान करावे. यथाकाल संध्यावंदन करावे. पंचयज्ञ (देव, मनुष्य, ऋषि, पितृ, भूतयज्ञ) करावेत. अकर्म - विकर्माची माहिती घ्यावी. गुरूंचे मार्गदर्शन घ्यावे. पाप करू नये. पापकर्म घडले तर प्रायश्चित्त घ्यावे. हरिस्मरण करावे. इंद्रिय दमन करावे. परान्न घेऊ नये. दररोज स्नान करावे. वेदसेवा करावी, तीर्थयात्रा कराव्यात. अन्नदान करावे. प्रतिग्रह घेऊ नये. अतिथीपूजा, शालग्रामपूजा करावी. एकादशी करावी. सत्य बोलावे, परधन चोरू नये. सज्जनात रहावे. दुर्जनांनी पिडले तर शांति धरावी. दैवलाभाने संतोषावे. सन्मति ठेवावी. धर्माचरणाने भक्ति प्राप्त होते. श्रीस्वामी महाराज म्हणतात -

***भक्ति श्रद्धा ध्यान । याही घडे आत्मज्ञान ।***
***त्यात भक्ति ये घडोन । धर्माचरण करिता ॥***
***यथार्थ होता आचरण । शुद्ध होय अंतःकरण ।***
***मग सहज ची ध्यान । लागे जाण अर्जुना ॥ (२००,२०१)***

माघस्नान हा या धर्माचरणातीलच एक भाग आहे म्हणून श्रीस्वामीमहाराज म्हणतात, 'माघस्नानाला तुच्छ साधन मानू नये' (२०७).

## माघमाहात्म्य या ग्रंथाची मांडणी

१) माघमाहात्म्यात वर दिल्याप्रमाणे प्रत्येक ओळीत दत्तयंत्रातील जे मंत्र गुंफले आहेत त्यामुळे वाचकाच्या हातून सहजरित्या मंत्रपठण होते. तसेच ॐ कारादि बीजमंत्र, ॐ नमो नारायणाय असा बीजाक्षरसहित मंत्रजप नामजप होतो.

२) स्वधर्मकर्माचरणाची प्रेरणा देऊन त्याद्वारे, भक्ति, ज्ञान, ईश्वरभाव प्राप्त करण्यास सर्वजण सक्षम होऊ शकतात याची हमी दिली आहे.

३) भाषा अत्यंत सुलभ असून कथानकांद्वारे विषय समजाऊन दिला आहे व आशय घनता साधली आहे.

४) जाणीवपूर्वक मंत्रांची योजना केली आहे त्यामुळे भाषा प्रभुत्व समजते.

## स्त्री शिक्षा

शास्त्रग्रंथ विविध स्तरांवरील अधिकारी व्यक्तींसाठी कमी-जास्त रहस्य उलगडत असतात. या बाबत पांचरात्र आगमातील महत्त्वाच्या अशा लक्ष्मीतंत्र या ग्रंथात म्हटले आहे की, वैदिक, आगमिक अशा शास्त्रांचे आत्मसिद्धिसाठी अध्ययन करावे, अलोभी राहून, रागद्वेष सोडून द्यावा. कमी-अधिक शास्त्रार्थ सांगणाऱ्या ग्रंथाची कधीही निंदा करू नये. त्या ग्रंथातील आपल्याला जेवढे शक्य आहे तेवढे स्वीकारावे व आचरावे कारण सर्व शास्त्रग्रंथ प्राणिमात्रांच्या हितासाठी मनन-चिंतन करून लिहिलेले असतात, श्लोक असे -

***विष्वशास्त्राण्यधीयीत निगमांश्चैव वैदिकान् ।***
***सर्वाननुचरेत् सम्यक् सिद्धान्तानात्मसिद्धये ॥***
***अलोलुपेन चित्तेन रागद्वेषविवर्जितः ।***

*न निन्देन्मनसा वाचा शास्त्राण्युच्चावचान्यपि ॥*
*तावन्मात्रार्थमादद्यात् यावता ह्यर्थ आत्मनः ।*
*भूतानां श्रेयसे सर्वे सर्वशास्त्राणि तन्वते ॥ ल. तं. २८.२९-३१*

याला अनुसरून सर्व शास्त्रांचे यथावत् अध्ययन केले पाहिजे व त्यातील विचार देश-काल परिस्थितीनुसार उचलून त्यानुसार आचरण, उपासनादि करावयास हवे. असाच एक अध्ययन-अनुसरणास सिद्ध ग्रंथ म्हणजे प. प. वासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी महाराज विरचित "स्त्रीशिक्षा" हा लघुग्रंथ होय. हा ग्रंथ पतिविरह झालेली एक स्त्री व तिचे गुरु यांच्या संवादातून साकार झाला आहे. यातील स्त्रीधर्म, वेदांत हा भाग गद्यमय आहे आणि स्त्रीला सहज गाता येईल व ज्ञानही घेता येईल असा भाग पद्यमय आहे. यद्यपि यातील स्त्रीधर्म हा त्या काळाला अनुसरून आहे तथापि त्यातील स्त्रीचा जो विशेषाधिकार नोंदवला आहे तो आजही ग्रहण करता येईल; एवढेच नव्हे तर आपण त्याचा प्रचारही केला पाहिजे. अशा आशयाचा आहे. श्रीस्वामी महाराजांनी स्त्रीला वेदांत श्रवणाचा व चिंतनाचाही अधिकार दिला आहे. तो देताना ईश्वरानुग्रह होण्यासाठी सोऽहम् भावाने त्याची पूजा कशी करायची तेही शिकविले आहे. याचा परिचय करून घेण्यासाठी स्त्रीशिक्षा ग्रंथातील वेदांत विचार, आचरण शुद्धता, सोहम् भावाने पूजा व ग्रंथ मांडणी यांचा थोडक्यात परामर्श घेऊ.

## स्त्रीशिक्षेतील वेदांत विचार

श्रीस्वामीमहाराज विरचित दत्तपुराण, दत्तमाहात्म्य आदि ग्रंथांतून त्यांची वेदांत शिकवण सविस्तरपणे आलेली आहे. तथापि प्रस्तुत ग्रंथात श्रीस्वामी महाराजांनी एखाद्या सामान्य गृहिणीलाही सहज कळेल अशा सोप्या रीतिने वेदांत स्पष्ट केला आहे. तो थोडक्यात पुढीलप्रमाणे :

श्रीगुरु शिष्येला म्हणतात की, "मी म्हणताना तू डोळ्यांवर किंवा मस्तकादिकावर हात न ठेवता आत्मप्राप्तिस्थानावरच म्हणजे हृदयावर हात ठेवलास. याचा अर्थ तुला 'सर्व भूतांच्या हृदयात ईश्वर रहातो' हे माहीत आहे. पण याची तुला प्रतीती नाही, तशी असती तर तुला शोक-मोह झाले नसते. तू देहाला 'मी' म्हटल्याने या सर्व गोष्टी होतात. म्हणून नाम-रूप-कुल-गोत्र-वर्णाश्रम-जातिसंबंधरहित निर्विकार आत्म्याला जाणून घे. देह जड आहे. त्यास जन्ममरणादि सहा विकार आहेत. देह आपल्याला दिसतो म्हणून आपल्याहून तो निराळा आहे. जीवाने देह सोडला म्हणजे देहास मरण येते. जीव मरत नाही. तो अजरामर आहे. जीवाला लिंग नाही. एकोणीस अवयवांचा लिंग देह व त्या लिंगदेहामध्ये पडलेली चैतन्याची छाया मिळून 'जीव' म्हटला जातो." श्री स्वामी महाराजांनी आपल्या शिष्येला सांगितले की व्रतदानादिक केले तर चित्तशुद्धी होऊन ईश्वर प्रसादाने स्त्रीलाही मोक्ष मिळेल. श्रीगुरुंची शिष्या तयारीची होती. तिने श्रीगुरूंना पुढे प्रश्न विचारला की, 'प्राण देह सोडतो मग देह अचेतन होतो, तर प्राणालाच आत्मा का म्हणू नये ?' यावर श्रीगुरूंनी तिला दश प्राणांचे कार्य सविस्तरपणे सांगितले. दशप्राणांना बल देणारा आत्माच आहे हे पटवून दिले. अन्नमय कोश व प्राणमय कोश कसे असतात ते सांगितले. त्यानंतर शिष्येने अनुक्रमे मन व बुद्धिविषयी प्रश्न विचारले असता श्रीगुरूंनी मनोमय कोश, विज्ञानमय कोश यांची संपूर्ण माहिती देऊन जीवाचे साक्षीत्व समजाऊन दिले. ते म्हणाले की, "सर्व विकल्प दूर करून स्वसंवेद्य आत्मस्वरूपास आपणच ओळखावे." (प्रकरण ३ रे)

तसेच ते पुढे सांगतात की, नामरूप सोडून विवेकाने सच्चिदानंद दृष्टी ठेवावी. यासाठी चित्ताची एकाग्रता हवी. ती होण्यासाठी आचरणाचे नियम पाळावेत. ईश्वरानुग्रह होण्यासाठी ईश्वराची सोहम् भावाने पूजा करावी. असे म्हणून श्री स्वामी महाराज शिष्येला प्रथम ईश्वरानुग्रह होण्यासाठी आचरण शुद्धता सांगतात.

## स्त्रीशिक्षेतील आचरण शुद्धता

श्रीस्वामी महाराज आदर्श आचरण सांगताना म्हणतात की, 'देह हे देऊळ आहे, त्यामध्ये राहणारा जीव हा सदाशिव आहे; असा निश्चय करून जे अहिंसारूप पुष्प त्याला आवडते ते द्यावे. त्याची निरंतर सोहम् भावाने पूजा करावी.' श्रीस्वामी महाराज 'हिंसा' या शब्दाचा अर्थ देतात. हिंसा म्हणजे प्राणच घेणे असा अर्थ नव्हे, तर काया-वाचा-मनाने दुसऱ्यास पीडा न देणे हा अर्थ समजावा. निरर्थक कोणाचे मनसुद्धा दुखवू नये. ईश्वरार्पण कर्म, सरळ वागणूक, स्वच्छ बुद्धि, असत्य न बोलणे, शांती धरणे, इंद्रिय दमन, गोड बोली, शुभ कर्म, धीर धरणे, प्रसंगी न हळहळणे, सज्जन संगती, यथालाभ संतुष्टी, श्रवण साधना याचा अवलंब करावा. या सदाचरणाने ईश्वरानुग्रह खात्रीने होईल असे त्यांनी आश्वासन दिले आहे. (प्रकरण ३).

स्त्रीच्या खास आचरणाबाबत श्रीस्वामीमहाराज धर्मशास्त्रानुसार जे आचरण श्रीगुरुचरित्र व काशीखंड यात सांगितलेले आहे ते प्रमाण मानतात. प्रस्तुत ग्रंथातील विधवा स्त्रीचे जे आचरण सांगितले आहे ते कालमानानुसार मागे पडले आहे. आजच्या स्त्रीचे व्यक्तिगत व सामाजिक जीवनातील जे स्थान आहे ते त्याकाळी नसल्याने स्त्रीचा त्या दृष्टीने विकसित पैलु घेतला गेलेला नाही. या प्रकारच्या गोष्टी स्थल-काल संदर्भानुसार बदलत्या असतात. शाश्वत मूल्ये मात्र तीच राहतात. श्रीस्वामीमहाराजांनी जे आदर्श आचरण, आचार शुद्धतेसाठी नेमून दिले आहे त्यास शाश्वतता आहे. आजच्या अनीतिवर्धक काळात तर अशा आचार शुद्धतेची जास्त गरज आहे. कुटुंबातील स्त्री जर तत्त्व-मूल्यहीन जीवन जगत असेल तर मुलांना घडवणे कसे शक्य आहे ? श्रीस्वामीमहाराज आणखी पुढे जाऊन स्त्रीच्या आचार पद्धतीत सोहम् भावाने ईश्वरपूजा समाविष्ट करतात. या आचार नियमाबाबत त्यांच्या शिष्येने उत्सुकता दाखविली, याचे श्रीगुरु स्वागत करतात.

## स्त्रीशिक्षेतील सोहम् भावाने ईश्वरपूजा

श्रीस्वामी महाराजांनी सोहम् या शब्दाचे शास्त्रीय पृथःक्करण केले आहे. 'सोहम्' यात दोन पदे आहेत : १) सः २) अहम् या प्रत्येक पदाला वाच्यार्थ व लक्ष्यार्थ आहेत.

सः पदाचा वाच्यार्थ - मायेचे अधिष्ठान, माया प्रतिबिंबित ईश्वर व सर्व अवस्था, सर्व कोशांच्या पलीकडील, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभाव असलेला परमात्मा हा 'सः (तो)' आहे. या पदाचा वाच्यार्थ असा सः म्हणजे 'तो' तीन देहांपेक्षा वेगळा आहे. याचे तीन देह म्हणजे १) पाय व कंबर या भागात सप्त पाताळ, नाभि ते मस्तक या भागात भूः इत्यादि लोक आहेत. असे हे विराट शरीर आहे. त्यात नक्षत्र हे दात आहेत. माया हे हास्य आहे. रात्र-दिवस म्हणजे निमिषोन्मेष आहेत. सृष्टि हा कटाक्ष आहे. समुद्र हा कुक्षी आहे. नद्या या नाड्या आहेत. वृक्ष हे केश आहेत. वृष्टि हे रेत आहे. पर्वत हे अस्थि आहेत. हे त्याचे स्थूल शरीर आहे. २)

दिशा म्हणजे कान, सूर्य हा नेत्र, वरूण ही जिव्हा, अश्विनीकुमार हे नासिका, अग्नि हा वाणी, इंद्र हा हात, प्रजापति हा लिंग, मृत्यु हा गुरु, चंद्र हा मन, बृहस्पति हा बुद्धि, विष्णु हा चित्त, रुद्र हा अहंकार असा हिरण्यगर्भ हे त्याचे लिंग शरीर आहे. ३) अ - व्याकृत हा त्याचा कारणदेह आहे. या तीन देहांनी वेष्टित ते ब्रह्मचैतन्य हा सः पदाचा वाच्यार्थ आहे.

सः पदाचा लक्ष्यार्थ - देहेन्द्रियप्राणमनोबुद्धि - अहंकाराहून वेगळा, वैश्व, तैजस्, प्राज्ञ याहून वेगळा. जाग्रतादि अवस्थांचा साक्षी, पंचकोशाहून निराळा, वैश्वानर, हिरण्यगर्भ, ईश्वर याहून वेगळा, कूटस्थ, सूत्रात्मा, ज्याचे सृष्टि-स्थिती-प्रलय हे व्यापार आहेत तो ''सः'' आहे. अहं पदाचा वाच्यार्थ - तीन देह वेष्टित चैतन्य, अविद्याप्रतिबिंबित जीव, अविद्येचे अधिष्ठान चैतन्य हा अहम् पदाचा वाच्यार्थ आहे. यातील तीन देह म्हणजे - १) पंचभौतिक स्थूल देह २) पाच ज्ञानेन्द्रिये, पाच कर्मेन्द्रिये, पाच प्राण, मन व बुद्धि मिळून तयार झालेला लिंग देह ३) अज्ञान कारण देह हे होत. या तीन देहांनी वेष्टिलेले चैतन्य जीवभावाने समजणे म्हणजे 'अहम्' होय.

अहम् पदाचा लक्ष्यार्थ - साक्षी - कूट - प्रत्यगात्मा म्हणजे अहम् होय. हा या पदाचा लक्ष्यार्थ आहे.

श्रीगुरु शिष्येला सांगतात की सोहम् चे अशा प्रकारे चिंतन करावे. चिंतन तेलाच्या धारेप्रमाणे अखंड असावे हेच निदिध्यासन होय. वेदांत श्रवण करावा. जीवाच्या किंचित् 'ज्ञ' पणाला शिवस्वरूपाने सर्व 'ज्ञ' पणा आला की परस्परांचे एकत्व होते; असे अनुसंधान श्रवणानुसार करणे ते मनन होय. असे श्रवण-मनन-निदिध्यासन करून असंभावना, विपरीत भावना संपून निर्विकल्पना येते, कृतकृत्यता येते, पुनर्जन्म होत नाही, जीवन्मुक्ती मिळते. अशा महात्म्यांना प्रारब्ध संपेपर्यंत देह असतो पण त्यांचे देहांतासमयी प्राणोत्क्रमण होत नाही तर ते ब्रह्मस्वरूपात लीन होतात.

श्रीगुरूंचा असा उपदेश ऐकून त्यांची शिष्या तल्लीन झालेली आहे. तिने श्रवण-मनन-निदिध्यासन करून स्वानुभूती घेतली आहे; असे हा ग्रंथ पुढे सांगतो. या स्त्रीने आपली एकत्वानुभूती प्रकट करणारे पद गाईले आहे. या पदानंतर स्त्रीशिक्षेचे तिसरे प्रकरण संपते. यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी विविध पदे लिहिली आहेत.

या पदांमधून (१) 'स्व' ची ओळख नीट करून घे; (२) वृंदा, अहिल्या, सीता, ब्राह्मी यांचे काय झाले याचा नीट विचार कर, पतीशी एकनिष्ठ राहा. (३) त्रिगुणात्मक गाठ सोड, उन्मनी झोप घे, त्याने हरीला प्रिय होशील; (४) साधुगुरुची कन्या होऊन मायावरणाची लुगडी सोड, त्रिगुणाची वेणी सोड, पापपुण्य सोडून तुरीयेत उडी घे; हृदयग्रंथी तोड म्हणजे सगळा संशय फिटेल व हा धर्म जपला तर कर्मे संपतील; (५) शृंगार व्यर्थ आहे. रूप लावण्य असार आहे. कामक्रोध खोटे आहेत. इन्द्रिय-मन-बुद्धि हे तीन किल्ले स्वाधीन कर. काम हा शत्रू आहे तो मृत्युकडे नेईल, हे जाणून भक्तीने बलिष्ठ हो; (६) विवेकलोचन उघड, मायाशयन सोड, गुरु प्रसादाचा अरुणोदय झाला आहे, साधन-वस्त्रे नेस, भेदाचे कांडप कर, जन्ममूळ दळण दळ, मनवासरे सुटली आहेत, इंद्रियगायी निर्गुणवनात सोड, विज्ञानसूर्य उगवला आहे. देहबुद्धीचे धुके विरले आहे. वैराग्यकिरण पडले आहेत, विषय चंद्रकमळ सुकले आहे. त्यात आशातृष्णादि भुंगे मेले आहेत, भ्रांति सोड, सावध हो, वासना शेजारणीच्या घरी जाऊ नकोस. तत्त्वज्ञान गृहकृत्य करावे, मन संपून दत्तमय व्हावे; (७) तुला स्वतःलाच सोवळेपणा आहे. हरिचरणी आवड धरली की सोवळे होते. एरवीचे जे सोवळे असते ते कोणीतरी शिवले की ओवळे होते, पण चित्सुख, ज्ञानप्राप्ती, हरिभक्ति याने जे सोवळे झाले आहेत ते कधीच ओवळे होत नाहीत. अशी सोवळी हो, दत्ताला प्रिय होशील; हा सदुपदेश केला गेला आहे. या सर्व पदांमधून श्रीस्वामीमहाराजांनी स्त्रीच्या दैनंदिनीविषयी रूपक केले आहे. पुढील (८) सौभाग्य सुंदरी पद व प्रार्थना श्लोकात अरुंधतीने भृगुपत्नी ख्यातीला सौभाग्य सुंदरीची उपासना सांगितली आहे अशी माहिती दिली आहे. तर (९) सासुरवास पदात चिंतोबा हे सासरे, प्रवृत्ती ही सासू, तृष्णा ही नणंद, काम-क्रोध-लोभ हे दीर, यांच्या सासुरवासाने जीव त्रासला आहे म्हणून आता गोविंदाचा - परपुरुषाचा संग करून निःसंग हो; असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी प्रत्येक जीवालाच कसा सासुरवास असतो ते स्पष्ट केले आहे.

यानंतर श्रीदत्ताची प्रार्थना करणारी सात पदे आहेत. ही त्या काळातील स्त्रियांना दळण-कांडण करता करता सहज म्हणता येण्यासारखी आहेत. त्यात रूपकादि अलंकार वापरून दत्तभक्ति करण्याकडे स्त्रीचे मन वळवले आहे. सोप्या सोप्या पदातूनही ईशपूजा करून अ-मन होण्याचे तंत्र दिले आहे.

## स्त्रीशिक्षा या ग्रंथाची मांडणी

या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणजे यात स्त्रीला वेदोपनिषदे न अभ्यासता सुद्धा श्रवण-मनन-निदिध्यासन करणे कसे शक्य आहे ते दिले आहे. स्त्रीला जीवन्मुक्तीचा मार्ग संसारातच अनुसरता येतो व दत्तप्रिय होता येते हे येथे विशेषत्वाने सांगितले आहे. हे मार्गदर्शन शाश्वत स्वरूपाचे आहे. स्थल-काल-परिस्थिती निरपेक्ष आहे. श्रीस्वामी महाराजांनी हे ज्ञान गुरु-शिष्या यांच्या संवादातून सुलभपणे उलगडत नेले आहे. अधून-मधून संस्कृत श्लोक, पदे व फटका यांचा समावेश केला आहे. स्त्रीची दैनंदिन कामे लक्षात घेऊन त्यातून वेदांताचे मनन करावयास मार्गदर्शन केले आहे, त्यानुसार पदे रचली आहेत. वरील तीनही ग्रंथ लघुग्रंथ असले तरी आशयगर्भ आहेत. त्यांचा हा अल्प विमर्श आहे. या ग्रंथांचे वाचन होणे व त्यानुसार आचरण करणे हा सद्यस्थितीत आवश्यक भाग आहे. संसार करता करता धर्म-अर्थ-काम-मोक्ष हे चारी पुरुषार्थ संपन्न होऊ शकतात हे श्रीस्वामी महाराजांनी सहजपणे शिकविले आहे. त्यांचा अवलंब करणे हे आपल्या हातात आहे. तसा अवलंब करण्याची प्रेरणा श्रीगुरुकृपेने व्हावी ही श्रीगुरुचरणी प्रार्थना !

**डॉ. सौ. रजनी पत्की**
१२, मधुबन, बी, ३८/२, कर्वेनगर, पुणे ४११०५२.
फोन : ०२०-२५४६०८१५

**सर्व पापांचे प्रायश्चित्त । चित्तगेही ध्यावा दत्त**
**वाचे वदता दत्त दत्त । दत्त करी गुणातीत**







# त्रिशतीकाव्य : श्रीगुरुचरित्रातील बोधाचे दर्पणातील 'दर्शन'

**प्रा. डॉ. मनोहर कृष्णाजी कुबडे**

*एम. ए. पीएच.डी. मॅथेमॅटिक्स - प्राध्यापक दयानंद कॉलेज, सोलापूर.*

## 'म्हणौनि सकलावडिल देव'

'जगी ज्यास कोणी नाही त्यास देव आहे' याची प्रचिती माझ्या वडिलांच्या जीवनावरून येते. माझ्या वडिलांचे (गुरुभक्तकेसरी कै. कृष्णाजी गोविंद तथा बापूसाहेब कुबडे) वयाच्या तिसऱ्या वर्षी पितृछत्र हरपले. धन नाही, आप्तेष्टांचे सहाय्य नाही अशा परिस्थितीत त्यांच्या आईने (गं. भा. मनुबाई) बार्शीत घर केले. माऊली मोठी करारी व धीराची होती. तिला गुळवणी महाराजांच्या मातोश्री उमाबाई यांचा मोठा आधार होता. दोघींचा फार स्नेह होता. परिसाच्या संगतीने जसे लोखंडाचे सोने होते तसे श्रीगुळवणी महाराजांच्या संगतीने बापूंच्या जीवनाचे सोने झाले. महाराज बार्शीला ज्या शाळेत शिक्षक होते त्याच शाळेत बापू दाखल झाले. त्यांनी बालवयातच गुरुंचे बोट धरले ते पुढे घट्ट झाले व महाराजच पुढे बापूंचे मोक्षदाते गुरु झाले. किशोरवयापासूनच गुरुंच्या सहवासात आल्याने अध्यात्माचे, भक्तीचे, योगाचे व शिस्तीचे बाळकडू मिळाले. महाराजांच्या मार्गदर्शनाखाली योगाभ्यास झाला. बापूंचा विवाहही महाराजांनीच ठरविला. महाराज म्हणजे आमच्या घरातील वडीलधारेच. त्यांच्या शब्दाबाहेर कधीही जाणे नाही. हीच गुरुभक्ती, गुरुनिष्ठा बापूंच्या मनात कायमची रुजली. प. प. श्रीलोकनाथ तीर्थ स्वामी महाराजांचे आज्ञेवरून महाराजांनी बापूंना दीक्षा दिली. बापूंचे समग्र जीवन कृतार्थ झाले. बापूंच्या षष्ठ्यब्दिपूर्तिला संकेश्वर करवीर मठाचे शंकराचार्य श्री जेरे स्वामी महाराज यांनी बापूंना श्रीगुळवणी महाराजांचे उपस्थितीत 'गुरुभक्तकेसरी' ही पदवी देऊन आशिर्वाद दिले. महाराज नंतर पुण्याला गेल्यानंतर बऱ्याच वेळा सुट्टीत सोलापूरला आमचेकडे येत असत. दत्तजयंती व गुरुपौर्णिमा हे उत्सव पूर्वी महाराजांचे उपस्थितीत सोलापूरलाच होत असत. सन १९५२ च्या गुरुपौर्णिमेच्या दिवशी आमचेकडे महाराजांचा मुक्काम असताना माझा जन्म झाला. जन्मापासूनच मला महाराजांची कृपादृष्टी लाभली. पुढे विद्यार्थीदशेत दीक्षाही मिळाली. पुढे ब्रह्मश्री प. पू. दत्तमहाराजांनीही आम्हाला त्यांच्या कृपाछत्राखाली घेतले. आम्हा दोघांनाही गुरुमंत्र दिला व पत्नी सौ. प्रज्ञास शक्तिपात दीक्षाही दिली. हा आमचेवरील गुरुकृपेचा ओघ योगिराज प. पू. नारायण काकांनीही कायम ठेवला आहे. त्यांचे आगमन झाले की घर पवित्र होते. मनातील विकल्प झडून जातात, कृतज्ञतेच्या व कृतार्थतेच्या भावनेने कृतकृत्य वाटते. या गुरुत्रयीच्या रूपाने आम्हाला 'महापुरुषसंश्रय' च प्राप्त झाला आहे.

## 'दत्तावतारी' टेंबे स्वामीमहाराज

परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबे स्वामीमहाराज यांचे जीवन व विभूतिमत्त्व हे योग, भक्ती व ज्ञान यांचे जणू काही त्रिवेणी संगमस्थानच होते, हे त्यांच्या चरित्रावरून व त्यांनी निर्मिलेल्या वाङ्मय संपदेवरून दिसून येते. स्वामीमहाराजांच्या वाङ्मयसंपदेची तुलना फक्त भगवत्पूज्यपाद जगद्गुरु श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी निर्माण केलेल्या वाङ्मयाशीच होऊ शकते. आचार्यांची भाषा जेवढी प्रसन्न व गंभीर आहे तेवढीच स्वामीमहाराजांची भाषाही प्रसन्न व गंभीर आहे. आचार्यकृत स्तोत्रांमधून जसा भक्तिरस ओथंबून वहात असतो तसाच भक्तिरसाचा प्रवाह स्वामीमहाराजांची स्तोत्रे वाचताना भरभरून वहात असताना दिसतो. 'शंकरः शंकरः साक्षात्' यात वर्णिल्याप्रमाणे जसे आचार्य हे प्रत्यक्ष शंकरच आहेत तसेच स्वामीमहाराज हे चतुर्थ दत्तावतारच आहेत. हे स्वामीमहाराजांचे अवतारित्व व अलौकिकत्व प. पू. श्रीवक्रतुण्ड महाराज कवीश्वर यांनी प्रत्यक्ष श्रीस्वामीमहाराजांचे समोर केलेल्या एका प्रवचनात शास्त्रप्रमाणाने सिद्ध केले आहे. विशेष म्हणजे श्रीस्वामीमहाराजांनीही त्याचा प्रतिवाद केला नाही. ही हकीकत ब्रह्मश्री प. पू. श्रीदत्तमहाराज कवीश्वर यांनी लिहिलेल्या स्वामीमहाराजांच्या 'श्रीगुरुदेवचरित्र' या चरित्रग्रंथात नमूद केली आहे. स्वामीमहाराजांचे ठिकाणी असलेल्या अलौकिक विभूतिमत्त्वाची प्रचीती स्वामीमहाराजांच्या वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्याला आल्याशिवाय राहणार नाही. स्वामीमहाराजांचा जन्म रविवार श्रावण वद्य ५ शके १७७६ रोजी सावंतवाडी संस्थानातील माणगाव येथे 'अत्रि' गोत्र असलेल्या टेंबे कुळात झाला. आज सन २००३-२००४ अर्थात शके १९२५-१९२६ हे वर्ष स्वामीमहाराजांचे सार्ध जन्मशताब्दि वर्ष असल्याने, त्यांनी निर्मिलेल्या वाङ्मयातील काही अंशाचे चिंतन करण्याची संधी या 'कल्याणी' विशेषांकाने दिली व ही अत्यल्प अशी लेखनसेवा श्रीस्वामीमहाराजांनीच प्रेरणा देऊन पूर्ण करून घेतली हे माझ्यासारख्या अनधिकारी व्यक्तीचे भाग्यच होय.

## ग्रंथप्रकाशकांचे ऋण

गेल्या काही शतकांमध्ये ज्या काही संतपुरुषांनी अध्यात्मिक ग्रंथाची निर्मिती केली आहे. त्या सर्व संतमंडळींमध्ये श्रीस्वामीमहाराजांचे स्थान अगदी अग्रगण्य असेच आहे. श्रीस्वामीमहाराजांचे उपलब्ध झालेले सर्व वाङ्मय श्रीस्वामीमहाराजांचे परमशिष्य सहजयोगी सद्गुरु प. पू. श्रीवामनरावजी गुळवणी महाराज यांनी स्वामीमहाराजांच्या जन्मशताब्दि वर्षी १९५४ साली प्रकाशित केले. हे समग्र वाङ्मय जवळ जवळ साडेसहा हजार पृष्ठांचे आहे. या वाङ्मयाच्या संपादनाची संपूर्ण जबाबदारी राष्ट्रीय पंडित, विद्यावाचस्पति ब्रह्मश्री प. पू. श्रीदत्तमहाराज कवीश्वर यांनी अहोरात्र अविश्रांत परिश्रम घेऊन अत्यंत समर्थपणे पार पाडली. जणू काही या गुरु-शिष्य जोडीचे हे जीवनकार्यच होते. यातील बरेचसे वाङ्मय हे

संस्कृत भाषेत असल्यामुळे व या वाङ्मयात सर्वही शास्त्रांमधील सिद्धान्तांचे ग्रथन असल्यामुळे केवल श्रीदत्तमहाराजांमुळेच हे वाङ्मय आज आपणांस ग्रंथ रूपाने उपलब्ध आहे. नाहीतर या वाङ्मयाचे प्रकाशन तसे अशक्यप्रायच होते. हे समग्र वाङ्मय ही स्वामीमहाराजांची वाङ्मयी तनुच आहे. या वाङ्मयातून साधकांना, भक्तांना ते मार्गदर्शन देत आले आहेत व असेच अनंतकाळापर्यंत देत राहणार आहेत. हे सर्व प्रकाशनकार्य केवळ श्रीगुळवणीमहाराज व श्रीदत्तमहाराज या गुरुद्वयीच्या अंतःकरणात आपणासारख्या आर्त, अर्थार्थी व जिज्ञासू जनांबद्दल असलेल्या अपार करुणेमुळेच शक्य झाले आहे.

## पारायणरूपाने 'दत्तसेवा'

आज मराठी माणसांच्या घराघरातून 'श्रीगुरुचरित्र' या ग्रंथाला जे वैशिष्ट्यपूर्ण स्थान प्राप्त झाले आहे ते स्थान इतर कोणत्याही ग्रंथाला प्राप्त झालेले नाही. थोडे निरीक्षण केले तर असे लक्षात येईल की ज्या ज्या घरात 'श्रीगुरुचरित्र' हा ग्रंथ आहे त्या त्या घरात या ग्रंथाचे स्थान अगदी देवघरातच आहे. श्रीज्ञानेश्वरांची भावार्थदीपिका, समर्थांचा दासबोध, नाथांचे भागवत, श्रीतुकारामांची अभंगगाथा, व्यासांचे श्रीमद्‌भागवत हे ग्रंथ एक वेळ दिवाणखान्यात दिसतील पण श्रीगुरुचरित्र मात्र दिवाणखान्यात कधी दिसणार नाही. ते देवघरातच दिसेल इतकी या ग्रंथाबद्दलची आस्था समस्त मराठी जनांच्या मनात आहे. जसे श्रीमद्‌भागवत भगवान श्रीकृष्णांचा निवास आहे तसेच श्रीगुरुचरित्र या ग्रंथात श्रीदत्तात्रेयांचा निवास आहे. श्रीदत्तात्रेयांचे जे तीन अवतार आहेत - श्रीदत्तात्रेय, श्रीपादश्रीवल्लभ, श्रीनृसिंहसरस्वती - त्या तीन अवतारांची चरित्रे या श्रीगुरुचरित्र ग्रंथात वर्णिलेली आहेत. या तीन अवतारांच्या चरित्राच्या अनुषंगाने अनेक महत्त्वाच्या विषयांचा विचारही या ग्रंथात मांडलेला आहे. श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ मंत्ररूप असून तो पारायणाचा विषय आहे. यामुळे अनेक दत्तभक्त या ग्रंथाचे पारायण करीत आलेले आहेत व यापुढेही करीत राहणार आहेत. 'काम्ये मतिस्त्यज्यताम्' असे जरी आचार्यांनी सांगितले असले तरी संसारात येणाऱ्या अडीअडचणींमुळे, संकटांमुळे अनेकांना सकाम कर्मे ही करावी लागतात. संकटे नसली तरी अधिक उत्कर्षाची अपेक्षा असतेच. या श्रीगुरुचरित्र ग्रंथाचे असे सकाम पारायण करणाऱ्यांच्या मनोकामनाही पूर्ण झाल्या आहेत. याचे दाखले घरोघर मिळतील. निष्काम पारायण करणाऱ्यांचीही चित्तशुद्धी होऊन ते अध्यात्मिक दृष्टीने वरच्या भूमिकेवर गेले आहेत. अशीही उदाहरणे काही कमी नाहीत. पारायण करणे हीसुद्धा सेवा समजली जाते. परंतु श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ केवळ पारायणाचा विषय नसून तो अभ्यासाचाही विषय आहे ही जाणीव केवळ श्रीस्वामीमहाराजांच्यामुळे निर्माण झाली हे कोणालाही नाकारता येणार नाही.

## संहितेयं द्विसाहस्त्री

श्रीस्वामीमहाराजांच्या वाङ्मयाचे सर्वात मोठे व ठळक असे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी 'श्रीगुरुचरित्र' या ग्रंथाच्या संदर्भात केलेली वाङ्मयनिर्मिती. श्रीगुरुचरित्राबद्दल एवढे साक्षेपी, विवेचनात्मक व रहस्योद्धारनात्मक लिखाण श्रीस्वामी महाराजांशिवाय दुसऱ्या कोणीही केलेले नाही. श्रीस्वामीमहाराजांचा श्रीगुरुचरित्रावरील पहिला ग्रंथ म्हणजे 'द्विसाहस्त्री संहिता' स्वामीमहाराजांनी गृहस्थाश्रमात असताना श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेवरून माणगांव मुक्कामी या ग्रंथाची निर्मिती केली. गुरुचरित्रातीलच सर्व कथाभाग या ग्रंथात आलेला आहे. यात २३ अध्याय असून श्लोकसंख्या २००० आहे. श्लोकसंख्या दोन हजार असल्यामुळे व श्रीदत्तप्रभूंना हा ग्रंथ अत्यंत प्रिय असा झाल्यामुळे श्रीदत्तप्रभूंनीच याचे नामकरण 'द्विसाहस्त्री संहिता' असे केले आहे. याच ग्रंथात शेवटी 'योगरहस्य' व 'बोधरहस्य' ही दोन प्रकरणे समाविष्ट केली आहेत. योगरहस्याचे संपूर्ण विवरण श्री गुळवणी महाराजांनी व बोधरहस्याचे संपूर्ण विवरण पं. आत्माराम शास्त्री जेरे यांनी आपल्या अधिकारवाणीने 'योग-भक्ति-दर्शन' या ग्रंथात केले आहे. 'द्विसाहस्त्री संहिता' हा ग्रंथ तयार झाल्यावर सुमारे १५ वर्षांनी स्वामीमहाराजांनीच यावरील संस्कृत टीका श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने संन्यासाश्रमात असताना प्रभासपट्टण व द्वारका येथे लिहिली. आश्चर्य म्हणजे मूळ ग्रंथ जवळ नसताना जसे आठवेल तसे लिहून ही टीका पूर्ण झाली. तसेच या ग्रंथाला चूर्णिकाही लिहिली आहे. या ग्रंथावरील टीकेत व चूर्णिकेत अनेक महत्त्वाच्या विषयांचे सांगोपांग विवरण असून अनेक विषयांचा विचारपूर्वक निर्णय स्वामीमहाराजांच्या अधिकारवाणीतून झाला आहे. स्वामीमहाराजांच्या सर्वच वाङ्मयाची निर्मिती श्रीदत्तप्रभुंच्या आज्ञेने झाली असल्यामुळे, ते सर्व वाङ्मय मंत्ररूप आहे व पारायणास योग्य असेच आहे. जसे मूळ मराठी गुरुचरित्राची पारायणे संप्रदायात सर्वत्र होत असतात तशीच याही ग्रंथाची पारायणे स्वामीमहाराजांच्या संप्रदायात सर्वत्र होत आहेत. अनेक प्रसंगी या ग्रंथाचा स्वाहाकारही होत असतो. श्रीगुरुचरित्राचा अभ्यास करू इच्छिणाऱ्यांनी या ग्रंथाचा अवश्य अभ्यास करावा. या ग्रंथाच्या अभ्यासाशिवाय गुरुचरित्रातील अनेक कथांचे रहस्य उलगडणार नाही, श्रीगुरुतत्त्वाचे स्वरूपही समजणार नाही. हा ग्रंथ म्हणजे स्वामीमहाराजांच्या स्वतंत्र व आर्ष प्रतिभेचा एक अत्यंत श्रेष्ठ असा आविष्कारच मानावा लागेल. ही द्विसाहस्त्री संहिता श्रीगुळवणी महाराजांच्या नित्य वाचनात असे.

## 'समश्लोकी' गुरुचरित्र

समश्लोकी गुरुचरित्र ही स्वामीमहाराजांची दुसरी मोठी रचना. शके १८२४ मध्ये ब्रह्मावर्त येथे स्वामीमहाराजांचा चातुर्मासानिमित्त मुक्काम असताना श्रीदत्तप्रभुंनी समश्लोकी गुरुचरित्र लिहिण्याची स्वामीमहाराजांना आज्ञा केली. रोज २०० ते २५० श्लोकांची रचना केल्यास पावणेसात हजार श्लोकांचा ग्रंथ पूर्ण होण्यास सव्वा महिना लागेल असे सांगितले. त्याप्रमाणे हा ग्रंथ रचून पूर्ण झाला. मराठी गुरुचरित्रातील प्रत्येक ओवीला एक श्लोक याप्रमाणे हा ग्रंथ तयार झाला आहे. मराठी गुरुचरित्राचा शब्दशः जसाच्या तसा अनुवाद असे याचे स्वरूप आहे. या ग्रंथातील संस्कृत भाषा स्वामीमहाराजांच्या इतर ग्रंथातील संस्कृत भाषेच्या तुलनेत बरीच सोपी अशी आहे. मूळ गुरुचरित्र मराठी भाषेत असल्यामुळे त्याचा फायदा फक्त मराठी भाषिक लोकांनाच होत असे. परंतु भारतवर्षातील मराठी भाषिक नसलेल्या लोकांनाही याचा लाभ व्हावा या उद्देशाने या ग्रंथाची रचना झाली आहे. ज्या काळात संस्कृत ग्रंथांचे भाषांतर मराठी भाषेत करण्याची पद्धत होती त्या काळात मराठी ग्रंथाचे संस्कृतात भाषांतर केले आहे. या ग्रंथाच्या सप्ताहपारायणाची पद्धती मराठी गुरुचरित्राप्रमाणेच आहे.

## सप्तशतीगुरुचरित्रसार

'सप्तशतीगुरुचरित्रसार' हा स्वामीमहाराजांचा गुरुचरित्रावरील तिसरा ग्रंथ. हा ग्रंथ मराठीत असून, अध्याय ५१ असून ओवीसंख्या मात्र सातशे आहे. मूळ मराठी गुरुचरित्र हा ग्रंथ ब्राह्मणांनी सोवळ्यात अनुष्ठान

म्हणून वाचण्याचा सर्वत्र संप्रदाय आहे. स्वामीमहाराजांचा आचाराबाबत फार कटाक्ष असल्यामुळे ज्यांना हा ग्रंथ वाचण्याची शक्यता नाही अशा सर्व स्त्रीपुरुषांना गुरुचरित्रवाचनाचे श्रेय मिळावे यासाठी स्वामीमहाराजांनी या ग्रंथाची रचना केली आहे. यातील प्रत्येक ओवीचे तिसरे अक्षर वाचीत गेल्यास श्रीमद्‌भगवद्‌गीतेचा पंधरावा अध्याय तयार होतो. सातशे ओव्या असलेल्या या ग्रंथात सातशे श्लोक असलेल्या गीतेतील सातशे अक्षरे असलेला पंधरावा अध्याय गुंफण्यामागील काय रहस्य आहे हे तशा अधिकारी व्यक्तींकडूनच कळून येणे शक्य आहे.

## 'त्रिशती' निर्मितीचा हेतू

'श्रीगुरुचरित्र त्रिशतीकाव्य' ही स्वामीमहाराजांची गुरुचरित्राच्या संदर्भातील चौथी रचना. श्रीस्वामीमहाराजांचे पट्टशिष्य प.प. श्री दीक्षितस्वामीमहाराज यांनी नृसिंहवाडीस असताना, वाडीतील श्रीदत्तपूजकांच्या घराण्यातील मुलांना संस्कृत भाषेचे ज्ञान व्हावे व श्रीदत्तचरित्रही समजावे अशी सदिच्छा स्वामीमहाराजांकडे व्यक्त केली. हे जाणून स्वामीमहाराजांनी 'श्रीगुरुचरित्रत्रिशतीकाव्य' व 'श्रीदत्तचंपू' हे दोन ग्रंथ संचारातच तयार करून वाडीस श्रीदीक्षितस्वामी महाराजांकडे पाठविले व ते शिकविण्याची व्यवस्था करण्याची आज्ञा केली. प.प. श्री दीक्षितस्वामीमहाराजांनी त्यावेळी वाडीस श्रीब्रह्मानंदस्वामींचे मठात एक संस्कृत पाठशाळा सुरू करून, हे ग्रंथ तेथील विद्यार्थ्यांना शिकविण्याची जबाबदारी वे. शा. सं. श्री धुंडिराजमहाराज कवीश्वर यांचेवर सोपविली. याबद्दल त्रिशतीकाव्याच्या प्रस्तावनेत श्री गुळवणीमहाराज म्हणतात - 'प्रासादिक असे श्री महाराजांचे ग्रंथ, गुरुसेवाबुद्धीने अध्यापनकार्य करणारी छात्रहितैषी अध्यापक मंडळी व भगवंताविषयी प्रेमादर बाळगणारा छात्रवर्ग असा सुंदर त्रिवेणीसंगम त्यावेळी वाडीस जमला होता.' ज्याप्रमाणे भगवंतांनी अर्जुनाला निमित्त करून सर्वांसाठी गीतोपदेश केला त्याप्रमाणे स्वामीमहाराजांनी वाडीतील बालकांना निमित्त करून सर्वांसाठीच या त्रिशतीकाव्याची निर्मिती केली. विद्यार्थ्यांना संस्कृत भाषेचे ज्ञान व्हावे, काव्यशास्त्राचे ज्ञान व्हावे व श्रीदत्तचरित्रही समजावे अशा तिहेरी उद्देशाने या त्रिशतीकाव्याची निर्मिती झाली. योग्य अध्यापकांकडे श्रद्धापूर्वक या ग्रंथाचे अध्ययन केल्यास हे तीनही उद्देश सफल होऊ शकतील.

## त्रिशतीचे वाङ्मयीन स्वरूप

'श्रीगुरुचरित्र त्रिशतीकाव्य' या ग्रंथात तीन शतके आहेत. पहिल्या शतकात १०० श्लोक, दुसऱ्या शतकात १०२ श्लोक व तिसऱ्या शतकात १०७ श्लोक असे एकूण ३०९ श्लोकांचा हा ग्रंथ आहे. अकराव्या चातुर्मासानिमित्त महतूर येथे श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम असताना शके १८२३ मध्ये या त्रिशतीची रचना झाली. तसे हे काव्य मम्मटाने सांगितल्याप्रमाणे अमंगल निपटून टाकण्यासाठी (शिवेतरक्षतये) परमानंदाचा लाभ करून देण्यासाठी (सद्यःपरनिर्वृतये) तर आहेच पण कांतासंमित नसून प्रभुसंमित असे आहे. यात स्वामीमहाराजांनी अधिकारवाणीने उपदेश केला आहे. जे काव्य वाचल्याक्षणी आनंद देते त्यास द्राक्षापाक असे म्हणतात. ज्या काव्याचा आनंद बऱ्याच खटपटीनंतर विश्लेषणानंतर मिळतो ते काव्य नारिकेलपाक या सदरात गणले जाते. हे त्रिशतीकाव्य नारिकेलपाक या सदरातील आहे असे वाटते. याचे मुख्य कारण म्हणजे हे संस्कृतात आहे याशिवाय गुरुचरित्रातील सर्व महत्त्वाचा भाग अतिशय कमी शब्दात व्यक्त केला असल्याने हे त्रिशतीकाव्य आकलनास अतिशय कठीण असे झाले आहे. हे काठिण्य स्वामीमहाराजांनी स्वतःच त्या काव्यावर टीका लिहून दूर केले आहे. काही ठिकाणी ही टीका द्राक्षापाक वाटावी इतकी सोपी आहे परंतु काही ठिकाणी ती अतिशय गंभीर व शास्त्रसिद्धान्त प्रकट करणारी आहे. हाही ग्रंथ मंत्ररूप असल्याने याचीही पारायणे करण्याचा प्रघात संप्रदायात सर्वत्र आहे. साधकांच्या प्रापंचिक व पारमार्थिक अडचणी दूर करण्यासाठी जी 'प्रश्नावली' स्वामीमहाराजांनी सिद्ध करून ठेवली आहे, त्यात 'त्रिशतीकाव्य व कृष्णालहरी वाचावी' असे साधन कित्येकांना मिळते. यावरूनही त्रिशतीची मंत्ररूपता सिद्ध होते. या काव्याचा आस्वाद घेऊ इच्छिणाऱ्या सामान्य वाचकाला संस्कृत भाषेच्या अत्यल्प ज्ञानाबद्दल निश्चितच वाईट वाटेल. व तो जिद्दीने संस्कृत भाषेचा अभ्यास करण्यास निश्चितच उद्युक्त होईल. दुसरे म्हणजे हल्लीच्या काळात सर्वही नियमांचे पालन करून शुचितेने गुरुचरित्राचे नित्य वाचन करणे हे अवघड झाले आहे. अशा परिस्थितीत त्रिशतीकाव्याचे पारायण हे अत्यंत सोपे असे साधन आहे. केवळ एक तासात या त्रिशतीचे पारायण पूर्ण होऊ शकते. आणि गुरुचरित्र पारायणरूपी सेवा या त्रिशतीद्वाराही होऊ शकते.

## अत्रिजाचे त्रिजस्वरूप

'त्रिगुणात्मक त्रयमूर्ति दत्त हा जाणा । त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा ।।' या आरतीत वर्णिलेल्या, 'त्रिगुणात्मका त्रिगुणातीता । त्रिभुवनपालक तव शरणं ।।' या भजनात वर्णन केलेल्या अत्रिनंदन श्रीदत्तात्रेयांचे यथार्थ स्वरूप समजून येण्यासाठी स्वामीमहाराजांनी या त्रिशतीकाव्याची रचना केलेली आहे. त्रिशतीकाव्याच्या या सुशंकरं सन्तमजं गुरुं परं परंपराभ्रं प्रणमत्पुरंदरम् ।।

*वरं हरन्तं प्रवरं सुसावरं भजेऽत्रिजं योगिवरं निरन्तरम् ॥१.१॥*

पहिल्या श्लोकातील 'अत्रिजं' हे पद 'श्रीदत्तात्रेय' या अर्थाने तर आहेच पण स्वामीमहाराजांनी अतिशय सुंदर रीतीने श्लेष अलंकार साधला आहे. या श्लोकात 'भजे' या पदानंतर (ऽ) अवग्रह नसेल तर पुढील पद 'त्रिजं' असे होते. या श्लोकावरील टीकेत स्वामीमहाराजांनी या 'त्रिज' या पदाचे तीन अर्थ सांगितले आहेत. (१) त्रिषु सह्याद्रि - पाञ्चाल देश - करञ्जनगराख्य स्थानेषु जातं (२) त्रिभ्यः अत्रिमुनि - राजाख्यद्विज - माधवाख्यविप्रेभ्यः जातं (३) त्रिभ्यः अनसूया - सुमति - अम्बाभ्यः जातं - श्रीदत्तात्रेय - श्रीपाद - श्रीनृसिंहसरस्वत्याख्यं गुरुं. श्री दत्तात्रेय, श्रीपादश्रीवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती असे तीनवेळा अवतार घेतल्यामुळे त्यांना 'त्रिज' हे नावही अन्वर्थक असेच आहे.

तसेच त्रिशतीच्या या

*वासपं गतिदं वन्देऽत्रिजं चारुहितं वृतम् ॥*

*तं वृतं हि रुचाऽजं त्रिदेवं वन्तिगपं सदा ॥३.१०७॥*

शेवटच्या श्लोकात श्रीदत्तात्रेयांचा उल्लेख 'अत्रिजं' असा करून टीकेत 'त्रिदेवं' या पदाचे तीन अर्थ "१. त्रयाणां भूर्भुवःस्वर्लोकानां देवं प्रकाशकम् २. त्रयाणां सत्वरजतमसां गुणानां देवं प्रकाशकम् ३. त्रयाणां विश्वतैजसप्राज्ञानां देवं प्रकाशकम्" सांगून इथेही श्लेष अलंकार साधला आहे. अशारीतीने काव्य व तत्त्वज्ञान यांची मिळणी अभ्यासकांना आश्चर्यासह आनंद देऊन जाते.

## परब्रह्माचे अवतारित्व

पहिल्या श्लोकात श्रीदत्तात्रेयांचा 'अज' असा उल्लेख करून, दुसऱ्या श्लोकात 'अजः आकारिवत् अभवत्' असा उल्लेख स्वामी महाराज करतात आणि टीकेत याचे 'सः दत्तात्रेयः अजः प्रभुः जन्मादिविकाराभावेऽपि आकारियद् आकारवान् इव अभवत् ।' असे स्पष्टीकरण करतात. आणि वर उल्लेखिलेल्या शेवटच्या श्लोकातही श्रीदत्तात्रेयांचा उल्लेख 'अज' असा करायला विसरत नाहीत. हे दत्तात्रेय प्रभु वस्तुतः जन्मादिविकारशून्य अज असे असून ते जणु कांही देह धारण करते झाले. वरवर पाहता हे विरोधी वाटते. परंतु हा विरोधाभास आहे. यातील 'इव' हा शब्द अत्यंत मार्मिक व महत्त्वाचा असा आहे. हा 'इव' शब्द, गीतेवरील आचार्यांच्या भाष्यातील "स भगवान् नित्यशुद्ध बुद्धमुक्तस्वभावोऽपि सन्स्वमायया देहवान् इव जातः इव लोकानुग्रहं कुर्वन् इव च लक्ष्यते" या वाक्याची थेट आठवण करून देणारा आहे. आचार्यांनी तर 'इव' हा शब्द त्रिवार वापरला आहे. अशा विरोधाभासातून स्वामीमहाराजांनी संपूर्ण विश्व हे परमात्म्याचा विवर्त आहे व परमेश्वराचे अवतारित्वही मायिक आहे असेच जणु कांही सूचित केल्यासारखे वाटते. स्वामीमहाराजांच्या व आचार्यांच्या वचनांमध्ये ही अशी एकवाक्यता अभ्यासकाला अनेक ठिकाणी आढळून येते.

## दर्पणेऽल्पे यथा मठः

मूळ गुरुचरित्र हे अतिशय विस्तृत, सुमारे सात हजार ओव्यांचे आहे. आणि हे त्रिशतीकाव्य अतिशय संक्षिप्त व फक्त तीनशेनऊ श्लोकांचे आहे. तरीही संपूर्ण गुरुचरित्राचे सार प्राज्ञजनांनी या त्रिशतीत पहावे असे स्वामीमहाराज पहिल्या शतकाच्या चौथ्या श्लोकात म्हणतात. हे म्हणणे किती सार्थ आहे याची प्रचिती या त्रिशतीचा अभ्यास करणाऱ्याला निश्चितपणे येईल. हे म्हणणे स्पष्ट करण्याकरता श्री महाराज याच श्लोकात एक सुंदर व चपखल असा दृष्टान्त देतात. ते म्हणतात की एखाद्या मोठ्या मठाचे एखाद्या लहान आरशात जसे स्पष्ट प्रतिबिंब दिसते तसे संपूर्ण गुरुचरित्राचे सार या ग्रंथात दिसते. बिम्बाचा कोणताही अंश आरशातील प्रतिबिंबात गाळला जात नाही. तसेच गुरुचरित्रातील सर्वही भाग अत्यंत साररूपाने या त्रिशतीत आलेला आहे असेच ते सुचवीत आहेत. तसेच गुरुचरित्रात जसा श्रीदत्तात्रेयांचा निवास आहे तसाच त्यांचा निवास या त्रिशतीतही आहे हे 'मठ' या पदाने श्री महाराज सुचवीत आहेत. इथे साधर्म्य दाखवून उपमा अलंकारही साधला आहे.

## अंतरंगाचा भागोवा

श्रीदत्तजयंतीच्या तिथीचे रहस्य सांगताना (१.३१) श्रीमहाराज म्हणतात - भक्तांचे मार्गदर्शक असल्याने मार्गशीर्ष मासात, वेदांनी शोधल्यामुळे मृगशीर्ष नक्षत्रावर, सौम्य आल्हादक असल्याने बुधवारी (सौम्यवारी), ऐश्वर्याने पूर्ण असल्यामुळे पौर्णिमेला, प्रदोषसमयी श्रीदत्तराज जन्मले. मातेची महती सांगताना (१.४८) श्री महाराज म्हणतात - ब्रह्मचारी पुत्र हा गुरुंचे अधीन असतो व संन्यासी पुत्र हा संबंधरहित असतो म्हणून गृहस्थी पुत्राने मातापित्यांची सेवा करावी. 'मातृदेवोभव, पितृदेवोभव' या श्रुतीत मातेचा उल्लेख प्रथम आल्यामुळे व 'पितुर्माता गरीयसी' अशी श्रुती असल्यामुळे पित्यापेक्षा माता जास्त वंदनीय व श्रेष्ठ आहे. (२.२४) ज्या मातेने हे मोठे गर्भाचे ओझे धारण केले, गर्भामुळे उत्पन्न झालेले मृत्यभयही सहन केले. मोठ्या कष्टाने प्रसूतिवेदना सहन केल्या, संतानाच्या सुखाकरिता निद्रात्यागही केला, तारुण्यसुखद भोगेच्छाही सोडली, इतके अनिवार्य दुःख केवळ संततिसाठी सोसून मोठ्या प्रेमाने आपले स्तन्यपान देऊन मुलांचे रक्षण केले, आपल्या सुखदुःखाचे विचार मनात आणले नाहीत, त्या मातेचे उपकार फेडावे असे इच्छिणाऱ्यांना या जगात योग्य असे साधनच मिळणार नाही. म्हणून संन्याशांनाही मातृप्रेम सोडवत नाही व संन्याशांनाही माता वंदनीय आहे. स्मरणभक्तीचे महत्त्व (२.३१) सांगताना श्रीमहाराज म्हणतात- श्रीगुरुयतींच्या पादकमलांचे जो आदराने स्मरण करतो तो श्रीगुरुंच्या कृपालेशाने महासंसार भयापासून मुक्त होऊन तरुन जातो. स्मरणभक्ती ही नवविधा भक्तींमध्ये प्रथम क्रमांकावर असून इतर कोणतीही भक्ती स्मरणाशिवाय होत नाही व ही स्मरणभक्ती भगवंताला अतिशय प्रिय अशी आहे. श्रीदत्तात्रेय हे स्मर्तृगामी आहेत. (२.३७) श्रीगुरुंची अवज्ञा ही संसार भयजनक आहे आणि गुरुंची आज्ञा ही भवतापनाशक आहे म्हणून गुरुंची आज्ञा नेहमी शिरसावंद्य मानावी. इथे दत्तमाहात्म्यातील 'त्यांची आचरणे प्रायः न घ्यावी । वचने मात्र न टाळावी ॥' या ओवीची आठवण होते. वाडीक्षेत्राचे माहात्म्य (२.७७) सांगताना श्रीमहाराज म्हणतात - भगवान् श्रीगुरुनृसिंहदेव नृसिंहवाडी क्षेत्रातून जरी गाणगापुरी गेले तरीही वाडीक्षेत्री भक्तजनांच्या अभीष्टकामना निश्चितच पूर्ण होतात व असेच पुढे उत्तरोत्तरकालीही होणारच. भक्तजनोद्धारार्थ भगवान नेहमी जागृतच आहे. पुढे (२.९१ ते २.९९) कर्मविपाक सांगितला आहे. नंतर पुढे विभूतीचे माहात्म्य (२.१००) सांगितले आहे.

पुढे तिसऱ्या शतकात (३.१० ते ३.१५) नित्यानित्यवस्तुविवेक सांगून स्त्रीधर्माचा उपदेश केला आहे. नंतर (३.२६ ते ३.३१) सदाचाराचे सविस्तर वर्णन आहे (३.३४) सकाम भक्ताला निष्कामताही दिली. पुढे (३.९२) श्रुती व स्मृती ह्या ईश्वराच्या आज्ञा असून त्या अनुल्लंघ्य आहेत. अशा अनेक महत्त्वाच्या विषयांचा ऊहापोह श्रीमहाराजांनी या त्रिशतीत केला आहे.

श्रीगुरुचरित्रातील सर्व कथा या त्रिशतीत अगदी संक्षिप्त स्वरूपात आल्या आहेत. काही कथा तर अगदी एका श्लोकातच सांगितल्या आहेत. एकाच श्लोकात संपूर्ण कथा सांगण्याची श्रीमहाराजांची हातोटी तर अतिशय अप्रतिम अशीच आहे. काही कथांचा तर नुसता उल्लेखच आहे. परंतु या कथांचे जे तात्पर्य आहे, सार आहे ते सांगण्याकरिता मात्र बरेच श्लोक खर्च केले आहेत. या दृष्टीने श्रीमहाराज सुरुवातीला 'प्राज्ञैः प्रेक्ष्यः अत्र तत्सारः' असे जे म्हणतात ते किती यथार्थ आहे हे दिसून येते.

## त्रिशतीतील बोध

साधकाचे मुख्य ध्येय काय आहे हे समजावून सांगण्याकरिता ज्ञानकांड सांगितले आहे. ज्ञानाकरिता कर्म हे साधन आहे. कर्मशुद्धीसाठी भक्ती आहे. भक्तीची आवश्यकता ज्ञान दृढ होण्यासाठीही आहेच. यातील बहुतेक कथा या सकाम भक्तांच्या कथा आहेत. त्यांना मार्गदर्शनावरून त्यांच्या कामना श्रीगुरुंनी पूर्ण केल्या आहेत व त्यांना सकामतेतून निष्कामतेकडे नेले आहे. ईश्वराकडेसुद्धा काय मागावे हे शिकविण्यासाठी दीपकाची कथा सांगितली आहे. दीपकाने ईश्वराकडे गुरुभक्ती व गुरुसेवाच मागितली आहे. सदाचाराचे सविस्तर वर्णन करून त्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. आचाराबरोबरच स्मरणभक्ती ही ईशकृपा प्राप्तीचे

मुख्य साधन आहे. गुरुंची आज्ञा शिरसावंद्य मानावी, ती कधीही टाळू नये. त्यातच जीवाचे कल्याण आहे. वाडी व गाणगापूर या क्षेत्रांचे माहात्म्य सांगून अशा स्थानी केलेल्या उपासनेचे फलही शीघ्र मिळते हा स्थानमहिमा सांगितला आहे. सद्‌गुरु हे 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं समर्थ' असे असतात. त्यांची कृपा, त्यांचा प्रसाद, अनुग्रह, हाच जीवाला पूर्ण ज्ञान व मोक्ष प्राप्ति करून देण्यास समर्थ आहे.

## वृत्ते व अलंकार

या त्रिशतीकाव्यात भक्तीच्या जिव्हाळ्याबरोबर पांडित्याचा प्रकर्षही दिसून येतो. साहित्यशास्त्रातील अनेक शब्दालंकार व अर्थालंकार त्यांनी अत्यंत लीलेने साधले आहेत. त्यांचे शब्दलालित्य, नवीन शब्द निर्माण करण्याची क्षमता व काव्यनिर्मितीची क्षमता, एकाच शब्दाचे अनेक अर्थ लावण्याची हातोटी, काव्यमय शैली, श्लोकांचे मंत्ररुपत्व व मंत्रगर्भत्व, अतिशय अल्प शब्दात फार मोठा आशय अभिव्यक्त करण्याचे सामर्थ्य, शब्दापलीकडील भाव काव्यातून सहज साधण्याची शैली, उपमादि अलंकारांनी काव्य सजविण्याची सौंदर्यदृष्टी या सर्व गोष्टी पाहून मति गुंग होते. काव्यातील रसास्वाद व मार्मिकता हा वाचकांच्या ग्रहणशक्तीच्या व जाणीवेच्या पातळीनुसारच होत असतो.

केवळ उदाहरणादाखल त्यांनी या त्रिशतीत साधलेल्या अलंकारांची नावे व हे अलंकार ज्या श्लोकांमध्ये साधले आहेत त्यांचे क्रमांक यांचा निर्देश करीत आहे. श्लेष, अनुप्रास (१.१), दृष्टान्त (१.२), अर्थान्तर-न्यास (१.३), उपमा (१.४), काव्यलिंग (१.६), यमक (१.७), विरोधाभास (१.१०), रूपक (१.१४), अनुमान (१.१५), शब्दप्रमाण (१.१९), पूर्णोपमा (१.२०), काव्यार्थापत्ति (१.२१), सहोक्ति (१.२४), अतद्‌गुण (१.२६), मुद्रालंकार (१.२५), लुप्तोपमा, असङ्गति (१.३३), व्यस्तरूपक (१.३४), अतिशयोक्ति (१.३७), विभावना (१.४३), लोकोक्ति (१.४६), प्रहर्षण (१.४७) व्याजोक्ति (१.६५), भ्रान्तिमद (२.११), विपरीताख्यानकी (२.३९), निदर्शना (२.५०), वक्रोक्ति (२.७०), उत्प्रेक्षा, व्यतिरेक (२.३८), अधिकप्रभेद, वृत्यनुप्रास (२.८०).

तसेच छन्दःशास्त्राचा व संगीतशास्त्राचा त्यांचा परिचय किती सूक्ष्म होता हे श्रीमहाराजांनी वापरलेल्या अनेक वृत्तांवरून दिसून येते. या त्रिशतीत जवळ जवळ चाळीस प्रकारची वृत्ते वापरली आहेत. त्या वृत्तांची नावे व पुढे त्या वृत्तांत रचलेल्या श्लोकांची संख्या पुढीलप्रमाणे - वंशस्थ (६), आर्या (९), शिखरिणी (४), अनुष्टुप् (९६), इन्द्रवज्रा (७), योगिनी (२६), शार्दूलविक्रीडित (२९), शालिनी (९), मालिनी (२), उपजाति (३१), रथोद्धता (१०), स्रग्धरा (१४), तोटक (२), प्रमिताक्षरा (२), प्रहर्षिणी (१), द्रुतविलम्बित (४), त्रिष्टुप् (१), सिंहोन्नता (३), स्राग्विणी (१), भुजंगप्रयात (७), पुष्पिताग्रा (४), स्वागता (१), हरिणी (१), मन्दाक्रान्ता (३), वसन्ततिलका (५), चामर (२), पृथ्वी (१), उपेन्द्रवज्रा (२), विद्युन्माला (१), भुजंगशिशुभृता (१), कुमारललिता (१), माणवकाक्रिडितक (१), तनुमध्या (१), उदिता (१), रुचिरा (१), मत्तमयूर (१). वृत्तांना गेयता असल्यामुळे वाचकांनी त्या त्या वृत्तांच्या चालीत ते ते श्लोक म्हणावेत. त्यामुळे श्लोकातील भाव अभिव्यक्त करताना गेयतेमुळे तो खुलतो व मनाला आनंद प्राप्त होतो. अशा रीतीने महापुरुषांच्या दिव्यवाणीचा स्पर्श शब्दांच्याद्वारे अंतःकरणात प्राप्त होऊन मन व वाणी पवित्र होते.

(३.६८) हा श्लोक केवळ दोन अक्षरे (द, व) वापरून तयार झालेला आहे. (३.६७) हा श्लोक तर फक्त एकच अक्षर (त) वापरून तयार केला आहे. (३.१०७) या श्लोकात 'हारबन्ध' गुंफला आहे. (३.१०५) या श्लोकात 'सर्वतोभद्र' हा बन्ध साधला आहे. (३.१०७) या श्लोकात 'गतप्रत्यागत' हा बन्ध साधला आहे. हे बन्ध पाहून श्रीमहाराजांच्या अलौकिक व कल्पनातीत अशा रचनाकौशल्याचे सामर्थ्य पाहून मन आश्चर्याने स्तिमित होते.

## श्रीसद्‌गुरुचरणी प्रार्थना

श्रीगुरुचरित्रातील कथा अतिशय उद्‌बोधक आहेत. चमत्कारांच्या माध्यमातून भक्तीची पुष्टी होते हे जरी असले तरी केवळ चमत्कारांवर भर न देता त्यातून दिलेली शिकवण मनावर ठसविण्याचे कार्य श्रीमहाराजांनी केले आहे. यातून तत्त्वज्ञानात्मक विचार मांडून साधकांना उच्च भूमिकेवर नेतात, वृत्ती अंतर्मुख करतात, वैराग्याचे बीज मनात पेरतात आणि सकामतेकडून निष्कामतेकडे अतिशय हळुवारपणे नेतात. हे श्रीदत्तात्रेयांचे साधकांना मार्गदर्शन करण्याचे कार्य व उपासकांची बुद्धी शुद्ध करण्याचे कार्य श्रीस्वामीमहाराज या त्रिशतीद्वारे करीत आहेत. अशा या ग्रंथांच्या द्वारे साधकांनी आपले कल्याण साधून श्रीमहाराजांच्या कृपेने कृतकृत्य व्हावे ही सद्‌गुरुंचे चरणी विनम्र प्रार्थना.

**प्रा. डॉ. मनोहर कृष्णाजी कुबडे**
बी १-६, गौरीशंकर गृहसंकुल, रामलाल चौक,
३४ रेल्वेलाईन्स, सोलापूर - ४१३००१.
फोन : (०२१७) २७२७१९५



# श्री क्षेत्र गरुडेश्वर

**सौ. शशिकला वि. दिंडोरकर**

*एम्. ए. (ऑनर्स) इकॉनॉमिक्स. काही वर्षे लेक्चरर, एस्. एन्. डी. टी. रिझर्व बँक व आय डी बी आय येथे काही काळ नोकरी.*

प.पू. टेंबेस्वामी उर्फ वासुदेवानंद सरस्वती महाराजांनी देहत्यागासाठी म्हणून गुजराथ राज्यातील नर्मदा नदीच्या उत्तर तटावर असलेल्या नर्मदा जिल्ह्यातील 'गरुडेश्वर' या लहानशा खेडेगावाची निवड केली. सर्व प्रमुख दत्तस्थानात या स्थानाचा उल्लेख असून नर्मदा पुराणातही या स्थानाचा स्पष्ट उल्लेख आहे. प.पू. स्वामींचा जन्म १३ ऑगस्ट १८५४ रोजी महाराष्ट्रातील सावंतवाडी जिल्ह्यातील 'माणगाव' या लहानशा खेडेगावी झाला. त्यांनी २४ जुलै १९१४ रोजी 'गरुडेश्वर' मुक्कामी नर्मदेत देहत्याग केला म्हणून या स्थानी त्यांची समाधी आहे. आज हे स्थान दत्तभक्तीचे केंद्र बनले आहे.

नर्मदा किनाऱ्यावरून स्नान करून येता येता सर्वप्रथम डाव्या बाजूस इंदीरच्या महाराणी अहिल्याबाई होळकरांनी बांधलेला चौथरा दृष्टीस पडतो. पुढे उजवीकडे प.पू. स्वामींचे समाधी मंदिर असून समाधीवर स्फटिकाचे शिवलिंग आहे. त्याची प्रतिष्ठापना गुजराथमध्ये दत्तभक्तीची ज्योत जिवंत आणि ज्वलंत ठेवणारे नारेश्वरचे संत प.पू. श्री रंगावधूत स्वामींनी केलेली आहे. समाधीच्या एका बाजूला असलेल्या गाभाऱ्यात प.पू. वासुदेवानंद स्वामींची पूर्णाकृती मूर्ती असून दुसऱ्या बाजूच्या गाभाऱ्यात स्वामी महाराजांच्या वापरातील वस्तू पहावयास मिळतात. येथेच अनुष्ठान करणारांसाठी बसण्याची सोय आहे. भोवती प्रदक्षिणेसाठी चौथरा असून येथून नर्मदेचा शांत नीलवर्ण प्रवाह आणि सातपुडा पर्वतांच्या रांगांचे दर्शन होते. सद्गुरू येथे सदैव हजर असतात अशी सर्व श्रीभक्तांची श्रद्धा आहे. समाधी मंदिरातील भगवान दत्तांच्या पाषाणमूर्तीची पूजा पुजाऱ्याशिवाय कोणीही करू शकत नाही कारण तेथे पुजाऱ्यांशिवाय कोणालाही प्रवेश नाही. समाधी मंदिराच्या मागील बाजूस डावीकडे व्यवस्थापक कार्यालय असून तेथे ट्रस्टतर्फे केल्या जाणाऱ्या राहाण्या-जेवणाच्या व्यवस्थेचे पास, पूजा, अभिषेक वगैरेची नोंद, पावती दिली जाते. स्वामी महाराज रचित ग्रंथही येथे उपलब्ध आहेत.

समोरच भगवान दत्तांचे मंदिर असून त्याचा विशाल सभामंडप श्री गुरुलीलामृतात वर्णिलेल्या तैलचित्रांनी सुशोभित केलेला आहे. गर्भद्वारानी पुजाऱ्यांशिवाय कोणालाही प्रवेश नसला तरीही बाहेरून प्रेमस्वरूप दत्तमूर्तीचे व पादुकांचे मनसोक्त आणि सुंदर दर्शन होऊ शकते. दत्तमूर्तीचे खाली ज्यांच्या आदेशाने दैनंदिन कार्यक्रम निश्चित करीत असत, ग्रंथरचना करीत असत आणि ज्यांची आळवणी करीत असत अशी दत्तप्रतिमा आहे. मंदिरातील गर्भद्वारे सर्वत्र कलात्मक अशा चांदीच्या प्रतिमांनी मढविलेली आहेत. या मंदिराच्या मागील बाजूस धर्मशाळा, बाजार, करोटेश्वर आणि गरुडेश्वराची मंदिरे, विशाल भोजनशाळा आहेत. या मंदिराच्या डाव्या बाजूला असलेल्या डोंगराच्या पायथ्याशीच नारेश्वर मंदिर असून संपूर्ण गरुडेश्वर स्थान उंच टेकडीवर आहे.

प. पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामी गृहस्थी होते. एक अपत्य झाल्यावर पत्नीसह बालकाचे निधन झाले. पुढे स्वामींनी संन्यास घेऊन देशातील स्थितीचे अवलोकन करण्यासाठी भारतभ्रमण केले. योग, तंत्र व मंत्र ह्या शास्त्रात अधिकारी असलेल्या स्वामींनी अनेक सामान्य माणसे, जिज्ञासु व ज्ञानपिपासु माणसांना सुयोग्य मार्गदर्शन करून ईश्वरापर्यंत पोहोचण्यास मदत केली. त्याबरोबरच संस्कृत भाषेत विपुल ग्रंथसंपदा तयार केली. त्यांची मराठीत साधकांना लिहिलेली पत्रे, श्लोक व पदे आजही विपुल प्रमाणात अस्तित्वात आहेत. गरुडेश्वर येथील संस्थेच्या वाचनालयात स्वामींचे चरित्र, फोटो व त्यांचे समग्र ग्रंथ उपलब्ध असून सुचीसुद्धा उपलब्ध आहे. गरुडेश्वर हे खेडेगाव असल्याने येथे पोस्ट ऑफिस, टेलिफोन, सरकारी दवाखाना, खाजगी डॉक्टर व इतर सोयीसुविधा मर्यादित प्रमाणात असून येथे रेल्वेस्थानकही नाही. परंतु अहमदाबाद, बडोदा येथून एस्.टी. बसेस उपलध आहेत. येथील समाधी मंदिरात स्वामींचा जन्मदिवस, पुण्यतिथी, दत्तजयंती व गुरुप्रतिपदा असे मोठे उत्सव आणि इतर लहान मोठे उत्सव साजरे केले जातात.

सध्या प. पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामींचे १५० वे जयंती वर्ष आहे. त्यानिमित्त गणेश याग, विष्णू याग, श्रीयाग, क्षौत (सूर्याचा याग), नवचंडी, रुद्र स्वाहःकार, पवमान स्वाहःकार अशा विविध धार्मिक कार्यांचे आयोजन केले आहे. तसेच कुंभमेळ्यानिमित्त श्री पादुकांना नाशिक कुशावर्त येथे स्नान घडविले गेले. ३० नोव्हेंबर ते ४ डिसेंबर २००३ या काळात यज्ञात १ लाख आहुती देण्याचा कार्यक्रम झाला असून रोज १५० ब्राह्मण भोजन असे ५ दिवस होते. ह्याचा सर्व खर्च गांधीनगर, अहमदाबाद, सुरत, बडोदा येथील अवधूत परिवाराने केला असून विशेष म्हणजे येथे ब्राह्मणांना दक्षिणा दिली जात नाही. तसेच ३० नोव्हेंबर ते १५ डिसेंबर २००३ या काळात 'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' अशी अखंड धूनही होती. १९ डिसेंबर ते २५ डिसेंबर २००३ या काळात गुरुचरित्र सप्ताह, स्वामी महाराज ग्रंथ पारायण, विविध स्वाहःकार इ. चे आयोजनही केले होते. येथे १२ महिने सकाळी ५॥ वाजता काकडआरती; ९॥ वाजता शृंगार आरती; १२ वाजता दत्तमंदिर, समाधीमंदिर, रंगावधूत मंदिर येथे भोगआरती; सायंकाळी ६॥ वाजता सायंआरती व ८-८॥ वाजता शेजारती असा कार्यक्रम असतो. या शिवाय विशेष उत्सव प्रसंगी भजन, कीर्तन, प्रवचन, वेदघोष, धून, पालखी असेही कार्यक्रम आयोजित केले जातात.

अशा प्रकारे प. पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या पदस्पर्शाने, सहवासाने आणि देहत्यागाने पावन झालेले हे स्थान आज दत्तभक्तांचे माहेर बनलेले आहे.

**सौ. शशिकला वि. दिंडोरकर**

६, अमित टॉवर, तळमजला, भारत ज्योती बसस्टॉप जवळ,

बिबवेवाडी, पुणे ३७.



# यति चक्रवर्ती वासुदेवानंद सरस्वती महाराज

**श्री. अरविंद बा. बीडकर**

*मेकॅनिकल ड्राफ्टसमन केंद्रीय नागरी संरक्षण खात्यातून मुख्य ड्राफ्ट्‌समन म्हणून सेवानिवृत्त प.पू. नाना महाराज तराणेकर (इंदूर) त्रिपदी परिवार पुणे शाखा सदस्य व प्रतिनिधी शांती पुरुष, आदिमाता, श्री. अक्कलकोट स्वामी समर्थ भूषणराज इ. मध्ये लेखन.*

'श्री गणेश दत्त गुरुभ्यो नमः' ह्या सिद्ध मंत्रात्मक अर्थपूर्ण शब्दांचे दत्तसंप्रदायांत एक स्वतंत्र गुरुपीठ आहे. ह्या गुरुपीठाचे स्वयंभू पीठाधिपती आहेत, 'श्री दत्तगुरु, भगवान श्री वासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी महाराज.' तीव्र वैराग्य व कर्मठ आणि कडक सदाचरणामुळे समाजाचे आकर्षण असलेले, श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य महाराजांनी आचारधर्म, उपासना, नीतीधर्म ह्यावर प्रवचनांद्वारे शिक्षण दिले. 'अधिकार तैसा करू उपदेश' ह्या संत तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे, जनमानसांची पारख करून, मोठा लोकसंग्रह करून अष्टदिशांमध्ये मार्गदर्शक राहून ते संन्यासाश्रमाचे मानदंड झाले. साक्षात् दत्तप्रभू त्यांच्याशी बोलत आणि तेही त्यांच्याशी, त्यांच्या आज्ञेशी एकरूप असत. म्हणजे प्रत्यक्ष दत्तावतारच.

ज्ञान व वैराग्य हे प्रथमपासूनच त्यांचे जवळ होते. स्वयंस्फूर्तीने त्यांनी संन्यास ग्रहण केला. म्हणून ते 'विद्वत् संन्यासी'. दीक्षाग्रहणाच्या वेळी दंड ग्रहण करून, त्याचा त्याच वेळी त्याग केल्याने ते 'परमहंस संन्यासी' झाले. वाग्दंड, मनोदंड व कर्मदंड हे त्रिदंड. पूर्णज्ञान ह्या एकमेव दंडाने, त्रिदंड एकरूप झाल्याने उच्चतम कोटीस ते पोहोचले. आज ९० वर्षानंतरसुद्धा, कोणत्याही प्रांतातील वा भाषेतील व्यक्तिने संन्यासाश्रमाचा दंड घेतला की त्या व्यक्तिला माणगांव, नृसिंहवाडी, गरुडेश्वर ह्या तीर्थक्षेत्री म्हणजेच महाराजांच्या जन्मभूमी, कर्मभूमी व चिरविश्रांति स्थानी 'निर्मला', 'कृष्णा', व 'नर्मदा' ह्यांचे तीर्थोदक प्राशन करण्यासाठी जावेच लागते. आपल्या हाताने दीक्षित स्वामींना दंड देऊन 'नृसिंह सरस्वती' असे त्यांनी नाव दिले. महाराजांनी सुमारे तीस व्यक्तिंना संन्यास ग्रहण करण्यांस प्रेरित केले म्हणूनच ते 'यति चक्रवर्ती महाराज.'

त्यांनी संन्यासधर्मास प्रेरित केलेले, त्यांचे एक शिष्य, श्री.प.पू. योगानंद सरस्वती (गांडा महाराज) यांनी त्यांचेवरील लिहिलेल्या १३५ अध्यायांतील 'श्री गुरुमूर्ति' ग्रंथातील चौथ्या अध्यायांत त्यांच्या जन्माचे बहारदार वर्णन केले आहे ते असे. ।।श्री गणेशायनमः।। योगानंद भक्तासी म्हणती, श्रावणमासी श्री गुरुमूर्ति, कवण्या कारणे अवतार घेती, तुम्हां प्रति सांगू तें ।। श्रावणमासी जन समस्त, पुण्यकर्मी असती रत, शिवासी रुद्राभिषेक करीत. नाना व्रते आचरती ।। कोणी करिती लिंगार्चन, कोणी करिती नक्त भोजन, शंकरा लक्ष त्रिदलार्पण अनुष्ठान जप जाप्य ।। ऐसी सत्कर्मे आचरती, ब्राह्मण संतर्पणे होती, वर्षा ऋतु उत्तम अति, वनस्पती टवटवीत । मेघोदके सजल मही, धान्यादिकांचे पोषण पाही, होवोनिया सकल जनही, शांत हृदयी वर्तती ।। ब्रह्मचारी यती तापसी, चातुर्मास्य एका स्थळासी, वास करिती वर्षा ऋतुसी, स्वात्मत्त्वासी भोगावया ।। ऐसा उत्तम श्रावणमास, तिथी पंचमी शुभविशेष, उक्त असे जी शुभ कार्यास, ती तयांस आवडली ।।

मौंजीबंधनानंतर नित्यनियमाने थंड पाण्याने त्रिकाल स्नान, संध्या, होमादी कर्मे, भिक्षान्न, तेही तीन घरी सुके, न शिजवलेले मागून स्वतः शिजवीत. शिजवलेले अन्न धार्मिक विधीने ग्रहण करीत. (एक भाग गोमातेसाठी, एक भाग जलचरांसाठी, एक भाग स्वतः ग्रहण करण्यासाठी) अनवाणी पायाने त्यांनी संपूर्ण देश पालथा घातला, औषधी ज्ञान असून स्वतःसाठी कोणतेही औषध घेतले नाही. त्यांची चाल इतकी गतिमान होती की बरोबरच्या लोकांना धापा टाकत, दम लागावयाचा, इतका की त्यांचेबरोबर चालणे अशक्य व्हायचे. कोणत्याही ऋतूंमध्ये त्यांनी अंगावर पंचा वा धाबळी व संन्यासाश्रमांत एक छाटी व लंगोटी ह्या व्यतिरिक्त वस्त्र वापरले नाही.

औषधी व ज्योतिष ज्ञान, अध्यात्मांतील अचूक मार्गदर्शन, सर्वांना मदत करावयाची वृत्ती, त्यामुळे दूरदूरच्या गावातील लोक येऊ लागले. त्याचबरोबर त्यांच्या विद्वत्तेचा लोकांवर पडणारा प्रभाव पाहून, गावातील हितशत्रूंमुळे वाढणाऱ्या प्रापंचिक समस्या, सासूसुनेचा गृहकलह हा प्रपंचातील वैराग्य आणखी वाढविण्यास कारणीभूत झाला. ह्या उद्वीग्नतेचे पापक्षालनासाठी अत्यंत कठीण असे 'चांद्रायण' व्रत की ज्यांत संपूर्ण मौन पाळून, शुक्ल प्रतिपदेपासून रोज १-१ घास जेवणाच्या वेळी वाढविणे म्हणजे पौर्णिमेस पंधरा घासाचे भोजन व पुन्हा १-१ घास कमी करत अमावस्येस पूर्ण उपोषण केले. ह्या कठीण व कडक व्रतांत 'मनोनिग्रह हेच बळ' असे त्यांनी दाखवून दिले.

अनंतात विलीन झालेल्या पत्नीच्या, अशौच कालाच्या उत्तरक्रीया करून चौदाव्या दिवशी त्यांनी संन्यास घेतला. पुढील काळांत संन्यासी व्रताप्रमाणे 'गुरुपौर्णिमा ते प्रोष्ठपदी पौर्णिमा' म्हणजे आषाढी पौर्णिमा ते भाद्रपद पौर्णिमा पर्यंतचा काळ, असे २३ चातुर्मास सोडले तर कोठेही तीन दिवसांपेक्षा जास्त एका स्थानी राहिले नाहीत. संपूर्ण भारत पालथा घालून धर्म आणि कर्मकांडाचे महत्त्व दाखवून 'परमार्थाचे पावित्र्य, ज्ञानाचा प्रकाश, भक्तीची मधुरता, वैराग्याचे वैभव, विवेकाची गोडी, अनासक्तीची आर्द्रता, सत्याची सोज्वलता, शांतीचे सौभाग्य या सर्व संस्कारांचे प्रवचनाद्वारे समाजावर आंतरबाह्य लेपन केले.

एकपाठी महाराजांनी आपले धार्मिक व संस्कृत भाषेचे शिक्षण तिसऱ्या वर्षापासूनच आजोबांजवळ सुरू केले. वेदाध्यायन, वेदमूर्ति विष्णुभट उकीडवे, ज्योतिष शास्त्राचे ज्ञान शंभूशास्त्री साधले, सावंतवाडीचे विष्णू आळवणी व गोव्याचे नीलंभट पद्ये यांचेकडून घेतले. अध्यात्मिक साधनेचा लाभ वाडीचे गोविंदस्वामी, मौनीस्वामी यांचेकडून, मंत्र, यतिराज भगवान श्री दत्तगुरु आणि संन्यासाचा दंड मंडलेश्वरचे कैवल्याश्रम स्वामींकडून, घेण्याचा विचार मात्र दत्ताज्ञेने उज्जैनीस नारायण स्वामींकडून त्यांचे गुरू अनिरुद्ध स्वामींनी, परवानगी दिल्यानंतर प्राप्त, वनौषधींच्या ज्ञानाबद्दल महाराज म्हणत 'आम्ही वनस्पतींच्या जवळ जेव्हा जातो तेव्हा त्या वनस्पतीच

आमच्याशी बोलतात व त्यांचा गुणधर्म सांगतात.'

महाराजांचे गुरू नारायणस्वामी. ते रामाचे भक्त, समर्थ रामदास्वामींचे उपासक. त्यांची समाधी चाफळ येथे. आपल्या गुरूंसाठी महाराज, माघ वद्य नवमी म्हणजे श्री रामदास नवमीचा उत्सव करीत. जालवणपूरला दासनवमीच्या दिवशी दासबोध वाचताना, 'श्रुती' म्हणून त्यावर भाष्य केले आणि दासबोधातील त्या अर्थाची ओवीही वाचून दाखविली. मात्र त्यांचे दरवर्षी होणाऱ्या दासनवमीच्या प्रवचनांतील विचार कोणी लिहून न ठेवल्याने जास्त माहिती मिळू शकत नाही. जर त्यांचे विचार लिहिले गेले असते तर 'समर्थ रामदास स्वामींच्या' वाङ्मयाचे अध्यात्मिक दृष्ट्या वेगळ्या बाजूचे प्रकटन झाले असते.

आपल्या भ्रमंतीच्या काळांत, तंजावर, जंबकेश्वर वाटेवरील ईराळे गावी, शृंगेरी मठाधीश श्री शंकराचार्य श्री. प.प. सच्चिदानंद शिवाभिनव श्री नृसिंह भारती महाराज त्यांना पाहून आपल्या शिष्यांना म्हणाले, "हे स्वामी श्री दत्तावतार आहेत. यांच्या माता व पित्यांचे अनंत कोटी जन्माचे सुकृत असल्याने श्री दत्त भगवनांनी यांचे घरी जन्म घेतला. हे आपले आद्य शंकराचार्य आहेत. त्यांनी प्रकटपणे धर्मस्थापना केली. हे गुप्तपणे धर्मस्थापनेचे कार्य करीत आहेत. स्वतः संन्यासधर्म विधियुक्त पालन करतात. शरणार्थी लोकांना सदुपदेश करून सन्मार्गाला लावतात. यांच्यामुळे आचार्य प्रणालिकेचा उदय झाला आहे. नास्तिक माणूस यांच्या दर्शनाने सुधारतो व सन्मार्गाला लागतो. हे आद्य श्री शंकराचार्यांप्रमाणेच, सर्वगुण संपन्न आहेत. दयाळू आहेत. दुःखीजनांना, त्यांच्या दुःखाचा परिहार होण्यासाठी त्यांना शास्त्राधारे नियम सांगतात व दुःखमुक्त करतात. यांच्या दर्शनाने पतित लोक पावन होतात. याच कारणाने ते पायी तीर्थयात्रा करतात. लोक सन्मार्गाला लागून ईश्वराचे भजन पूजन करीत आहेत !' यावर महाराजांनी 'मजविषयी जे गोडवे गायिले तितकी माझी योग्यता नाही' सांगितले.

अखेरचा २३ वा चातुर्मास गरुडेश्वरला झाला. अतिशय थकल्याने तेथे एका लिंबाचे झाडाखाली थांबले. भक्तांनी त्या झाडाखाली मठी बांधून दिली. अंत्यकाळ जवळ आल्यावर त्यांनी सारात्मक मार्गदर्शन केले ते असे. 'गुरुद्वादशी, दत्तजयंती, गुरुप्रतिपदा हे उत्सव करा. अन्नदान करा. सर्वांबरोबर गोड बोला. दुसऱ्याचे नुकसान न होईल असे वागा. माता पित्याची सेवा करा. स्त्रियांनी सासरी राहून सासू सासरे, इतर वडील माणसे व पतीची दृढ सेवा करावी. शैव व वैष्णव म्हणजे स्मार्त की भागवत एकादशीमध्ये दोन्हीही एकाच देवाची रूपे असल्याने कोणतीही एक एकादशी करावी. गृहस्थाश्रमीने संयतवृत्तीचे आचरणासाठी, कायम चतुर्थी, अष्टमी, एकादशी, पौर्णिमा/अमावास्या पाळावी. उदरनिर्वाहाकरिता कोणताही धंदा केला तरी वेदविहित कर्म व गुर्वाज्ञा पालन केले म्हणजे अंतःकरण शुद्ध होऊन उपासना स्थिर होईल. मनाला शांती लाभेल. त्यामुळे आत्मज्ञान होऊन मोक्षाचा लाभ होईल. याप्रमाणे जो वागेल तो शेवटी पूर्ण सुखी होईल.'

महामृत्यूचे आमंत्रण आल्यावर ईश्वरी इच्छा समजून क्षीणता जेष्ठ वद्य अमावस्येस वाढली असतानाही प्रतिपदा उगवतांच, सिद्धासन घालून, देवाकडे मुख फिरवून, त्राटकाने श्वास निरोधन करून दीर्घ प्रणवोच्चाराने, ब्रह्मस्वरूपी देह विसर्जन केला. संन्यास धर्माप्रमाणे दंडाचे तीन तुकडे करून स्वामींचे मांडीवर ठेवून, शिष्यांनी देह नर्मदेला अर्पण केला आणि धर्मभास्कर स्वामी दत्तस्वरूपांत विलीन झाले.

श्री वासुदेवानंद सरस्वती महाराजांनी ४ ते ५ हजार पृष्ठांचे ग्रंथभांडार रचलेले आहे. त्यांच्या ग्रंथावरून दत्तभक्तीचे, धर्मनिष्ठेचे प्रगाढ चिंतनशीलतेचे आणि लोकांच्या उद्धाराच्या तळमळीचे प्रत्यंतर दिसून येते. वर्णाश्रमोचित कर्तव्ये, भक्तीच्या अधिष्ठानावर सर्वांनी अगदी काटेकारपणे आचारावी असा त्यांचा दृष्टिकोन होता. आचारधर्मावर त्यांचा विशेष कटाक्ष होता. त्यांच्या स्तोत्र रचनेमध्ये भारतीय संस्कृतीतील श्रद्धास्थानांचा महिमा भक्तिभावाने व समर्थवाणीने गायिलेला आहे.

त्यांच्या, श्री गांडा महाराज, श्री दीक्षित स्वामी, श्री सीताराम महाराज, श्री रंगावधूत स्वामी, श्री गुळवणी महाराज, श्री नाना महाराज इ. श्रेष्ठ विभूतींनी सद्गुरूनिष्ठेने दत्तभक्तीचा गोडवा आणि 'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' हा थोरल्या महाराजांनी प्रापंचिकांसाठी सिद्ध करून दिलेल्या मंत्राने संपूर्ण भारत खंडास व्यापून टाकले आहे. थोरल्या महाराजांनी लोकांना दिलेला आशीर्वाद हा त्या व्यक्तिपुरता सिमीत नसून त्यांच्या पिढ्यान् पिढ्या उद्धरणारा अमृतमयी आशीर्वाद आहे. माझे सद्गुरू प.पू. नाना महाराज तराणेकर यांचे पट्टशिष्य श्री अरविंदकाका आगाशे यांनी लिहीलेले 'स्वामी माझा लेकूरवाळा' या अभ्यासपूर्ण पुस्तकाच्या संग्रहात महाराजांच्या 'कृपांकितांचा सुगंध' या शीर्षकाखाली १४६ कृपांकितांचे जीवन दर्शन दिले आहे. यांत २० जणांची नुसती समजलेली नावे असून त्यांची माहिती उपलब्ध नाही असाही उल्लेख आहे. ह्यावरून आगाशे काकांनी किती परिश्रमाने ह्या भाग्यवंतांचा संग्रह संग्रहित केल्याचे लक्षात येते.

ह्या संकलित लेखाची प्रेरणा देणारे माझे सद्गुरू प.पू. नानामहाराज तराणेकर होत. 'सद्गुरूंच्या अनुग्रहाच्या ध्यासाने, परमार्थाच्या अंतरंगांत शिरण्यासाठी वयाच्या आठव्या वर्षी संपूर्ण समर्पणाच्या तयारीने गुरुप्राप्तीसाठी 'श्री गुरुचरित्रांची शास्त्रशुद्ध सलग सात पारायणाद्वारे, एकोणपन्नास दिवसाच्या खडतर साधनेने सद्गुरूंना प्रसन्न करून त्यांनी थोरल्या महाराजांचा अनुग्रह प्राप्त केला.' प.पू. नानामहाराजांच्या माझ्यावरील कृपाछत्रामुळे मला माझे परमगुरू थोरले महाराज, यांचेवरील समजलेले काही अप्रकाशित प्रसंग.

१. पुण्यातील प्रसिद्ध वैद्य रा. शि तथा भाऊसाहेब मराठे (१९०२ - २०००) हे त्यांच्या वयाच्या चौथ्या-पाचव्या वर्षी इंदूर संस्थानातील संस्थानच्या दवाखान्यांत डॉक्टर म्हणून काम करीत असलेल्या 'बडवई' येथे मामांकडे राहात होते. योगायोगाने त्यावेळी 'बडवई' येथे श्री वासुदेवानंद सरस्वती टेंब्ये स्वामी यांचे चातुर्मासानिमित्त नर्मदा तटाकी वास्तव्य होते. मामांमुळे त्यांना त्यांचे दोन वेळा दर्शन घडले. व त्यांनी दिलेले तीर्थ प्राशन करावयास मिळाले. 'श्री स्वामींजवळ पळी पंचपात्र वगैरे काही नसे. ते आपला हात त्यांचे हातावर पालथा करीत आणि त्यांच्या हातातून हातावर तीर्थ पडत असे.

२. थोरले महाराज भिक्षेसाठी दुपारच्या वेळेस नाशिकमधील काळ्या रामाच्या अगदी पाठीमागे असलेल्या जुन्या वाड्यांत गेले असता, तेथे खेळणाऱ्या लहान मुलीकडे पाहून तिच्या भिक्षा वाढावयास आलेल्या आईस म्हणाले, 'माई हिला साधी सुधी समजू नका. तिची नीट आणि जास्त काळजी घ्या. ही मोठी झाल्यावर सद्गुरूपदाची धुरा संभाळणार आहे.

ती छोटी मुलगी म्हणजे खाडीलकरांची ठकू. महाराजांच्या यथार्थ आशीर्वादाने त्या झाल्या 'श्री भागीरथीनाथ महाराज वैद्य.' हंस-ब्रह्म-अत्रि-दत्त-नारायण-लक्ष्मण-बलभीम या सद्गुरू परंपरेतील आठवे गुरुपद

सद्गुरू श्री भागिरथीनाथ महाराजांनी भूषविले. संपन्न केले. (पुण्यांत डेक्कन जिमखान्यावर श्री भागिरथीनाथ महाराजांनी त्यांच्या गुरुंच्या नावे स्थापन केलेले श्री बलभीम मंदिर आहे.)

३. विदर्भातील आपल्या भ्रमंतीच्या काळांत थोरल्या महाराजांनी अडीच फूट उंचीची पितळेची दत्ताची मूर्ती एका मारवाडी गृहस्थास दिली व मी ज्याला द्यावयांस सांगेन त्याला दे सांगितले. पुढे जवळ जवळ पंचेचाळीस ते पन्नास वर्षांनी प.पू. पाचलेगावकर महाराज त्याला भेटले व त्यांनी ती मूर्ती मागितली. प्रत्यक्षांत आधल्या रात्री थोरल्या महाराजांनी 'स्वप्नांत येऊन उद्या तुझ्याकडे येणाऱ्यांस ती मूर्ती देण्यांस सांगितले.' मात्र मूर्तीमुळे झालेली भरभराट लक्षांत घेऊन 'त्याने मूर्ती नसल्याचे' सांगितले. त्याच रात्री पुन्हा महाराजांनी स्वप्नांत येऊन 'मी जशी भरभराट करू शकतो तसाच नायनाटही करू शकतो' हे सांगितले. दुसऱ्या दिवशी पुढील गावी जात असलेल्या प.पू. पाचलेगावकर महाराजांना शोधून त्यांची माफी मागून त्या मारवाडी गृहस्थाने मूर्ती सन्मानपूर्वक दिली. सध्या ही मूर्ती प.पू. पाचलेगावकर महाराजांच्या खामगांवच्या आश्रमांत आहे.

४. श्री. अरविंदकाका आगाशे ह्यांनी फक्त नाव समजले असा 'स्वामी माझा लेकुरवाळा' मध्ये उल्लेख केलेल्या श्री पंची ह्यांचे घरी, त्यांच्या आजोबांना 'थोरल्या महाराजांनी' दिलेल्या 'छाटीचे' आणि त्यांच्या आजीला 'स्वामी समर्थांनी' ओटीत दिलेल्या 'गणेश मूर्तीचे' दर्शन व सुस्पर्श अचानकपणे न मागतां, न मागोवा घेता, कायम अंतःकरणांत बसून गेला. ते भाग्य मला माझ्या नानामहाराजांमुळे लाभले. दर्शनानंतर समजलेल्या गोष्टी.

आजोबांचे नाव केशवराव पंची. ते निजामाचे काळांत पेशकार होते. त्यांना व त्यांच्या आजीला थोरल्या महाराजांकडून अनुग्रह व मंत्र मिळाला व त्यावेळेस त्यांना अनुग्रहाचे वेळी 'छाटी' भेट म्हणून दिली. त्यांचे पश्चात ती छाटी वडीलांकडे म्हणजे विष्णूपंत पंची यांचेकडे आली. (ते निजामाचे काळात को ऑपरेटीव्ह ऑफिसर होते.) आजोबांनी प्रथम आषाढ शुद्ध प्रतिपदेस देह ठेवावयाचा ठरविला. परंतु घरच्यांच्या आग्रहामुळे तो विचार बदलून श्रावण शुद्ध एकादशी (पुत्रदा एकादशी) दिवस ठरविला मात्र ह्या दिवशी त्रिपाद योग असल्याने त्यांनी द्वादशीस बारा ब्राह्मणांना दक्षणा दिली व देह ठेवला. (१९३६ साली) ही इच्छामरणाची ताकद 'थोरल्या महाराजांमुळे' असे ते सांगत. वडील एक संत पुरुष होते. व गुळवणी महाराजांचे स्नेही होते. आई-वडीलांना थोरल्या महाराजांचा अनुग्रह घेण्याची इच्छा होती. परंतु तो योग नव्हता. कारण थोरले महाराज समाधिस्त झाले. मात्र एके दिवशी अचानकपणे एकाच वेळी आजोबा, आजी आणि वडिलांच्या स्वप्नांत थोरले महाराज आले व सांगितले 'दीक्षित स्वामी नृसिंह सरस्वतीचा गुरुमंत्र व अनुग्रह घ्यावा.' त्याप्रमाणे वडीलांनी दीक्षित स्वामींकडून अनुग्रह घेतला. नोकरीच्या निमित्ताने वडिलांना खूप हिंडावे लागे. तरी त्यांनी नेहमीची उपासना व साधनेत खंड पडू दिला नाही. थोरले महाराज कित्येकदा त्यांना संदेश देत असत. एकदा बैलगाडीतून जाताना रात्रीच्या वेळेस अचानक बैलगाडी थांबली. गाडीवानाने घाबरून सांगितले की चंद्रप्रकाशांत दोन वाघ दिसत आहेत. त्यामुळे बैल हालत नाही. त्यांनी गाडीवानास मागे बसविले व स्वतः कासरा हातात घेऊन थोरल्या महाराजांना हाक मारली व ते करुणात्रिपदी म्हणू लागले. तत्काळ दोन्ही वाघ निघून गेले व त्यांचा पुढील प्रवास सुरू झाला. वडीलही इच्छामरणी होते. त्यांनी प्रथम एकनाथ षष्ठीस देह ठेवावयाचे ठरविले. मात्र दिवस चांगला नाही म्हणून तुकाराम बिजेस देह ठेवीन असे सांगितले व त्याप्रमाणे १९७१ साली बिजेस देह ठेवला.

५. वाडीला ज्या तीन घरी थोरले महाराज भिक्षा मागावयास जावयाचे त्यातील एक घर 'विष्णू बाबाजी पुजारी' यांचे, त्यांचे नातू 'दिगंबर शंकर पुजारी' ह्यांनी सांगितलेली आठवण. माझी आजी स्वच्छतेची भोक्ती. रोज संपूर्ण घर गोठ्यापासून आढ्यापर्यंत झाडून झाल्याशिवाय ती स्वयंपाकास सुरुवात करीत नसे. महाराज यावयाच्या वेळेस सर्व तयारी असावी असे आजोबांना वाटे. बाहेर महाराजांचा 'नारायण' म्हणून आवाज आला की ते चिडून विचारायचे की एवढ्या मोठ्या विभूतीला किती वेळ उभी ठेवणार? आजी म्हणायची, 'मी ताजे ताक देईन मोठा गडवा भरून. ती ताक आणावयाची. महाराज हसायचे. कारण ताक त्यांना आवडते. ते ताक पिऊन पुन्हा थोडे वर बरोबर घेऊन परत जायचे. त्या दिवशी उरलेल्या घरी ते जातच नसत.

६. आपल्या भ्रमंतीच्या काळात, सन १९०५ मध्ये, पुणे-सासवड-यवत मार्गावरील, पुण्यापासून ४५ कि.मी. अंतरावर असलेल्या राजेवाडी गावातील मोठ्या अवार असलेल्या व अश्वत्थ वृक्ष असलेल्या राम मंदिरात महाराज राहिले होते.

***श्रीपाद श्रीवल्लभ नरहरी दत्तात्रेया दिगंबरा***
***वासुदेवानंद सरस्वती सद्गुरुनाथा कृपा करा.***
***॥ अवधूत चिंतन श्री गुरुदेव दत्त ॥***

**श्री. अरविंद बा. बीडकर**
४, जयति, संगम नगर, पद्मावती, पुणे ३७.
फोन : २४२११२०७



# मंत्रविज्ञान - शोध आणि बोध

**प्रा. प्र. श्री. डोरले**

*एम्. ए. बी. एड्. (मराठी) सेवानिवृत्त प्राचार्य ज्युनिअर कॉलेज मलकापूर जि. बुलढाणा ६ पुस्तके प्रकाशित वीर सावरकर, स्वामी विवेकानंद व अध्यात्मावर प्रवचने व भाषणे 'एन्. सायक्लोपिडिया ऑफ हिंदुइझम' १० व्या खंडात २८ लेख कोलंबिया युनिव्हर्सिटी अमेरिकामध्ये प्रकाशित होणार आहेत.*

भारत भूमी ही पुण्यभूमी आहे. धर्मभूमी आहे. मोक्षभूमी आहे. अनेक संत - महंत - ऋषि - मुनी या भूमीत जन्मले आणि ईश्वरभक्तिचा, आराधनेचा, उपासनेचा मार्ग सामान्य जीवांच्या उद्धारासाठी त्यांनी तयार करून ठेवला. याच संतांनी अनादि काळापासून भारतीय संस्कृती घडविली, वाढविली आणि इतिहासाच्या वाटचालीतील अनेक घातक व भीषण झंझावातामधून रक्षिली. आपल्या तपःपुत जीवनानुभूतीतून उपदेशात्मक वाणीतून समाजाचे अंतःकरण घडविले, त्यांच्या मनावर सात्विकतेचे संस्कार केले. षड्रिपुमुळे दुर्गुणांनी प्रदुषित झालेले त्यांचे अंतःकरण शुद्ध केले त्यांतून शाश्वत जीवनाचा आनंद त्यांच्या जीवनात निर्माण केला. आध्यात्मिकता हा भारतीय परंपरेचा वारसा आहे. तो या सर्व श्रेष्ठ संतांनी जोपासला, वाढविला, टिकविला आणि आपल्या पुढील पिढीच्या स्वाधीन केला. त्यामुळेच ईश्वरनिष्ठांची मांदियाळी या भूमीत निर्माण झाली. त्यांच्या अथक प्रयत्नामुळेच मानवी जीवनाला शाश्वत आनंदाचे, सत्-चित्-आनंदाचे अधिष्ठान सतत मिळत राहिले. याच एका ईश्वरीकार्यासाठी वेग-वेगळ्या कालखंडात, विविध नाम-रूपांनी यांचा आविर्भाव झाला. संत श्रीतुकोबारायांनी याची साक्ष देतांना स्पष्टपणे म्हटले की -

***आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासी ।***
***बोलिले जे ऋषी । साच भावे वर्ताविया ॥***

मानवी जीवनाचे संधारण, संवर्धन आणि संरक्षण करण्यासाठी अनेक संतांचा अवतार या भूमीवर झाला आहे. चिंतनशील ऋषिंनी संशोधित केलेली जी सनातन व शाश्वत जीवनमूल्ये आहेत त्यांना आपल्या जीवनात प्रत्यक्ष आचरणात त्यांनी आणून दाखविले. त्यामुळे हे संत म्हणजे या प्राचीन जीवनमूल्यांचे चालते-बोलते रूपच असतात. स्वतःच्या आचरणाने त्याचा वस्तुपाठच ते समाजापुढे-समोर ठेवतात. आधि केले आणि मग सांगितले' या न्यायाने त्यांना आदर्श ठेऊन, त्यांच्यापासून अनेक लोक प्रेरणा घेऊन स्वतःचे जीवनसार्थकी लावण्याचा प्रयत्न करतात, 'जेयांच्या लीळेमाजी नीती । जियाली असे'। असे वर्णन श्री ज्ञानेश्वर माऊलींनी त्यांचे केले आहे. अशाच साक्षात्कारी संतांच्या प्रेरणेने असंख्य पाऊले ईश्वरभक्तिची वाट चालू लागतात. अशा या अवतारी सत्पुरुषांच्या मालिकेत "अनंतकोटी ब्रह्मांडनायक राजाधिराज श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्री वासुदेवानंद सरस्वती टेंबेस्वामीमहाराज' हे स्वतःच्या अलौकिक तेजाने, तळपणारे दत्तात्रेयाचे अवतार असे अवतारी संत आहेत. त्यांचे पुण्यस्मरण करण्याचा हा एक अल्प प्रयत्न आहे.

प.प. श्रीमत् वासुदेवानंद सरस्वतींचे जीवन हे अलौकिक आहे. अतर्क्य, अद्भुत अशा घटनांनी परिपूर्ण आहे. मानवी बुद्धीच्या आवाक्यापलीकडील असे आहे. आपल्या फक्त साठ वर्षाच्या जीवन कालखंडात त्यांनी सनातन वैदिक धर्माच्या विविध पैलूंचे, सामर्थ्याचे, दैवी गुणवत्तेचे, नराचा नारायण करणाऱ्या संस्काराच्या विकसन प्रक्रियेचे जे सर्वस्पर्शी दर्शन घडविले ते विलक्षण आहे. सनातन वैदिक धर्माचे आचरण मानवाला करता येऊ शकते याचे प्रत्यक्ष उदाहरण संपूर्ण मानव समाजासमोर सादर करण्यासाठीच त्यांचा अवतार झाला होता. तोच त्यांच्या जीवनाचा उद्देश होता. इ.स. १८९१ मध्ये त्यांनी संन्यास ग्रहण केला. उज्जैन येथे दंडग्रहण करतेवेळी श्रीदत्तप्रभूंनी "आज सर्वत्र वर्णाश्रमधर्माचा लोप झाला आहे. तरी यापुढे सर्व भरतखण्डात पायीच संचार करून सर्व लोकांना उपदेश करावा व धर्ममार्गाची स्थापना करून ईश्वरनिष्ठा व स्वधर्मनिष्ठा जागृत करावी" अशी त्यांना आज्ञा करून त्यांच्या अवताराचा हेतू स्पष्ट केला. आपले आराध्य दैवताच्या म्हणजे गुरुदत्तात्रेयांच्या या आदेशाचे पालन समाधिस्थ होईपर्यंत म्हणजे वयाच्या साठाव्या वर्षापर्यंत पू. स्वामींनी तंतोतंत केले. त्या व्रताच्या जोपासनेसाठी अतोनात कष्ट, परिश्रम केले. पू. स्वामींच्या जीवनातील वाटचालीत 'तितिक्षा' कशी असते याचे पूर्ण दर्शन घडते.

पू. श्री. स्वामींचे जीवन कर्म, उपासना, योग, ज्ञान यांनी परिपूर्ण असे आहे. वेद, उपनिषदे, ब्रह्मसुत्र, शंकराचार्यांचे संपूर्ण ग्रंथ, रामायण, महाभारत, श्रीमत् भागवत, श्रीगुरुचरित्र या व इतर सर्व धार्मिक ग्रंथाच्या द्वारा त्यांनी संपूर्ण भरत खंडात फिरून लोकांचे प्रबोधन केले. त्यांना उपदेश देऊन उपासनेला लावले. सन्मार्गाला लावले. भक्ति, ज्ञान, कर्म आणि योग यामध्ये ज्याचा जसा अधिकार असेल त्याप्रमाणे त्याला उपदेश करून त्या जीवात्याला साधनसंपन्न केले. आध्यात्मिक मार्गातील 'अधिकारी' पुरुष केले. त्यांच्या प्रमुख शिष्यपंचायतनावरून ही गोष्ट सिद्ध होते.

पू. श्री स्वामीमहाराजांच्या जीवनाला विविध आयाम आहेत. असंख्य पैलू आहेत. भारतीय ज्ञान परंपरेतील १८ विद्या ६४ कला जणू त्यांच्यासमोर हात जोडून उभ्या आहेत. सृष्टिमधील 'समग्र कार्य-कारण भाव' हा त्यांच्यासमोर 'करतलअमलावत्' न्यायाने स्वतःच स्वतःचे संपूर्ण रहस्योद्घाटन करीत आहे असे अनेक चमत्काकर हे त्यांच्या जीवनाचे, व्यक्तिमत्वाचे अभिन्न अंग आहेत. आयुर्वेदापासून तो ज्योतिषशास्त्रापर्यंत, भाषाशास्त्रापासून ते मंत्र विज्ञानापर्यंत, नित्य आन्हिकातील स्तोत्ररचनेपासून तो अत्यंत जटिल, तांत्रिक, यज्ञयागापर्यंत, आहारशास्त्रापासनू तो वास्तुशास्त्रापर्यंत असे एकही शास्त्र नाही की ज्यात पू. श्री स्वामीमहाराजांची गती नव्हती. त्यांच्या ठायी विद्यमान असलेल्या असाधारण गुरुभक्तिमुळे श्रीगुरुगीतेत म्हटल्याप्रमाणे 'एवं विधं गुरु ध्यात्वा, ज्ञानयुत्पद्ये स्वयं' अशी त्यांच्या ठिकाणी स्वयंभू ज्ञानशक्ती परिपूर्णतेने अस्तित्वात होती. त्या ज्ञानशक्तिच्या साह्याने त्यांनी अनेकांना सन्मार्गाला लावले. त्रिविधतापांनी

पोळलेल्या अनेक संत्रस्त जीवांचा उद्धार करून 'बुडते हे जन न देखवे डोळा। म्हणूनि कळवळा येत असे।' ही संत स्वभावाची उक्ती सार्थ केली. या लेखात त्यांच्या ठिकाणी अस्तित्वात असलेल्या मंत्रसामर्थ्याचा आणि सनातन धर्माचे परंपरागत एक प्रमुख लक्षण असलेल्या मंत्रविज्ञानाचा विचार त्यांच्याच कृपासाह्याने करण्याचा प्रयत्न करू. त्या आधी पू. श्री. स्वामीमहाराजांच्या जीवनातील मंत्रसामर्थ्याचे दर्शन घडविणाऱ्या कांही घटनांचा मागोवा घेऊ.

१. पू. श्री स्वामीमहाराजांचा त्यांच्या व्रतबंधानंतर म्हणजे वयाच्या आठव्या वर्षापासून वेदांचे अध्ययनाचा संबंध आला. त्यांचे पिताश्री श्री. गणेशभट यांना श्रीदत्तगुरुंच्या आशीर्वादानेच सर्व मार्गदर्शन मिळाल्याने सद्‌गुरुच्या कृपेचे कवच पू. श्री स्वामीमहाराजांना लहानपणापासूनच सहज प्राप्त होते. पूर्वजन्मातील संस्कारामुळे त्यांची मेधाशक्ती, प्रज्ञाशक्ती अत्यंत तीव्र होती. त्यामुळे गुरुगृही मिळालेल्या वेदमंत्रांची संथा व त्यांचे पाठांतर त्वरित होत असे. या अध्ययनात त्यांना त्यांचे आजोबा श्री हरिभट यांचीही खूप मदत मिळत असे. पू. श्री स्वामी लहानवयापासूनच वैदिक परंपरेला आवश्यक त्या सर्व गोष्टींचे नियमांचे कडकडीत पालन करीत. त्यांचे वेदाध्ययन नित्य सोवळ्यात व स्त्रीशूद्रादिकांपासून दूर राहूनच होत असे. वेदमंत्रांच्या सिद्धीसाठी आवश्यक असलेल्या अन्नशुद्धी, आचारशुद्धी, ब्रह्मचर्यव्रताचे नैष्ठिक पालन, या बाबतीत त्यांनी कधीही तडजोड स्वीकारली नाही. यामुळे त्या वेदमंत्रातील शक्तींची सिद्धी त्यांना सहजपणे प्राप्त झाली. संपूर्ण आयुष्यभर त्यांच्या साह्याने त्यांनी अनेकांचे जीवनातील कष्ट, समस्या या दूर केल्या आहेत. 'आचारः प्रथमो धर्मः' याप्रमाणे आचार हेच धर्मांचे एकमात्र अधिष्ठान आहे हा सिद्धांत त्यांनी आयुष्यभर पालन केला.

### सर्पबंधन

पू. श्री स्वामी कांही लोकांसमवेत शेजारच्या गांवी कांही अनुष्ठानासाठी निघाले होते. सहजपणे गप्पा करीत असतांना अचानक त्या सर्वांना एका पिवळ्या जर्द जातिवंत नागाचे दर्शन झाले. नागाच्या भितीने सर्व थांबले. पुढे जाण्याची हिम्मत होईना. पू. श्री. स्वामींनी पुढे येऊन तांदूळ अभिमंत्रीत करून त्य सर्पाभोवती सर्पबंधन मंत्राने वर्तुळाकार पेरले. नाग हतबुद्ध झाला. सर्वांनी त्याला त्यातच अडकलेले पाहिले. नियोजित कार्य करून सर्व परतले. सकाळच्या प्रसंगाची स्मृतीही कुणाला राहिली नाही. दुसरे दिवशी आपले आन्हिक आटोपतांना श्री स्वामींना त्या प्रसंगाची आठवण आली. चोवीस तास होऊन गेले होते. ते त्वरित त्या जागेवर आले. तो नाग त्याच अभिमंत्रित वर्तुळात फिरतो आहे हे त्यांना आढळले. त्यांनी विमोचन मंत्राचा प्रयोग करून त्याला बंधनमुक्त केल्याबरोबर तो नाग गतीने जवळच्या झुडपात पळून गेला. मंत्र सामथर्याचा हा पहिला अनुभव पू. श्री स्वामीमहाराजांना आला. पुढील आयुष्यात या प्रकारचे अनेक चमत्कार त्यांच्याकडून घडले आहेत.

### गायीच्या बाधेचे निवारण

पू. श्री स्वामी एकदा आपल्या विवाहित बहिणीला भेटण्यासाठी गेले होते. त्यांच्या बहिणीकडे 'तांबु' नांवाची एक गाय होती. ती बाधित झाली होती ती कुणाला म्हणजे, तिच्या पाडसालाही जवळ फिरकू देत नव्हती आणि दूधही देत नव्हती. बहिणीने पू. श्री स्वामींना सांगितले. पू. श्री स्वामींनी त्या गायीकडे एकाग्र नजरेने पाहिले. त्यांच्या लक्षात आले की ही गाय बाधित झाली आहे. त्यांनी हातपाय धुतले. चिमुटभर अंगारा घेऊन तो मंत्राने अभिमंत्रित केला. गाईच्या डोक्याला लावला व तिच्या पाठीवर थाप मारून आचळाला हात लावला. सर्वांना आश्चर्य वाटले की दोन दिवसांपासून अंगाला स्पर्शही न करू देणाऱ्या या गाईने पान्हा सोडला आणि भरपूर दूध दिले.

### पिशाच्चाने बाधित घर

पू. श्री. स्वामी एकदा आपल्या दुसऱ्या विवाहित बहिणीकडे गेले. त्या घराच्या शेजारी एक पडके घर होते व त्या घरातून रात्रीच्या वेळी भयानक रडण्याचा आवाज आला. ते पैशाचिक रडणे सतत सहा महिन्यांपासून सर्व लोकांना त्रस्त करीत होते. त्याचा बंदोबस्त करण्याचा मांत्रिकांनी खूप प्रयत्न केला पण कांहीही उपयोग झाला नाही. पू. श्री स्वामींनी आपले आन्हिक आटोपल्यावर पिशाच्च विमोचन मंत्रांनी अभिमंत्रित केलेल्या तांदुळाच्या अक्षता त्या घरात फेकल्या. त्याबरोबर त्या घरातील पैशाचिक रडण्याचा बंदोबस्त झाला. भुताटकीने बाधित झालेले ते घर 'मुक्त' झाले.

कांही उदाहरण म्हणून वरील कांही प्रसंग घेतले आहेत. पू. श्री स्वामींच्या जीवनात तर या प्रकारच्या असंख्य घटना आहेत. माणगांवच्या वास्तव्यात सुमारे सात वर्ष- अनेकांना पू. श्रीस्वामींच्या अंगी असलेल्या या विविध मंत्रसिद्धींचा अनुभव आला आहे. शेवटी भगवान श्रीदत्तात्रेयांकडूनच ज्यावेळी'आता हा बाजार बंद करा' या प्रकारचा आदेश आला त्यावेळीच मंत्रसिद्धीचा, मंत्रसामर्थ्यचा विनियोग त्यांनी कमी केला. पू. श्री स्वामीमहाराजांच्या जीवनातील त्यांच्या ठिकाणी असलेल्या या मंत्रविज्ञानाच्या उपलब्धीचा विचार करतांना कांही प्रमुख गोष्टी लक्षांत घेणे जरूर आहे की ज्यांच्यामुळे त्यांना हे सहजशक्य होऊ शकले.

१. श्री भगवान दत्तात्रेय त्यांना आदेश देऊन लोककल्याणाची कामे करून घेत होते. कधी हे आदेश त्यांना स्वप्नात होत तर कधी जागेपणी तर कधी आकाशवाणीच्या रूपाने त्यांना मिळत.

२. मंत्रविज्ञानसिद्धीसाठी आवश्यक असलेली क्षमता पू. श्रीस्वामींनी स्वतःच्या तपश्चर्येतून प्राप्त केली होती. वेदविद्या हिला श्रुती म्हणतात. 'वेदाभ्यासोहि विप्रस्य तपः' या शास्त्र वचनावर पू. श्री स्वामींचा पूर्ण विश्वास होता. त्यामुळे कडकडीत तपाचरण शास्त्रानुकूल जीवनवहन त्याच्या जोडीने आचार शुद्धी जसे त्रिकाल संध्यावंदन नियमित करणे, परान्न कधीही न घेणे, चांद्रायण व्रतासारख्या व्रत पालनाने देहशुद्धी करणे, जमिनीवर झोपणे इत्यादि साधन शुचितेमुळे त्यांच्यामध्ये मंत्रसिद्धीला आवश्यक असलेल्या ग्रहणक्षमतेचा अधिकार सहजपणे आला होता. त्यामुळेच त्यांच्या जीवनचे ते एक अभिन्न अंग म्हणून होते. प्रत्यक्ष श्रीगुरुदत्तात्रेयांकडून त्यांना 'मंत्रानुग्रह' झाल्याने साक्षात् सद्‌गुरुदत्तात्रेयांच्या समग्र शक्तिचे अभिसरण त्यांच्यात झाले होते. त्यामुळेच प्राचीन ऋषींप्रमाणे मंत्रांचे द्रष्टेपण सहजपणेच त्यांच्याठिकाणी होते. त्यांच्या पुण्यस्मरणाचे निमित्ताने भारतीयांचे मंत्रविज्ञान शास्त्राचा कांही विचार करू या !

### मंत्रविज्ञान शास्त्र

भारतीय संस्कृतीत मंत्रविज्ञानशास्त्र हे अतिशय प्रगल्भ रूपाने विकसित झाले आहे. प्राचीन वाङ्‌मयात या बद्दलचे खूप पुरावे सापडतात. मंत्रविज्ञानाचे आधारावर अनेक शास्त्रांची निर्मिती या संस्कृतीत झाली आहे. मंत्रसिद्धी ही योगसिद्धीचे एक महत्त्वाचे अंग म्हणूनच समजली गेली आहे. योगशास्त्राचे

रचनाकार महर्षी पातञ्जल मुनींनी एका सूत्रात वर्णन केले आहे की 'जन्मौषधिमंत्र तपः समाधिजाः सिद्धयः' म्हणजे कांही लोकांना जन्मतःच सिद्धी प्राप्त होतात, काहींना औषधींपासून तर काहींना मंत्रजपापासून व समाधिपासून सिद्धी प्राप्त होतात. पू. श्री स्वामीमहाराजांना वर वर्णन केल्याप्रमाणे अखंड नामस्मरण 'श्वासोश्वासे दत्तात्मन' आणि समाधिमुळे अनेक मंत्रांची सिद्धी ही प्राप्त झाली होती.

मंत्रविज्ञान शास्त्राच्या बाबतीत भारतीय शास्त्रांची एक स्पष्ट धारणा आहे. त्यांच्या विनियोगासंबंधी, फलश्रुतिसंबंधी निश्चित अशी अनुभूती आहे. मंत्र ही एक शक्ति असून त्या शक्तीच्या साह्याने धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थाची सहजपणे उपलब्धी होऊ शकते ही ती स्पष्ट अनुभूती होय. त्यांची व्याख्या करतांना असे म्हटले आहे की

***मननात् सर्व भावानां त्राणात्संसार सागरात् ।***
***मन्त्ररूपाहि तच्छक्तिर्मनन त्राण रुपिणि ॥***

संपूर्ण भावाचे मनन आणि संपूर्ण जगताचे त्राण करणाऱ्या मन आणि त्राण रूपी शक्तीला मंत्ररूपा असे म्हणतात. हीच मंत्रशक्ती होय. याचे विधिपूर्वक अनुष्ठान केले असता त्यामधून अनेक शक्तींचे सामर्थ्य उदित होते.

वेदकाळापासून ऋषिमुनींची ही स्पष्ट धारणा आहे की ज्यावेळी ब्रह्माची अभिव्यक्ती सृष्टिरूपाने होण्यास प्रारंभ होतो त्यावेळी पहिल्यांदा 'नाद' 'ध्वनि' निर्माण होतो. या नादातून सृष्टि निर्माण होते. 'वागेव विश्वा भुवनानि यज्ञे' या प्रसिद्ध सूत्रात हाच सिद्धांत वर्णन केला आहे. वैदिक ऋचा म्हणजे अतींद्रिय अवस्थेत ऋषींनी जे मूळ 'ध्वनी' वा 'नाद' अनुभवले ते ध्वनी त्यांनी शब्दरूपाने मांडलेत त्यांचेच रूप होत. याचाच अर्थ असा की 'प्रत्येक वस्तूचे मूलभूत शब्द व शब्दसमूह त्यांची रूपे व नाद आकाशतत्त्वात अस्तित्वात असतात. 'ऋचेः अक्षरे परमे व्योमन्' हे म्हटले जाते ते याच अर्थाने समजावे. त्याचमुळे वैदिक शब्दसंहिता, वर्णसंहिता ही हे त्या मूळ नादाच्या ध्वनिच्या अधिकाधिक जवळचे आहेत. नाद, ध्वनी हे शब्दाच्या आधी निर्माण होतात आणि 'वाच्यार्थ' 'पदार्थ' त्यानंतर निर्माण होतात हा दुसरा सिद्धांत 'अर्थः सृष्टेः पूर्वम् शब्दसृष्टिः' त्यांनी संशोधित केला.

शब्दांच्या उच्चाराने 'नाद' निर्माण होतो. त्यामुळे वातावरणात कंपने निर्माण होतात. त्या कंपनलहरी आघातानुसार, उच्चारानुसार तीव्र, संथ, गतिमान, ऱ्हस्व, दीर्घ, शांत या प्रकारच्या असतात. या कंपनलहरी वातावरणाच्या माध्यमातून वर्तुळाकार गतीने विश्वात पसरतात आणि त्यांना अनुकूल असलेल्या, सुसंवादी समानधर्मी असलेल्या अंतराळातील शक्ती घेऊन आपल्या मूळ जागी परततात. त्याची परिणामकारकता, फलश्रुति ही मंत्रवेत्त्यच्या संकल्पावर व विनियोगावर अवलंबून असते. त्याचमुळे मंत्रात देवता, शक्ति, त्याचबरोबर 'संकल्प आणि विनियोगाला खूप महत्त्व आहे. त्यानुसार त्या मंत्रदेवता फळ देतात. 'ऋचोअक्षरे परमेव्योमन् । तस्मिन् इंद्रो वरुणो मित्रो अर्यया ओकांसि चक्रिरे । म्हणजे अक्षर व शाश्वत म्हणजे नित्य अशी वेदाक्षरे महदकाशरूपी परब्रह्मात असतात व तेथे अग्नि, वरूण, इंद्र या देवतांची स्थाने असतात. या ठिकाणी मंत्राशी आबद्ध असणारी देवता मग मंत्रकर्त्याच्या संकल्पानुसार कार्यरत होत असते.

मंत्रविज्ञानाचे हे वैशिष्ट्ये लक्षात घेतले की पू. श्री स्वामीमहाराजांच्या पुढील व याप्रकारच्या इतर अनेक घटनांचा अर्थ व त्याचबरोबर त्यांच्या मंत्र सामर्थ्याचा प्रत्यय येतो. रहस्य लक्षात येते.

पू. श्री स्वामीमहाराज माणगांवाला असतांना एकदा गुरुद्वादशीच्या उत्सवाला प्रचंड गर्दी झाली होती. अश्विन महिन्यात कोकणात पाऊस तसा खूप पडतो. उत्सवाची महाप्रसादाची तयारी झाली. भोजनासाठी हजारोंच्या पक्ती बसल्या. इतक्यात पाऊस पडू लागला. लोक चिंताग्रस्त झाले. भोजन विस्कळीत होणार. सर्व पू. श्रीस्वामींकडे आले. त्यांना विनंती केली. ते म्हणाले, 'एक मोठा नैवेद्य वाढून आणा.' त्याप्रमाणे आणला. श्री स्वामींनी वरुण देवतेची मंत्रगर्भ प्रार्थना केली. "भोजन होईपर्यंत म्हणजे प्रसाद ग्रहण करेपर्यंत येथे वृष्टी करू नये", ही प्रार्थना करताच त्या परिसरात इतरत्र सगळीकडे पाऊस पडला पण देऊळवाडीमध्ये मात्र सर्वांचे भोजन होईपर्यंत पावसाचा एक थेंबही पडला नाही. वेदातील ऋषिंनी इंद्र, वरुण, उषा, मरुत, सूर्य या अंतरिक्षातील देवतांच्या प्रार्थना केल्या आहेत. त्या - त्या मंत्राचा विनियोगाप्रमाणे त्या देवतांनी सामर्थ्य प्रकट केले आहे. येथेही तसेच घडले. कारण पू. श्री स्वामींच्या ठांयी ते मंत्रवेत्तेपण होते. ते सामर्थ्य होते. या प्रसंगाने

***देवाधीनं जगत् सर्वम् मंत्राधिनंच दैवतम् ।***
***ते मंत्राः ब्राह्मणाधिना - ब्राह्मणो मम दैवतम् ॥***

ही उक्तीही सार्थ झाली.

याच काळात पू. श्रीस्वामींना मराठीतील श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ संस्कृतमध्ये लिहिण्याचा आदेश झाला. त्यानुसार त्यांनी तो लिहिला. त्यांचे लेखन चालू असतांना श्री नारोपंत उकिडवे यांनी पाहिले की श्रीस्वामी महाराज अतिशय वेगाने एकामागून एक श्लोक लिहीत आहेत. त्यांना आश्चर्य वाटून त्यांनी विचारले, 'तुम्ही इतक्या वेगाने कसे लिहू शकता? आपली ही लिखाणाची गती पाहून मी आश्चर्यचकित झालो आहे. त्यांवर पू. श्रीस्वामी म्हणाले की, 'मी जे श्लोक लिहितो त्यांतील अक्षरे मला स्वच्छ व स्पष्ट दिसू लागतात. ती मी लिहून काढतो. वास्तविकपणे या लिखाणात माझा कांही संबंध नाही.'

वेदांचे जे 'अपौरुषेयत्व' आहे ते याच प्रकारचे आहे. पू. श्रीस्वामी महाराज हे 'मंत्रद्रष्टे ऋषी' होते. त्यांनी या भावावस्थेत रचलेले सर्व ग्रंथ व स्तोत्रांची जातकुळी ही या वेदप्रणित मंत्रविज्ञानाची आहे हे लक्षांत घेतले पाहिजे. म्हणजे त्याचे अनुष्ठान, उपासना कोणत्या श्रद्धेने केले पाहिजे हे आपल्या लक्षात येऊ शकेल. ऋषि, मुनी हे जसे वेदांचे द्रष्टे होते त्यांप्रमाणे पू. श्री स्वामीमहाराज हे द्रष्टे होते.

ध्वनिशास्त्रातील आधुनिक संशोधनानेदेखील सत्य मान्य केले आहे. मंत्रातील शब्दांच्या ध्वनिकंपनांचा 'इथर' या द्रव्यावर परिणाम होऊन त्या माध्यमातून बाह्य आणि शरीरांतर्गत पिंड रचनेवर त्याचा एक निश्चित परिणाम होतो. सूक्ष्मरूपाने घडणारा हा परिणाम सातत्याने, नियमाने जर होत गेला तर तो 'सघन' अशा स्वरूपात केंद्रीभूत होत जातो. त्याचमुळे मंत्रविज्ञानात, मंत्रसाधनेत नियमितपणाला, नित्य साधनेला, निश्चित जपसंख्येला अतिशय महत्व आहे. पू. श्री स्वामींच्या साधनाकाळात त्यांनी केलेल्या विविध अनुष्ठानांच्या, उपासनेच्या बाबतीत अत्यंत कठोरपणाने पालन केलेल्या नियमांचे, आग्रहीपणाचे महत्व यावरून सहजपणे लक्षात घ्यावे. नित्य उपासना आन्हिक झाल्याशिवाय तोंडात अन्नाचा एक कण व पाण्याचा एक थेंबही ते घेत नसत. त्यांची साधनाकाळाची परिस्थिती व

उपासना श्रीसमर्थ रामदास स्वामींनी वर्णन केल्याप्रमाणेच होती. ते म्हणतात-

*नित्यनेम प्रातःकाळी । माध्यान्हकाळी सायंकाळी ।*
*नामस्मरण सर्वकाळी । करीत जावे ॥*
*हरुषकाळी विषयकाळी । पर्वकाळी प्रस्तावकाळी ।*
*विश्रांतिकाळी निद्राकाळी । नामस्मरण करावे ॥*
*चालता बोलता धंदा करिता । खाता जेविता सुखी होता ।*
*नाना उपभोग भोगिता । नाम विसरो नये ॥*
*(श्रीदासबोध द. ४ था. समास ३ रा)*

या उपासनेच्या तादात्म्यातूनच त्यांची इष्ट देवता श्रीगुरुदेवदत्त यांच्याशी ते एकरूप झाले होते. देव भक्तांचे ऐक्य झाले होते. श्री ज्ञानेश्वर माऊलीने वर्णन केलयाप्रमाणे-

*हृदया हृदय येक जाले । ये हृदयीचे ते हृदयी घातले ।*
*द्वैत न मोडिता केले । आपणाऐसे अर्जुना ॥१४२१॥*
*दीपें दिप लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला ।*
*द्वैत न मोडिता केला । आपणपे पार्थु ॥१४२२॥*

पू. श्रीस्वामीमहाराज आणि सद्गुरुदत्त यांच्या या तादात्म्य शक्तीत मंत्रसामथर्याचे विज्ञान आहे.

## तादात्म्याचे विज्ञान - आधुनिक संशोधन

शंभर वर्षापूर्वी स्वामी विवेकानंदांनी अमेरिकेमधील विज्ञाननिष्ठ लोकांना म्हटले होते की 'भारतीयांचे धर्मविज्ञान आणि उपासनाविज्ञान समजण्यासाठी तुमच्या विज्ञानाला अजून शंभर वर्षे लागतील' - स्वामी विवेकानंदांची भविष्यवाणी आज खरी ठरली आहे.

१९६२ साली शिकागो येथील 'टेड सिरियन' नावांच्या व्यक्तिच्या ठिकाणी 'तादात्म्याची विलक्षण शक्ती' अस्तित्वात असल्याचे परा-मानस विज्ञान शास्त्राचा (पॅरा-सायकॉलॉजी) अभ्यास करणाऱ्या संशोधकांच्या लक्षात आले. टेड सिरियन हा एखाद्या विषयाशी इतका तद्रूप होऊन जात असे की जर त्या अवस्थेत त्याचे फोटो काढलेत तर ज्या विषयाशी तो तद्रूप झाला असेल त्याच्या छटा अधिक प्रभावीपणे दृग्गोचर होत असत. भगवान श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या चरित्रात अशीच उदाहरणे आहेत. 'राम होवोनि रामासि भजावे' किंवा 'रामासी इतुके भजावे की स्वये रामचि व्हावे' या साधकाच्या अवस्था या तादात्म्य शक्तीचीच रूपे आहेत. टेड-सिरियनच्या अंगी असलेल्या या तादाम्यशक्तीचे अनेक शास्त्रज्ञांनी, भौतिकशास्त्रज्ञांनी, जीवशास्त्रज्ञांनी, परा-मानसशास्त्रातील संशोधकांनी विविधांगी निरीक्षण व परीक्षण केले. त्यासाठी विविध प्रयोग, विविध चाचण्या (टेस्ट) घेतल्यात. त्या सर्व प्रयोगातील 'सत्यानुभूतीमुळे' ते आश्चर्यचकित झाले. त्यांच्या विविध भावसमाधिच्या अवस्थेतील फाटोंना वृत्तपदांनी खूप प्रसिद्धी दिल्याने त्याच्या नांवाचा खूपच गाजावाजा झाला. त्याच्या ठिकाणी विद्यमान असलेल्या तादात्म्यशक्तीमुळे, एकरूपतेच्या सामर्थ्यामुळे दोन महत्त्वाचे प्रश्न शास्त्रज्ञांसमोर, वस्तुनिष्ठ (ऑबजेक्टिव्ह) पद्धतीने विचार करणाऱ्या बुद्धिवाद्यांसमोर आणि तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणाऱ्या विचारवंतांसमोर उभे राहिलेत. ते खालीलप्रमाणे-

अ) तादात्म्य शक्तीमुळे, एखाद्या वस्तु, भावधारेच्या चिंतनामुळे (ध्यानामुळे) ध्येय व ध्याता यांच्यामध्ये एखादा भौतिक म्हणा, मानसिक म्हणा संपर्क प्रस्थापित होतो काय? त्या संपर्कामुळे परस्परात एखादी रासायनिक प्रक्रिया संभवते काय?

ब) सृष्टीत असे एखादे तत्त्व आहे काय की जे मानवी चेतनेचा संबंध भूतकाल व भविष्यकाळाशी जोडू शकते?

वरील महत्त्वाच्या प्रश्नांचा वस्तुनिष्ठ अभ्यास करण्यासाठी, त्यांतील विज्ञान शोधण्यासाठी सर्व शास्त्रशाखाती तज्ज्ञांची एक समिती स्थापन करण्यात आली. त्या समितीचे नांव होते 'एलिट - सोसायटी - फॉर - सायिकिक रिसर्च' - या समितीच्या सन्माननीय अध्यक्षा होत्या 'श्रीमती पॉलीन ओहलर'. त्यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन झालेल्या या विद्वत्सभेने टेड सिरियन याच्या तादात्म्य शक्तीचे सर्वबाजूंनी सर्व स्पर्शी असे सखोल अध्ययन केले. संशोधन केले. संशोधनाच्या निष्कर्षात टेड सिरियन याच्या ठांयी विद्यमान असलेल्या तादाम्यशक्तीचे अस्तित्व मान्य केले. त्याचबरोबर त्याचे पूर्ण स्पष्टीकरण करण्यास आजचे विज्ञान हे असमर्थ आहे याची कबुली दिली. या सर्व प्रायोगिक निष्कर्षाचे अल्पांशाने स्पष्टीकरण करण्याचा, त्यांतील वैज्ञानिक सत्य मांडण्याचा प्रयत्न सुप्रसिद्ध अमेरिकन जीवरसायनशास्त्रज्ञ डॉ. कॅमेरॉन यांनी केला. याचा तपशील मांडतांना ते म्हणतात -'मनुष्यशरीराची रचना ज्या कोशांनी होते त्यांत 'न्युक्लिक ॲसीड' नावाचे एक तत्व असते. ते ध्यानाच्या द्वारा किंवा एखाद्या विशिष्ट विचारांच्या तादालद्वारा सातत्याने, निरंतरपणे प्रवाहीत, प्रभावित करता येऊं लागले की ते अतिशय शक्तिशाली होते. तो शक्तिशाली प्रवाह हा कोठेही प्रक्षेपित करता येतो. त्यामुळे 'ध्येय व ध्याता' यांच्यात परस्पर संबंध प्रस्थापित करता येऊ शकतो. एकाचे कांही घटक व गुण दुसऱ्यात व दुसऱ्याचे पहिल्यात हस्तांतरीत, प्रतिबिंबित करता येतात.'

अमेरिकेतील डॉ. कॅमेरॉन यांच्या जोडीने इंग्लंडमधील बी. एफ. गुडरिच कंपनीचे रिसर्च डायरेक्टर डॉ. डब्ल्यु. एल. सेनॉन व इटलीचे जीवशास्त्रज्ञ यांनी या संदर्भात संशोधन सूक्ष्मध्वनी तरंगाच्या द्वारा केले. ते म्हणतात -

"तादात्म्यात, तद्रूपतेत अखंडत्वाने व सातत्याने उद्घोषित होणाऱ्या वैचारिक लहरींमुळे वा विशिष्ट ध्वनिंच्या कंपनांमुळे (गुरुद्वारा प्राप्त इष्ट मंत्राच्या जपामुळे का?) निर्माण होणारे नाभिकिय रसायन' अज्ञात असलेल्या स्थळांपर्यंत, घटनांपर्यंत पोहचण्यास समर्थ बनते व त्याचा परिणाम म्हणून ध्येय वस्तूचा संदेश, प्राण, प्रकाश अंतःकरणात उतरू लागतात. ही ध्येय वस्तू, संदेश प्रकाशरूप अस्तित्व म्हणजेच आपल्या इष्ट देवतेचे, आराध्य देवतेचे दर्शन वा साक्षात्कार होय.

पू. श्रीस्वामी महाराज त्यांचे तयांचे इष्ट दैवत, आराध्य दैवत श्रीगुरुदत्तात्रेय यांच्याशी पराकोटीचे तादात्म्य होते. एकरूपता होती. त्यांतूनच त्यांच्या ठिकाणी अभूतपूर्व अशा मंत्रसिद्धीचे सामर्थ्य प्रकट झाले होते. या प्रकारच्या तादाम्याचा पुरावा आधुनिक संशोधनातूनही सहजपणे सिद्ध झाला आहे. त्यामुळे 'मंत्रविज्ञान, मंदासामर्थ्य' म्हणजे एक थोतांड आहे. अंधश्रद्धा आहे असे म्हणून नाकारणे हे योग्य होणार नाही.

## ध्वनिलहरी - आधुनिक संशोधन

मंत्र म्हणजे विशिष्ट शब्दांचा एक समूह असतो. त्याच्या शास्त्रशुद्ध उच्चारणाने ध्वनि-नाद उत्पन्न होतो. त्या नादातून 'कंपने' निर्माण होतात. त्या कंपनांमध्ये एक निश्चित परिणाम घडविण्याचे सामर्थ्य असते. भारतीय मंत्रयोगातील ही प्रमुख धारणा आहे.

ध्वनिलहरींचा, नादलहरींचा वातावरणावर एक निश्चित परिणाम होतो हे आता या क्षेत्रातील आधुनिक संशोधनानेही सिद्ध झाले आहे. यापैकी कांही प्रयोगांची माहिती खालीलप्रमाणे -

१. श्रीमती वॉटस् ह्ज या चांगल्या गायिका आहेत. वादक आहेत. इंग्लंडमध्ये लॉर्ड लीटन यांच्या घरी अनेक प्रसिद्ध संशोधक, विचारवंत यांच्या उपस्थितीत त्यांनी प्रयोग करून दाखविला. त्यांनी विविध प्रकारच्या राग रागिण्या वाजवल्या आहेत. त्या प्रत्येक वेळी तेथे ठेवलेल्या 'स्पेक्टोग्राफ मशिनवर' विविध प्रकारच्या आकृती - जसे - पाने, फुले, त्रिकोण, षट्कोन, सर्पाकृती - दिसल्यात यावरून ध्वनिलहरींचा, स्वरलहरींचा, नादलहरींचा स्वरांच्या आरोह - अवरोहांनुसार वातावरणावर परिणाम होतो व त्यानुसार त्यांच्या रेखाकृती निर्माण होतात हा सिद्धांत सिद्ध झाला.

२) याच प्रकारचा प्रयोग फ्रान्समध्ये 'मॅडम - लैंगे' या गायिकेने करून दाखविला. तिच्याही गायनाने, वादनाने याच प्रकारचा परिणाम सिद्ध झाला. तिने तन्मयतेने भावविभोर होऊन ज्यावेळी एक धार्मिक गीत म्हटले त्यावेळी उपस्थितांना अतिशय आश्चर्य वाटले. कारण 'स्पेक्टोग्राफरवर' बालक येशूला कडेवर घेऊन उभी असलेल्या मेरीचे चित्र त्यांना दिसले व वातावरणात एक प्रकारचे गांभीर्य भरून राहिले असल्याची अनुभूती त्यांना आली.

३) इटलीमध्ये झालेल्या प्रयोगात एका भारतीयाने सामवेदातील ऋचेवर आधारित रचना वाजविली. त्याचा परिणाम म्हणून वीणा पुस्तक धारिणी सरस्वतीचे चित्र उमटले. या प्रकारचे अनेक प्रयोग शास्त्रज्ञांनी केले आहेत. वरील सर्व प्रयोगांनी हे सिद्ध झाले की, ध्वनींच्या कंपनलहरींचा परिणाम हा बाह्य व आंतरिक सृष्टीवर निश्चित होतो.

(श्रीमती वॉटस व्ह्यूज लिजित - 'पायस - फिंगर्स' - मधून) मंत्रविज्ञानाला हे कसे शक्य होते? त्याची मीमांसा भारतीय मंत्रयोगात केली आहे.

## पिंड - ब्रह्मांडाची एकरूपता

भारतीय सृष्टीविज्ञानशास्त्रानुसार हे संपूर्ण विश्व पाच महाभूतांचे मिळून बनले आहे. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश. यांच्या सूक्ष्म तन्मात्रांपासून आपला देहही बनला आहे. यावरूनच 'पिंडी ते ब्रह्मांडी' ही अतिशय विज्ञाननिष्ठ असा सिद्धांत आपल्या पूर्वसुरींनी मांडला आहे. विश्व आणि व्यक्ती हे दोन्हीही एकमेकांशी संबंधित आहेत. फक्त त्याची अनुभूती आपल्याला घेता येत नाहीं. हा अनुभव साधना, उपासना, योग, मंत्रानुष्ठान या द्वारा घेण्याचे शास्त्रशुद्ध मार्गदर्शन मंत्रविज्ञानात आहे. पिंड आणि ब्रह्मांडाचे हे सामरस्य सर्वच संतांनी वर्णिले आहे. प्रातिनिधिक स्वरूपात आपण श्रीरामदास स्वामींचे म्हणणे पाहू.

*पाचभूते ते ब्रह्मांडी । आणि पाचची वर्तती पिंडी ।*
*याची पाहावी रोकडी । प्रचीत आता ॥१।५।३७॥*
*पांचा भूतांचे ब्रह्मांड । आणि पंचभूतिक ते पिंड ।*
*या वेगळे ते उदंड । अनुमान ज्ञान ॥*
*जेचि पिंडी तेचि ब्रह्मांडी । प्रचित नाही की रोकडी ।*
*पंचभूतांची तातडी । दोहीकडे ॥१।५।४०॥*

या प्रकारे विश्व ब्रह्मांडाचा आणि पिंडाचा अन्योन्य संबंध आहे. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश या महाभूतांचा आणि शरीरांतर्गत असलेल्या त्यांच्या शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या तन्मात्रांचा परस्परांशी अन्योन्य संबंध आहे. शब्द हा आकाशाचा स्पर्श, वायूचा दुपट्टा, अग्निाचा, रस हा आपाचा आणि गंध हा पृथ्वीचा असा परस्पर अनोन्य संबंध आहे. संपूर्ण विश्वातील अणुरेणु हे याप्रमाणे परस्परांशी एकरसतेने, एकरूपतेने संबंधित आहेत. आजच्या आधुनिक संशोधनाने सिद्ध झालेले हे 'सत्य' संशोधकदेखील प्रांजळपणे मांडून राहिले आहेत. भौतिकशास्त्राची अत्याधुनिक शाखा 'एनर्जी फिजिक्स' यांत संशोधन करणारे एक विख्यात संशोधक 'फ्रिटजॉफ कॅपरा' यांनी हेच सत्य सांगताना म्हटले आहे की -

"The most important charecteristic of the Estern World view is the Basic oneness. All things are seem as interdepenent and inseparable parts of the cosmic whole; as different manifestations of the same ultimate Reality... As we study the various models of subatomic physics we shall see that they express again and again in different ways the same insight... that the constitutents of matter and the basic phenomena involving them are all interconnected, interrelated and interdependent. They can not be understood as isolated entities but only as integrated parts of the whole." (Taio - Physics मधून )

विश्वातील अणूरेणूंचा परस्परांशी असणारा हा अविच्छेद, एकरस संबंध सिद्ध झाल्यानंतर कोणत्याही मंत्रसाधनेचा व मंत्रजपाचा परिणाम कसा होतो ? साधकाचे शरीर, त्याच्या सभोवताली असलेले वातावरण, त्याच्या शरीरांतर्गत होणारे बदल. या नादलहरींचा प्रवास याचेही सखोल संशोधन आज विविध ज्ञानशाखांमध्ये होते आहे. अतिशय जिज्ञासेने या सर्व प्रक्रियेचा शोध घेणे चालू आहे.

## मंत्रजपाचा देहांतर्गत परिणाम

विविध प्रयोगाने बाह्यवातावरणावर स्वरलहरींचा कसा परिणाम होतो हे आपण पाहिले. या मंत्रसाधनेचा देहावर अंतर्गत परिणाम कसा होतो या बाबतीत प्रयोग केले असता असे लक्षात आले आहे की या मंत्रोच्चाराने उत्पन्न झालेली कंपने (व्हायब्रेशन्स) आपल्या मेंदूमधील सूक्ष्मातिसूक्ष्म (न्युरॉन्स) पेशींना - ज्या अब्जावधी आहेत - कंपित करतात. त्यांतून एका विशिष्ट लयीमध्ये निर्माण झालेली ही कंपने तेथून सिम्पॅथेटिक नर्व्हजपर्यंत जातात. त्यानंतर 'सेन्सरी नर्व्हज' मध्ये जातात. वाक् इंद्रियांशी संबंधित पेशीसमूहातून शब्दोत्पादक पेशींमधून (हायपोग्लॉसल नर्व्ह) वाहक पेशीसमूहातून (मोटर-नर्व्हज) उच्चारले जातात. या प्रकारे वातावरणातून पंचमहाभूतातील समानधर्मी शक्तिनी अधिकाधिक सामर्थ्यशाली बनून पिंड-ब्रह्मांडाच्या एकरूपतेच्या आयामात, परिघात तो साधक वावरू लागलो. त्याच्या मनरूपी संकल्पानुसार एक निश्चित परिणाम घडविण्याचे सामर्थ्य त्याच्या अंगी सहजपणे येऊ लागते यालाच आपण 'मंत्रयोगाची सिद्धि' योगसिद्धि असे संबोधू लागतो. ज्याच्या अंगी हे सामर्थ्य आहे, त्याला सिद्धमहात्मा, योगी असे म्हणू लागतो.

पू. श्री. स्वामी वासुदेवानंद सरस्वती महाराज हे मंत्रयोगी होते. सिद्धपुरुष होते. योगसिद्ध महात्मा होते. श्रीगुरुदेवदत्त सद्गुरुशी एकरूप झालेले, तादात्म्य झालेले सत्पुरुष, अवतारी महापुरुष होते. त्यामुळे सर्व योगसिद्धि, मंत्रदेवता त्यांच्यासमोर हात जोडून उभ्या असत. सृष्टितील चर, अचर, पशू, पक्षी, प्राणी, वनस्पती, वाहणाऱ्या सरिता या पासून तो

अंतराळातील विविध नक्षत्र देवता, जड वास्तूतील अदृश्य शक्ति, पिशाच्च योनिमधील वेताळापासून तो ब्रह्मसंमंध, ब्रह्मराक्षसापर्यंत, विश्वरचनेतील नियोजित कार्य करणाऱ्या देवांच्या गणापासून तो योगिनीपर्यंत सर्व अस्तित्वावर त्यांचे प्रभुत्व होते. त्याचा विनयोग त्यांनी सद्गुरुंच्या आदेशाप्रमाणे जगत्कल्याणासाठी केला. आपले अवतारकार्य विविध प्रकारे संपन्न केले. प. प. पू. श्रीस्वामीमहाराज हे 'योगसिद्ध' महापुरुष होते. पातञ्जल मुनींनी साक्षात्कारी, सत्याची अनुभूती प्राप्त झालेल्या अशा सत्पुरुषाचे सामर्थ्य साधनपादातील सूत्र क्रमांक ३६ मध्ये वर्णन केले आहे. ते सूत्र पुढीलप्रमाणे -

सत्यप्रतिष्ठायां क्रियाफलाश्रयत्वम् ॥३६॥

सूत्रार्थ - योग्याच्या ठिकाणी सत्य स्थिरभावास प्राप्त झाले म्हणजे एखादी क्रिया केल्यावरच ते फल प्राप्त व्हावयाचे ते फल ती क्रिया कुणी केली नसतानाही त्या योग्याच्या इच्छेचा आश्रय करिते. म्हणजे योग्याच्या केवळ इच्छेमात्र करूनच ते फल निष्पन्न होते.

वरील सूत्राचा थोडक्यात विचार करायचा झाला तर तो असा करता येईल की ईश्वराने निर्माण केलेल्या सृष्टिमध्ये 'कार्य कारण भाव' हा अखंड कार्यरत असतो. विशिष्ट क्रिया केली म्हणजे तिचे विशिष्ट फळ मिळणार हा तो सिद्धांत होय. पण सत्यव्रती, योगी, सिद्धाचे तसे नसते. त्याचे सामर्थ्य या कार्यकारण भावाच्या मर्यादा सहजपणे ओलांडून जातात. त्याच्या वाणीत, संकल्पात इतके सामर्थ्य असते की त्याच्या इच्छेप्रमाणे, संकल्पाप्रमाणे त्यांनी व्यक्त केलेल्या शब्दांप्रमाणे लगेच घटना घडून येतात. हे अमोघ सामर्थ्य निर्माण होण्याचे कारण कोणते ?

त्याचे कारण म्हणजे हा सत्पुरुष पूर्ण ईश्वरशरण असतो. त्याच्याशी तादात्म्य झालेला असतो. एकरूप झालेला असतो आणि मागे वर्णन केलेल्या 'तादात्म्याचे विज्ञानामुळे त्याच्यात ते सामर्थ्य सहजपणे आले असते. त्याचे जीवनच सृष्टीशी समरस झाले असते. त्या समरसतेमुळे त्याचेही जीवन आप, तेज, वायू, आकाश, सूर्य, चंद्र या शक्तिप्रमाणे एक असेच झालेले असते. त्याचाच अर्थ असा की त्याचे या पंचमहाभुतांवर प्रभुत्व आलेले असते. त्या सुसंवादित्वामुळेच अप्रतिहत सामर्थ्याचा प्रत्यय त्यांच्या जीवनचरित्रात आढळून येतो. पू. श्री. स्वामीमहाराजांचे संपूर्ण जीवनच ईश्वरनिष्ठ आणि सृष्टिसंवेदी झाले होते. त्यामुळे त्यांच्या चित्तात, मनात संकल्पयुक्त जी जी स्पंदने निर्माण झालीत - ती शब्द, ध्वनीरूपाने, नादरूपाने - शब्दरूप होऊन बाहेर प्रकट झाली म्हणजे 'मंत्ररूपानेच' ती सिद्ध झालीत. पू. श्रीस्वामी महाराजांची स्तोत्र, समग्र वाङ्मय जे मंत्रगर्भ आणि मंत्रसिद्ध आहेत त्याचे रहस्य हेच आहे.

प. प. पू. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपाशिर्वादाने या श्रद्धेने व निष्ठेने त्यांनी दर्शविलेल्या मार्गाने उपासना करण्याचे मनोबल आपणा सर्वांना प्राप्त व्हावे ही त्यांच्या चरणी प्रार्थना करू या. त्यासाठी -

***ध्यानमूलं गुरोर्मूर्तिः पूजामूलं गुरोः पदम् ।***
***मंत्रमूलं गुरोर्वाक्यं मोक्षमूलं गुरोः कृपा ॥***

या एकांतिक निष्ठेने त्यांच्या भक्तीत तल्लीन होण्याचा प्रयत्न करू.
॥ अवधूत चिंतन श्रीगुरुदेव दत्त ॥

**प्रा. प्र. श्री. डोरले**
'शिल्पा' अपार्टमेंट २/१४, श्रीरामकृष्ण परमहंसनगर,
पौड रोड, कोथरूड, पुणे ३८.



# प. पू. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेम्बे) स्वामीमहाराज विरचित कुमारशिक्षा, युवशिक्षा व वृद्धशिक्षा

**डॉ. सौ. सुमती देशपांडे**

*एम्. ए. मराठी, एम्. एड्., पीएच. डी. मराठी-हिंदी भारुड काव्य - एक अभ्यास ३० वर्षे नोकरी, कर्मवीर भाऊराव पाटील हिरे हायस्कूल उपमुख्याध्यापिका म्हणून निवृत्त. ३ वर्षे नामदेव अध्यासनांत संशोधन सहाय्यक. संत साहित्यावर निरनिराळ्या मासिकातून लेख.*

### प्रास्ताविक

हिंदुधर्म आणि त्याचे व्यवच्छेदक लक्षण असलेला वर्णाश्रमधर्म यांच्या रक्षणासाठी आणि पुनरुज्जीवनासाठी 'दत्तसंप्रदाय' निर्माण झाला. भागवतात विष्णूचे चोवीस अवतार सांगितलेले असून 'दत्तात्रेय' हा त्यामधील सहावा अवतार आहे. हा पूर्णब्रह्म असून कल्पान्तीही तो अविनाशीच आहे, अशी दत्तसांप्रदायिकांची श्रद्धा आहे. दत्तसंप्रदायाची उपासना कठोर, अवघड आहे. ती योगरूप असल्यामुळे ब्रह्मचाऱ्यांसाठी आहे. दत्तसंप्रदायात गृहस्थाश्रमाचे आचरण करणाऱ्या असंख्य प्रापंचिकांना 'गुरुचरित्र' पारायणाची उपासना सांगितलेली आहे. आचारभ्रष्ट समाजाला गुरुचरित्रकारांनी एक नवा आचार निर्माण करून दिला आहे. सर्वसामान्य लोकांसाठी नाना प्रकारची व्रते वैकल्ये सिद्ध केली आहेत. ब्रह्मा-विष्णु-महेश यांच्या एकीकरणातून एका नुन्याच संप्रदायाचा त्यांनी पुरस्कार केला आणि आक्रमणाच्या पडत्या काळात समाजाचे रक्षण केले. हा संप्रदाय महाराष्ट्र, आन्ध्रप्रदेश, आणि कर्नाटकातील एक प्रधान संप्रदाय आहे. या संप्रदायाचे उपास्य दैवत 'दत्तात्रेय' आहे. महर्षी अत्रि यांचा पुत्र 'दान' म्हणून जगास मिळाला म्हणून दत्त + अत्रेय = दत्तात्रेय बनला. ईश्वर आपल्याला पुत्ररूपाने लाभावा अशी महर्षी अत्रींची इच्छा होती. त्यांच्यावर प्रसन्न होऊन भगवंताने म्हटले, 'मी स्वतःला तुला देऊ केले आहे.' त्यामुळे भगवंताच्या या अवताराला 'दत्त' असे म्हणतात, असे भागवतात म्हटले आहे.

### थोडक्यात चरित्र

आधुनिक काळातील एक दत्तोपासक, सत्पुरुष, प्रख्यात वेदाभ्यासक, 'वासुदेवानंद सरस्वती' या नावाने प्रसिद्ध असलेले टेंबे स्वामी यांचे पूर्ण नाव वासुदेव गणेश टेंबे असे होते. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील माणगाव येथे श्रावण वद्य ५ शके १७७६ रोजी झाला. स्वामींचे आजोबा हरिभट टेंबे यांचे ज्येष्ठ चिरंजीव गणेशभट व पत्नी रमाबाई यांचे टेंबेस्वामी सुपुत्र होय ! गणेशभट नेहमी गाणगापूरला जात असत, त्यामुळे हरिभट हेच प्रपंच पहात. त्यामुळे स्वामींचे प्राथमिक संस्कृत शिक्षण हरिभटांच्याच मार्गदर्शनाखाली झाले. जात्याच तेजस्वी व तल्लख बुद्धीच्या स्वामींना विविध पाठशाळेत पाठवून संस्कृतचे अध्ययन केले. बालवयातच आजोबांकडून अमरकोश, रूपावली, नित्य स्तोत्रपाठ, अष्टाध्यायी या ग्रंथांचे शिक्षण त्यांनी घेतले. मौंजीबंधनानंतर श्री. तात्या उकिडवे यांच्याकडे वेदाध्ययन केले. गुरुचरित्राचे वाचन नित्य होतच असे. 'आचारोपरमोधर्मः' या शास्त्रवचनाचे काटेकोर पालन केले. वेदाध्ययनानंतर श्री शंभुशास्त्री साधले यांच्याजवळ याज्ञिकाचा अभ्यास केला. वयाच्या १९ व्या वर्षी अन्नपूर्णाबाईशी त्यांचा विवाह झाला. त्यांनी गृहस्थाश्रमाचे काटेकोर पालन केले. काही कालावधीनंतर झालेल्या दृष्टांतानुसार नरसोबाच्यावाडीला गेले. तेथे गोविन्दस्वामी या सत्पुरुषाच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी दत्तोपासना सुरू केली. त्यांना वारंवार दत्तात्रेयाचे साक्षात्कार होऊ लागले. दत्तात्रेयांनीच त्यांना मंत्रोपदेश दिला. त्यांनी योगाभ्यासही केला. इ.स. १८८२ मध्ये चांद्रायण व्रत केले. पुढे माणगाव येथे दत्तमंदिर बांधले. तेथे सातवर्षे मौन व्रतात राहून दत्तोपासना केली. इ.स. १८८९ मध्ये पत्नीसमवेत तीर्थयात्रेसाठी माणगाव सोडले. इ.स. १८९१ मध्ये यात्रेमधेच पत्नीचे निधन झाले. पत्नीनिधनानंतर १३ व्या दिवशी संन्यास घेतला आणि पुनः तीर्थयात्रा सुरू केली. विविध ठिकाणी राहून पुराणप्रवचनांद्वारे ते लोकांत धर्मजागृती करीत असत. अनेक ठिकाणी दत्तमूर्तीची प्रतिष्ठापना केली. उपासनेला प्रेरक अशी ग्रंथरचनाही केली. गरुडेश्वर (गुजराथ राज्य) येथे ज्येष्ठ वद्य ३० शके १८३८ रोजी त्यांचे निधन झाले. तेथे त्यांची समाधी असून दत्तपादुकांची स्थापना केलेली आहे. सात्विक वृत्ती, वेदोक्त आचार व संयम याद्वारे त्यांनी स्वतःचा आदर्श समाजापुढे ठेवला. त्यांची ग्रंथसंपदा संस्कृत व मराठीत असून ती प्रासादिक, हृदयाचा ठाव घेणारी व दत्तसंप्रदायाला तत्त्वज्ञानात्मक बैठक प्राप्त करून देणारी आहे. श्रीदत्तलिलामृताब्धिसार (१९०३), दत्तमालावर्णांकित माघमाहात्म्य (१९०४), कुमारशिक्षा (१९०९), लघुवासुदेवमननसार (१९१०), श्री दत्तमाहात्म्य (१९११), स्त्री-शिक्षा व स्त्रीगीते, दुसरी आवृत्ती (१९२१), अज्ञानतिमिरदीपक (१९२६) इत्यादी त्यांचे ग्रंथ महत्त्वपूर्ण आहेत. दत्तसंप्रदायाचा 'वेद' मानल्या जाणाऱ्या मराठी गुरुचरित्राचे यांनी केलेले संस्कृत भाषांतर म्हणजे समश्लोकी गुरुचरित्र होय!

### शिक्षात्रयम्

स्वामींच्या संप्रदायात प्रसिद्ध असलेल्या प्रश्नावलीतून अनेकांना जी साधने मिळतात, त्यात शिक्षात्रयाचे सार्थवाचन असे एक साधन आहे. 'शिक्षात्रयम' या ग्रंथाचे कुमारशिक्षा, युवशिक्षा व वृद्धशिक्षा असे तीन प्रकार आहेत. हे शिक्षात्रय प्रमाणानुसारी असल्यामुळे स्वामी हे इतर आप्तांप्रमाणे एक श्रेष्ठ आप्त आहेत हे कळून येते. त्यांच्या शुद्ध चारित्र्यावरून आसेतुहिमालयापर्यंत अनेक लोकांनी धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य या दिव्यगुणांनी युक्त असे 'स्वामी' पाहिले आहेत. या 'शिक्षात्रया' मध्ये मूळ संस्कृत श्लोकांचे भाषांतर केलेले आहे. क्रमाक्रमाने आपण थोडक्यात पाहू.

### कुमारशिक्षा

यातील मूळ संस्कृतश्लोकांचे भाषांतर पं. विष्णुशास्त्री खरे

न्यायवेदान्ताध्यापक, अद्वैतवेदान्तविद्यापीठ सातारा यांनी केलेले आहे. सत्य, ज्ञान, अनंत हेच दत्तात्रेयाचे म्हणजेच परमात्म्याचे स्वरूप आहे. हाच वेदान्ताचा अपूर्व म्हणजे इतरत्र कोठेही न आढळणारा सिद्धान्त बालवयापासून मनावर बिंबविण्यासाठी (कौमार आचरेत प्राज्ञ धर्मान् भागवतानिह भागवत ७:६:१) ही 'कुमारशिक्षा' स्वामींनी लिहिली. या शिक्षेतील चिंतनाने, प्रत्येकाने स्वतःचे स्वस्वरूप ओळखण्याचा प्रयत्न करावा एवढीच स्वामींची अपेक्षा आहे. कुमारशिक्षा केवळ बालांनाच नव्हे, तर बालवयात तसे संस्कार न झालेल्या सर्वांनाच उपयोगी पडणार आहे.

यामध्ये संस्कृत भाषेत १०४ श्लोक आहेत. प्रत्येक श्लोकातून निरनिराळे आचरणाचे नियम, अर्थ, काम, मोक्ष या विषयी स्पष्टीकरण केलेले आहे. ईश्वराचे रूप निराकार, निर्गुण असून ते चित्तशुद्ध असलेल्या साधकाला मोठ्या उपासनेने कळते, पाहता येते हे दृष्टान्ताद्वारे सांगितलेले आहे. उपनिषदातील काही कथा सांगून त्यातून मिळणारा बोध सांगितला आहे. याखेरीज धर्माचरणाचे फळ, कर्म कसे, कोणी, केव्हा करावे संन्यासाश्रम, नास्तिक-आस्तिक कोणाला म्हणावे, ईश्वराचे स्वरूप कृष्णातीरावर होणाऱ्या प्रभूच्या लीला, स्त्रियांनाही होणारे गुरुदर्शन, गृहस्थाश्रमाचे मुख्य कर्तव्य इत्यादी विषयांची उदाहरणासहीत चर्चा केली आहे. श्रुती आणि स्मृती या ईश्वराच्या आज्ञा आहेत, त्या विधिनिषेधांच्या योगाने कर्माधिकारी पुरुषाला अनर्थकारक कर्मापासून परावृत्त करतात. प्रेमळपणाने उपदेश करून कल्याणप्रद मार्गाकडे वळवतात.

*'उभे विधिनिषेधाभ्यां निवर्त्याधिकृतं नरम् ।*
*अनर्थत्वस्मार्थे ते नियोजयत आदरात् ॥४॥*

या ठिकाणी उभे हा शब्द श्रुती व स्मृती याबद्दल योजला आहे. वेद हे अपौरुषेय आहेत. त्यांचे अनुकरण करणारी जी शास्त्रे आहेत त्यांना 'स्मृतिग्रंथ' म्हटले आहे. वेदांना 'श्रुति' म्हटले जाते. श्रुति आणि स्मृति हे ग्रंथ म्हणजे माणसाचे दोन ज्ञानचक्षू आहेत. वेदअध्ययनाने ऋषिऋण, यज्ञयागादीनी देवऋण व संतति निर्माण करून पितृऋण यातून मुक्त होता येते. मुक्त झाल्यावर कर्म सोडून जर मोक्ष मार्गाला जाईल, तर त्याला कोणतेही विघ्न येत नाही. केलेल्या कर्माचे फळ चांगले किंवा वाईट हे भोगावेच लागते. हा कर्मसिद्धान्त बालपणापासूनच जाणून घेतला पाहिजे. तरच ती व्यक्ती अत्यंत दक्षतेने अनाचार किंवा अत्याचार यांच्या टोकाला न जाता कर्म केले पाहिजे असा विचार करेल. सदाचाराने धर्म, धर्माचरणाने संपत्ती, धर्माशी विरोध न करता विषयोपभोग घेणे, नंतर मोक्षप्राप्ती असा क्रम असेल तर बालपणापासूनच त्या व्यक्तिच्या आचरणात फरक पडेल. धर्माचरणाबरोबरच सत्संगही महत्त्वाचा आहे. दुर्जनांच्या सहवासात बुद्धिभेद होण्याची शक्यता जास्त असते. स्वतःची योग्यता ओळखून शुभेच्छा, विचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ति, असंसक्ति, पदार्थभावना व तुर्यगा अशा ज्ञानाच्या सात भूमिका आहेत. त्या क्रमाक्रमाने पार कराव्या लागतात. या सर्वाआधी चित्तशुद्धी आवश्यक असते. ही गोष्ट स्वामींनी स्पष्टपणे सांगितलेली आहे.

वेदांची आणि ईश्वराची अवज्ञा करणे हे नास्तिकपणाचे लक्षण असून असा मनुष्य जिवंत असून मेल्यासारखाच समजावा. तो नरकात पडेल असे 'कुमारशिक्षेत' स्पष्ट बजावले आहे. उलट ईश्वराचे अस्तित्व मानणारा व वेदोक्त कर्माविषयी आस्था बाळगणारा मोक्षाला जातो- असे कनोपनिषदातील एका आख्यायिकेद्वारे पटवून दिले आहे.

परमेश्वर हा एकमेवाद्वितीय असला तरी तो भक्तांसाठी देवी, गणपती, विष्णु, शंकर व सूर्य अशी पाच रूपे घेतो. सध्या कलियुगात कृष्णातीरी तो जागृत असल्याची ग्वाही स्वामींनी दिली आहे. श्रीनृसिंहसरस्वती स्वतः एका दत्तभक्ताकडे भिक्षेसाठी गेले. तेव्हा त्या भक्ताच्या पत्नीने अत्यंत आदराने, त्यांचा सत्कार करून त्यांना जोंधळ्यांच्या कण्यांची भिक्षा घातली. त्यावेळी त्या स्त्रीला साक्षात गुरुदर्शन झाले. अशा कथेतून स्त्रियांनाही कोणत्याही प्रकारे कमी लेखलेले नाही, त्यांना अनुष्ठान वगैरे करण्याचीही मुभा होती हे दाखविले आहे. प. पू. स्वामींनी कार्तिकस्वामींच्या पर्वतावर असतांना शास्त्रसिद्धान्ताचे अध्ययन न केलेल्या साधकांना योग्य मार्गदर्शन करण्यासाठी ही 'कुमारशिक्षा' लिहिली. अतिन्द्रीय ज्ञान असलेल्या महर्षींनी घालून दिलेल्या नियमांना लौकिक व्यवहाराच्या फुटपट्टीने मोजून चालणार नाही. त्यामुळे अंतिम हित तर होणारच नाही उलट अकल्याणच होण्याची शक्यता असते. म्हणूनच ही 'कुमारशिक्षा' मार्गदर्शक म्हणून उपयुक्त आहे.

धर्माचरण करणाऱ्याने दुर्व्यसनी, पाखंडी व आळशी लोकांची संगत धरू नये असे म्हटले आहे.

*'तथा त्यजेत् दुर्व्यसनिपाखण्डालससंगतिम्' ।*

कुमारशिक्षेची उपयुक्तता खालील श्लोकात वर्णन केलेली आहे.

*पक्ववाक्यप्रमाणज्ञा नित्यं पक्वान्नभोजिनः ।*
*तावत् कुमारशिक्षेयं बालानां प्रातराशवत् ॥१०४॥*

ज्याप्रमाणे लहान मुलांना सकाळची न्याहारी आवश्यक असते त्याप्रमाणे भोळ्याभाबड्या लोकांना ही 'कुमारशिक्षा' उपयोगी पडेल.

## युवशिक्षा

प. पू. स्वामींच्या 'युवशिक्षा' मधील १०१ संस्कृत भाषेतील श्लोकांचे मराठीत भाषांतर पं. श्रीपादशास्त्री जेरे, न्यायचूडामणि वेदान्तप्रवचनपटु - कोल्हापूर यांनी केले आहे. कुमारशिक्षेत सांगितलेल्या साधनांचे अनुष्ठान केलेल्या साधकाला उपासनामार्गाचा उपदेश करण्यासाठी ही 'युवशिक्षा' लिहिली आहे. ज्या भक्ताची चित्तशुद्धी असते त्याला दत्तात्रेय ज्ञान देतात त्यांचे 'सुशिक्ष' असे वर्णन केले आहे. अशा दत्तात्रयांचे भजन या युवशिक्षेत केलेले आहे. भजन म्हणजे उपासना हेही सूचित केले आहे. ईश्वराचे अस्तित्व नाकारणाऱ्यांना स्वामी म्हणतात, 'आपल्याला प्राप्त होणारी सुख-दुःखे आपल्या आधीन नसतात. ती आपल्याला प्राप्त होतात. ती देणारा कोणीतरी आहे - तो ईश्वर !

वेदांचे स्वरूप व इतर कोणत्याही प्रमाणांपेक्षा त्यांचे श्रेष्ठत्व कसे आहे याचे विवेचन यामध्ये केले आहे. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांची लक्षणे व वेदातील विधींबाबत असणारा मतभेद या विषयांचा विचार येथे केला आहे. या वेदांचे प्रयोजन सांगतांना हे तीन वेद यज्ञांकरता उपयोगी आहेत. यज्ञातील होता, हा ऋग्वेदी, अध्वर्यु हा यजुर्वेदी आणि उद्गाता हा सामवेदी असतो. चौथा वेद अथर्ववेद याचा यज्ञात उपयोग नसला तरी शांतिकर्म पुष्टिकर्म इत्यादी कर्मात त्याचा उपयोग होतो असे म्हटले आहे. वेदान्तामध्ये निरनिराळ्या अधिकाऱ्यांना उद्देशून निरनिराळ्या उपासना सांगितलेल्या आहेत. मुक्तीचे दोन प्रकार असून एक सद्योमुक्ती व दुसरी क्रममुक्ती ! यांच्या अनुक्रमे निर्गुण उपासना व सगुणोपासना आहेत. वाममार्गातील उपासना म्हणजे सुरामद्य इत्यादींचे सेवन करणे, याला

देहान्त प्रायश्चित्त सांगितले आहे. ब्राह्मणांनी तर या मार्गाचा मुळीच अवलंब करू नये असे कळकळीने सांगितले आहे. ८६ व्या श्लोकांपासून मूर्तीपूजेसंबंधी विस्ताराने विवेचन केले आहे. स्मृती, पुराणे, वेद यांनी सदाचार संपन्न अशा व्यक्तींनी मूर्तीपूजा केल्यास त्यांचा ऐहिक उत्कर्ष होतो व पारलौकिक सिद्धी प्राप्त होते असे म्हटले आहे.

*सगुणेशार्चया रामदासाद्याः अधुनातनाः ।*
*अत एवभवञ्शाब्दपरब्रह्म परायणाः ॥८॥*

या श्लोकांत श्री समर्थ रामदासांना श्रीरामचंद्रांच्या प्रतिमापूजनाने परब्रह्माचे शाब्दज्ञान व अपरोक्ष साक्षात्कारात निष्णात होणे साध्य झाले. मूर्तीपूजा ही विशेषतः मंदबुद्धीच्या लोकांसाठी सांगितलेली आहे. या ठिकाणी मंदबुद्धी हा शब्द शास्त्रीय ज्ञान नसणारे लोक या अर्थी वापरलेला आहे. सगुणोपासना उपासकाचे चित्त शुद्ध करते त्याला जितेन्द्रिय बनविते. पुढे त्याला निर्गुणसाक्षात्कार होतो. मूर्तीपूजेसाठी समर्थ रामदासांप्रमाणे श्रीनारायणस्वामींचे उदाहरण दिले आहे. श्री नारायणस्वामींची समाधी भंग होऊ नये म्हणून प्रत्यक्ष दत्तात्रेयांनी नारायणस्वामींचे रूप घेऊन त्यांच्या दोन मुलींचे रक्षण केले. मूर्तिपूजा निरर्थक किंवा अशास्त्रीय मानू नये असे स्वामींनी सांगितले. या युवशिक्षेमध्ये मुमुक्षूने स्वकर्माचरणाने ईश्वराला संतुष्ट करून मोक्ष मिळवावा असे म्हटले आहे. कर्माचे फळ केव्हा, कसे मिळते याची चर्चा केली आहे. वेद म्हणजे काय ते कसे उत्पन्न होतात इत्यादींची चर्चा ११ ते १५ श्लोकात केली आहे. कर्माचे दोन प्रकार अन्यांकरता जे नसते ते प्रधान व अन्यांकरता जे असते ते अंगकार्य असे म्हटले आहे. कर्माची प्रकृति, विकृति आणि या दोघांहून भिन्न अशी प्रवृत्ती सांगितलेली आहे. चित्तशुद्धी होऊन केलेली उपासना कशी महत्त्वाची आहे हे पटवून दिले आहे. उपासना सामर्थ्याने जो देह सोडून ब्रह्मलोकात जातो तो ब्रह्मलोक कसा आहे याचे वर्णन खालील श्लोकांत केले आहे.

*'यत्रापराजित पुरं हिरण्यमयगृहाणि च ।*
*अश्वत्थः सोमसवनः सरऐरंमदीयकम् ॥६७॥*
*अनन्यधिपतिस्तत्र सङ्कल्पादेव कामितान् ।*
*विषयान् स्थूलदेहेन कदाचित्सूक्ष्मदेहतः ॥६८॥*

या ब्रह्मलोकात पराभूत न होणारे नगर आहे. त्यामध्ये सुवर्णाची घरे, अमृतस्त्राव करणारा अश्वत्थ वृक्ष, ऐरंमदीय नावाचे सरोवर आहे. त्यातील पाणी अन्नाप्रमाणे असून हर्ष निर्माण करणारे आहे. येथे इच्छिलेले सारे स्थूलदेहाने भोगता येते. शिवाय हे सर्व उपभोगून ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतो, असे सांगितले आहे. शेवटच्या ९० ते १०१ श्लोकांमध्ये श्री नारायणस्वामींचे चरित्र सांगून या कलियुगातही उपासनेने उत्तम फलप्राप्ती होते हे सांगितलेले आहे.

*एवं ह्युपासनानि श्रुतिमुखप्र दितान्यत्र संदर्शितानि ।*
*प्राप्यांन्येषां यविष्टं तदिह परमया श्रद्धया भक्तिमत्या ।*
*योऽङ्गीकृत्वाऽप्युपास्तेऽपि सतिकलियुगे तारतम्याद्युपास्ते ।*
*सोऽन्यत्र अत्रात्मायवेयात् श्रुतिमुखगदितां मुक्तिमीशप्रसादात् ॥१०१॥*

भक्तियुक्त परमश्रद्धेने येथे जो उपासना करतो तो या जन्मात किंवा पुढील जन्मात मुक्त होतो. इतकेच नव्हे तर कलियुगात सुद्धा उपासना फलप्रद होते ती आवश्य करावी असे म्हटले आहे.

**वृद्धशिक्षा**

मूळ संस्कृतभाषेतील ७० श्लोकांचे मराठीत भाषांतर वे. शा. सं. पं. आत्मारामशास्त्री जेरे - न्यायवेदान्त अध्यापक तत्त्वज्ञान मंदिर अंमळनेर यांनी केले आहे. 'वृद्धशिक्षा' हा एक प्रकरण ग्रंथ असून वेदान्तातील सर्व विषय अत्यंत सूक्ष्म रूपाने यामध्ये चर्चिले आहेत. साधकाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या अशा पहिल्या श्लोकात चित्तस्थैर्याकरता प्रणवोपासना सांगून तिच्यामुळे भगवद्भक्ताला ज्ञानप्राप्ती होते असे म्हटले आहे. यामध्ये श्रवणमननादिकांची लक्षणे, षड्विधतात्पर्य लक्षणे, प्रयोजन, महत्त्व, दत्तमाहात्म्य इत्यादी ग्रंथांचे साररूप दत्तचरित्र यात आलेले आहे. उपनिषदे व ब्रह्मसूत्रे यांची उजळणी करणारा हा ग्रंथ आहे असे स्वामींनी म्हटले आहे. ॐ काराने सगुण व निर्गुण अशा उभयविध दत्तस्वरूपाचा बोध होतो. प्रखर वैराग्य नसले तरी तीव्र भक्तीभाव असलेला संन्यासी मोक्ष प्राप्त करू शकतो असे भक्तीचे माहात्म्य सांगितलेले आहे. मात्र अशा संन्याशाने भिक्षाटन, भगवंताचे नामस्मरण, स्नान व बाह्य आंतरिक शुद्धी, देवपूजा व ध्यान ही सहा कर्मे आवश्यक सांगितली आहेत. जन्मतः मनुष्याला प्राप्त होणाऱ्या देवऋण, पितृऋण, ऋषीऋण यांतून मुक्त झाल्याशिवाय मोक्ष मिळत नाही याला दत्तभक्त अपवाद आहे.

श्रवणाचे महत्त्व विशद करताना श्रवणाने संस्कार नसलेल्या बुद्धीला आत्म्याचे ज्ञान होऊ शकत नाही, असे म्हटले आहे. जीव हा जागृत, स्वप्न व सुषुप्ती या तिन्ही अवस्थांचा साक्षी आहे म्हणूनच तो त्यांच्यापासून भिन्नच असतो. जीवाचे वास्तविक स्वरूप परमात्मा असून तो परमात्मा निर्गुण असला तरी शून्यरूप नाही. सजातीय, विजातीय व स्वगत भेदरहीत असा तो आहे, म्हणजे त्याच्याहून वेगळे काहीच नसल्यामुळे कोणताही भेद त्याच्या ठिकाणी संभवत नाही. आत्म्यासंबंधीचे विवेचन १८ ते २० या श्लोकात केलेले आहे. 'तत्त्वमसि' या संपूर्ण वाक्याचा अर्थ त्याचा वाच्यार्थ, लक्ष्यार्थ सविस्तर सांगितलेला आहे. यातील त्वं शब्दाचा वाच्यार्थ म्हणजे जीवात्मा, तत्पदाचा वाच्यार्थ ईश्वर असा आहे. दोन्ही पदाचा लक्ष्यार्थ 'शुद्धचैतन्य' असा आहे. या महावाक्याच्या श्रवणाने मुमुक्षूला ब्रह्मसाक्षात्कार होतो म्हणजेच तो कृतार्थ होतो, स्वरूपानंदात निमग्न राहतो.

उपासनारूप योगमार्गाचे महत्त्व लक्षात घेण्यासारखे आहे. अधिकारानुरूप कर्मयोग, उपासना योग किंवा ज्ञानयोग सांगून सांसारिक दुःखात बुडालेल्या जीवांचा उद्धार करण्यासाठी दत्तात्रेयांनी अवतार घेतला असे म्हटले आहे.

जगाच्या उत्पत्तीविषयी नैय्यायिकांचा आरंभवाद व सांख्यांचा परिणामवाद हे मुख्यतः दोन सिद्धान्त आहेत. त्यांचे स्पष्टीकरण केलेले आहे. उपक्रमोपसंहार, अभ्यास, अपूर्वता, फलअर्थवाद, आपत्ति या सहा प्रमाणांनी ब्रह्माच्या ठिकाणी सर्व वेदान्तवाक्यांचे तात्पर्य आहे. असा निर्णय करणे याला 'श्रवण' असे म्हणतात. या श्रवणाने सर्व संशय नाहीसे होतात. युक्तिपूर्वक केलेले चिंतन म्हणजे मनन ! या मननाचे स्वरूप, त्याचे फल, त्याचा ऊहापोह केलेला आहे. निर्विकल्प समाधीचे फळ, कारण आणि शेवटच्या अवस्थेचे महत्त्व ही विशद केले आहे. ज्ञानाचे मुख्य साधन असलेले हे श्रवणादिक ज्याला जमत नाही, त्या मुमुक्षूने निरंतर भगवान दत्तात्रेयाचे भजन करावे ते त्याला कृतार्थ करते. समाधि

अवस्था एकदा प्राप्त झाल्या ती नाहीशी करण्यास कोणीही समर्थ होत नाही. अष्टांग योगाने प्राप्त झालेल्या ह्या आनंदावस्थेतील समाधीतील आनंद नाहीसा होणारा नसतो.

भजन, पूजन इत्यादी न करता केवळ स्मरणाने संतुष्ट होणारी दत्तात्रेय ही देवता आहे. शेवटच्या १० श्लोकांत सकामभक्ती करणाऱ्या आयुराजा, प्रल्हाद, मदालसापुत्र, अलर्क, विष्णुदत्तब्राह्मण, पिङ्गलनाग, कार्तवीर्यार्जुन, साध्यदेव, दलादन ऋषी, रेणुका यांना निरनिराळ्या प्रकारे उपदेश करून दत्तात्रेयांनी त्यांचा उद्धार केला. निर्गुण, निराकार, परमात्मतत्त्व हेच श्रीदत्तप्रभूंच्या रूपाने सगुण साकार होऊन जगत् कार्य करते. वास्तविक जगत् हे मायिक, मिथ्या असून एक परमात्माच सर्वत्र परिपूर्ण भरून राहिलेला असा सत्य आहे. तोच विश्वरूपाने नटला आहे. जगाच्या आदि अंतीमध्ये तोच एक आहे. त्याच्याखेरीज दुसरे काही नाही. सर्वाला सर्वव्यापक, स्वयंप्रकाशी, सच्चिदानंद घन एक श्रीदत्तच आहे. एकंदरीत असे म्हणता येईल की,

*'जे भक्त असती माझ्या प्रेमी । त्याशी प्रत्यक्ष दिसतो आम्ही ।*
*लौकिक मते अविद्य वर्मी । जातों श्रीशैली यात्रेसी ॥'*

असे दत्तात्रेयांचे अभिवचन आहे. हा ग्रंथ म्हणजे जो जो अर्थ यातून पाहिजे तो तो अर्थ देणारा हा कल्पतरुच आहे !

'श्रीगणेशगुरुदत्ताय नमः'

**डॉ. सौ. सुमती देशपांडे**
३६/४, एरंडवणा, संकल्प बंगला, पांडुरंग कॉलनी,
पुणे ४११०३८. फोन २५४३०५७६



# श्रीकृष्णालहरी : एक उत्तम लहरीकाव्य

**प्रा. डॉ. सौ. शैलजा कात्रे, पुणे.**

*एम्. ए. पीएच्. डी. प्राध्यापिका - संस्कृत विभाग स.प. महाविद्यालय पुणे.*

प. पू. वासुदेवानन्द सरस्वतींनी आपल्या गृहस्थाश्रमीच्या जीवनात माणगावी द्विसाहस्त्री गुरुसंहिता रचली असली तरी त्यांची बरीचशी ग्रंथनिर्मिती त्यांच्या यतिजीवनात झाली आहे. सततची भ्रमंती, अपरिग्रहामुळे ग्रंथनिर्मितीसाठी स्वतःची बुद्धी आणि दत्तकृपा याखेरीज अन्य कोणतेही साधन जवळ नसूनही श्रीस्वामींनी वाङ्मय निर्मितीचे सत्र जवळ जवळ २० वर्षे अव्याहतपणे केले. तत्त्वज्ञानविचार सांगणारे आकरग्रंथ, अनुवाद, लहान प्रकरण ग्रंथ याबरोबरच भाष्यरचना, टीका, पुराण, निबंध, काव्य, पद्य आणि स्तोत्ररचना त्याही संस्कृत आणि मराठी भाषेतून एवढी विपुल आणि विविध ग्रंथनिर्मिती करणारे स्वामीजी म्हणजे जणू आधुनिक शंकराचार्यच होत. दत्तसंप्रदायाचा प्रसार आणि त्याच्या दृढ स्थापनेसाठी आवश्यक अशी ग्रंथसंपदा हे स्वामींचे आद्यकार्य मानले तरी त्यांचे या व्यतिरिक्तही अनेक पद्यसंग्रह आणि स्तोत्रवाङ्मयही विपूल प्रमाणात आहे. तर्ककर्कश अशा ग्रंथरचनेबरोबरच भावगर्भ पद्यरचना आणि लीनभावाने केलेली स्तोत्ररचना हे त्यांचे वैशिष्ट्य मानावे लागेल. याशिवाय त्यांच्या ग्रंथांवर तसेच काही स्तोत्रांवर त्यांनी स्वतःच भाष्य लिहून सांप्रदायिकांना दत्ताभ्यासाचा मार्ग सुकर केला आहे.

आद्य शंकराचार्यांच्या स्तोत्रांप्रमाणेच स्वामींचे स्तोत्र वाङ्मयही विषयदृष्ट्या आणि प्रकारदृष्ट्या वैविध्यपूर्ण आहे. निरनिराळ्या देवतांबरोबरच अनेक नद्यांच्या स्तुतींनी परिपूर्ण अशी स्वामींची स्तोत्रसंपदा आहे. किंबहुना हेच त्यांच्या स्तोत्रांचे वैशिष्ट्य मानावे लागेल.

### नद्यांची महती आणि श्रीकृष्णा लहरीचे वेगळेपण

भारतीय स्तोत्रवाङ्मयामध्ये नद्यांची स्तुती प्रायः सर्वच प्राचीन आचार्यांनी केलेली आहे. भारताच्या सांस्कृतिक इतिहासात नद्यांना वेगळेच स्थान आहे. ऋग्वेद कालापासून नद्यांचे माहात्म्य ऋषी वर्णित आहेत. शंकराचार्यांनाही गंगा, नर्मदा या नद्यांनी मोहिनी घातली आणि त्यांच्या वाणीतून जणू या नद्यांची पवित्रता प्रकटली. जगन्नाथपंडितांच्या 'गंगालहरी' संस्कृत वाङ्मयात अजरामर ठरल्या आहेत. यानंतर १९ व्या, २० व्या शतकातील प. पू. वासुदेवानंद सरस्वतींनी नद्यांची स्तोत्रे रचून नद्यांबाबतचा भारतीय दृष्टिकोन जणू पुनःस्थापित केला आहे. नद्या म्हणजे भारतीय सांस्कृतिक कहाणी सांगणाऱ्या लोकमाता एवढेच नव्हे तर परमेश्वराचा एक चालताबोलता अवतारच होय, या धारणेतूनच स्वामींच्या हातून विविध नद्यांवरील स्तोत्रे रचली गेली. यामुळेच गंगा, नर्मदा, गोदावरी, यमुना, कावेरी यांसारख्या मोठ्या आणि पुराणप्रसिद्ध नद्यांवर स्तोत्र, कवने करून ते थांबले नाहीत तर आपल्या अखंड भ्रमंतीत ज्या ज्या नद्या भेटल्या त्या सर्वांनाच त्यांनी तितक्याच आदराने स्तोत्रसुमन अर्पिलेले दिसते. यामुळेच क्षिप्रा, वेदवती, तुंगा, चंद्रभागा इतकेच काय पण दक्षिणेतील पिनाकिनी, महाराष्ट्रातील वेण्णा, भीमा, पंचगंगा या नद्यांनाही स्वामींनी गंगेइतक्याच आर्ततेने आळविले आहे. तरीही यात 'कृष्णा' या नदीकडे स्वामींचा ओढा प्रकर्षाने जाणवतो. दत्तात्रेयांचा साक्षात्‌वास असणाऱ्या कृष्णेसाठी त्यांनी स्तोत्रांचे अनेक प्रकार निवडले. पंचक, अष्टक, आरती, स्तुतिस्तोत्र याबरोबरच स्वामींनी कृष्णेवर लहरीकाव्यही रचले. यावरूनच त्यांची कृष्णेवरील सविशेष प्रीती प्रत्ययास येते.

### लहरीकाव्य

स्तोत्रवाङ्मयात लहरीकाव्य हे आपल्या वैशिष्ट्यपूर्ण रचनेमुळे चटकन नजरेस भरते. सर्वच स्तोत्रांमधून ईशस्तुती, त्या देवतेवरील भक्तिभाव, क्षमायाचना अगर वर प्रार्थना या गोष्टी असल्या तरी लहरी स्तोत्रांमध्ये मात्र आत्मनिवेदनाचा भाग जास्त असतो. यातील वर्णन हे जास्त भावपूर्ण सलगीचे असे असते. या प्रकाराच्या 'लहरी' - लाट या नावातच याचे स्वरूप साठविले आहे. लाट जशी उसळून समुद्रात उभे असणाऱ्याला पूर्णपणे भिजवून शेवटी त्याच्या चरणाशी लीन होते तरीही त्याला आपल्याकडे खेचून घेते असाच काहीसा स्वभाव संस्कृतमधील उपलब्ध लहरीकाव्यांचा आहे. यात प्रामुख्याने शंकराचार्यांच्या सौंदर्यलहरी, आनंदलहरी, शिवलहरी जगन्नाथ पंडितांचे लहरी पंचक - अमृतलहरी, करुणालहरी, लक्ष्मीलहरी, सुधालहरी आणि सुप्रसिद्ध गंगालहरी यांचा समावेश असला तरी आधुनिक संस्कृत साहित्यामधील (२० वे शतक) स्वामींच्या नर्मदा लहरी आणि श्रीकृष्णा लहरी यांचाही निर्देश या बरोबरीनेच करावा लागेल. किंबहुना 'जगन्नाथान्तं संस्कृतम् !' असे म्हणणाऱ्या पंडितांना प. पू. वासुदेवानंद सरस्वतींनी या सरस संस्कृत रचनांद्वारा दिलेले विद्वत्तापूर्ण आणि अर्थगर्भ असे प्रत्युत्तरच आहे. मात्र हे देत असताना स्वामींच्या मनाच्या प्रांजळपणाची आणि सात्त्विकतेची प्रचीती येते. यात आढ्यतेच्या भावनेचा मागमूसही नाही, की पांडित्य प्रदर्शनासाठी वारेमाप अलंकारांची उधळपट्टी नाही. 'दत्तप्रेरितमती' वासुदेवानंद सरस्वतींची लीनता आणि उत्कटता या दोन्ही लहरीकाव्यात आपणास ठायी ठायी जाणवते. यापैकी आपण 'श्रीकृष्णालहरी' या स्तोत्राची ओळख या लेखाद्वारे करून घेणार आहोत.

गंगालहरींप्रमाणेच श्रीकृष्णालहरी हे काव्य ५३ श्लोकांचे आहे. नर्मदालहरींचे हे स्वामींचे दुसरे लहरी काव्य तीस श्लोकांचेच आहे. स्वामींनी अनेक लहान-मोठ्या नद्यांवर स्तोत्ररचना केली असली तरी 'लहरी' हे नाव कृष्णा आणि नर्मदा या दोन नद्यांवरील रचनांनाच दिले आहे हे लक्षात घेण्यासारखे आहे. श्रीकृष्णालहरी या स्तोत्राव्यतिरिक्त श्रीकृष्णापंचक स्तोत्र, श्रीकृष्णाष्टक, श्रीकृष्णावेणी पंचगंगा स्तोत्र, कृष्णा-पंचगंगा संगमस्तोत्र अशी संस्कृत तसेच काही मराठी, पद्यकाव्य व आरत्या (संस्कृत व मराठी दोन्ही भाषेत) एवढे स्वामींचे श्रीकृष्णामाईवरील ग्रंथकाव्य आहे. या सर्वांमधून श्रीकृष्णालहरी या काव्यावर स्वामींनी स्वतः टीका लिहिली आहे या काव्याचे

वैशिष्ट्य आहे. यामुळे मूळचे काव्यगुणांनी युक्त असलेले हे लहरीकाव्य स्वामींनी दर्शविलेल्या तात्त्विक विचारांमुळे जास्तच उठून दिसते.

### शिखरिणी वृत्ताचे औचित्य

लहरीरचनेचे प्रसिद्ध उद्गाते श्रीशंकराचार्य त्यांची सौंदर्यलहरी पूर्णपणे शिखरिणीवृत्तांत आहे. जगन्नाथ पंडितांचे गंगालहरीस्तोत्र ही शेवटच्या काही श्लोकांचा अपवाद वगळता शिखरिणी वृत्तातच आहे. स्वामींच्या श्रीकृष्णालहरीसुद्धा शिखरिणी वृत्तातच आहेत. गंगालहरीप्रमाणेच शेवटचे काही श्लोक (एकोणपन्नास ते त्रेपन्न) अन्य वृत्तांतील आहेत. पैकी ४९ वा पृथ्वी वृत्तांत, ५० वा शार्दूलविक्रीडीतात, ५१ वा स्त्रग्धरा वृत्तात तर ५२ व ५३ हे श्लोक अनुष्टुभातील आहेत. नर्मदालहरीतही पहिले वीस श्लोक शिखरिणी वृत्तातच स्वामींनी रचले आहेत. म्हणजेच आपणास असे म्हणता येईल की - लहरीकाव्यासाठी कवींनी प्रामुख्याने शिखरिणी वृत्ताची निवड केली असली तरी इतर वृत्तेही लहरी रचनेला वर्ज्य नाहीत.

शिखरिणी वृत्ताचे औचित्य स्वामींनी श्रीकृष्णालहरीच्या स्वकृत टीकेत सांगितले आहे. ते म्हणतात या वृत्ताची देवता जल असल्यामुळे जलरूपात दिसणाऱ्या श्रीकृष्णेसाठी ते वृत्त योग्य होय. कविकुलगुरु कालिदासाने मेघदूतासाठी 'मन्दाक्रान्ता' वृत्ताची केलेली निवड जशी मेघाने 'विश्रान्तः सन्' बनून कालक्रमणा करावी असे सुचविते त्याप्रमाणे शिखरिणी वृत्त हे त्याच्या नावानुसारच धावत्या प्रवाहाची आठवण करून देते. म्हणजेच एकाच वेळी हे वृत्त जलदेवतेचा परिचय करून देते तसेच प्रवाहीपणही सुचविते. त्यामुळेच 'लहरी' संभवतात.

### कृष्णालहरीतील वर्ण्यविषय

कोणत्याही ग्रंथांच्या आरंभी इष्टदेवतेचे नमन असते. 'मङ्गलादिनि हि शास्त्राणि प्रथन्ते' (व्याकरण महाभाष्य) ही जरी प्राचीन परंपरा असली तरी स्तोत्रकाव्यांना त्यातही लहरीकाव्यास मंगलाचरण सहसा आढळत नाही कारण सर्व काव्यच मंगलरूप (स्तुतिपर असल्याने) असते. श्रीकृष्णालहरीत मात्र पहिला श्लोक हा मंगल स्वरूपाचा आहे.

***चतुर्बाहुः श्रीमत्सजलजलदश्यामल तनुः***
***प्रकाशद्वक्त्रेन्दुः सदुडुगणमुक्तावलिरपि ।***
***तडिद्वासा भास्वद्द्युतिलकलसन्मौलिरमहत्***
***क्षमाभ्रस्य ब्रह्मेरपि जयति तनुः स्वहितकृत् ॥***

येथे चतुर्भुज, नीलवर्णी, स्निग्ध कांतीच्या सह्यतनयेचे वर्णन करून तिचा जयजयकार केला आहे. या श्लोकात वरवर कठीण वाटणारी शब्दरचना आहे म्हणूनच की काय स्वामींनी स्वकृत टीकेत याबाबतची आपली भूमिका प्रस्तावनेत (श्रीकृष्णालहरी अवतरणिका) सुस्पष्टपणे मांडली आहेत. या लहरीकाव्याचे प्रयोजनही त्यांनी तेथे स्पष्ट केले आहे. 'सर्व पाप परिहरणक्षमायाः श्रीकृष्णायाः स्तुतिः आरभ्यते !' ही स्तुति केवळ पापनाशक नाही तर 'परमानन्दलाभ' या काव्याच्या अंतिम प्रयोजनासाठीही आहे, असेही स्वामींनी स्पष्ट प्रतिपादन केले आहे. येथील श्रीकृष्णेची स्तुती हे ब्रह्मप्राप्तीचे साधन आहे. कारण नदी-तीर्थ-सेवन हाही एक प्रकारचा यज्ञच आहे ही साधनाच होय म्हणून हा स्तुतिरूपयज्ञ श्रुतिपंरपरेलाच अनुसरणारा होय असे स्वामी मानतात. (- यज्ञत्वेनोक्तत्वात्स्मृत्यादौ प्रोक्तत्वात् च इयं स्तुतिः अनवद्या !) या श्लोकातील वर्णन स्वामींनी अशा प्रकारे केले आहे की ते कृष्णा (नदी), दत्तात्रेय, विष्णू व आकाश (आकाशाभिमानिनी देवता) या चारांचेही भासते. चार बाहू, वर्षाऋतूतील मेघाप्रमाणे स्निग्ध श्यामल वर्ण, सुंदर मुख, नक्षत्रमालेप्रमाणे (उडुगण) टपोऱ्या मोत्यांचा हार, झळाळते लखलखीत वस्त्र या गोष्टींचा सहेतुक उल्लेख श्लोकात येतो कारण या बाबी वरील चारही ठिकाणी लागू होतात. याद्वारा स्वामींना जणू कृष्णामाईचे दत्तरूपाशी अथवा विष्णुरूपाशी साम्य दाखवावयाचे आहे. हेच साम्य स्वामींनी पुढच्या श्लोकांमधूनही अनेक ठिकाणी सुचविले आहे. एवढेच नव्हे तर पुढे प्रतिपादित केलेल्या हरिहराद्वैत (श्लोक - ५, २०, ४०) संकल्पनेचे सूतोवाचच जणू या प्रथम श्लोकात आढळते. स्वामींचे हे मंगलाचरणातील वर्णन हा अनुभूतीचा प्रांत आहे. मूर्त-अमूर्ताच्या सीमा यात मिसळल्या आहेत. सगुण-साकार चतुर्बाहुरूप मूर्तीचे दर्शन केवळ स्वामींच्या स्वकृत टीकेमुळेच होऊ शकते.

मंगल श्लोकानंतर लहरीकाव्याला सुरुवात होते. येथेही या स्तोत्राचे वेगळेपण जाणवते ते यातील ध्रुवपदाच्या योजनेमुळे ! 'नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरुमते' हाच चतुर्थचरण म्हणून २-४८ श्लोकांमध्ये आला आहे. हे ध्रुवपद अत्यंत विलोभनीय आणि यात योजलेली श्रीकृष्णेची शमिततृष्णे व गुरुमते ही विशेषणे अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहेत. यामुळेच स्तोत्राच्या अखेरीस स्वामी - 'कृष्णां यो वृणुते भक्तः पदं यायान्निरन्तरम् ।' (जो भक्त कृष्णेची निवड करतो (आराधना करतो) तो शाश्वत पदाप्रत जातो.) असे म्हणतात. दुसऱ्या श्लोकावरील टीकेत स्वामींनी सांगितलेली तृष्णेची व्याख्याही 'तृष्णा नाम आयताशा तस्या व्याप्तौ नरक गतिरेव' (तृष्णा म्हणजे मोठी लांबच लांब आशा. तिने वेढले की नरकच मिळतो.) ५२ व्या श्लोकातील दुसऱ्या चरणाचे स्पष्टीकरण देते तसेच याने तृष्णा नष्ट करणारी कृष्णा असा अनुप्रासयुक्त गोडवाही कृष्णेला प्राप्त करून दिला आहे.

वास्तविक कृष्णेचा महिमा अगाध आहे. तरीही केवळ गुरुकृपेने स्वामी तिचे वर्णन करीत आहेत असा भाव दुसऱ्या व तिसऱ्या श्लोकांतून प्रगटला आहे. येथे स्वामींची भाषाही अत्यंत मृदु, मुलायम आहे, ते म्हणतात -

***अपि श्रीकृष्णे ते महिमपरपारं व्रजति को***
***न शेषोऽशेषास्यैरपि कथयितुं वा प्रभवति ।***
***अतो व्रीतो वाचः शुचय इह वाप्यल्पकमिदं***
***नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरु मते ॥***

(हे कृष्णे तुझ्या अपार महिम्याचे पैलतीर ब्रह्मदेवालाही - कः दिसले नाही. शेषाची हजारो मुखेही तुझे गुणगान करण्यास थिटी पडतात म्हणून तुझी स्तुती करण्यास मी कचरत आहे. केवळ वाणी शुद्धीसाठीच माझा हा प्रयत्न.)

म्हणूनच की काय पुढे चौथ्या श्लोकात स्वामी 'शिशुवचनवन्मे शृणु मुदा' (बालकाच्या बोबड्या बोलाप्रमाणे असलेले माझे हे वचन कृष्णे तू आनंदाने ऐक.) असे म्हणून कृष्णेशी मातेप्रमाणेच सलगी करीत आहेत.

श्रीकृष्णालहरीच्या सर्व श्लोकांमधील वर्णन लेख विस्तारभयास्तव येथे देता येत नाही तेव्हा या श्लोकांमधून आलेल्या विषयांचा थोडक्यात आढावा घेऊ.

श्रीकृष्णालहरी स्तोत्रामध्ये कृष्णेची महती अनेक प्रकारे स्वामींनी सांगितली आहे. १७ व्या श्लोकात कृष्णेच्या प्रवाहाची माहिती सांगताना वाई हे क्षेत्र म्हणजे 'मुख' आहे. नरसोबावाडी हे 'सदयहृदय', आंध्रातील कुरवपूर हे नाभिस्थळ तर पूर्वसागराला मिळणारे तुझे दोन प्रवाह म्हणजे

कृष्णेचे चरणयुगुल असे वर्णन आले आहे. या श्लोकात आलेला चार अवयवांचा उल्लेख सूचक आहे. सर्वसामान्यपणे देवतेचे वर्णन करताना चरणापासून डोक्यापर्यंत करतात. सागराला नदी मिळते ते नदीचे मुख अशी कल्पना रूढ असली तरी स्वामींनी येथे क्रम बदलला आहे. मुख हा उत्तमांगांचा भाग असल्याने तो उच्चस्थळी स्वामींनी मानला आहे. या श्लोकावरील टीकेत वाईक्षेत्रातील ब्राह्मण वस्तीला त्यांनी श्रुतीचा आधारही सांगितला आहे. (ब्राह्मणोऽस्य मुखम् - ऋ. १०-९०)

स्वामींनी कृष्णामाईचे इतर नद्यांशी नाते अनेक लहरींमधून स्पष्ट केले आहे. ११ व्या श्लोकात गुरुचा कन्याराशीत प्रवेश झाला असता गंगा बहीण म्हणून तुझ्या भेटीला येते आणि वर्षभर सह्य पर्वतावर राहाते याची प्रचीती कुंडांमधून वाहणाऱ्या गंगेद्वारे येते. ती अचानक येते तशीच अचानक लुप्तही होते. पुढील श्लोकात जम्बुद्विपातील सर्व तीर्थे तुझ्या भेटीला येतात असे वर्णन करून तू मात्र कोठेही जात नाहीस - आम्हा भक्तांना सोडत नाहीस असेच जणू सुचविले आहे. स्वकृत टीकेत स्वामींनी हे म्हटले आहे. (त्वं तु न कापि गच्छसि ।)

कोयना (ककुद्मती) नदी पुत्रवत् कृष्णेला येऊन मिळते असे वर्णन ४१ व्या श्लोकात येते. येथे पुराणांचा आधार स्वामींनी घेतला आहे. कोयना म्हणजे ब्रह्मदेव व कृष्णा विष्णूचे रूप. ब्रह्मा हा विष्णूचा पुत्र म्हणूनच कोयना-कृष्णा संगम (कऱ्हाड येथे) म्हणजे जणू पिता-पुत्र भेटच होय. हा संगम नृसिंहवाडीतील पंचगंगा-कृष्णा यांच्या संगमाप्रमाणेच तर कृष्णावेण्णा यांचा संगम म्हणजे जणू साक्षात् हरी-हराचे ऐक्यच. (श्लोक ४०) म्हणजे एका दृष्टीने ब्रह्मा-विष्णु-महेशांचे हे मीलन आहे. म्हणूनच कृष्णेला स्वामींनी 'गुरुमते' हे विशेषण लावले आहे. दत्तात्रयांचे त्रिमुख जणू ते कृष्णेमध्ये पाहतात.

अशा प्रकारे कृष्णेचे स्वरूप असल्यामुळेच तिच्या तीरावरील गावांना तीर्थक्षेत्रांचे महत्त्व न लाभेल तरच नवल ! या तीर्थाचे माहात्म्य १३, १४, १५, १६, १८, ३०, ४५ यांसारख्या श्लोकांमधून वर्णिले आहे. या सर्व श्लोकांचे स्वरूप तीर्थस्थानी तुझ्या प्रवाहात स्नान केल्याने परमपदप्राप्ती होते. पापक्षालन होते. श्राद्ध केल्याने गति मिळते अशा स्वरूपाचे वर्णन आहे. काही श्लोकात प्रायश्चित्ताचाही उल्लेख आहे.

कृष्णेचे स्वरूप 'अलक्ष्यं ते रूपं' असे असल्यामुळेच तिच्यापुढे अपराधाची मोकळी कबुली देण्याचा प्रांजळपणा स्वामींनी दाखविला आहे. एका श्लोकात ते म्हणतात -

*अयं सामान्योऽस्तीत्यपि मनसि मा स्थापय यतः*
*समस्तधौघास्ते जननि मयि तिष्ठन्ति सुचिरम् ।*
*अतो बध्दोतिष्ठेश्वरि परिकरं त्वं दृढतरं*
*नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरु मते ॥ (श्लोक ४२)*

(हा तुझा भक्त, पापी अगदी सामान्य आहे असे तू मनातही आणू नकोस. हे माते, सर्व प्रकारच्या पापांच्या राशी माझ्या ठिकाणी बराच काळ वसती करून राहिल्या आहेत म्हणून तू कंबर कसून (माझ्या उद्धारासाठी) सज्ज हो. दत्तप्रभुला मान्य असणाऱ्या व तृष्णा शमविणाऱ्या श्रीकृष्णे तुला वंदन असो.)

श्रीकृष्णेचे पापनाशक स्वरूप मनोज्ञ पद्धतीने ४४ व्या श्लोकात स्वामींनी वर्णिले आहे. नानाविध पापांचे पर्वत नष्ट करण्याचे तुझे सामर्थ्य कोठे आणि माझे त्रिविध असे सामान्य पाप कोठे ? यासाठी ते सुंदर दृष्टान्त देतात. अग्नीपुढे जणू सामान्य पाचोळा ! श्रीकृष्णेचे त्वरित गतीने पापांचे क्षालन करण्याचे सामर्थ्यच येथे सुचविले आहे. म्हणूनच की काय स्वामी 'हे श्रीकृष्णे तुझ्या प्रवाहावरून वाहिलेला वारा मला स्पर्श करो. तुझे पवित्र तीर्थ माझ्या मुखात पडो आणि माझा देह तुझ्याच थंडगार प्रवाहात पडो' अशी प्रार्थना करतात. (श्लोक ४७). या द्वारा स्वामींनी कृष्णेचा नित्य सहवास आपणास घडावा अशी प्रार्थना केली आहे. दत्तभक्त स्वामींना अशा ऊर्मी येणे साहजिकच आहे आणि ही कृष्णा खुद्द दत्तप्रभूंना मान्य आहे.

कृष्णेच्या तीराचा मान सर्व तीर्थे, नद्या राखतात. देव श्रेष्ठमुनि इ. सुद्धा या तीराचा आदर करतात असे कोणते वैशिष्ट्य कृष्णेत आहे याचे वर्णन स्वामींनी ५० व्या श्लोकात केले आहे. गंगा, यमुना, नर्मदा, गोदावरी, मन्दाकिनी या मोठमोठ्या नद्यांनी आपले स्थान व स्वरूप सोडले पण कृष्णा मात्र नाम व रूप दोहोंच्याही माध्यमातून श्रीकृष्णाशी सदैव एकरूप होऊन राहिली आहे. तसा एकभाव इतर नद्यांना साधला नाही. यमुना एखाद्या सेविकेसारखी कृष्णाचे पाय धूत राहिली तर गंगा शंकराची पत्नी (द्वितीय) बनून त्याच्या डोक्यावर आरूढ झाली. नर्मदा शंकराच्या घामातून प्रगटली. गोदावरी शिवाच्या जटेतून निर्माण झाली. मन्दाकिनी तर शिवाच्या जटेतच अडकून राहिली. भोगावती पाताळात गेली. एकट्या कृष्णेनेच आपले नाव व रूप सोडले नाही म्हणूनच ती सर्वांना वंद्य ठरते. (श्लो. ५०)

अशा या श्रीकृष्णामाईने सगुण रूपात दर्शन द्यावे म्हणून स्वामींनी ४९ व ५१ व्या श्लोकात आर्त विनवणी केली आहे. ते म्हणतात, 'वपुषि तेऽसिते भवतु दृक्त्वदीयेऽम्मये ।' (तुझ्या जलमय स्वरूपावर माझी दृष्टी सदा असू दे) (श्लोक ४९). सगुण रूपाची ओढ वर्णिताना स्वामी म्हणतात,

*भूयो भूयोऽ भयोक्तीर्वितर तव तनुर्मोह मोहप्रहर्ती ।*
*सा मे कामेश मेध्या मनसि नयनयोरावरादस्तु दत्त ॥ (श्लोक ५१)*

(तू पुन्हा पुन्हा मला अभयवचन दे. मोहाचा नाश करणारी तुझी मूर्ती माझ्या डोळ्यात व मनामध्ये नित्य आदराचे स्थान मिळवीत राहो.)

अशा या श्रीकृष्णेचे स्मरण करणारा नित्य अभयपद मिळवितो आणि अभक्त जो तृष्णेच्या आधीन राहतो तो दुःखाचा धनी होतो (श्लोक ५२) ही फलश्रुती सांगून शेवटच्या श्लोकात हे कृष्णास्तोत्र दत्ताने प्रेरणा दिल्यामुळे वासुदेवानंद सरस्वतींनी रचले यामुळे नृसिंह सरस्वती आपल्यावर प्रसन्न होवोत अशी गुरुची कृपायाचना करून ते लहरीकाव्य समाप्त होते.

असे हे ५३ श्लोकांचे श्रीकृष्णालहरी काव्य कृष्णानदीचे 'कृष्णत्व' आणि स्वामीमहाराजांचे तिच्यावरील ममत्व आपल्या मनात ठसविते. या लहरीकाव्यावरील स्वामींची टीका ही या स्तोत्राचे तात्त्विक चिंतन करते. दत्तभक्त नागपूरचे डॉ. गु. वा. पिंपळापुरे यांनी 'श्रीकृष्णालहरीतरंगसौंदर्य' या पुस्तकातून या स्तोत्राचे अतिशय हृद्य व अभ्यासपूर्ण समीक्षण करून कृष्णाभक्तांना कृष्णेचा प्रसादच साक्षात् मराठी या मातृभाषेतून वाटला आहे. नागपूरच्याच स्वामीभक्त डॉ. त्र्यं. गो. पण्डे यांनी केलेला मराठी पद्यानुवादही भावपूर्ण आहे.

प. पू. वासुदेवानंद सरस्वतींच्या या विशेषांकांत संपादकांनी माझी अल्पशी सेवा मंजूर करून मला कृष्णामाईच्या शब्दप्रवाहात अवगाहन करण्याची संधी दिल्याबद्दल मी खरोखरच धन्यतेचा अनुभव घेत आहे ! इति शम् । श्रीकृष्णार्पणमस्तु ।

**शैलजा कात्रे**
संस्कृत प्राध्यापिका, स. प. महाविद्यालय, पुणे,
केतकी सदन सोसायटी, २१६ नवी पेठ, पुणे ४११०३०.



# करिता कीर्तन भगवंताचे

**श्री. मोरेश्वर नागनाथ जोशी**

*एस्.एस्. सी टेक्निकल नोकरी २५ वर्षे एस्. के एफ्‌मध्ये, स्वेच्छा निवृत्ती. कीर्तन, प्रवचनाद्वारे वेद, देश, धर्म पुराणे, संतचरित्रे, संस्कृती यांचा प्रचार व प्रसार कीर्तन व सांस्कृतिक संस्थांचे पदाधिकारी ९ - १० पुरस्कार प्राप्त - आदर्श कीर्तन पुरस्कार, कीर्तन भूषण, कीर्तन कौस्तुभ इत्यादी. कीर्तन संमेलने व परिषदांत सहभाग ११ व्या वर्षापासून कीर्तनास प्रारंभ निरनिराळ्या संत महात्म्यांचे आशीर्वाद प्राप्त.*

नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी । या शब्दात संतश्रेष्ठ नामदेव महाराजांनी कीर्तनाचे महिमान सांगितले आहे.

*कीर्तनानंदे चारी मुक्ति । धावत येती घराती ॥*
*सोपे सार सोपे सार । कीर्तन उच्चार कलीयुगी ॥*
*वाजता टाळी कीर्तन छंदे । जाते वृंदे पातक ॥*
*एका विनटला कीर्तनी । भुक्ती मुक्ती लागती चरणी ॥*

पैठणक्षेत्रीचे प्रसिद्ध संत शांतीचे माहेरघर असणारे संत एकनाथ महाराजांनी या अभंगांत कीर्तनाचे वर्णन केले आहे.

समर्थ रामदास स्वामी म्हणतात-

*भगवंतास कीर्तन प्रिय । कीर्तने समाधान होय ।*
*बहुत जनास उपाय । हरि कीर्तनी कलीयुगी ॥*

ईश्वराला कीर्तन प्रिय आहे. या कलियुगामध्ये यज्ञ, याग व्रत वैकल्ये व कर्ममार्गाचे आचरण करणे अवघड आहे. सर्व सामाजाला करता येण्यासारखा आनंद देणारा समाधान देणारा अत्यंत चांगला उपाय उत्कृष्ट मार्ग म्हणजे कीर्तन होय. कीर्तनाचे – भगवत्‌प्राप्ति भगवंताचा साक्षात्कार किंवा अध्यात्मज्ञानाचे प्रबोधन होय. त्यामध्ये संगीत, नाट्य, विनोद, रंजन जे भाग दुय्यम आहेत. ज्या प्रमाणे भोजनांत लोणचे, चटणी, मीठ तोंडी लावण्यापुरते असते त्याप्रमाणे कीर्तनाचा प्रतिपाद्य विषय मुख्यतः ईश्वरप्राप्ति होच असला पाहिजे. यावर सर्वच संतांनी आणि माहात्म्यांनी भर दिला असून त्याप्रमाणे त्यांनी आपली कीर्तनातील अनुभूती आपल्या अभंग वाङ्मयांतून वर्णन केली आहे. मनुष्यदेहाचे अंतीम ध्येय परमेश्वरप्राप्ति हेच आहे. तर कीर्तनात भगवंताचे सगुणरूपाचे वर्णन भरावे. त्याच्या लीलांचे कथांचे वर्णन करून त्यांत रमून जावे. त्यामुळे मनाला समाधान प्राप्त होते, चित्त प्रसन्न होते. परमेश्वर चरणी स्थिर होते.

कवि मोरोपंत आपल्या एका आर्येत म्हणतात-

*वाखाणावे प्रेमे भगवद्यश मुनिवरा तुवा आता ।*
*चित्त प्रसन्न होते प्रभूचा महिमचि आवरे गाता ॥*

देवर्षि नारदांनी भगवान् व्यासजींना उपदेश केला की परमेश्वर प्रसन्न होईल. देवर्षि नारद म्हणतात पूर्वीच्या जाणत्या लोकांनी असे सांगून ठेविले आहे की मनुष्याने पुष्कळ तप केले, शास्त्राध्ययन केले, यज्ञयाग केले, दान केले पण ह्या सर्वांचे शाश्वत फळ काय? तर त्या उत्तमश्लोक परमेश्वराची प्राप्ति. मग ती कीर्तनानेही होऊ शकते. एकदा का भगवद्‌कीर्तनाची, भजनाची गोडी लागली की मग ते काही केल्या सुटत नाही. याला माझे स्वतःचेच उदाहरण पहा म्हणून नारदांनी व्यासांना सत्संगतीत आपल्याला भगवंताच्या कीर्तनाची कशी गोडी लागली हे सांगितले.

देवर्षि नारदांच्या उपदेशावरून भगवान व्यासजींनी श्रीमद्‌भागवत् या ग्रंथाची रचना रकरून त्यांत भगवंताच्या विमल यशाचे वर्णन केले आहे. लीलांचे वर्णन केले आहे. त्यांनी ती शुकमुनींना सांगितला व शुकमुनींनी राजा परीशिताला सांगितला, तेव्हापासून आजपर्यंत भागवत ग्रंथाद्वारे अनेक विद्वान, कीर्तनकार, शास्त्री, पंडित भगवंताच्या कथा सर्व समाजाला ऐकवित आहेत.

*संत मुकुटमणी श्री तुकाराम महाराज म्हणतात-*
*कलियुगामाजी करावे कीर्तन । तेणे नारायण देईल भेटी ॥*

कीर्तनाचे प्रयोजन परमार्थ असून त्यासाठी कीर्तनकाराला अध्यात्मिक भूमिकेवर आरूढ होऊन मनुष्याच्या मनाचे उन्नयन करावयाचे असते व त्याला नैतिक मूल्याचे व धार्मिक मुल्यांचे ज्ञानप्राप्त करून देऊन, कौटुंबिक व सामाजिक कर्तव्याचे महत्व पटवून देऊन कृतिप्रवण करावयाचे असते. हे सर्व आपोआप भगवंताचे गुण श्रवण व वर्णन केल्याने प्राप्त होते. असा सर्व संतांचा महात्म्यांचा दृढ विश्वास आहे. म्हणून समर्थ म्हणतात-

*पहिले ते हरिकथा निरूपण । दुसरे ते राजकारण ।*
*तिसरे ते सावधपण । सर्व विषयी ॥*
*किंवा*
*म्हणोनी कीर्तनाचा अगाध महिमा । कीर्तने संतोषे परमात्मा ।*
*सकल तीर्थे आणि जगदात्मा । हरि कीर्तनी वसे ॥*

असा अगाध महिमा कीर्तनाचा समर्थांनी वर्णन केला आहे.

परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमत् श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे स्वामी) महान दत्तावतारी म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांना कीर्तनाची मनापासून आवड होती. त्यामुळेच त्यांच्या बहुतेक चातुर्मासात भजन कीर्तन दररोज होत असे. त्यासाठी त्यांनी काही कीर्तनाख्याने रचिली आहेत. व अनेक कीर्तनकारांना ती समजावून सांगून त्यांच्याकडून करवून घेतली आहेत. त्या आख्यानांमध्ये निरनिराळ्या वृत्तामध्ये पद्यरचना करून त्यांना रागांची तालांची जोड दिली आहे. त्यामुळे ती आख्याने सांगताना वाचताना, ऐकताना एक विशेष परिणाम करतात. त्यांच्या कीर्तनकार शिष्यांपैकी ह.भ.प. श्री सखारामबुवा कानडकर, ह.भ.प. श्री गोपाळबुवा राजाध्यक्ष, श्री बापटशास्त्री ही मंडळी प्रसिद्ध आहेत. ते परम भागयवान आहेत कारण प.प. स्वामींच्या स्वरूपांत असणारे दत्तप्रभूच त्यांना आख्याने सांगत होते व त्यांच्याकडून कीर्तने करवून घेत होते.

ब्रह्मनिष्ठ, आत्मज्ञानी, साक्षात्कारी महापुरुषांना संतांना प्रवृत्तिचे, सगुणभक्तीचे वावडे असते असे म्हणतात. ते खरेही आहे. कारण ते त्यांच्या पलीकडे गेले आहेत.

पण वर वर्णन केलेले संत ज्ञानी, साक्षात्कारी भगवंताची पूर्णकृपा असणारे असून कीर्तनभक्तीचा आग्रह धरतात त्याच कोटीतील प.प. श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे स्वामी) महाराज ब्रह्मनिष्ठ, योगीश्वर व संन्यासी असून कीर्तनाचे पुरस्कर्ते व आग्रही आहेत. निर्विकल्प समाधीत जेवढे श्रीस्वामीमहाराज रममाण होत तेवढेच कीर्तनातही रमत. वेळप्रसंगी त्यांना कीर्तनांत श्रवण करताना समाधी लागत असे. अष्ट सात्विक भाव दाटून आले की डोळ्यातून अश्रूधारा सुरू होत असत. हे अनेकांनी पाहिले आहे. त्यांनी कीर्तन भक्तीचा प्रसार व प्रचार केला आहे. निर्विकल्प समाधीसुखाचा अनुभव घेताना त्यांची दत्तभक्ती सुटली नाही. श्रीस्वामीमहाराजांचा कर्म मार्गावर आचारावर भर होता त्याबाबतीत त्यांचा कटाक्ष होता. शास्त्रविरुद्ध वर्तन त्यांना कधीही आवडले नाही. असे असून सगुणभक्तीची ओढ त्यांना होती. प.प. श्री स्वामीमहाराज ज्ञान, कर्म व उपासना या तिन्ही मार्गाचे एक महान आचार्य होते, सिद्धपुरुष होते. असे असूनही प्रवृत्तिकडे सगुण भक्तीकडे लक्ष असणे अप्रयोजक दिसते. पण

*तुका म्हणे आता । उरलो उपकारापुरता ॥*

या उक्तीप्रमाणे सिद्धपुरुष, संत महात्मे सामान्यजनाला सन्मार्गाला लावण्यासाठी खाली येतात (अवतरती) अवतार धारण करतात. सर्वसामान्य जनतेपुढे निखळ वेदांत जरी मांडला तरी त्याचा अपेक्षित परिणाम होईल की नाही सांगता येत नाही आणि कर्माचरणाच्या बाबतीत तर अनेकांना कंटाळा आळस किंवा लाज वाटते. लोक काय म्हणतील इकडे त्यांचे लक्ष असते. त्यामुळे चांगले कर्माचरण घडत नाही व केलेल्या कर्माचे फळ अपेक्षेप्रमाणे मिळत नाही. अशावेळी त्यांच्या उद्धाराचा मार्ग म्हणजे भगवंताच्या सगुण चरित्राचे गुणवर्णन करून कीर्तन करणे व त्यांचा अंतःकरणापर्यंत ठाव जाणे परिणाम भगवंताविषयी प्रेम निर्माण होऊन परमार्थाची ओढ निर्माण होते.

या कीर्तनाच्या माध्यमातून सर्व समाजाला वैदिक धर्माचे यथार्थ दर्शन घडविणे ईश्वरभक्ती, दत्तभक्ती, दत्तसंप्रदाय त्यांच्या मनात रुजविणे हे त्यांच्या कीर्तनाख्यानाचे मुख्य प्रयोजन दिसते.

श्रीदत्तमाहात्म्य या ग्रंथात स्वामीमहाराज कीर्तन भक्तीचे वर्णन करताना लिहितात-

*अजन्म्याचे दिव्य जन्म कीर्तन । अक्रियांचे दिव्य क्रियागान ।*
*जन्मबीजाचे करी दहन । तुरवी गहन कर्मवाती ॥२७॥*
*करिता कीर्तन भगवंताचे । उठावे सात्विक भाव साचे ।*
*तरीच साफल्य जन्माचे । अन्यथा वंधाचे ठाणे ते ॥२८॥*
*नोहे हृदय सद्गदित । नोहे वाचा गद्गदित ।*
*न हो तनू रोमांचित । प्रेमाश्रूपात नोहे जरि ॥२९॥*
*अंतर्मान नोहे जरी । देहभान न उडे तरी ।*
*दंभ मिथ्या प्रतारणापरी । जाणिजे चतुरी कीर्तन प्रौढी ॥३०॥*

या ओव्यात श्री स्वामी महाराजांनी कीर्तन भक्तीचे रहस्य दाखविले आहे. कीर्तनाने आणि श्रवणाने अष्टसात्विकभाव जागृत होणे म्हणजेच मनोमय कोशाचा विकास होणे होय असे कीर्तन चित्तशुद्धीचे अमोघ साधन आहे. याशिवाय कीर्तनाच्या रसपूर्णतेने कठीण अध्यात्मिक विषयसुद्धा सुलभ करण्याचा गुण विपुलतेने उपयोजिला आहे. त्यांच्या कीर्तनाख्यानातून अनेक तात्विकविषय सरळ आणि स्पष्ट झालेले दिसतात. तसेच त्यांचे सर्व वाङ्मय, पदे, अभंग, भजने ग्रंथ हे कीर्तनाकाराला अभ्यासासाठी, कीर्तनासाठी आणि आचरणासाठी उपयुक्त आहेत. त्यांच्या वाङ्मयामध्ये (१) भक्तीरसमयता (२) कठीण विषय सुलभ करणे (३) शैयता (४) शब्द लालित्य इ. अनेक विषयाचा समावेश झालेला असून तयाचा प्रत्यक्ष अनुभव येतो. याचे सर्वांच्या पाठांत असलेली करुणा त्रिपदी इ. काव्यप्रकार त्यांच्या वाङ्मयात आलेले आहेत.

प.प. श्री स्वामीमहाराजांनी अनेक पूर्वरंग व आख्यानांची रचना करून कीर्तनकारांना दिली. त्यातील काही आख्याने उपलब्ध आहेत त्यातील प्रमुख (१) श्री विष्णू दत्त आख्यान (२) आयुराजा आख्यान (३) चंद्रहास आख्यान (४) वटसावित्री आख्यान (५) श्रीदत्तात्रेय जन्माख्यान इ. आख्यानातून प.प. श्रीस्वामीमहाराजांनी कीर्तनांत परंपरेनी आलेल्या वृत्तांचा समावेश केला आहे. उदा. साकी, दिंडी, आर्या, कामदा कटाव इ. दादरा, धुमाळी, केरवा, भजनी, त्रिताल इ. तालांमध्ये अनेक पद्य रचना केल्या असल्यामुळे त्या आख्यानांना एकप्रकारचा दर्जा प्राप्त झाला आहे.

उदा. विष्णुदत्त आख्यानांतील सुरवातीची जी साकी आहे त्यामध्ये माहूरक्षेत्राचे वर्णन केले आहेच पण त्याच्या स्मरणाने देखील मनाचा चित्ताचा मल नाहिसा होईल याची ग्वाही देतात.

*साकी*

*श्री माहुरपूर पवित्र सुंदर स्थान श्रीदत्ताचे ।*
*ज्याचे करिता स्मरणची अंता जातील मल चित्ताचे ॥*

अत्यंत तालबद्ध रचना केल्यामुळे म्हणायला व साथ करणाऱ्या साथीदारांनाही आनंद मिळतो. आणि मग कीर्तनकार कीर्तनानंदांत रंगून गेला म्हणजे उपस्थित श्रोतृवृंदही व साथिदारही तल्लीन होऊन श्रवण करीत असतात आणि मग वक्ता आणि श्रोता कीर्तनात प्रत्यक्ष भगवंत असल्याचा अनुभव घेतात. हा कीर्तनाचा खरा परिणाम आहे.

तसेच सतिचरीत्रातील त्याचा अनुप्रास सुरेख सहज मधुर आहे पहा.

*पद -*

*घेऊनि कर, येवबोनिसुर, होवुनी श्रमी ।*
*जोडुनी कर, सोडुनि दर, अत्रि आश्रमी ॥*
*घासुनि शिर, अर्पुनि कर, ते स्वराश्रमी ।*
*म्हणती, प्रणती, विनति अनुसूये सतीवर्ये*
*मुनिभार्ये, सदय, हृदय हो*

तसेच आयुराजाच्या चरित्रातील प्रारंभीची आर्या तिची सहजता लक्षांत येते.

*"राये उपाय केले पुत्रप्राप्तीस ते अमीत महा ॥*
*दैवे निष्फळ झाले तरि धैर्य सोशितो व्यथा तम हा ॥*

प.प. श्री स्वामीमहाराजांच्या इतर ग्रंथांप्रमाणे या कीर्तनआख्यानातही अगाध शब्द पांडित्य, प्रगाढ विद्वत्ता, निस्सीम ततवनिष्ठा व जहाल — व धर्माभिमान सर्वच ठिकाणी प्रत्ययास येते.

सूत्ररूपाने भक्तिचे तत्वज्ञान जगाला सांगणारे देवर्षि नारदमुनि, भगवान महर्षि व्यास वैराग्यसंपन्न शुकाचार्य या तीन महापुरुषांची — अवृति म्हणजे ही कीर्तन परंपरा होय. उत्तम शब्दांनी वाणीला व मनाला पवित्र करणे व उत्तम वाणीने भगवंताचे गुणानुवाद गाऊन त्याला प्रसन्न करून घेणे हेच कीर्तनाचे ध्येय आहे.

समाजांतील निसर्गशुद्ध प्रेमवृत्ति क्षुद्र वैषयिकतेला दूर सारून ईश्वरपरायण होणे, समर्पित होणे यालाच कीर्तनभक्ती म्हणतात.

सर्वप्रकारच्या सर्व थरांतील समाजाला आकर्षित करून सन्मार्गाला लावणे. त्यांच्या मनांत परमेश्वर, धर्म संस्कृती, संतमहात्म्ये, देश यांच्या विषयी प्रेम निर्माण करणे त्यांची सेवा करणे यासाठी कीर्तनाचा खरा उपयोग आहे. म्हणूनच प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे स्वामी) महाराज आत्मतृप्त असूनही कीर्तनसेवेकडे वळतात यावरून त्यांच्यामनांत समाजाविषयी असलेली करुणा लक्षांत येते.

प.प. श्री स्वामीमहाराजांच्या सार्धशतसांवत्सरिक जन्मशताब्दी निमित्ताने भारतात सर्व प्रांतातून शहरांतून व विदेशातही विविध कार्यक्रम सुरू आहेत. त्यातील एक भाग म्हणून ॐकार ट्रस्ट या सामाजिक कार्य करणाऱ्या सेवाभावी संस्थेने प.प. श्री स्वामीमहाराजांच्या जीवनावर 'कल्याणी' अंक काढण्याचे ठरविले. त्याबद्दल प.प. श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे स्वामी) महाराज सार्धशतसारत्सरिक १५० वी जयंती महोत्सव समितीचा कार्याध्यक्ष या नात्याने कृतज्ञता व्यक्त करितो. हा लेख प.प. श्री स्वामीमहाराजांच्या कृपेने संकलन करण्याचे धाडस केले आहे. त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करावी तेवढी थोडीच आहे. जनतेने प.प. श्री स्वामीमहाराजांच्या इतर ग्रंथांप्रमाणे विशेषतः कीर्तनकारांनी उपयुक्त असणारी आख्याने समाजापुढे सांगावीत अशी सदिच्छा व्यक्त करून प.प. श्री स्वामीमहाराजांचे चरणी ही सेवा समर्पित करितो.

**मोरेश्वर नागनाथ जोशी - चन्होलीकर**
श्री मयूरेश्वर गणेश मंदिर, श्री दत्त निवास,
श्रीमान सोसायटी कर्वेनगर, पुणे - ५२



# प. पू. वासुदेवानंद सरस्वती आणि आयुर्वेद

**श्री. सर्वेश अजित कुलकर्णी**

*तृतीय वर्ष आयुर्वेदाचार्य.*

कलियुगामध्ये सामान्यांना भगवंताचे दर्शन परमात्म्याचे अंश, कलारूपाने साकारणाऱ्या सत्पुरुषांमधूनच होत असते. अशाच सत्पुरुषांपैकी एक प. पू. वासुदेवानन्द सरस्वती यांचे चरित्र व कार्य सर्वश्रुत आहेच. अशा सत्पुरुषांचे दीपस्तंभासारखे जीवन व त्यातील पैलू समजून घेणे हे आपल्यासारख्या अल्पमती व्यक्तींना खरोखर अगम्य आहे. स्वामीजींच्या 'आचार' सन्दर्भातील विचारांचा परामर्श आयुर्वेद शास्त्राचे माध्यमातून जाणून घेणे सुलभ होऊ शकते. या सन्दर्भातच येथे आपण संक्षेपाने विचार करणार आहोत.

***"धर्मार्थकाममोक्षाणां आरोग्यं मूलमुत्तमम् ॥***
***रोगास्तस्यापहर्तारः श्रेयसो जीवितस्य च ॥"***

च. सू. १।१५-१६

अर्थात धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ साध्य करण्यासाठी उत्तम, आरोग्यरूपी मूल हे अनिवार्य आहे आणि रोग हे श्रेयस्कर अशा जीविताचे हरण करणारे ठरतात. या ठिकाणी 'धर्म' ही संकल्पना स्पष्ट होणे गरजेचे ठरते. जीवनाचे धारण (रक्षण, पोषण, अभिवर्धन) ज्याच्यापासून होते तो धर्म असा सोपा अर्थ घेतला तर या धर्माचे पालन कसे करावे ? हा प्रश्न पडणे स्वाभाविक आहे. स्वामीजी सांगतात,

***"आचारप्रभवो धर्मो धर्मेणार्थं साधयेत् ।***
***कामं तदविरोधेन मोक्षोऽतः सुकरो भवेत् ॥"***

शिक्षात्रय. कुमारशिक्षा. श्लोक १६

वर्णाश्रमविहित अशा कर्मांनी, आचाराने धर्म व्यक्त होतो. याच धर्माला अनुसरून अर्थ व काम हे पुरुषार्थ साध्य करावेत म्हणजे मोक्ष मिळणे सुकर होते. धर्म हा मुळात व्यक्ती आणि समाज या पातळींवरील आहे. प्रत्येक व्यक्तीचे जीवन गुणरूपी, आचाररूपी फुलांनी सुंदर असूनही विखुरलेले असते. पण धर्माच्या सुसंस्कृत धाग्यात अशी फुले गुंफून एक माला तयार होते. जीवनाला एक अर्थपूर्णता येते. सामाजिक पातळीवर, साहित्यकारांचे वचनानुसार 'प्रत्येक व्यक्ती म्हणजे ज्योत. समाज म्हणजे ज्वाला. प्रत्येकाने समाजरूपी ज्वालेत आपली ज्योत मिसळलीच पाहिजे.' या स्वरूपाचा हा विचार आहे. ही ज्वाला धर्मकार्यासाठी उभारलेले जणू होमकुंडच असते ज्यात स्वतःपेक्षा राष्ट्र मोठे आहे ह्या भावनेने प्रत्येक ज्योत येऊन मिसळते व हा धर्माचा अग्नि अधिक प्रखर, तेजस्वी आणि प्रगल्भ होतो. येथे आचार हाच समाज संघटन व स्वतःच्या व्यक्तिमत्त्व विकासास कारणीभूत ठरतो. आणि असे आचरण अत्यंत निष्ठेने व्हायला हवे. ह्याविषयी स्वामीजीसुद्धा कायम आग्रही असत.

आयुर्वेदामध्ये शरीरस्थ भावपदार्थ (दोष, धातु, मल) हे सम अवस्थेत असणे हे आरोग्याचे लक्षण सांगितले आहे व हे सम ठेवण्यासाठी स्वस्थ व्यक्तीने स्वस्थवृत्ताचे आचरण करावे. शोधनोपक्रम (पंचकर्म) झाल्यानंतर रसायनांचे सेवन करावे. रसायनांचे गुणधर्म सांगताना आचार्य चरक सांगतात,

***'दीर्घमायुः स्मृतिं मेधामारोग्यं तरुणं वयः ।***
***प्रभावर्णस्वरौदार्यं देहेन्द्रियबलं परम् ।***
***वाक्सिद्धिं प्रणतिं कान्तिं लभते ना रसायनात् ।***
***लाभोपायो हि शस्तानां रसादीनां रसायनम् ।' च. चि. १।१।७-८***

दीर्घायुष्य, स्मरणशक्ती, धारणाशक्ती, आरोग्य मिळून वार्धक्यातसुद्धा तारुण्याचा लाभ होतो. प्रभा, वर्ण, स्वर, उदारता येऊन देह आणि इन्द्रियही श्रेष्ठ अशा बलाने परिपूर्ण होतात. वाक्सिद्धी, विनम्रपणा, कमनीय शरीर इ. गुणधर्म नरास रसायनामुळे प्राप्त होतात. अशा रसायनासाठी उपयुक्त दिव्य औषधींचे वर्णन करून झाल्यावर आचार्य चरक 'आचार रसायन' सांगतात,

***'सत्यवादिनमक्रोधं निवृत्तं मद्यमैथुनात् ।***
***रसायनगुणान् सर्वान् यथोक्तान् स समश्नुते ॥***
***इत्याचाररसायनम् । च.चि. १।४।३०-३५***

सत्य भाषणशील, क्रोध न करणारा, मद्यपान तथा स्त्री सहवास न करणारा, अहिंसक, फार श्रम (स्वशक्तीपेक्षा जास्त) कष्ट करणारा, शान्तचित असणारा, प्रिय बोलणारा, जप, शौच इ. चे पालन करणारा, धैर्यवान, दानशूर, तपस्वी, देवता, गो, ब्राह्मण, आचार्य, गुरु, वृद्ध इ. सर्वांची सेवा करणारा, कधीही क्रूरतापूर्ण व्यवहार न ठेवणारा, सदा सर्वदा सर्वांशी कारुण्याने वागणारा, योग्य वेळी झोपणारा व जागणारा, नित्य दूध, तूप यांचा आहारात सम्यक् मात्रेत उपयोग करणारा, देश व काल यांचे प्रमाण जाणणारा / भान असणारा युक्तिज्ञ, अहंकाररहित, उत्तम आचार, विचार युक्त, संकुचित मनोवृत्तीचा नसणारा, अध्यात्मविद्या जाणून घेण्यास ज्याची इन्द्रिये तत्पर आहेत, ज्ञानवृद्ध, विद्यावृद्ध एवं तपोवृद्ध तसेच आस्तिक, जितेन्द्रिय अशा सत्पुरुषांची उपासना करणारा तथा धर्मशास्त्राच्या नियमानुसार आचरण करणारा पुरुष हा प्रतिदिन रसायन सेवन करणाऱ्या पुरुषासमानच निर्माण होतो. आणि पूर्वी सांगितलेले रसायनांचे सर्व फायदे त्यास मिळतात.

वर चरकाचार्यांनी औषधांइतकाच या रसायनांचा फायदा होतो असे सांगितले आहे व रसायनात सर्वच "आचार" संबंधाने विचार आला आहे. यावरूनच आचाराचे महत्त्व स्पष्ट होते. आचार रसायनातील आचार हा यम-नियमांपासून फार वेगळा नाही. अशाच आचारापासून साधकाची खऱ्या अर्थाने अध्यात्मविद्येच्या क्षेत्रात वाटचाल सुरू होते.

अशाच शुद्ध अशा आचाराच्या पालनाने स्वतः स्वामीजींनी साधकांपुढे एक अग्रीम असा आदर्श ठेवला आहे. स्वामीजींनी स्वतः चान्द्रायण

व्रतासारख्या अत्यंत कठोर व्रताचे पालन केले. त्याचा प्रभाव संन्यास आश्रमामध्ये पडलेला दिसून येतो. चातुर्मासात स्वामीजींनी अनेकांना आचारासंबंधी मार्गदर्शन आणि योगमार्गासंबंधी उपदेश केला आहे. योगिराज गुळवणी महाराजांना अनेकदा स्वामीजींनी योगमार्गाचे मार्गदर्शन केले. आचारसंपन्न सर्वच साधकांवर स्वामीजींची कृपादृष्टी कायम असे. तसेच स्वामीजींचा विशेष भर क्षौर कर्मावर होता कारण आचारसंपन्न ब्राह्मणाला क्षौर कर्म हे पाप शमन करणारे, प्रसन्नता, शरीर लाघव, सौभाग्यदायक असून उत्साहवृद्धी करणारे आहे, असे सुश्रुताचार्य सांगतात,

***"पाप्मोपशमनं केशनखरोमापमार्जनम् । हर्षलाघवसौभाग्यकरमुत्साहवर्धनम् ।"***

सु. चि. २४।७३-७४

भगवान दत्तात्रेय स्वामीजींशी बोलत असत. दत्तात्रेयांच्या अनुज्ञेने काही रुग्णांना ते असाध्य व्याधींवरसुद्धा उपचार सांगत व त्या चिकित्सेने रुग्णास अपशम मिळत असे. स्वामीजींचे व्यक्तिमत्त्व पुढील चरकवचनाने अधिक चांगले सांगता येईल.

***रजस्तमोभ्यां निर्मुक्तास्तपोज्ञानबलेन ये । येषां त्रिकालममलं ज्ञानमव्याहतं सदा ॥***
***आप्ताः शिष्टा विबुद्धास्ते तेषां वाक्यमसंशयम् । सत्यं वक्ष्यन्ति ते कस्मादसत्यं नीरजस्तमाः ॥***

च. सू. ११।१८-१९

तपोबलं एवं ज्ञानबलाने जे रज व तम गुणांनी पूर्णपणे मुक्त आहेत. त्यामुळे सदा त्रिकालाचे शुद्ध व संपूर्ण ज्ञान ज्यांना असते, ते महापुरुष आप्त, सभ्य, एवं विशेष ज्ञानवान असतात. त्यांचा प्रत्येक आणि प्रत्येक शब्द उपदेशासारखा असून सदा सत्य असतो. कधीही असत्य असत नाही.

पुढे औषधाचे वर्णन करताना चरकाचार्य सांगतात,

***तत्र दैव्यपाश्रयं - मन्त्रौषधि... ।***
***सत्त्वावजयः - पुनरहितेभ्योऽर्थेभ्यो मनोनिग्रहः ॥ च. सू. ११।५४***

दैव्यव्यपाश्रय चिकित्सेत मन्त्र, औषधी इ. प्रकारची चिकित्सा व सत्त्वावजय चिकित्सेत मनाचा अहितकर विषयांपासून निग्रह. वरील दोन्ही प्रकारच्याच औषधाने स्वामीजी चिकित्सा देत असत असे म्हणता येऊ शकते. मात्र या ठिकाणी एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे की, स्वामींनी कोणत्याही व्यक्तीविशेषांस सांगितलेली चिकित्सा अन्य कोणी घेण्याचा अगर अन्य कोणास देण्याचा प्रयत्न करू नये. कारण देणारा आप्त (वरील व्याख्येनुसार) असेलच असे नाही आणि घेणारा पात्र ठरेलच असे नाही. स्वामीजी हे आप्त असल्यामुळे त्यांनी दिलेले औषध सिद्ध होत असल्यामुळे असाध्य व्याधीसुद्धा बरे होत.

स्वतः स्वामीजींनीच अशा आचार रसायनाचे फायदे अनुभवल्यामुळे ते आचाराबद्दल अधिकाराने सांगत. आचार पालन ही प्रत्यक्षात सोपी गोष्ट नाही मात्र क्रमाक्रमाने या आचाराचे काटेकोरपणे पालन केले म्हणजे ही अवघड गोष्ट सहज शक्य होऊ शकते. आचार हा अध्यात्मविद्येचा पाया आहे. त्यामुळे ज्ञान, कर्म किंवा भक्ती कोणताही मार्ग असला तरी आचाराला अनन्यसाधारण महत्त्व आहे आणि म्हणूनच स्वामीजींनी सांगितलेला आचार सन्दर्भातील विचार हा आजही साधकांपुढे दीपस्तंभासारखा मार्गदर्शक ठरतो.


**सर्वेश अजित कुलकर्णी**
(तृतीय वर्ष, आयुर्वेदाचार्य)
३४६ शनवार पेठ, नवीन मराठी शाळेसमोर, पुणे ३०.



# कल्याणकारी श्री. प. पू. वासुदेवानंद सरस्वती महाराज

**डॉ. प्रभाकर वि. कुलकर्णी**

*एम.ए. (मराठी), पीएच.डी. देवचंद कॉलेज - निपाणी येथून मराठी विभाग प्रमुख म्हणून सेवानिवृत्त. २/३ पुस्तके प्रकाशित. संतवाङ्मयावर लेख प्रकाशित.*

भारतीय संस्कृतीच्या विकासातील एक अद्‌भुत निर्मिती म्हणून दत्तात्रेय देवता मानली जाते. दत्तात्रेय ही देवता क्षमाशील, पालनीयता अशी सर्वांचे रक्षण करणारी आहे. स्वधर्माची व गुरुपीठाची स्थापना करण्यासाठी, मानवाचा उद्धार करण्यासाठी हा अवतार झाला आहे. ही देवता म्हणजे मांगल्याची ज्योतच. जो स्वतःसकट सर्वस्वाचा दाता तो दत्त होय. हा अवतार अज्ञानाधंकार नाहीसा करणारा असल्यामुळे सदैव, सर्वकाळात असणाऱ्या या अवताराची कधीच समाप्ती होऊ शकत नाही. दत्तात्रेय ही संघर्ष आणि भेद यांना उल्लंघून सामंजस्य साधणारी देवता आहे.

दत्तसंप्रदायात अनेक दत्तावतार होऊन गेले. त्यापैकी दत्तात्रेयाचा तिसरा अवतार म्हणून श्री. प. पू. वासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामींचा विशेष मान आहे. दत्तप्रभू हे टेंबे स्वामींच्या रूपानीच लोकांना सन्मार्गाला लावण्याचा प्रयत्न करत होते.

"आचारो प्रथमो धर्मः" या वचनाप्रमाणे लहानपणापासूनच कर्ममार्गाचे यथाविध आचरण करीत राहिल्यामुळे स्वामी महाराजांच्या ठिकाणी ब्रह्मतेज वाढले होते. पूर्वसंस्कारानुसार त्यांची प्राज्ञशक्ती तीव्र स्वरूपाची होती. त्यांचे बालपण हे खेळण्या बागडण्यापेक्षा ज्ञानप्रांतात विहार करणे त्यांना आवडत असावे. आजोबांच्या बरोबर रूपावली, समासचक्र, अमरकोश, अष्टाध्यायी मुखोद्‌गत झाले. वयाच्या १२ व्या वर्षीच ऋग्वेदसंहिता, पदे, घन इत्यादींचा अभ्यास त्यांनी केला. त्याच वेळी दशग्रंथी ब्राह्मण म्हणून स्वामीमहाराजांची ख्याती झाली. त्यांनी रघुवंश, पुराणांचा अभ्यास केला होता. विशेष म्हणजे ते प्रतिदिनी गुरुचरित्राचा पाठ करीत. ते वेदपारंगत जसे होते तसेच ज्योतिषशास्त्रवेत्तेही होते.

### आचरण

प. पू. टेंबे स्वामीमहाराज वेदसंपन्न असल्यामुळे ते उच्चकोटीचे श्रीमंत होते. परंतु आर्थिकदृष्ट्या दारिद्र्याच्या वातावरणातून वावरत होते. सांसारिक जीवनाच्या दृष्टीने त्यांचे दारिद्र्यच होते. त्यामुळे त्यांच्याकडे अंगावर घालण्यास पुरती वस्त्रे नसत. नेसण्यास एक पंचा व पांघरण्यास एक पंचा आणि मिळालाच तर डोक्याला गुंडाळण्यास एखादा पंचा, एवढेच वस्त्र. अंथरण्यास गवताची चटई, पायात मात्र कधीही काहीही नाही.

त्रिकाल स्नान करणे, स्वतः सोवळ्याने भात करून, नैवेद्य व वैश्वदेव करून नंतरच भोजन करणे असा त्यांचा परिपाठ होता. प्रतिदिनी गुरुचरित्राचा पाठ करत. त्यांनी आजन्म परान्नाला स्पर्श केला नाही. पुढे माधुकरीची भिक्षा मागून राहात. त्यांचे आचरण नियमपूर्वक होते. मातोश्री विषयी त्यांना नितांत आदर होता. सदैव त्यांना नम्रभावे ते नमस्कार करत. मातोश्रींची देखील बालवासुदेवावर खूप श्रद्धा होती. वैदिक ज्ञानामुळे व ज्योतिषाच्या अभ्यासामुळे त्यांना घर चालविण्यापुरती आर्थिक मदत होत होती. त्या संपत्तीची मदत टेंबे कुटुंबियांच्या प्रपंचाला होत होती.

कागलमधील एका ओताऱ्याकडून मिळालेली दत्तप्रभूंची मूर्ती हीच स्वामीमहाराजांची आराध्य बनली. तीच माणगावचीही आराध्य बनली. सावंतवाडी संस्थानमधील माणगाव हे एक प्रसिद्ध दत्तक्षेत्र बनले. शिवाय महाराजांच्या वास्तव्यामुळेही येथे लोकांचे येणे वाढले. श्रीदत्त प्रभूंच्या आज्ञेने स्वामीमहाराजांचे माणगावातील वास्तव्य सात वर्षांचे होते. माणगावी स्वामीमहाराज असताना दत्तप्रभूंनी त्यांच्या स्वप्नात येऊन आज्ञा केली. 'भक्तराज आता तुम्ही तीर्थयात्रा करायला निघा. शरणागत लोकांना उपदेश करा. भवबंधनातून मुक्त होण्याचा मार्ग त्यांना दाखवावा. ह्या प्रकारे परोपकार करू लागल्यावर तुमचा अहंकार नाहीसा होईल आणि माझ्या अद्वैत स्वरूपाचा तुम्हाला अनुभव येईल. जीवनमुक्ती सुखाचा तुम्हाला लाभ होईल. शेवटी तुम्हाला विदेह मुक्तीची प्राप्ती होईल.' त्याचप्रमाणे दत्तप्रभूंनी वासुदेवांना सांगितले, 'परंतु हे परमसुख बाह्य प्रपंचाचा त्याग केल्याविना लाभणार नाही. ह्यासाठी संसार उपाधी सोडून द्या. संस्थानासाठी पूजा नैवेद्याचा बंदोबस्त करा. माझी मूर्ती आपल्याबरोबर घ्या आणि प्रथम नरसोबाच्या वाडीला चला.' स्वामीमहाराजांनी दत्तप्रभूंची आज्ञा प्रमाण मानून माणगाव येथील दत्तमंदिरातील पूजा-अर्चा, नैवेद्य यांची सोय करून, मातोश्रींचा निरोप घेऊन, पत्नीला आपल्याबरोबर घेऊन स्वामीमहाराज तीर्थयात्रेला निघाले. आपल्याबरोबर त्यांनी दत्तात्रेयाची मोठी मूर्ती, अंगुष्ठ मूर्ती आणि पादुका बरोबर घेतल्या.

दत्तप्रभूंनी स्वामी महाराजांना असाही स्वप्नात उपदेश केला की, 'आजपासून तुम्हाला शरण येणाऱ्या भक्ताला तुम्ही वरदान द्यावे. तुमचे रक्षण करण्यासाठी माझे गण येथे ठेवीत आहे. त्यामुळे तुम्हाला कुणापासून उपद्रव होणार नाही. आजकाल बहुतेक लोक शास्त्राच्या विरुद्ध वागतात. ते धर्मभ्रष्ट झालेले आहेत. नास्तिक बनलेले आहेत. यासाठी तुम्ही तीर्थाच्या ठिकाणी संचार करावा, धार्मिक आणि श्रद्धाळू लोकांना सदुपदेश करावा आणि त्यांना सन्मार्गाला लावावे.'

दत्तप्रभु स्वामी महाराजांच्या रूपानीच लोकांना सन्मार्गाला लावण्याचा प्रयत्न करत होते. दत्तप्रभूंच्या आज्ञेप्रमाणे तीर्थयात्रेला प्रारंभ केला.

### तीर्थयात्रा

तीर्थयात्रेमागचा उद्देश म्हणजे पवित्र तीर्थस्थानी जाऊन तेथील समाजमनाचे, त्यांच्या विचारांचे निरीक्षण करून त्यांना जीवनमुक्तीची योग्य दिशा दाखवून द्यावयाची. स्वामीमहाराजांची तीर्थयात्रा ही नुसती

तीर्थस्थाने पाहण्याची नव्हती. लोकमनाचा अभ्यास करून त्यांना अज्ञानांधकारातून बाहेर काढावयाचे, धर्माचे महत्व त्यांच्यापुढे विशद करावयाचे, जनताजनार्दनाला भक्तीची वाट दाखवून त्यायोगे त्यांचे कल्याण साधावयाचे.

आपल्या पत्नीसमवेत स्वामीमहाराजांचे आगमन श्रीक्षेत्र नृसिंहवाडी येथे झाले. वाडीत आल्यावर त्यांची गोविंदस्वामींशी भेट झाली. मौनिस्वामींचीही भेट झाली. स्वामी महाराजांनी गोविंदस्वामींच्याकडे आपणास मंत्रोपदेश करण्याची इच्छा व्यक्त केली. तेव्हा गोविंदस्वामी म्हणाले, "मंत्रोपदेश करण्याचा माझा अधिकार नाही. ज्यांना जरूर असेल ते तुम्हास मंत्र देतील" त्याच दिवशी रात्री मध्यरात्रीच्या सुमारास कृष्णातीरी जाऊन, हातपाय धुवून, थोडा जप करण्याचा विचार करून स्वामीमहाराज देवाकडे आले. पण दार बंद असल्याने देवानजीक बसणे चांगले नाही, असा विचार करून प्रदक्षिणा घालण्यासाठी दक्षिणद्वारी जाताच, भगवीवस्त्रे परिधान केलेला असा तेजस्वी पुरुष त्यांनी पाहिला. स्वामी महाराजांनी नमस्कार केला. 'तू कोण? यावेळी तू का आलास? शयनारती झाल्यावर येथे कोणीही येऊ नये असा नियम आहे. तो तुला ठाऊक नाही काय?' असा प्रश्न त्या तेजस्वी पुरुषाने केला. त्यावेळी 'मी या स्थळी प्रथम आलो. मला नियम माहीत नाही.' असे स्वामी महाराजांनी म्हटल्यावर तो तेजस्वी अदृश्य झाला. पहाटे स्वप्नात दत्तप्रभू प्रगट झाले. त्यांनी स्वामीमहाराजांना पहिल्या भेटीची आठवण करून दिली. मंत्रोपदेश केला. दत्तपूजा व ध्यान करावे, उपनिषद भाष्यांचा विचार करावा असे सांगितले. तेजस्वी पुरुष म्हणजे प्रत्यक्ष श्री नृसिंह सरस्वतीच होते ही गोष्ट दुसऱ्या दिवशी गोविंदस्वामींना कळून आली. स्वामी महाराजांची योग्यता गोविंदस्वामींनी अंतर्ज्ञानाने जाणली होती. स्वप्नातला मंत्रोपदेश गोविंदस्वामींनी स्वामी महाराजांना सांगितला. तेव्हापासून गोविंदस्वामी हे गुरुस्थानी झाले. मौनी स्वामी, नारायण स्वामींसारख्या थोर विभूतींच्या सहवासात स्वामीमहाराजांचा बराच काळ गेला. गोविंदस्वामींच्या आशीर्वादाने त्यांची तीर्थयात्रा सुरू झाली.

श्री नृसिंहवाडी-कोल्हापूर-पंढरपूर-बार्शी अशा मार्गाने स्वामीमहाराज गोदातीरी गंगाखेडला आले असतांना त्यांच्या पत्नीचे निधन झाले. मुळातच विरक्तीवृत्ती आणि त्यात पत्नीचा वियोग. त्यामुळे विरक्तीत अधिकच भर पडली. चौदाव्या दिवशी त्यांनी संन्यास ग्रहण केला. तेव्हापासून ते श्री. प.पू. वासुदेवानंद सरस्वती म्हणून ओळखले जाऊ लागले. पुढे ते नर्मदाकाठी मंडलेश्वरला आले. तिथून अमरखेडला आल्यावर त्यांना गोचरस्वामींचे दर्शन झाले. मंडलेश्वर येथे कैवल्याश्रम थोर स्वामीमहाराजांचे दर्शन झाले. तिथून बैलवाडा (नेमावरजवळील) एका गावात मुक्कामाला असतांना रात्री स्वप्नात नर्मदेचे त्यांना दर्शन झाले. नेमावरला आल्यावर स्वप्नात दिसलेली नर्मदामूर्ती त्यांना दिसली. तिथून उज्जैन, सारंगपूर येथे काही दिवस मुक्काम करून लोकांना सन्मार्गाला लावण्याचे कार्य केले. सारंगपूर - बजरंगगड - पिछेरा - जालवण - मथुरा - कुरुक्षेत्र - हरिद्वार - बदरीकेदार - बदरीनारायण - ब्रह्मावर्त येथे आले. या ठिकाणी शके १८१४ चा चातुर्मास झाला. तिथून हरणगाव येथील नर्मदेच्या ब्राह्मणी घाटावर महाराजांचा मुक्काम असतांना, नर्मदाघाटावरून चालत असतांना महाराजांचा पाय घसरून त्यांना लचक भरली. माधुकरी मागण्यासाठी चालत जाणे त्यांना अशक्यप्राय झाले. महाराज तिथेच थोडावेळ निजून राहिले. त्यावेळी १० वर्षाच्या कुमारी स्वरुपात नर्मदामातेने दर्शन देऊन म्हटले, 'भिक्षेची वेळ झाली आहे आपण भिक्षा घ्यायला निघावे. मी आपल्या कमरेची लचक बरी करणार आहे.' कुमारीने भस्म घेऊन त्यावर मंत्रोपचार केला, ते भस्म त्यांना देऊन आपल्या कमरेस लावण्यास सांगितले. त्यांनी तसे केले. महाराज उठून उभे राहिले. पाय खाली टेकताच आपली लचक बरी झाल्याचे त्यांना आढळून आले. त्यांनी नर्मदामातेला (कुमारीला) नमस्कार केला. तिची स्तुती केली. बालरूपी नर्मदा अंतर्धान पावली. महाराजांनी नेहमीप्रमाणे भिक्षा मागितली. ब्रह्मणीवरून महाराज नेमावरला आले. ॐकारेश्वर येथे त्यांनी तेहतीस दिवस मुक्काम केला. मंडलेश्वर - चिखलदा येथे ते आले. तिथून तिलकवाडा येथे मुक्काम करून चातुर्मास केला. तिथून बरकाल येथे आल्यावर अत्रि अनुसूया आश्रमात येऊन अनुसूया मातेची प्रार्थना केली. तिथून मार्कंडेश्वर येथील महादेव मंदिरात मुक्काम झाला. या ठिकाणी महाराजांना गांडाबुवा शरण आले. महाराजांनी गांडाला महादेवमंदिरात योगाभ्यास शिकविला. 'महादेव तुझी इच्छा पूर्ण करील असा गांडाला आशीर्वाद दिला. गांडा म्हणजेच गांडा बुवा. ते महाराजांचे पट्टशिष्य बनले. तिथून निकोरा-गिरनार-प्रभास-प्राची सरस्वती येथे महाराज आले. हे स्थान म्हणजे श्रीकृष्णांनी देहत्याग केलेली जागा. महाराजांना पाहिल्यावर येथील लोकांना महाराज म्हणजे प्रत्यक्ष श्रीकृष्ण परमात्मा आहेत असे वाटले. तिथून सुदामपुरी म्हणजेच पोरबंदर करून महाराज द्वारकेला आले. राजकोट -बढवाण - विरमगाव या मार्गाने गांडाबुवांसमवेत महाराज सिद्धपूरला आले. सरस्वती देवीला नमस्कार केला. सिद्धपूर - डाकोर - शिबोर - तिलकवाडा येथे गांडाबुवा समवेत काही दिवस मुक्काम केला. तिथून चिखलदा येथे शके १८२२ चातुर्मास केला. तिथून मंडलेश्वर - इंदोर - उज्जैन - महतपूर येथे शके १८२३ चा चातुर्मास केला. तिथून सारंगपूर - ब्रह्मावर्त येथे शके १८२४ चा चातुर्मास केला. परत वाडी. येथे नारायण दीक्षितांना दंड देऊन त्यांचे श्री नृसिंहसरस्वती दीक्षितस्वामी असे नाव ठेवले. वाडीहून गाणगापूर, तिथून कयाधूनदीच्या तीरावर महाराज राहिले. नंतर नरसी. तिथे १८२७ चा चातुर्मास केला. या ठिकाणी असतांना श्री नृसिंहवाडीत रात्री पालखीच्या वेळी पालखीतील श्रीमूर्ती निसटून खाली आली. तेव्हा महाराज नरसी गावात होते. त्यावेळी दत्तप्रभूंनी महाराजांना कोपायमान अवस्थेत दर्शन देऊन सांगितले, 'पुजारी नियमांचे पालन करत नाहीत. पादुकांवर अशुद्ध पदार्थ घालतात. आधण पाणी घालतात. तुमची निंदा करतात. त्यांना शासन पाहिजे. तेव्हा वाडीहून महाराजांच्याकडे आलेल्या मंडळींना, पुजाऱ्यांना महाराजांनी बजावले. नियमांचे काटेकोर पालन करून दत्तप्रभूंची प्रार्थना करण्यास सांगितले. 'शांत हो श्रीगुरुदत्ता' हे पद तयार करून देऊन, ते म्हणण्यास सांगितले. दत्तप्रभूंची कळवळून प्रार्थना करण्यास सांगितले. 'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' या नाममंत्राचे भजन करण्यास सांगितले. पुढे महाराज नरसीहून ब्रह्मावर्त - प्रयाग - काशी (पंचक्रोशीची यात्रा केली.) तिथे महाराजांना वाडीला जाण्याची दत्तप्रभूंकडून आज्ञा झाली. तिथून बढवाई येथे आले. तिथे त्यांचा मुक्काम व शके १८२८ चा चातुर्मास झाला. तिथून संनावद - श्रीनृसिंहवाडी येथे महाराज आले. तिथून परत बेळगाव - गुर्लहोसूर - कैवल्याश्रम मंदिरात १० दिवस मुक्काम करून यल्लमा (रेणुकामातेचे जन्मस्थान) मार्गाने किष्किंधानगरी - पंपासरोवर शेषाचल पर्वतावर कार्तिकस्वामींचे दर्शन - बालाजी - कालहस्ती - शिवकांची - पक्षितीर्थ - चिदंबरनाथ -श्वेतारण्य - मरुताचल - उदयाचल - कुंभकोणम श्रीरंगपट्टण

- मदुरा - मिनाक्षी - पाषाण याठिकाणी भेटी देत महाराज रामेश्वरला आले. सेतु दर्शन घेऊन दक्षिणसागरात स्नान केले. - कावेरी किनारी असलेल्या संध्यामंडप (तंजावर) गावी आले. तिथे शके १८२९ चा चातुर्मास केला. पुढे तंजावर - जंबुकेश्वर - कावेरी तीरावरून भ्रमण करून ईराले नजीक आले. तिथे शृंगेरीपीठाधीश श्री शंकराचार्य श्री नृसिंहसरस्वती महाराज यांची भेट व त्यांचे दर्शन झाले. शंकराचार्यांनी महाराजांचे अलौकिक महत्व व त्यांचे मोठेपण लोकांना सांगितले. तिथून महाराज करूर स्टेशन मार्गे नेरोट येथे राजमहेंद्रीजवळ आले. कोडारगाव - कलेश्वर - वैनगंगातीर (पवनी) येथे शके १८३१ चा चातुर्मास केला. चातुर्मास विठ्ठलमंदिरात केला. पवनीहून माहूरला जाण्यासाठी बोरीगावी आले. इथे जनकदेव शरभंगऋषींचा आश्रम पाहून माहूरगडावरील संघर्ष पर्वतावर असलेले रेणुकामातेचे दर्शन, अनुसूया, अत्रिमहाराज यांचे दर्शन घेऊन फुलगामी आले. गोदावरी नदी पार करून ते मोसला गावी आले. तिथून बार्शीला आले. बार्शी ही पूर्वी अंबरीषाची राजधानी होती. जवळच दुर्वासऋषींचा आश्रम होता तिथून महाराज पंढरपूरवरून वाडीला आले. वाडी येथे आपला सर्व ग्रंथसंभार गांडाबुवांना देऊन ते सांबगावी आले. बेळगाव - धारवाड - गूर्लहोसूर - मलप्रभाकाठ - चिदंबरनाथ मंदिरात मुक्काम. धारवाड हावनूरला आले. शके १८३२ चा चातुर्मास हावनूर येथे झाला. हावनूर येथे श्री. प.पू. गुळवणी महाराजांना श्री प.प. वासुदेवानंदसरस्वतींचे दर्शन झाले. स्वामी महाराजांचा मुक्काम त्रिपुरांतकेश्वर मंदिरात होता. या गावी श्री. प. पू. स्वामी महाराजांच्या पायातील खडावा एकांच्या घरी आहेत. त्यांची रोज नित्य नियमाने पूजा होत असते. महाराजांनी इथे श्री प.पू. गुळवणी महाराजांना व्याघ्रांबरधारी दत्तस्वरूपात दर्शन दिले. आणि तसे चित्र काढण्याची प्रेरणा दिली. याची हकीकत स्वतः गुळवणी महाराजांनी सांगून ठेवली आहे. महाराजांनी स्वामीमहाराजांना विचारले, पुन्हा या चरणांचे दर्शन केव्हा? त्यावेळी महाराजांनी स्वतःकडे बोट दाखवून जे रूप दाखविले, ते निरंतर चित्तात ठेवण्यास आदेश दिला. तेच आम्ही चित्रित करून आमच्या नित्य वाचनाचे पोथीमध्ये ठेवून दिले. असे हे व्याघ्रांबरी एकमुखी स्वरूपात श्री दत्तप्रभू श्री स्वामीमहाराजांचे ठिकाणी व्यक्त झालेले पाहिले.' पुढे स्वामीमहाराजांनी गुळवणी महाराजांना म्हटले, ' तुझ्या पोथीत असलेल्या व्याघ्रांबरी दत्ताचा फोटो फ्रेम करून दे.' गुळवणी महाराजांनी तो फोटो स्वामीमहाराजांना दिला. पुढे स्वामीमहाराज गरुडेश्वरी असतांना गुळवणी महाराज आले असताना त्यांना तो व्याघ्रांबरधारी दत्ताचा फोटो स्वामीमहाराजांच्या समोर चौरंगावर ठेवलेला आढळला. त्या फोटोची षोडशोपचारपूजा स्वामीमहाराजांनी केली. स्वामी महाराज रोज त्याची पूजा करत असत. तोच दत्तप्रभूंचा फोटो स्वामी महाराजांनी चौरंगावरून उचलला व गुळवणी महाराजांच्या हातात दिला. त्याची माहिती 'जीवनगंगा-आद्यकलश' या ग्रंथात पृ. क्र. ६५-६६ वर आली आहे.

हावनूरहून स्वामीमहाराज शृंगेरी-वनवासीक्षेत्र-कृष्णातीरी गालवक्षेत्री जैनपूर - काडलूर (कृष्णा-भीमा संगम) मार्गे शके १८३३ वद्य षष्ठीला कुरवपूर (कुरुगड्डी) येथे आले. तिथे स्वामीमहाराजांनी चातुर्मास केला. दत्तआज्ञेने खेडगावी गेले. भीमानदीत स्नान केले. पुढे सोलापूर - तुळजापूर येथे तुळजाभवानी दर्शन (स्तोत्ररचना केली) घेऊन वांदनदीतीरावर आले. तिथे दासोपंतांची गाठ पडली. तेथील बापूगोसाव्यांना दासोपंत व स्वामीमहाराज भिन्न नसल्याचे दाखवून दिले. तिथून गोदातीरावर आले. त्यावेळी वाटेत महाराजांच्या डोक्यावर एका कावळ्याने तिनदा चंचू प्रहार केला. त्यावेळी दत्तप्रभूंची आज्ञा झाली, 'त्या अरिष्ट शमनार्थ, तुम्ही परळीला जावे. वेनसंगमावर गोदावरीचे स्नान करा म्हणजे ह्या अरिष्टाची शांती होईल.' स्वामीमहाराजांनी त्या ठिकाणी तीन रात्री मुक्काम केला. गोदावरीत स्नान केले. ज्योतिर्लिंगाचे दर्शन घेतले. गोदावरीतीरावरील राजूरगाव येथे सीताराम महाराजांनी स्वाहाकार केला. स्वामीमहाराज, नृसिंहवाडीहून श्री नृसिंह सरस्वती दीक्षित स्वामी, हंपीमठाचे शंकराचार्य, दाजीमहाराज, टकले महाराज इत्यादी महाराज समारंभाला उपस्थित होते. राजूर - आवंढ्या नागनाथ - नरसी - उटीगाव (अगस्ती आश्रमाचे ठिकाण) हिंगोली गावावरून गोदावरी तीरावरच्या गोंडगावी स्वामीमहाराज आले. तेथे रेणुका मातेचे स्थान आहे. तिथे ज्येष्ठ महिन्यात गोदावरीच्या काठावरील उकडगावी गंगासमाप्तीचा उत्सव केला. (दशहरा उत्सव) राक्षस भुवननजीक पांचालेश्वर येथे श्रीदत्त दर्शन घेऊन पैठणला आगमन, तिथून दौलताबाद येथील जनार्दन स्वामीमहाराजांच्या समाधीचे दर्शन घेऊन, श्रीदत्त भगवान जिथे सागरगोट्यांचा खेळ खेळत होते ते स्थान पाहून वेरूळ - घृष्णेश्वर - घाट उतरून खानदेश, चाळीसगावला आले. तिथे गांडाबुवांना 'तू भडोचकिनारी राहून अभ्यास कर. मी नर्मदा किनारी जात आहे' असे स्वामी महाराजांनी सांगितले. शके १८३४ चा चातुर्मास ज्येष्ठ कृष्ण चतुर्दशीला नर्मदाकिनारी चिखलदा गावी पूर्ण केला. तिथून कातरहून शूलपाणीश्वराला आले. तिथून गरुडेश्वरला आले. शके १८३५ चा शेवटचा चातुर्मास गरुडेश्वरी केला. गरुडेश्वर हे नाव पडण्याचे कारण, गरुडांनी हत्तीचे स्वरूप धारण करून गजासुराचा वध केला म्हणून गरुडेश्वर. नर्मदा नदीच्या काठी हे रम्य आणि पावन क्षेत्र आहे. स्वामीमहाराजांचे बरेचसे अनुष्ठान नर्मदानदीच्या काठी झाले आहे. नर्मदा ही महानदी आहे. 'नर्म' म्हणजे सुख, आनंद आणि 'दा' म्हणजे देणारी. नर्मदा ही शिवस्वरूपा आहे. आयुष्याच्या अखेरपर्यंत त्यांचे वास्तव्य गरुडेश्वरला होते.

मंत्रशास्त्र, यंत्रशास्त्र, अदृश्यवस्तू ओळखणे हे ज्ञान त्यांना मुळातच होते. शिवाय त्यांचा स्वामीमहाराजांनी शास्त्रशुद्ध अभ्यास केला होता. मंत्रशास्त्र हे ध्वनिलहरीवर आधारलेले आहे. त्या मंत्रातील अक्षरसमूहांना, त्या स्पंदनांना विशिष्ट सामर्थ्य प्राप्त होते. महाराजांच्या अनेक स्तोत्रातील श्लोकांना मंत्रसामर्थ्य प्राप्त झालेले आहे. स्वामी महाराजांनी भक्तांना दिलेले मंत्र, दिलेली यंत्रे प्रभावी होती. मानवतेची सेवा हाच केवल मंत्रशास्त्राच्या उपयोगामागे त्यांचा हेतू होता. अनेक लोकांना अनेक प्रकारचे मंत्र, यंत्रे देऊन स्वामी महाराजांनी त्या लोकांची मानसिक, शारीरिक त्रासातून मुक्तता केलेली आहे. महाराजांचे सर्व जीवन - व्यवहार हे ईश्वरेच्छेच्या आधीन होते.

## स्वामी महाराजांची शिकवण

स्वधर्मावर श्रद्धा पाहिजे. स्नानसंध्या - देवपूजा, अतिथीपूजा, पंचमहायज्ञ, अतिथीसत्कार, गोसेवा, कथा, कीर्तन, भजन, पुराणश्रवण, सर्वांसी गोड वागणूक, वडिलांची सेवा करावी. श्री गुरुचरित्राचा नित्यपाठ करावा. रोज श्री गुरुचरित्राच्या नित्य पाच ओव्या वाचाव्यात. देवाजवळ येतांना पवित्र होऊन यावे असे ते सांगत. 'ईश्वर श्रद्धाळू भक्तांचे प्रत्येक संकटापासून संरक्षण करतो' असे आवर्जून सांगत. कुणी कुणाचा विश्वासघात करू नये. कुणी कुणाची मिळकत त्याने स्वसंतोषाने दिल्याखेरीज

घेऊ नये. कर्म मार्गाचा त्याग करू नका. चित्ताची शुद्धी कर्माने होऊन नंतर कल्याणाची प्राप्ती होते. आपल्याला कर्माची जरूर नव्हती. तथापि सर्वांना कित्ता लागावा एवढ्यास्तव शेवटपावेतो कर्ममार्गाचे अवलंबन केले. ब्राह्मणास गायत्री मंत्र हाच मुख्य मंत्र असल्याने त्याचेच पुरश्चरण करून ब्राह्मणाने कार्यसिद्धी करून घ्यावी. तसेच आपल्या कुळातील कोणी तपस्वी पुरुषाने जी देवता प्रसन्न करून घेतली असेल तीच कुलदेवता. ती कुळातील माणसांचे रक्षण करते. करिता तुम्ही या प्रमाणे कुलदेवतेचा व गायत्रीचा मंत्र नित्यजपत चला असे सांगत. सात्विक प्रवृत्तीनेच उन्नती होत असते. त्यासाठी आहारशुद्धीची गरज आहे. आत्मशुद्धीला व आत्मज्ञानाला त्यांनी प्राधान्य दिले.

## स्वामीमहाराजांची योग्यता

शृंगेरी पीठाधीश शंकराचार्य श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराजांच्या बद्दल म्हणतात, 'हे स्वामीमहाराज आपले आद्य शंकराचार्य आहेत. आद्य शंकराचार्यांनी प्रगटपणे धर्मस्थापना केली. हे गुप्तरूपाने धर्मस्थापनेचे कार्य करीत आहेत. शरणार्थी लोकांना सदुपदेश करून सन्मार्गाला लावतात. माणूस कितीही नास्तिक असला तरी यांच्या दर्शनाने सुधारतो. दुःखी जनांना त्यांच्या दुःखांचा परिहार होण्यासाठी त्यांना शास्त्राधारे नियम सांगतात. दुःखापासून मुक्त करतात. त्यांच्या दर्शनाने पतित पावन होतात. ते पायी तीर्थयात्रा करतात. यांच्यामुळे आर्यावर्तातील हजारो लोक सन्मार्गाला लागलेले आहेत. ईश्वराचे भजन पूजन करत आहेत. यावत्‌चंद्र दिवाकरौ यांच्या आयुष्याची वृद्धी व्हावी. अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करतो." यातून महाराजांच्या थोरपणाचे, ईश्वरी स्वरूपाचे वैशिष्ट्य जाणवून येते. गांडाबुवांनी स्वामी महाराजांच्या थोरवीपणाचे गुणवर्णन केले आहे. 'ह्या निरोपात नारळासारखा स्वाद आहे. नारळ बाहेरून जसा निरुपयोगी दिसतो, पण त्याच्या आत मधुर खोबरे असते. त्याचप्रमाणे श्रीगुरुवचनात उत्तम रहस्य आहे. अरे ज्या सत्पुरुषांनी षड्‌रिपुंना आपल्या स्वाधीन ठेवले आहे आणि जे स्वरूपानंदात निमग्न आहेत, त्यांच्याशी अज्ञ जन हवेतसे वर्तन करतात. तरीसुद्धा जे रागावत नाहीत, ज्यांना ह्या जगात कुणी शत्रू अगर मित्र नाहीत, शरण आलेल्या पतितास त्यांच्या दोषाकडे दुर्लक्ष करून पावन करतात, असे सत्पुरुष आपल्या अनन्य भक्तावर कधी क्रोध करतील काय? हे संभवनीय तरी आहे काय? तर मग श्रीसद्‌गुरु या दासावर रागावतील? बाबांनो ह्या निरोपाचा खरा अर्थ असा आहे की, 'तू स्वस्थ रहा. आत्मनात्म विचार कर. मन शांत ठेव. घाबरू नकोस. माझ्यात तुझा हिस्सा आहेच. तुझे शरीर माझ्या नजीक असो अथवा माझ्यापासून दूर असो, त्याची चिंता करू नको. तुझी सत्यभावना फलद्रूप होईल." 'बाबांनो विचार करा की, मरण कुठे आहे? अज्ञान्याजवळ जे अज्ञान आहे तेच त्याचे मरण होय' श्रीगुरुमूर्तीपूर्ण ब्रह्म आहेत. ते मृत्यूच्या मस्तकावर पाय देऊन बसलेले आहेत. यातून स्वामीमहाराजांच्या श्रेष्ठत्वाची, परमेश्वरी अवताराची योग्यता कळून येते.

त्यांच्यासारखे तपस्वी, विरक्त, शुद्धाचरणी, दिव्यब्राह्मण, साक्षात्कारी दत्तभक्त दुसरा आढळणे कठीण. स्वामीमहाराजांच्या बद्दल दासगणू महाराज म्हणतात, 'ज्ञानभारती, ज्ञानांबरी दिनपति उदेला, पूर्णब्रह्म प्रत्यक्ष दत्त अवधूत दुजेश्री व्यास पुनः जन्मले'

स्वामीमहाराजांचे पारमार्थिक वैभव कळसास पोचले. 'साक्षात् दत्तप्रभूंचे तृतीय अवतार' असे विधान वाडी येथे स्वामीमहाराजांच्या उपस्थितीत तेथील धर्मसभेत श्री. वक्रतुण्ड भालचंद्रशास्त्री कवीश्वर यांनी केले. विशेष म्हणजे तो निर्णय सर्वांना मान्यही झाला.

आजही त्यांच्या अनुयायांतर्फे त्यांच्या कार्याची योग्यता पटवून दिली जात आहे. स्वामीमहाराजांचे सारे आयुष्य बहुजनहिताय बहुजन सुखायच होते.

श्री प.पू. गांडाबुवा, रंग अवधूत महाराज, सीताराम महाराज, नृसिंह सरस्वती दीक्षित महाराज, नाना महाराज तराणेकर, गुळवणी महाराज, दत्तमहाराज कवीश्वर, मामा देशपांडे इत्यादी थोरांची परंपरा निर्माण झाली. अजूनही हे कार्य नंदादीपासारखे तेवत ठेवणारी थोर मंडळी निर्माण होत आहेत. दत्त महाराज कवीश्वरांचा जन्म झाल्यावर, वाडीत स्वामीमहाराजांनी छोट्या दत्तमहाराजांना आपल्या हातात घेऊन 'काय अण्णा, आलात पुन्हा कवीश्वर घराण्यात' असे म्हटले होते. जन्माला आलेल्या दत्तमहाराजांच्यावर पूर्ण कृपाशिर्वाद, स्वामीमहाराजांचा होता. कर्नाटक येथील संकेश्वर येथे श्री प.पू. सदानंद नाईक हे स्वामीमहाराजांचे अनुयायी आहेत. श्री प.पू. मामा देशपांडे हे अनुयायीच. यांच्या बाबतीत अशीच एक गोष्ट वाचण्यात आली. त्यांचा संदर्भ या लेखात देणे मला उचित वाटले. श्रीधर दत्तात्रेय आगाशे यांनी लिहिलेल्या 'देवाचिये द्वारी' या मामांच्या चरित्रातून वाचण्यात आली. 'मामांचे वडील दत्तू अण्णा जसे रामभक्त होते तसेच दत्तभक्त महाराजांच्या दर्शनामुळे दत्तभक्तीत तल्लीन झाले होते. दासबोध वाचनाबरोबरच नित्य गुरुचरित्राचे वाचनही ते करीत. तसेच नृसिंहवाडीची वारी असा क्रम सुरू झाला. त्यांनी दत्तप्रभूंच्याकडे प्रार्थना केली, 'संसार वेलीला फळे यायची असतील तर ती टिकणारी यावीत, नाहीतर आता फळे आली नाहीत तरी चालतील. पण या अकाली गळून जाण्यामुळे मन विचलित होते' अशी प्रार्थना करून देवासमोर शरणागत भावाने डोळे मिटून ध्यान करीत राहिले, तेव्हा श्री प.पू. वासुदेवानंद सरस्वतींना भेटावे असा दत्तप्रभूंचा आदेश झाला. त्यावेळी महाराजांचा मुक्काम वाडीलाच होता. महाराजांचे दर्शन घेऊन दत्तू अण्णांनी आपली मनोव्यथा त्यांना सांगितली. दर्शनाला दत्तू अण्णा सहकुटुंब गेले होते. महाराजांनी दत्तप्रभूंचा आदेश झाल्याप्रमाणे सात्विक पण कष्टी जोडप्याला दिलासा देऊन सांगितले, 'काही काळजी करू नका. सर्व काही ठीक होईल. यावेळी जो गर्भ राहील तो श्रीकृपेने टिकेल. तसाच काही प्रसंग आला तर दत्तस्मरण करा. मुलगा होईल व तो साक्षात्कारी होईल.' योगायोगाची गोष्ट म्हणजे 'शके १८३६ ज्येष्ठ अमावास्येच्या दिवशी म्हणजे २३ जून १९१४ रोजी मंगळवारी पार्वतीदेवींना प्रसूतीवेदना होऊ लागल्या. पार्वतीदेवींनी स्वामी महाराजांचा धावा सुरू केला. त्याच दिवशी रात्री स्वामी महाराज समाधिस्थ होण्यासाठी डोळे मिटत होते. तोच पार्वतीदेवींची व्याकूळ प्रार्थना त्याचवेळी पोचली. लगेच त्यांनी डोळे उघडले आणि तेजरूपाने ते पुण्याला प्रकट झाले. पार्वतीदेवींनी मनोमन त्यांना नमस्कार केला. त्यांनी हात वर करताच पार्वतीदेवींच्या वेदना थांबल्या. त्यावेळी महाराज म्हणाले, 'काही काळजी करू नकोस गुरुवारी मुलगा होईल. तयाचे नाव श्रीपाद ठेव.' इतके सांगून महाराज अदृश्य झाले. परत गरुडेश्वरी येऊन समाधी घेण्यासाठी डोळे मिटणार तोच श्री. शंकरकाका आजेगायकरांनी महाराजांना विचारले, 'महाराज एकदा डोळे मिटलेत, परत उघडले आणि आता परत मिटणार आहात; हे काय?' त्यावर महाराज म्हणाले, 'भक्तकार्य करण्यासाठी गेलो

होतो.' इकडे पुण्याला पार्वती देवी सुखरूप प्रसूत होऊन त्यांना पुत्ररत्न झाले.(संदर्भ - 'देवाचिये द्वारी' लेखक श्रीधर दत्तात्रेय आगाशे संकलक शामराव गुडी, श्री वामनराज प्रकाशन, श्रीगुरुकृपा, आनंदनगर, सिंहगडरस्ता, पुणे ४११०५१, द्वितीय आवृत्ती २०००, पृ. क्र. २९ ते ३१) तो दिवस आणि तारीख गुरुवार दिनांक २५ जून १९१४ होता. श्रीपादच्या जन्माच्यावेळी आषाढ शुद्ध २ पुनर्वसु, तृतीय चरण होता. तिकडे गरुडेश्वरी स्वामीमहाराजांच्या अवतार समाप्तीचा काल आला होता. आनंदनाम संवत्सर ज्येष्ठ वद्य अमावास्येला दत्तमूर्तीसमोर उत्तराभिमुख बसून प्राणायाम स्वरूप सामावून त्राटक करून आषाढ शुद्ध प्रतिपदा हा त्यांच्या पुण्यतिथीचा दिवस आहे. आषाढ शुद्ध प्रतिपदेला उत्तरायणात विदेह कैवल्य पदाची प्राप्ती करून घेतली.

एकूण सर्वांची शास्त्रनिष्ठा वाढावी, धर्मभावना डोळस व्हावी आणि आत्मसन्मुखता वाढावी असा त्यांचा दृष्टिकोन होता. त्यांच्याजवळ महान सामर्थ्य होते. कोणताही अभिनिवेश न ठेवता स्वामी महाराजांचा लौकिक देह भारतभर संचार करीत होता. त्यांच्या स्पर्शाने नद्या, तीर्थे, पर्वत, महासागर, मंदिरे, अरण्ये, हिंस्त्रप्राणी, मनुष्यप्राणी पावन होत होती. नर्मदानदी तर त्यांच्यावर पूर्णपणे प्रसन्न होती. तिने स्वामीमहाराजांना शेवटपर्यंत आपला शेजार सोडू दिला नव्हता. अवघा प्रपंच मोक्षमय कसा व्हावा आणि ज्ञानीभक्ती कशी वाढावी याचे विवेचन, त्यांचे उपदेश, प्रवचने, कीर्तने, पुराणे यामधून घडत असे. 'हे विश्वचि माझे घर' मानून त्यांनी अनेकांना कल्याणाची, आत्मज्ञानाची, सोपान मार्गाची, उत्कट भक्तीमार्गाची वाट दाखवून दिली. जनता जनार्दनाला अजूनही त्यांच्या कार्याची प्रेरणा मिळत आहे. वेदांताचे श्रवण, मनन, निदिध्यास यावर त्यांचा भर होता. श्रवणामध्ये अधिक लक्ष केंद्रित करण्यास ते सांगत. स्वधर्मापर श्रद्धा, स्नानसंध्या, देवपूजा, महायज्ञ, मातापितरांची सेवा करावी असे आवर्जून सांगत. उदरनिर्वाहाकरता, व्यापार, शेती, नोकरी, कोणताही धंदा केला तरी वेदविहित कर्म, गुर्वाज्ञा पालन हे कधीही सोडू नये. यावर त्यांचा विशेष भर होता. ज्ञानेश्वरमाऊली म्हणते त्याप्रमाणे 'स्वकर्मकुसुमांची पूजा' करावी असे स्वामीमहाराजही सांगत. स्वकर्म केले तरच अंतःकरण शुद्ध होते. अंतःकरण शुद्ध झाले तर उपासना स्थिर होते. त्यामुळे मनाला शांती मिळते. आत्मज्ञान होऊन मोक्षप्राप्ती होते. असे त्यांचे परवलीचे सांगणे होते.

शके १८३५ चा चातुर्मास स्वामीमहाराजांनी गरुडेश्वराला पूर्ण केला. त्यांचे शरीर क्षीण झाले होते. ते म्हणत, 'या शरीराला दोन वेळा सर्पदंश, तीनवेळा कॉलरा, एकवेळ संनिपात, एकदा कोड झाले. या सर्वांतून दत्तप्रभूंनी त्यांची मुक्तता केली. मरणावरही त्यांनी मात केली होती. पण महाराज ब्रह्मचैतन्य स्वरूप असले तरी देहधारी असल्याने जन्म, जरा, व्याधी आणि मृत्यू या उपाधी त्यांनाही लागल्या. शेवटी त्यांनी आनंदनाम संवत्सरातील ज्येष्ठ वद्य अमावास्येला रात्री दत्तमूर्तीसमोर बसून प्राणायाम स्वरूप सामावून त्राटक करून आषाढ शुद्ध प्रतिपदेला, उत्तरायणात विदेह कैवल्य पदाची प्राप्ती करून घेतली.

'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' हा स्वामीमहाराजांनी सांगितलेला मंत्र हा जनहिताच्या, भक्तांच्या रक्षणाचा, प्रकाश देण्याचा अखंडपणे तेवत राहणारा नंदादीपच आहे.

**डॉ. प्रभाकर वि. कुलकर्णी**

वृशाली हॉटेल लेन, हिंगणे खुर्द, सिंहगड रस्ता, पुणे ४११०५१.



# ॥ गुरोश्चरितं हि सदैव पेयम् ॥
# (श्री समश्लोकी गुरुचरित्र)

**सौ. जयश्री प्रदीप तराणेकर**

*बी.ए.ऑनर्स, 'शांतीपुरुष' मध्ये वाङ्मय सेवा.*

***"गुरुमूर्ति स्मरेन्नित्यं गुरुनाम सदाजपेत् ।***
***गुरोराज्ञां प्रकुर्वीत गुरोरन्यन्न भावयेत ॥१८॥ -***

सद्गुरुचे वर्णन करतांना श्रीगुरुगीताकार सांगतात की गुरुमूर्तीचे नामस्मरण व त्याचेच निरंतर ध्यान करणे, गुरु आज्ञेचे निष्ठेने अनन्यभावाने पालन करणे हेच शिष्याचे मुख्य कर्तव्य असते. याच गुरुआज्ञेच्या कर्तव्यपूर्तीतून निर्माण झालेल्या ग्रंथरचनेबद्दल विचार करताच प्रथम नजरेच्या कक्षेत येतो तो ग्रंथ म्हणजे श्री समश्लोकी गुरुचरित्र हा होय. श्री प.पू. वासुदेवानंद सरस्वतीस्वामी महाराजांच्या विशाल आणि अनमोल वाङ्मय निर्मितीतील एक मौल्यवान ग्रंथ म्हणून याचे एक वेगळे महत्त्व आहे आणि म्हणून फक्त याच एका ग्रंथाबद्दल विचार व्यक्त करण्याचा यात प्रयत्न केला आहे. प.पू. श्री वासुदेवानंद सरस्वती महाराजांची दिपविणारी विद्वत्ता, अमाप शब्दसंपत्ती, सूक्ष्म अवलोकन, नादयुक्त ओघवती अशी प्रसन्न रचना शैली, त्यातून फुलणारे कवित्व, वेदपुराणांचा त्यांचा सखोल अभ्यास, मराठी व संस्कृत या दोन्ही भाषांवरील प्रभुत्व, वाङ्मयनिर्मितीसाठी आवश्यक असणारा वृत्त, छंद, अलंकार यांचा म्हणजेच भाषाशास्त्राचा सखोल अभ्यास आणि त्यांचे व्यक्तिगत साधुत्व या सगळ्यांचे दर्शन त्यांच्या सगळ्या साहित्यरचनांमधून होते. तत्त्व आणि अनुभूती यांचा संगम या लिखाणात झालेला दिसून येतो. वाङ्मयातील विविध प्रकार त्यांनी अतिशय सुलभपणे व वैशिष्ठ्यपूर्णरीतीने हाताळलेले आहेत. पण त्याचबरोबर एका गोष्टीचा उल्लेख महाराज आपल्या या वाङ्मय निर्मितीबद्दल करतात तो म्हणजे 'गुरुकृपा.' 'गुरुकृपेशिवाय माझ्या हातून हे कार्य होणे शक्य नव्हते. हा सर्व गुरुकृपेचा परिणाम आहे.' असे महाराजांनी वारंवार आपल्या विविध ग्रंथरचनेबद्दल विचार मांडतांना सांगितले आहे.

***'विकाराभावेपि प्रभुरभववाकारविदजोऽविकाराभावेपि***
***स्वविमलयशोऽवाचयद्वृतः ।***
***पिता पुत्रस्यास्यादिव नववचो या निमुदे स देवोप्याप्युक्ति शिव उह***
***मुहुर्वाचयति हि ॥१॥***

त्रिशतीगुरुचरित्र ग्रंथाच्या सुरुवातीलाच महाराज सांगतात की, 'माझा अधिकार नसतांही पिता ज्याप्रमाणे आपल्या लहान मुलाकडून हळूहळू शब्द बोलवून घेतो आणि ते ऐकून आनंद दर्शवितो. त्याप्रमाणे माझ्याकडून त्या निर्विकार पण भक्तांकरिता साकार झालेल्या प्रभूने आपले निर्मल यश वदवून घेतले आणि अद्यापिही तसेच यश वारंवार वदवून घेत आहेत.' आपल्या हातून घडलेल्या कार्याचे श्रेय त्यांनी आपल्या सद्गुरुलाच दिले आहे. संन्यस्त धर्मात अहंकाररहितता मुख्य नियम मानला जातो- ज्याचे दर्शन यात होते. अहंकाररहित होऊन आपल्या वाङ्मयनिर्मितीच्या यशाचे श्रेय त्यांनी आपल्या सद्गुरूला दिले. कालौघात वाहून न जाता जे साहित्य टिकून राहते व कालानुसार जास्त प्रसिद्ध होत जाते ते त्यातील मौल्यवान जीवनमूल्यांमुळे, त्यापासून प्राप्त होणाऱ्या यशामुळे. महाराजांचे साहित्य टिकले ते त्याचमुळे. प्रत्येक ग्रंथनिर्मितीचे कारण काहीही असले तरी मुख्य कारण गुरुप्रेम गुरुआज्ञा हेच असलेले दिसून येते. अर्थात प्रत्येक ग्रंथाचे वैशिष्ठ्य वेगळे आहे. विविध वाङ्मयनिर्मितीच्या पद्धती त्यांनी सहजपणे हाताळल्या होत्या. या सगळ्या ग्रंथातून काही वैशिष्ठ्ये सामान्यतः ठळकपणे दिसून येतात ती म्हणजे त्यांचा सगळ्या शास्त्रांचा सखोल अभ्यास, तीव्र स्मरणशक्ती, भाषांवरील प्रभुत्व, अमाप शब्दसंपत्ती, रसाळ रचना शैली, लालित्यपूर्ण शब्दरचना आणि गुरुकृपेवरील नितांत विश्वास. महाराजांचे सगळे लेखन हे ग्रंथप्रामाण्यावर आधारित असलेले दिसून येते. तसेच त्यांच्या या रचनांना मंत्रगर्भत्व व पावित्र्य प्राप्त झालेलेही दिसून येते. ईशस्पर्शप्राप्त झालेल्याची जाणीव यांचे वाचन करतांना वाचकाला होते. महाराजांच्या विशाल वाङ्मयनिर्मितीबद्दल विवेचन करतांना एका समीक्षकाने म्हटले आहे की वाङ्मय उद्यानातील गुलाबांचा ताटवा म्हणजे महाराजांचे वाङ्मय आहे. त्यातील प्रत्येक ग्रंथफूल हे वैशिष्ठ्यपूर्ण असून अत्यंत सुंदर आहे. यातील समश्लोकी गुरुचरित्र एवढे एकच फूल उचलून त्याचे सौंदर्य पाहण्याचा हा एक अल्पसा प्रयत्न.

***'गुरु चरित्र महिमान । तोचि आम्हा अमृतपान ॥ -***

या अमृतपानाचा स्वाद सर्व भक्तजनांना मिळावा हा मुख्य उद्देश गुरुचरित्रकाराचाही होता आणि महाराजांचाही. श्री समश्लोकी गुरुचरित्र हा ग्रंथ म्हणजे मूळ मराठी गुरुचरित्र या ग्रंथाचे संस्कृत भाषांतर. ज्या ग्रंथाचे संस्कृतमध्ये भाषांतर करण्याची आज्ञा प्रत्यक्ष सद्गुरुंनी दिली तो मूळ ग्रंथ त्याच मूल्यांचा असला पाहिजे हे सत्य आहे. मूळ श्रीगुरुचरित्र ग्रंथ निर्मितीचा उद्देश आहे सद्गुरुप्राप्ती, गुरुभक्ती व गुरुकृपालाभ. याही ग्रंथाची (श्रीसमश्लोकीगुरुचरित्र) निर्मिती गुरुआज्ञेनेच झाली आहे.

***'आज्ञा असे श्रीगुरुची । म्हणोनि वाचे बोलतसे -'***

असे श्री सरस्वती गंगाधर या श्रीगुरुचरित्र या ग्रंथाच्या लेखकाने लिहून ठेवले आहे. मूळचा कर्नाटकप्रांतातील कानडी भाषिक, मराठी भाषेचा फारसा अभ्यास नसणाऱ्या या लेखकाने केवळ गुरुकृपेने या ग्रंथाचे लेखन केले जो ग्रंथ आजही लाखो भक्तांचे कल्याण करीत आहे. ते सामर्थ्य त्यात आहे. सद्गुण व सद्गुरुकृपा यांची प्राप्ती हाच या ग्रंथाचा मुख्य विषय व या विषयाला धरून त्याला पोषक असणाऱ्या व सर्वकाळी उपयोगी पडणाऱ्या अनुषंगिक गोष्टींचा विषय परिपोषासाठी संग्रह अशी रचना आहे. ईश्वरकृपेशिवाय सद्गुरुप्राप्ती होत नाही. सद्गुरुवाचून ज्ञानप्राप्ती होत नाही आणि ज्ञानाशिवाय मोक्षप्राप्ती नाही

असे शास्त्र सांगते. याचाच आधार या ग्रंथास आहे.

*'तुम्ही म्हणाल मज ऐसी। आपुले इच्छेने लिहिलेसी।*
*वेदशास्त्र संमतेसी। असेल तरी अंगीकारा'*
*(गुरुचरित्र अ. ४६ ओ. ४२)*

असे सांगून गुरुकृपा कशी लाभली व त्यामुळेच आपण हे ग्रंथनिर्मितीचे कार्य करू शकलो असा निर्वाळा दिला. ह्याच निर्वाळा श्री वासुदेवानंद सरस्वतींनी आपल्या श्रीसमश्लोकी गुरुचरित्र याच्या निर्मितीबद्दल दिला.

गुरुपरंपरेनुसार अगदी लहानपणापासून गुरुचरित्र या ग्रंथाचे वाचन, मनन, चिंतन अत्यंत श्रद्धापूर्वक करणाऱ्या महाराजांनी या ग्रंथाच्या सामर्थ्याचा अनुभव घेतलेला होता. याचे वाचन व प्रवचन हा त्यांच्या मांणगावीचा नित्यक्रम. संन्यासदीक्षाग्रहणानंतर सततच्या प्रवासात अनेक ग्रंथनिर्मिती त्यांनी केली. गुरुचरित्रावर आधारित अनेक ग्रंथ लिहिले पण मूळ गुरुचरित्राला लेखनाच्या दृष्टिकोनातून मात्र त्यांनी हात लावला तो ब्रह्मवर्तास. शके १८२४ मध्ये ब्रह्मवर्तास चातुर्मासाच्या निमित्ताने महाराजांचा मुक्काम असतांना गांवात प्लेगची साथ आली. त्यामुळे सर्व लोक गांव सोडून बाहेर निघून गेले. महाराजांनाही साथीची लागण झाली होती; पण स्वतः ते कोणतेही औषध घेत नसत. ईश्वरईच्छा समजून सहन करीत असत. त्यावेळी त्यांना गुरु आज्ञा झाली की मराठी गुरुचरित्रग्रंथाचे तुम्ही संस्कृत भाषेत भाषांतर करा. तेच तुम्हाला औषध ठरेल. महाराजांनी शोध केला तेव्हा त्यांना तेथे ५१ अध्याय असलेली श्रीगुरुचरित्राची एक प्रत मोठ्या मुश्किलीने मिळाली. ती समोर ठेवून त्यांनी गुरुआज्ञेने समश्लोकीचे लेखन सुरू केले. प्लेगसारख्या रोगाचा त्रास होत असतांनाही दररोज २०० ते २५० श्लोकरचना त्यांनी केली. म्हणजे सद्‌गुरूंनी करवून घेतली. ४० दिवसात ६७५० श्लोकांचा ग्रंथ लिहून पूर्ण झाला. शारीरिक अस्वास्थ्य असूनही इतक्या अल्प कालावधीत या ग्रंथाची निर्मिती केवळ गुरुकृपेमुळेच झाली असे महाराजांनी प्रामाणिकपणाने लिहून ठेवले आहे.

*'संग्रथ्य लिखितः प्रायोऽन्वहं श्लोकाः शताधिकाः।*
*श्लोकाः पञ्चविनान्यस्य प्रत्यहं द्वि शताधिकाः॥*

मूळ उपलब्ध प्रतीत गुरुगीता नव्हती त्यामुळे या ग्रंथातही गुरुगीता नाही. हे लेखनच त्यांना औषध ठरले असे त्यांनी पत्राद्वारे कळविले होते. श्रीगुरुचरित्राचेच मंत्रसामर्थ्य याही ग्रंथाला प्राप्त आहे. आवडीतून लिखाण होणे ही गोष्ट वेगळी आणि गुरुआज्ञा प्रमाण मानून लिखाण करणे ही गोष्ट वेगळी. एका उत्तम समर्पित शिष्याच्या रूपातील वासुदेवानंद सरस्वती येथे उठून दिसतात. श्री सरस्वती गंगाधराची गुरुनिष्ठा पुन्हा त्याच पण संस्कृत ग्रंथरचनेच्यावेळी इतक्या वर्षांच्या कालावधीनंतर तितक्याच प्रखरपणे प्रगट झाली. या ग्रंथाचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे याचा उलट दिशेने झालेला सफल प्रवास. एरव्ही बहुतेक करून संस्कृतातून प्राकृतात अनुवाद करण्यात येतो. पण येथे मात्र उलट म्हणजे मराठीचे संस्कृतमध्ये भाषांतर केले गेले आहे. हे अत्यंत कठीण, कष्टसाध्य आणि कालबाह्य असे कार्य महाराजांनी अत्यंत सफलपणे केले. असे प्रयोग क्वचितच कोणी केले आहेत पण ते तितके यशस्वी झाले नाहीत. महाराजांनी मात्र हे भाषांतर अतिशय सुंदर भाषेत, मूळ ग्रंथातील अर्थाला कुठेही धक्का लागू न देता केले आहे. श्री सरस्वती गंगाधरांच्या तोडीस तोड असे लेखन असल्याचे ग्रंथनिर्मितीतून महाराजांनी सिद्ध केले आहे. हे खूप मोठे यश आहे, पण याचे श्रेय त्यांनी स्वतः घेतले नाही.

*'चरितं यन्महाराष्ट्र भाषयारचितं हितम्*
*सरस्वत्यास्य विप्रेण वाच्छितद् देवभाषया ॥१॥*
*महाराष्ट्रीय भाषा तुन सर्व विषयोचिता*
*अतः सुगमया देववाण्येदं तन्यये मितम् ॥२॥'*

श्रीसरस्वती गंगाधर ब्राह्मणाने जे हितप्रद गुरुचरित्र मराठी भाषेत सांगितले तेच मी संस्कृतात सांगणार आहे. मराठी भाषा ही सर्व प्रदेशात रूढ असणे शक्य नाही म्हणून मी सुगम संस्कृतातून ते चरित्रवर्णन करीत आहे.' असा या ग्रंथलेखनामागील उद्देश त्यांनी स्पष्ट केला आहे आणि ही निर्मिती गुरुआज्ञेने झाली हेही सांगितले आहे. त्यावरून एक लक्षात येते की प्रत्यक्ष दत्तमहाराजांची इच्छा होती की त्यांच्या संप्रदायाचा प्रचार, प्रसार महाराष्ट्राबाहेरही व्हावा.

दत्तक्षेत्रे ही संपूर्ण भारतभर विखुरलेली आहेत. त्याचप्रमाणे दत्तभक्त-ही संपूर्ण भारतभर आहेत. त्यांना आपल्या संप्रदायाची माहिती होणे आवश्यक असेल तर मराठी या प्रादेशिक भाषेतून ते जगन्मान्य भाषेत म्हणजे देववाणी संस्कृत भाषेत असायला हवी. तरच ते वाङ्मय सगळ्यांच्या वाचनांत येईल. दत्तसंप्रदायाची घडी नीट बसविण्याची कामगिरी हे महाराजांच्या कार्यातील एक मुख्य कार्य आहे जे त्यांनी अत्यंत निष्ठेने आयुष्यभर केले. प्रादेशिक भाषांतील मौल्यवान वाङ्मय सांस्कृतिक भाषेतून लोकांपर्यंत पोचत नाही तोपर्यंत ते जीवनात उतरत नाही. श्रीदत्त वाङ्मय संपूर्ण भारतात पोहचविण्याची गरज सद्‌गुरूंनी ओळखून ते कार्य आपल्या परमशिष्याकडून करवून घेतले. अध्यात्मिक भावजीवनाचा तोल सांभाळणारा तेवढाच कोटीचा महापुरुष अशा कार्यासाठी हवा असतो जो महाराजांसारख्या शिष्याच्या रूपाने दत्तप्रभूंना लाभला. सहासहस्र चारशे एकाहत्तर श्लोक (६४७१) या एकावन्न अध्यायात आहेत. म्हणजे मूळ गुरुचरित्रापेक्षा भाषांतरात काही श्लोक कमी आहेत. यामागील कारण महाराजांनी सांगितले आहे की मूळ ग्रंथातील काही वर्णनात्मक ओव्या, अर्थानुसंधानास अडचण न होणाऱ्या ओव्या कमी केल्या आहेत त्याही गुरुसंमतीनेच. पण त्यामुळे वर्णनात कुठेही खंड पडलेला आढळत नाही. कारण संस्कृतामध्ये कमीत कमी शब्दात अर्थ स्पष्ट करता येतो हे ते जाणून होते. मूळ ग्रंथाप्रमाणेच याचेही ५१ अध्याय आहेत. मराठी गुरुचरित्र वाचणे, समजणे ज्यांना कठीण वाटते त्यांच्यासाठी हे भाषांतर आहे.

'गुरुणां गुरुः योगिनां चक्रवर्तिः' अशा श्रीदत्तात्रेयांचे ईश्वराच्या शाश्वत श्रीगुरु अवतारांचे हे महान मंगल चरित्र आहे. श्रीगुरुचरित्र हेच मुळात ईश्वरी लेणे आहे. तेच लेणे संस्कृतातही उपलब्ध झाले ते महाराजांच्यामुळे. श्रीपाद श्रीवल्लभ व श्रीनृसिंह सरस्वती या दोन महान दत्त अवतारांचे लीलाचरित्र हा या ग्रंथाचा प्रतिपाद्यविषय आहे. धर्मसंस्थापनकार्य, ज्ञानमोक्षकारक धर्मप्रबोधन, सर्व प्रकारच्या अधिकाराच्या भक्तशिष्य यांना दाखविलेला ज्ञानकर्म, भक्तीयोगाची पाऊलवाट, सद्‌गुरुस्थान, स्थान महिमा, त्यांचे कार्य महत्त्व व याविषयी केलेले मर्मग्राही मार्गदर्शन हे यांत आहे. त्याचबरोबर श्रीसद्‌गुरु उपासनेचे महत्त्वही सांगितले आहे. या ग्रंथाची रचना अनुबंधचतुष्ट्य या पद्धतीने आहे. म्हणजे १. विषयांची ओळख प्रथम करून देणे. २. त्या विषयाचा अधिकारी कोण? हे सांगणे ३. विषय व अधिकारी यांचा परस्पर संबंध काय व कसा असावा. ४. त्या विषयाची फलश्रुति काय, या मुद्द्यांचे स्पष्टीकरण या पद्धतीच्या लेखनात असते.

गुरुचरित्र हाच या ग्रंथाचा मुख्य विषय असल्यामुळे सद्गुरुप्राप्ती, गुरुभक्ति व गुरुकृपा या तिन्हींची प्राप्ती समाजातील निरनिराळ्या थरांतील वयोगटातील स्त्रीपुरुषांना कशी होते ? श्रीपाद श्रीवल्लभ व नृसिंह सरस्वती यांच्या काळात ती कोणाला व कशी झाली यांची निवडक उदाहरणे, उपासनेचे दाखविलेले मार्ग व त्या मार्गाचे अनुसरण करणाऱ्या व्यक्तींच्या व तत्कालीन समाजाच्या जीवनात पडलेला फरक हा याचा विषय विस्तार आहे. जी जी व्यक्ति आपल्या जागी प्राप्त परिस्थितीत आपल्याला विहित असलेल्या धर्माचे पालन तत्परतेने, धैर्याने, प्रामाणिकपणाने व निष्ठेने करेल ती ती व्यक्ति सद्गुरु व गुरुकृपा प्राप्त करून घेण्यास अधिकारी आहे हे हा ग्रंथ आपल्या विषयातून स्पष्ट करतो. ग्रंथाचे मूळ लक्ष्य गुरुकृपेची इच्छा व्यक्त करणारी सामान्य व्यक्ति हीच आहे. त्यामुळे यातील सगळे विषय मुख्यतः कथांद्वारेच मांडलेले आहेत. विषय वर्णनात्मक पद्धतीने जरी मांडले असले तरी ते कथांच्याद्वारेच आहेत. महाराजांनी मात्र या वर्णनाला थोडे कमी केले व मूळ विषय घट्ट धरून ठेवला. कथेच्याद्वारा सद्गुण लवकर मनावर ठसतात. नुसता उपदेश कामाला येत नाही. हे सत्य पूर्वीच्या ऋषिमुनींनाही माहीत होते. त्यामुळे भागवत, रामायण, महाभारत यांसारख्या ग्रंथातून कथांना प्राधान्य दिलेले दिसते व त्याच्या अनुषंगाने तत्त्वज्ञानाचा प्रचार येतो. तीच पद्धत या गुरुचरित्र ग्रंथाच्या वेळीही स्विकारलेली दिसते. यात पौराणिक कथा व गुरुचरित्र काळी घडलेल्या ऐतिहासिक कथा असे दोन भाग आहेत. या ऐतिहासिक काळाचे, त्या वेळच्या समाज जीवनाचे दर्शन यातून घडते. या दृष्टिकोनातूनही या ग्रंथाला ऐतिहासिक पुराव्याचे महत्त्व प्राप्त झाले आहे. पण वाचकांच्या दृष्टीने तो विषय गौणच ठरतो. सद्गुरु मीमांसा, सद्गुरुचे स्वरूप, त्यांचे महत्त्व, त्यांचे सर्वांगिण कार्य या विषयांचे सार प्रगट करणारा ग्रंथ म्हणून या समश्लोकीचे महत्त्व आहे. दोन विभूतींचे संपूर्ण चरित्र वर्णन करावे हाच फक्त उद्देश या ग्रंथाचा नाही तर या सद्पुरुषाची माहिती ही एखादा हार गुंफण्यासाठी घेतलेल्या दोऱ्यासारखी आहे. गुरुचरित्र हा गुरुतत्त्वांचा हार आहे व या गुरुंचे चरित्र हे या तत्त्वमालेतले सूत्र आहे. त्यामुळे चरित्राचे संदर्भ काही अध्यायापुरतेच व मोजके आहेत. त्या ऐवजी त्यांच्या कार्याच्या अनुषंगाने तत्त्वज्ञान जास्त आहे आणि बाकी सगळा ग्रंथ हा श्रीसद्गुरुच्या शिष्य व भक्त मंडळींच्या वर्णनाने भरलेला आहे.

विविध क्षेत्रातील, स्तरातील नमुन्यांची माणसं तितक्या तऱ्हेच्या समस्या व त्यावरचे उपाय यांत आढळतात व या सर्वांचा समन्वय साधणारी, सर्वांना आधार व प्रेरणा देणारी, सर्वांमध्ये मिळून मिसळून राहूनही सर्वांपासून अलिप्त, अबाधित, स्वयंपूर्ण अशी गुरुंची रसरशीत, प्रसन्न, तेजःपुंज मूर्ती यांत पहावयास मिळते. हे सद्गुरु मोठे सामर्थ्यशाली असूनही सामान्य जनांना दुर्मिळ नव्हते. चारचौघांत वावरणारे, त्यांच्या समस्या समजून घेऊन सोडविणारे, त्यांच्या बारीकसारीक अडचणींपासून त्यांच्या जन्मजन्मांतरीच्या कल्याणाची काळजी घेणारे असे सद्गुरु यांत आहेत. कोणत्याही जातीच्या, समाजातील कोणत्याही थरांतील रंजल्या गांजल्यांना आर्तपिडीतांना मदत करताना ते आढळतात. पण विशेष अनुग्रह करताना मात्र साधकांची निवड कडक परीक्षा पद्धतीतूनही करताना दिसतात. प्रत्येकाला आपण ज्या स्थितीत असू त्या स्थितीमध्ये गुरुकृपेने साधना सिद्धीला जाऊ शकते हा उपदेश निरनिराळ्या कथांमधून केलेला आहे. योग्यसाधना लावून देऊन आपापल्या धर्मपालनातून उद्धार करून घेणे शक्य आहे हे प्रतिपादन केलेले आहे. ज्यामुळे हा ग्रंथ सर्वसामान्य लोकांपासून विद्वान व्यक्तींपर्यंत सगळ्यांना विश्वास, श्रद्धा देऊ शकतो. याच्याच अनुषंगाने तत्त्वज्ञान, युगधर्म, समाजधर्म, सामाजिक बांधिलकी, स्त्रीधर्म, आश्रमधर्म, कर्तव्य, ज्ञान, योग, भक्ति, कर्म यांचे विवेचन आले आहे. प्रत्येक कथेतून वेगवेगळे आदर्श स्पष्ट केलेले आहेत. उदा. संदिपकाच्या कथेतून आदर्श शिष्य तर अनुसूयेच्या कथेतून, मृतसंजीवनी अध्यायातून आदर्श स्त्रियांचे दर्शन घडविले आहे. व्रतपालनातून हवे ते प्राप्त करून घेता येते हे व्रतमाहात्म्याचे श्रेष्ठत्व शनिप्रदोष व्रत निमित्ताने ठरविले आहे.

या ग्रंथाचे एक वैशिष्ट्य सांगणे अतिशय आवश्यक आहे. ते म्हणजे यातील मुख्य व्यक्तिचे चरित्र. त्यातून जाणवते की Super Man of the World अशा पद्धतीने त्यांचे वर्णन केलेले नाही. दत्त अवतार असूनही जन्मापासून चारही वेद मुखोद्गत असणाऱ्या महाराजांनी विधीवत तपश्चर्या करून गुरु करून त्यांच्याकडून शिक्षण घेऊन वृद्ध विद्वानांचा विश्वास आदर संपादन करून मग परिवर्तनानुसार ते नृसिंह सरस्वती झाले. म्हणजे मानवधर्माच्या सर्व मर्यादा पाळूनच त्यांनी आपल्या अवतारकाळात समाजात वास्तव्य केले. त्यामुळे हे गुरु आपले आहेत, आपल्यात आहेत, आपल्यासाठी आहेत हा विश्वास समाजाला मिळू शकला. या ग्रंथाची ही वैशिष्ट्ये माहीत असल्यामुळे त्याच्या प्रचाराची जबाबदारी महाराजांवर आली जी त्यांनी अत्यंत निष्ठेने व प्रामाणिकपणे पार पाडलेली दिसून येते. संस्कृत या जगन्मान्य भाषेत या ग्रंथाला नेऊन पोचविण्याचे महान कार्य त्यांनी केले.

वैशेषिक दर्शनाच्या सूत्रात म्हटले आहे की आप्तोपदेश वाक्यः शब्दाः। म्हणजे सिद्ध पुरुषांचा उपदेश प्रमाण स्वरूप आहे यालाच शब्दप्रामाण्य म्हणतात जे या ग्रंथात सापडते. प्रत्येक अक्षरात सामर्थ्य असतेच पण त्या अक्षरांची यथायोग्य जुळणी करणारा दुर्मिळ असतो. व्यक्तिच्या शुद्धत्वाचाही परिणाम या शब्दांवर होतो. अशी शब्दरचना या ग्रंथाला लाभली आहे. गीतेचा प्रभाव यांत जागोजागी पहावयास मिळतो. सुविचार सहजपणे गुंफलेले आहेत. तर मराठी भाषेतील म्हणींचे सुंदर, संस्कृत रूपांतर क्वचित सुभाषितवजा वाक्ये या भाषांतरात आलेली आहेत. अत्यंत मार्मिक शब्द वापरून व्यक्तिमत्त्वाला उठाव दिलेला आहे. मराठी भाषेतील शब्दांचेही प्रयोग यांत आलेले आहेत तर कठीण वाटणाऱ्या शब्दांचे स्पष्टीकरणही त्यांनी खाली दिलेले आहे. पाणिनीच्या व्याकरणातील प्रसिद्ध असलेल्या प्लुत हा स्वर मुद्दाम वापरला आहे जो वैशिष्ट्यपूर्ण आहे. विस्तृत वर्णनात्मक संवाद अत्यंत मार्मिक व छोट्या शब्दांतून सुंदरपणे वर्णन करणे हे कठीण काम अत्यंत सुंदरपणे केलेले आढळते. भाषा संस्कृत असूनही अत्यंत ओघवती आहे. शब्दसौंदर्य व विशाल शब्द भांडाराचे ज्ञान यातून जागोजागी प्रगट झाले आहे. संस्कृत साहित्यात या ग्रंथाने मोलाची भर घातली आहे. अत्यंत अल्पकालावधीत इतकी सुंदर ग्रंथरचना इतक्या सुलभपणे करणे हे इतके सोपे काम नव्हे. त्यासाठी ती व्यक्तिही तितकीच श्रेष्ठ असावी लागते.

महापुरुषांच्या वाङ्मयाचे एक वैशिष्ट्य असते ते हे की त्यांच्या सिद्धस्थितीतून हे संजीवन अमृतधारेप्रमाणे प्रगट झालेले असते. सर्व वाङ्मयीन कसोट्यांवर उतरूनही त्याचे एक वेगळेपण जाणवते ते म्हणजे

त्याला लाभलेला ईश्वरी स्पर्श. भक्ती वाङ्मय निर्मितीत महाराजांचा फार मोठा मोलाचा वाटा आहे. या ग्रंथाला वेदतुल्य धार्मिक ग्रंथाचे महत्त्व प्राप्त झालेले आहे. मूळ गुरुचरित्रातील उत्तुंग विस्तृत वजनदार रचना यांत आहे. त्यामुळे मुळ गुरुचरित्रासारखेच या ग्रंथाच्या वाचनाने वाचकांना यशप्राप्ती होते. विविध प्रकारच्या यशप्राप्तीसाठी विविध अध्यायाचे वाचन सांगितले आहे. उदा. : पहिला सद्गुरु प्राप्तीच्या तळमळीसाठी, गुरुकृपेसाठी तर तेरावा अध्याय आरोग्य प्राप्तीसाठी. चौदावा आकस्मित अरिष्ट आले तर त्याच्या निरसनासाठी इ. महाराजांचे म्हणजे वासुदेवानंद सरस्वतींचे सारे जीवनकार्य हे गुरुचरित्राशी निगडीत होते हे त्यांच्या जीवनचरित्रातून जाणवते. अध्यायाचे सार श्लोकबद्ध करून श्रीमद् भागवत या ग्रंथाचे प्रसिद्ध टीकाकार श्रीधर स्वामींनी जी पद्धत अवलंबिली होती तीच पद्धत महाराजांनीही येथे अवलंबिली आहे. सगळ्या अध्यायांचे सार श्लोकबद्ध करून दिले आहे व ते सार सांगताना नवनवीन वृत्तांची निवड केली आहे. मूळ ग्रंथात मात्र अनुष्टुभ वृत्ताचाच अधिक प्रमाणात उपयोग केलेला आहे. प्रत्येक अध्यायातील सारश्लोक एकत्र केले तर ५१ श्लोकांची अवतरणिका तयार होते जी अत्यंत सुंदर व प्रासादिक आहे.

"अध्याये प्रथम इहेष्ट वंदनाख्यंप्रोक्तं मंगलमयनामध्वारकाख्यं प्राप्येष्टं स्तुत इहधाम हर्षणीयं दतोऽ दर्शयद्गुतनुः प्रहर्षणीयम्" येथून सुरुवात करून प्रत्येक अध्यायाचे वर्णन अशा पद्धतीने सारश्लोकात केलेले आहे. 'क्रूर यवनाते करुनी शासन । सायंदेवास वरदान । देती श्रीगुरु कृपा करून । चौदाविधा अध्यायी ।।' याचे 'सायंदेवं शक्रमिताध्याय उवाचत्रीशो म्लेंच्छंपाहिभीस्ते स तयेति । गत्वा ऽ भीतो म्लेच्छनृपेणार्चित एव्य नृत्यत्रेजेमत्तमपूरोहियथासः ।।' असा श्लोक तयार केला आहे. 'पंचदशी श्री गुरुमूर्ती । तीर्थे सांगती शिष्यांप्रती । यात्रे दवडूनि गुप्त होती । वैजनाथीं श्रीगुरु ।' याचे 'चित्रपदोक्तित ईशस्तीर्थगमाय स शिष्यान् । पंचदशे कथायित्वा तद्विधिमैरयदेव ।। इतके सुटसुटीत, सुंदर भाषांतर केले आहे. प्रत्येक सारश्लोक तितकाच सुंदर व अर्थपूर्ण आहे. ज्या साधकाला गुरुकृपा होते त्यांच्या शारीरिक व्याधी प्रथम नाहीशा होतात. त्यानंतर वैराग्य प्राप्त होऊन शेवटी जन्ममरणरूप महारोगसुद्धा सद्गुरुरुपी महावैद्य नाहीसा करतात हे तेराव्या अध्यायाचे तात्पर्य समश्लोकीमध्ये व्यक्त करताना, 'पठन्ति ये भक्तियुता विनीताः श्रृण्वन्ति वा ऽ आख्यानमिदं गदहनम् । तेषां गृहे व्याधिभयं न नित्यं तेषां सुखंभूरि वदे त्रिसत्यम् ।।' असे केले आहे. या अध्यायाबद्दलचे महाराजांचे प्रेम करुणात्रिपदीमध्ये 'पोटशूळाने द्विज तडफडतां । कळवळले ते कळवळो आतां ।।' या ओळीतून प्रगट झालेले आहे. तसेच आपण ज्या स्थितीत असू त्या स्थितीमध्ये गुरुकृपेने साधना सिद्धीस जाते याचे उदाहरण माधवारण्यांची कथा आहे त्याबद्दल समश्लोकीत लिहिताना महाराजांनी लिहिले आहे की, 'अत्यंत सन्मार्ग इहं त्वयाप्तः सेवाधिकारण ततः समाप्तः । संसारमार्गो मम दर्शनेन पश्चात्मना मामविमर्शनेन ।।' (अ. १३ श्लोक ८५) म्हणजे तूं जी सेवा केलीस ती पूर्ण झाली असून जो सन्मार्ग मिळावा अशी तुझी आत्यंतिक इच्छा होती ते तुला आता माझ्या दर्शनाने प्राप्त झाले आहे. 'देवे रुष्टे गुरुस्त्राता, गुरौ रुष्टे न को ऽप्युऽः ।। वद कष्य वचाशिछन्धिद्वैधं चित्तं स्थिरीकुरु (।।२८।। अ. २) गुरु वाक्यतिचारी स रौखं नरकव्रजेत । गुरुवाक्यमकुर्वाणो मायाजिन्धौरु मज्जति (।।४९।। अ. २) अशांतून गीता वचनांची आठवण येते. संपूर्ण ग्रंथाची श्लोकबद्ध रचना करताना महाराजांनी कुठेही आपला तोल ढळू न देता, मूळ ग्रंथाच्या रचनेला धक्का न पोचू देताही एक सुरस समतुल्य काव्यरचना केली हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य विसरून चालणार नाही. श्रीगुरुचरित्र या ग्रंथाची त्यांना असलेली आवड, त्यावरचे प्रेम व श्रद्धा इतकी पराकोटीची होती की फक्त त्या ग्रंथाचे भाषांतर करूनच महाराज थांबले नाहीत तर त्यांनी परत त्यावर संस्कृत टीकाही लिहिली. एकाच ग्रंथावर विविध पद्धतीने लेखन करण्याची इच्छा होण्याइतका हा ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण आहे हेच यातून सिद्ध होते. मूळ ग्रंथावर आधारित ग्रंथरचनाही तितक्याच श्रेष्ठ आहेत. कर्ता करविता हरिः ही त्यांची श्रद्धा त्यांच्या अभ्यास व विद्वत्ते इतकीच महत्त्वाची आहे ज्याचे दर्शन या ग्रंथातून होते. 'या गुरुसि काय बा द्यावे । आम्ही कशाने उतरायी व्हावे ।।' याचे उत्तर महाराजांनीच या आपल्या लेखनकार्यातून दिले आहे. 'भवारवीस्था अमृतपेयं गुरोश्चरित्रं हि सदैव पेयम् ।। धर्मार्थकामान्निगमे गतिंच मतिं स्मृतिं राति च सद्गतिं च ।।६८।। भावार्थाने गुरुचरित्र ही संसारारण्यातील अमृतपोई असून तिचे सदैव पान करावे, असा संदेश देऊन महाराजांनी हा अभिनव बोध प्रगट केला आहे.

सौ. जयश्री तराणेकर
८१/१ स्नेहलतागंज, इंदूर, फोन नं. २५४५०२४

---

**आठवी चिंता तू गुरुदत्ता । जो भवसागर पतिता माता ।**
**आहे जयाचे कोमल हृदय । सदयांच हा भवहरिवरदाता ।।**

---



# ॥ श्रीवासुदेवानन्द सरस्वतीविरचित श्रीदत्तचम्पू ॥

**डॉ. सौ. सुनीता तांबे**

*एम.ए.एम.फिल, पीएच.डी. श्रीएकनाथ महाराज पंचक एक विवेचक अभ्यास. २५-३० लेख व लघुकथा प्रकाशित. काही कथा बक्षीस पात्र.*

## आरंभिक

कोकण भूमीतील माणगावी जन्मलेले श्री वासुदेव गणेश टेंबे उर्फ वासुदेवानन्द सरस्वती हे इ. स. १८५४ ते १९१४ या काळात वावरले. आयुष्यभर विरक्त, ब्रह्मचारी व संन्यासी वृत्तीनेच जीवन व्यतीत करायचा त्यांचा विचार होता. परंतु मातेच्या इच्छापूर्तीस्तव त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला. पुढे दोन अपत्ये व पत्नीच्याही निधनाने त्यांचे संसार बंधन तुटले आणि बालपणापासूनची 'योगी' जीवनदृष्टी उद्दीष्टाप्रत जाण्यास सिद्ध झाली.

नरसोबाच्या वाडीत वास्तव्यास असता सत्संग, ध्यानधारणा, श्रीगुरुचरित्र पठण व श्रीदत्ताची सेवाही घडली. गोविंदस्वामी नामक सद्गुरुंच्या भेटीतून ब्रह्मविद्येचे रहस्य जाणता आले. गूढशक्तीही प्राप्त झाली. श्रीदत्तांनीच सद्गुरू रूपात कानात प्रणव मंत्रोच्चार केला. जीवन उद्दिष्ट स्पष्ट झाले. भारत भ्रमणात विविध प्रदेशांबरोबरच सूक्ष्म समाज निरीक्षण, चिंतन करता आले. उज्जैनीस नारायणानन्द सरस्वतींकडून संन्यास दीक्षा मिळाली. विधिपूर्वक दण्डग्रहणही झाले. ज्ञानमार्गाची वाटचाल कर्ममार्गात परिणत झाली. लोककल्याण-लोकशिक्षण-लोकसंग्रह हेच जीवन व्रत बनले. त्यासाठी ग्रंथरचनाही झाली. साधनाकाळात एकूण व्यवहार कर्मठ असला तरी गरुडेश्वरी समाधी घेईपर्यंत तो स्वतःपुरताच ठेऊन पारतंत्र्यातील हतबल जनतेस करुणामयी वृत्तीने त्यांनी दिलासा दिला, स्फूर्ती दिली, जगण्यासाठीचे बळ दिले. त्यांचे वीतरागी जीवन बुद्धिवाद्यांना आव्हान ठरले असले तरी, लक्षावधी लोकांना परमार्थाचा शाश्वत मार्ग दर्शवितानाही कडकडीत शुद्धाचरण आणि कठोर व्रताचरण राखणारे श्रीवासुदेवानन्द सरस्वती प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूच असल्याचा निर्वाळा सर्वसामान्यांनी दिलेला आहे.

## ग्रंथसंभार

श्रीवासुदेवानन्द सरस्वतींनी संस्कृत तसेच मराठी भाषेतही विपुल व वैविध्यपूर्ण अक्षर वाङ्मय निर्माण करून सारस्वताच्या क्षेत्रातही स्वतःचे असे आगळे स्थान राखिले. दोन्ही भाषांना वरदान स्वरूप ठरलेले त्यांचे समग्र वाङ्मय एकूण बारा पुष्पात विभागून प्रसिद्ध झाले असून त्यात श्रीदत्तपुराण, श्रीगुरुचरित्र काव्यम्, शिक्षात्रयम् (कुमार, युवा, वृद्धा शिक्षा) श्रीदत्तचम्पू (सटीक), श्रीगुरुचरित्रम् (चूर्णिकेसह), श्रीगुरुदेव चरित्र, दत्तमाहात्म्य इत्यादी प्रमुख ग्रंथ तसेच वेदनिवेदनि स्तोत्र, श्रीकृष्णालहरी, पंचपाक्षिक, नवीन संशोधित अनेक स्तोत्रवाङ्मय तसेच विविध पद-पदांतरे आदींचा समावेश आहे. काही रचना श्रुति, वेदोपनिषदे, भगवद्गीता इत्यादी ग्रंथांतील सूत्रांवर केलेले तर्कशुद्ध तरीही प्रासादिक भाष्य आहे. ही बहुमूल्य तशीच बहुविध ग्रंथरचना वाचक-साधक-अभ्यासक आणि संशोधकांनाही आध्यात्मिक, सांस्कृतिक, सामाजिक, शैक्षणिक तसेच साहित्यिक दृष्ट्याही विचारधन पुरविणारी आहे. त्यातून त्यांनी अद्वैत तत्त्वज्ञान, मोक्षमार्गातील ज्ञान-योग-कर्म व भक्तिमार्ग विवरण, दत्तावतार कथा, दत्तमाहात्म्य, संप्रदाय, साक्षात्कारीत्व, जीवननिष्ठा इत्यादी विषयांचे समग्र दर्शन घडविले असून योगनिष्ठा, आचारश्रेष्ठता, विचारप्रगल्भता, ईश्वर शरणता, भक्तिप्रेम, जीवनधन्यतेचा प्रत्ययही आणून दिलेला आहे.

येथे श्रीवासुदेवानन्द सरस्वतींच्या ग्रंथसंपदेतील 'श्रीदत्तचम्पू' या ग्रंथाचीच केवळ आपल्याला ओळख करून घ्यावयाची आहे. त्यासाठी प्रथम 'चम्पूकाव्या' विषयी थोडे काही जाणून घेणे आवश्यक आहे.

## चम्पूकाव्य : एक आगळी काव्यरचना

'चम्पू' शब्दाची संस्कृत कोशातील व्याख्या पाहता 'गद्यपद्यमयं काव्यं चम्पूरित्यभिधीयते' (साहित्यदर्पण) अशी दिलेली आढळते. अर्थात चम्पूकाव्याची रचना गद्यपद्यमिश्रित असते. त्यातही भावनात्मक विषय पद्यात व वर्णनात्मक विषय गद्यात दिलेला आढळतो. संगीतात ज्याप्रमाणे गीत व वाद्ये परस्परपूरक असतात तसाच चम्पूरचनेत गद्यपद्याचा परस्पर पूरक संबंध असावा असे राजा भोज याने म्हटले आहे. वाद्यकलायुक्त गीत ज्याप्रमाणे हृद्य होते त्याचप्रमाणे गद्यबन्धयुक्त असा पद्यबंध चम्पूकाव्यात हृद्य होतो. संस्कृत साहित्यात चम्पूकाव्याची रचना विपुल प्रमाणात दिसून येत असली तरी सर्व चम्पूग्रंथ इ. सनाच्या नवव्या शतकानंतरचे आहेत. ब्राह्मणे, महाभारतातील काही भाग, जातकमाला, हरिषेणादि कवींच्या शिलाप्रशस्ती या गोष्टी गद्यपद्यमय आहेत. त्यातूनच पुढे चम्पूकाव्य उत्क्रान्त होत गेले, असे मानावे लागते. चम्पू काव्यातील पहिला ग्रंथ त्रिविक्रमाचा 'नलचम्पू' ! राजा भोज याचा 'चम्पूरामायण' ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यात गद्यपद्यरचनेचे अनेक चमत्कार दर्शविले आहेत. दहाव्या शतकातील सोमप्रभ सुरींच्या 'यशस्तिलका'त जैन धर्माच्या सिद्धान्ताचे विस्तृत विवरण असून अवंतीराज यशोधराच्या जैनधर्म स्वीकाराची कथाही यात दिलेली आहे.

सोळाव्या शतकात मराठवाड्यात होऊन गेलेल्या दत्तभक्त संतदासोपंत यांनीही चम्पूकाव्यसदृश्य काही काव्यरचना केलेल्या आढळतात. त्यांचे हे गद्यपद्यमिश्रित काव्य सर्वच दृष्टींनी अभ्यासनीय आहे. अलक्षित असले तरी, श्रीवासुदेवानन्द सरस्वतींच्या श्रीदत्तचम्पूवर दासोपंतांच्या काव्याचा प्रभाव जाणवतो. सतराव्या शतकानंतरच्या चम्पूकाव्यात 'आनन्दकन्द चम्पू'

व 'चित्रचम्पू' हे प्रसिद्ध होत. नंतरच्या काळात एकोणिसाव्या शतकातील श्रीवासुदेवानन्द सरस्वती यांचा 'श्रीदत्तचम्पू' हा काव्यग्रंथ महत्त्वाचा असून त्यात त्यांनी दत्तमाहात्म्याबरोबरच छंदशास्त्र (वृत्त, जाती, छंद, स्वैरपद्य) अलंकारशास्त्र (अर्थालंकार - शब्दालंकार) व व्युत्पत्तीशास्त्र (शब्दार्थ व व्युत्पत्ती) यांनाही तितकेच महत्त्व दिलेले आहे. एका दृष्टीने त्यांनी दिलेल्या स्त्री-वृद्ध-युवा-कुमार शिक्षांप्रमाणेच साहित्यशास्त्रातील भाषा, तिचे व्याकरण, तिच्यातील काव्यगुण, अलंकारशास्त्र, रसाविष्कार इत्यादींविषयीची शिकवण वासुदेवानंदांनी सर्वसामान्यांना दिलेली आहे, असे म्हणता येईल. कारण भाषेच्या व्युत्पत्तीचे ज्ञान होण्यास ज्याप्रमाणे व्याकरणशास्त्राच्या अभ्यासाची आवश्यकता असते त्याप्रमाणे काव्याचे मर्म जाणून घेण्यासाठी अलंकारशास्त्राच्या अध्ययनाची आवश्यकता असते. श्रीवासुदेवानंद सरस्वती हाडाचे शिक्षक असल्यानेच ते हे जाणून होते की साहित्यशास्त्र शिकल्याने माणसास काव्याचे स्वरूप, गुण-दोष, अलंकारादी जाणण्याची शक्ती येते. त्याची बौद्धिक कुवत वाढते आणि त्याला सखोल विचार करण्याची सवयही लागते.

## श्रीदत्तचम्पूचे अंतरंग

श्रीवासुदेवानन्द सरस्वतींनी 'श्रीदत्तचम्पूची' रचना नरसी क्षेत्री, इ. स. १९०५ साली पंधराव्या चातुर्मास्यात केली. त्याद्वारे संस्कृतातील एक वेगळा वाङ्मय प्रकार जनतेसमोर ठेविला. या ग्रंथाचे भाषांतर नरसोबावाडी येथील वे. शां. सं. रामचंद्रशास्त्री नारायणशास्त्री जेरे ह्यांनी मराठीत केले असून सर्वसामान्यांना त्यामुळे श्रीदत्तात्रेय माहात्म्य अधिक सुलभतेने जाणून घेण्यास मदतच झाली आहे.

या श्रीदत्तचम्पूची रचना तीन स्तबकात केलेली असून त्यातून श्रीदत्तात्रेयांच्या गुणगौरवाबरोबरच त्यांच्या सोळा अवतारकथा आणि त्या निमित्ताने आलेल्या रोचक उपकथांचे प्रतिपादनही अत्यंत मुद्देसूद, युक्तिसंगत व सप्रमाण केलेले आहे. आपल्या प्रतीपाद्य विषयासाठी वासुदेवानन्द सरस्वतींनी मुण्डकोपनिषद, बृहदारुण्यकोपनिषद, मार्कण्डेय, स्कंद, नारद, भविष्य, वैवर्त व ब्रह्मादि पुराणे तसेच कालिकाखंड व रामायण, महाभारत या ग्रंथांचाही आधार घेतला आहे. प्रथम स्तबकात १५२, द्वितीय स्तबकात ९९ व तृतीय स्तबकात १०० श्लोक रचना मिळून एकूण ३५१ श्लोक असलेली ही रचना विलक्षण आत्मीयतेने, भक्तिभावाने व शहाणे करून सोडावे सकलजन अशा सद्हेतूने केलेली आहे. दत्तभक्ती, दत्तमाहात्म्य हा या रचनेचा प्राण असल्याने केवळ दत्तात्रेयांविषयीच नाही तर अत्रीऋषी व सती अनुसूया या त्यांच्या मातापित्यांविषयीही अपार भक्तिभाव निर्माण करण्यात वासुदेवानन्द सरस्वती अग्रेसर होताना दिसतात. **प्रथम स्तबकातील** त्यांची पहिलीच कथा त्यादृष्टीने लक्षणीय ठरावी. सारांशाने ती अशी आहे -

एका रात्री अंधारात आपल्या पतीच्या सुखास्तव त्याला खांद्यावर घेऊन निघालेल्या त्याच्या पत्नीचा अनवधानानेच, मार्गात असलेल्या सुळावरील मांडव्य ऋषींना धक्का लागल्याने क्रोधानेच त्यांनी शापवाणी उच्चारली 'उद्या सूर्योदय होताच या स्त्रीचा पती यमलोकी जाईल.' ती ऐकताच 'हे सूर्या, उद्या तू उदयास येणार नाहीस' असा तिनेही सूर्यास शाप दिला. पतीस हवे ते मिळवून दिल्यानंतर ती त्यास घेऊन घरी परतली. तिच्या शापाने भयभीत झाल्याने सूर्यही आला नाही. परिणामी गाढ अंधःकाराने स्वर्ग तसेच पृथ्वीवरही अंधार झाल्याने सर्वत्र हाहाःकार माजला. तेव्हा ब्रह्मदेवाच्या सांगण्यानुसार सर्व देव इंद्रासह सती अनुसूयकडे गेले. तिला सर्व हकीकत सांगून तिच्यासह ते कौशिक ब्राह्मणाकडे आले. महासती अनुसूयेने कौशिक पत्नीच्या पतिव्रत धर्माचा गौरव करून तिला सूर्यास बोलाविण्यास सांगितले. सूर्योदयानंतर तुझा पती यमलोकी गेल्यास तेथूनही मी त्यास परत येथे रोगरहित अवस्थेत, देवांप्रमाणे कान्तीमान करून आणीन' असे वचनही दिले. अर्थातच कौशिक पत्नीने सूर्यास उदयास आणताच सूर्योदय झाल्याक्षणी अनुसूयेने अत्रीऋषींच्या चरणकमलांचे ध्यान करून सुहास्य मुद्रेने तत्क्षणी म्हटले, 'जर मला केवळ माझ्या पतीचेच चरण उपास्य असतील तर नुकताच मृत्यू पावलेला कौशिक ब्राह्मण जिवंत व्हावा.' अनुसूयेच्या पातिव्रत्य प्रभावाने कौशिक ब्राह्मण कांतीमान निरोगी अवस्थेत दुसऱ्याच क्षणी जिवंत झाला. देवांनी स्वर्गातून पुष्पवृष्टी केली व अनुसूयेसह सर्वजण स्वस्थानी गेले. (श्लोक क्र. २-१८) श्रीवासुदेवानन्द सरस्वती सांगतात 'वर प्रभावाने या लोकी खरोखर ब्रह्मा, विष्णु व महेश हे तिघेही, कर्दम ऋषीकन्या अनुसूया व अत्री ऋषींचे पुत्र बनून राहिले. या कथेनंतर हैहय कुलश्रेष्ठ कृतवीर्य व त्याचा शूर पुत्र अर्जुन यांचे जीवनचरित्र, अर्जुनाने केलेली दत्तात्रेय स्तुती, (श्लो. क्र. २०-५७) आठ कथांद्वारे दत्तमाहात्म्य वर्णन तसेच अनेक चमत्कार, सिद्धी, अनेकांना संकटमुक्त केल्याचे दाखले, (श्लो. क्र.५८-६९) कर्माने अंतःकरण शुद्धी होऊन शमदमादि साधनांनी ज्ञानप्राप्ती आणि ज्ञानप्राप्तीने अज्ञान नाश, शेवटी फलस्वरूप त्या एकट्या एक अशा परब्रह्माचे साक्षात् दर्शन (श्लोक क्र. ७०-८०) इत्यादी अनेक विषयांचे विवरण वासुदेवानंदांनी केलेले आहे. नंतरच्या भागात जमदग्नी ऋषी व रेणुकामातेचा पुत्र परशुराम ह्यांचे चरित्रकथन, कामधेनु हरण, सहस्त्रार्जुनाशी झालेले युद्ध, क्षत्रिय कुलाचा झालेला नाश आदि अनेक विषय प्रथम स्तबकात येतात. (श्लोक क्र. ८१-१५२) **द्वितीय स्तबकात** मदालसाने आपल्या पुत्रांना केलेला नीतीधर्माचा उपदेश (श्लोक ४४-५३) त्यांचे स्वरूप सुखात रममाण होणे. कामक्रोधादि-दंभलोभादिरूपी दावाग्नींच्या ज्वाळांनीही विचलित न होणे, सत्संग माहात्म्य, मदालसेने आपल्या धाकट्या पुत्रास अलर्कास आत्मतत्त्वाची करून दिलेली ओळख (१८-३५) अलर्काने दत्तात्रेयांची केलेली साधना - उपासना - दत्त भेट, दत्तात्रेयांनी महावाक्यांचा केलेला बोध (श्लो. ८०-८७) दिलेली मुक्ती, बंधु सुबाहुशी झालेली भेट (श्लो. ७१) अखेर अलर्काचे वनात जाणे, तेथे आपल्याला दत्तात्रेयासारखा गुरू लाभल्याने झालेला आनंद आणि त्या गायनातून त्याने केलेली दत्ताची स्तुती आणि शेवटी दत्तरूपात सामावून जाणे इत्यादी कथाभाग आलेला आहे. (श्लो. ९६-१००) **तृतीय स्तबकात** वासुदेवानंदांनी संक्षेपानेच भक्त प्रल्हादावर दत्तात्रेयांनी केलेला अनुग्रह मालिनी वृत्तांतून वर्णिला आहे. (श्लोक २-३) अवधूतांशी प्रल्हादाची झालेली भेट, त्यास करून दिलेली ज्ञानप्राप्तीसाठीच्या साधनेची ओळख, दत्तात्रेयांनी यदुराजास सांगितलेल्या पृथ्वी आदि करून पंचवीस गुरुंपासून मिळविलेल्या, अंतर्मुखता उत्पन्न करणाऱ्या तत्त्वज्ञानाची माहिती, दत्तगुरुंचे स्तुतीगान (श्लो. ७८-७९) दत्तस्थाने, आयुराजा, राणी इंदुमती व हुण्डासुराची कथा, नहुषाची रहस्यमयी जन्मकथा (श्लो. ३५-५२) परमेश्वराने रक्षिलेल्या भक्तास अभय असल्याची ग्वाही आणि 'ज्ञानानेच कैवल्य प्राप्त होते' या संत-सत्पुरुषांच्या निर्बोध वाणीचा उच्चार असे विविध विषय या शेवटच्या स्तबकात आलेले आहेत.

## श्रीदत्तचम्पूतील काव्यसौंदर्य

श्रीवासुदेवानन्द सरस्वतींच्या 'श्रीदत्तचम्पू'तील काव्यसौंदर्याचा विचारही महत्त्वाचा आहे. कारण चम्पूवाङ्मय गद्यपद्यमिश्रित असल्याने त्यात काव्याचे कोणते गुणधर्म प्रकटतात हे पहाणे आवश्यक आहे. 'शब्दार्थो सहितौ काव्यम्' अशी भामहाने काव्याची व्याख्या केलेली आहे. काव्याला स्त्रीची उपमा दिली जाते. काव्यरूपी स्त्रीची मोहिनी जशी तिच्या रूपाची म्हणजे बाह्य सौंदर्याची पडते तशीच तिच्या गुणांचीही पडते. काव्याचा बाह्य सौंदर्यात तिची रचना, शब्दमाधुर्य, भाषा, तिचे अलंकार इत्यादी येतात तर अंतः सौंदर्यात भाव-भावना, कल्पनाविलास, विचारांचे सामर्थ्य इत्यादींचा समावेश होतो. रसानुकूल चाल, नादानुकारी शब्दरचना, विषयानुरूप भाषा, भावनांची उत्कटता, सूचकता, प्रसाद, माधुर्य, ओज हे गुण त्याचबरोबर निसर्गवर्णने, व्यक्तिचित्रे, शब्दचित्रे यांचाही समावेश असतो. काव्यविषय कोणता यावर वरील सर्व बाबींचा विचार होतो.

श्रीवासुदेवानन्द सरस्वतींच्या या 'श्रीदत्तचम्पूत' श्रीदत्तात्रेय माहात्म्य त्यांचे गुणवर्णन करणे त्याचबरोबर सर्वसामान्यांना अद्वैततत्त्वज्ञान सुलभरीत्या समजावून सांगणे हा प्रमुख हेतु आहे. साहजिकच वेदांत तत्त्वज्ञान समजाऊन देताना - आचार धर्माचा विचार मांडताना वासुदेवानन्दांनी गद्याचा आश्रय घेतला आहे. उदा. द्वितीय स्तबकातील श्लोक क्र. ९६ मध्ये खिन्नचित्त असलेल्या काशीराजास सुबाहूने केलेला उपदेश गद्यातून आहे. ते सांगतात - ''तदनु महानुभावसेवया षड्लिंगैस्तात्पर्यावधारणलक्षणेन श्रवणेन युक्त्या संभावित त्वानुसंधानलक्षणेन मननेन ताभ्यां निःसंशयेर्थे स्थापितचित्तस्य विजातीयानात्मप्रत्ययानन्तरितसजातीयात्मप्रत्ययप्रवाहीकरणलक्षणेन निदिध्यासनेन ध्यातृध्यानभावराहित सुस्थिर ध्येयाकारान्तररस्थितिलक्षणेन समाधिना कृती भव ।।९६।।'' (गद्यम्) त्याचप्रमाणे दत्तात्रेयांचे गुणवर्णन करणे व व्यक्तिंच्या भावना प्रकटीकरणास त्यांनी पद्यबन्धाचा स्वीकार केला आहे. उदा. द्वितीय स्तबकात नुकत्याच जन्मलेल्या त्या आपल्या रडणाऱ्या मुलास सती मदालसा त्याच्या प्राणरक्षणासाठी गाण्यातून ज्ञानरूपी दूध पाजती झाली. ती म्हणते ''रोदिषि रे त्वं कस्मात्पूर्वमितस्त्वं यस्मात् ।। भ्रष्टपथीऽभूस्तस्मात्कष्टमवात्पमकस्मात् ।।२०।। (बोधप्रकारमाह जोडशन्तिः (गीतं उष्णिग्वा) आपल्या काव्यरचनेस वासुदेवानंदांचा दत्तात्रेयांचा तसेच सद्गुरुंचाही अनुग्रह लाभला असून त्यांची त्यांस अनुकूलताही आहे. ज्ञानदेवांनी काव्याची मूळ शक्ती 'प्रज्ञा' असल्याचे सांगितले त्याखेरीज मन, बुद्धी, मती, स्फूर्ती व उन्मेष या स्वाभाविक शक्तींचाही ते निर्देश करतात. वासुदेवानंदांचा हा ग्रंथ अभ्यासता त्यांच्या प्रज्ञेचा प्रत्यय येत राहतो. उदा. तृतीय स्तबकात देवशत्रू दैत्यांच्या नाशास्तव वसिष्ठ मुनींनी नहुषास युद्धास जाण्याची आज्ञा दिली. त्या वेळेस उपजाती वृत्ताने जे वर्णन येते ते त्यांच्या प्रातिभ्याची प्रज्ञेची प्रचिती देणारे आहे. (श्लोक क्र. ८२)

***'प्रस्थानमाहोपजातिवृत्तेन धीसारथिर्दैहरथोर्धवाहो ह्यग्रही मानिवदेक एव महाबलानां हतये प्रतस्थे तुरद्विषां देवगुरूक्तिशक्तिः ॥८२॥ (रूपक अलंकार)***

'चम्पू' वाङ्मय हे भाषाशैली व शास्त्राचा अतिशय अवघड प्रकार असल्याने फार थोड्या संतकवींनी तो हाताळला आहे. अशा क्षेत्रात दत्तात्रेयांच्या लीला वर्णन करताना वासुदेवानंदांनी वेदांताधारे आदर्श योग्याचे वर्णन, गृहस्थ धर्मातील अडचणी - संकटे व आत्मज्ञानाने प्रकाशाचा लाभ हा सिद्धान्त दत्तचम्पूतील तीन स्तबकांद्वारे उत्कृष्टरीत्या मांडला आहे. भाषेवरील त्यांचे प्रभुत्व व कमीत कमी शब्दात उत्कट रसाभिव्यक्ती करण्याचे कौशल्यही येथे दिसून येते. शब्दरचनेतील वैशिष्ट पहाता 'हतासिम दिष्ट (ष्टात), भ्रष्टाला रूष्ट, एकमेस्मरा, शरणम्, क्वापिन शिष्टं, प्रष्टं, कष्टं, पदं, वरं, वरणम् ही रचना अथवा पुत्रन्यस्क, भरोष्यलर्क, अनन्यगती चातकं धनइशभि वर्षत्यलं तथापि सकलसुधापारितृप्तयेऽलं जलं ही रचना भाषाशैलीची सखोलता दर्शविते. शब्दानुप्रासाबरोबर नादमाधुर्यही जाणवते. या रचनेत रेखीव व्यक्तिदर्शने उदा. प्रथम स्तबकात सती अनुसूयेने केलेले कौशिक ब्राह्मण पत्नीचे गुणवर्णन (श्लोक ९) ''प्राब्रवीद्विजसतीमनसूया भारतीमथ सतीमनसूया ।। साधु साध्वि वृष एष धृतस्ते लोक एष ही वड्ढे विहितस्ते ।।९।।'' (स्वागतार्थ स्वागतावृत्तम्) नेटक्या शब्दांची सारगर्भ रूपे, विशाल सौंदर्यदृष्टी राखीत अर्थ विशद करून स्थूलातून ते सूक्ष्मात वाचकांना घेऊन जातात आणि ज्ञाताच्या सहाय्याने अज्ञात, अमूर्त, निराकार अशा परतत्त्वाचा अचूक स्पर्श घडविण्याची किमया करून दाखवितात. उदा. प्रथम स्तबकातील श्लोक क्र. ७१ ते ८६ पहावेत. लेखाच्या विस्तारभयास्तव त्यांचा अन्वयार्थ येथे दिलेला नाही.)

भाषेला ज्या ज्या गोष्टींनी अधिक शोभा येते त्या त्या गुणधर्मांना 'भाषेचे अलंकार' म्हटले जाते. ही शोभा कधी दोन वस्तूतील साम्यातून तर कधी त्यातील विरोधाभासातून, कधी नादमयी शब्दातून तर कधी एखादी कल्पना अधिक खुलवून भाषेला परिणामकारक व सुंदर बनविले जाते. शब्दातील अक्षररचना नादमाधुर्य निर्मित जाते किंवा उपयुक्त शब्दयोजनेद्वारे अर्थसौंदर्य वाढते. परिणामी भाषेच्या अलंकारांचे शब्दालंकार व अर्थालंकार असे दोन प्रकार होतात. संस्कृत साहित्यात अलंकारांना काव्याचे शोभाकर धर्म म्हटले आहे. 'रसा'ला काव्यात्मा मानून त्या रसाचा परिपोष करणे हे अलंकाराचे प्रयोजन सांगितले गेले आहे. अलंकार हे काव्याच्या प्रत्येक घटकास सुंदर बनवितात. काव्यातील सौंदर्य चमत्कृतीजन्य असते. चमत्कृती अलंकारांमुळे येते. अलंकारांमुळे चमत्कृती, चमत्कृतीमुळे सौंदर्य आणि सौंदर्यामुळे काव्यातून वेगळीच आनन्दनिर्मिती होऊन वाचकांच्या मनास आल्हाद लाभतो. याचसाठी काव्यातील अलंकारांना महत्त्व देण्यात येते. वासुदेवानन्द सरस्वतींच्या या 'श्रीदत्तचम्पूतील' काव्यालंकारांचा विचार त्यासाठीच महत्त्वाचा ठरावा. किंबहुना त्यांनी दिलेल्या उपयोगात आणलेल्या कित्येक अलंकारांचा, जातीवृत्तांचा अभ्यास करणे आव्हानस्वरूपी आहे. येथे त्यांनी उपयोजिलेल्या अलंकारांचा थोडक्यात विचार करू -

वासुदेवानन्द सरस्वतींनी श्रीदत्तचम्पूत अनेकानेक अलंकार, वृत्ते दिलेली असून त्यात दृष्टान्त, उत्प्रेक्षा, व्यतिरेक, उपमा, यमक, श्लोके, रूपक, स्वभावोक्ती, सार, अर्थांतरन्यास इत्यादींचा समावेश आहे. त्याचप्रमाणे त्यांनी अनेक संस्कृत-मराठी वृत्ते, छंद उपयोजून चम्पूरचना काव्यगुणांनी समृद्ध केली आहे. संस्कृततज्ञ-पंडित असल्याने त्यांनी प्रथम स्तबकापासूनच त्यांचा अवलंब केलेला दिसतो. उदा. हरिणीवृत्तम्, शार्दूलविक्रीडित, आर्या, मालिनी, शालिनी, स्वागता, भुजंगप्रयात अशा नेहमी आढळणाऱ्या वृत्तांबरोबरच चित्रपदावृत्तम्, प्रहरणकालिका वृत्तम्, सिंहोन्नतावृत्तम्, रुचिरा, पृथ्वीनी, असंबाधावृत्तम्, अपराजितावृत्तम, तनुमध्यावृत्तम आदी संस्कृत वृत्तांतूनही काही श्लोकरचना केली. त्यांचे अलंकार व वृत्ते हा एक संशोधनविषय व्हावा इतके वैविध्य त्यात आहे. काही उदाहरणे पहाता त्यात - अनुष्टुभ वृत्त - **तृतीय स्तबक** - श्लोक क्र. २८ 'आनन्दो भूपतेः

पूर इवाब्धेरब्जवीक्षणात् । नान्तः स्थातुं समर्थोऽ भूत्पुत्रसद्रत्नवी क्षणात् ॥२८॥ (यात 'यमक'ही साधले गेले आहे.) ज्याप्रमाणे चंद्राला पाहून समुद्राचा आनंद उसळत्या लाटांच्या रूपाने बाहेर पडतो त्याप्रमाणे आपल्या सर्वगुणी - सर्वश्रेष्ठ पुत्रास पाहून झालेला आनंद आयुराजाच्या अंतःकरणात न मावून बाहेर पडला. There are several varieties of this metre, but that which is most in use has eight syllables in each quarter, but of variable should be short, the sixth long and the seventh alternately long and short.

शार्दूलविक्रीडित : प्रत्येक चरणात अक्षरे १९, यती १२ व्या अक्षरावर : म स ज स त त ग

*'सप्तद्वीपपरेशतान्ययशता युद्धेऽ प्रतिद्वंद्वता ॥*
*बाहुनांच सहस्रता विजयता ख्यात्याधिकात्मज्वता ॥*
*वित्ता सिद्ध्यनुकूलतार्थबहुताकुष्ठोतिता वावृता ॥*
*युष्मत्ता भववद्धिपभक्तिवृढता चान्तेऽस्तु सायुज्यता ॥३२॥ (प्रथम स्तबक)*

दृष्टान्त अलंकाराचे उदाहरण : द्वितीय स्तबक - श्लोक ५६ (योगिनी वृत्तम्)

*''व्रयतीऽव्ययमात्मावियया पुनरैक्यं न भजेत्पृथक्कृतम् ॥*
*मथनेन पृथक्कृतं पुनर्नवनीतं न हि तत्र ऐक्यभाक् ॥' (श्लो. ५६)*

ब्रह्मविद्येने संसारापासून वेगळे केलेले शुद्ध आत्मतत्त्व पुन्हा संसाराशी एकरूप होत नाही. घुसळल्याने ताकापासून वेगळे केलेले लोणी पुन्हा ताकात एकजीव होत नाही. ''मदालसेचा ज्ञानी पुत्र आपला पिता कुवलायाश्व यांस म्हणाला की, आईकडून मी ब्रह्मज्ञान संपादिले असल्याने स्वानुभूती हीच स्त्री मी वरली आहे. स्वयंप्रकाश आत्म्यातच आता मी स्थिर आहे. आम्ही तिघेही भाऊ ईश्वरभक्त आहोत आणि चौथा अलर्क 'भक्त'च होणार आहे. तेव्हा हे श्रेष्ठा आर्या तू देखील ज्ञानी हो. आणि आम्हाला पुन्हा संसारात येण्याचा आग्रह करू नकोस. कारण ब्रह्मविद्येने संसारापासून वेगळे केलेले शुद्ध आत्मतत्त्व परत संसाराशी एकरूप होत नाही.''

श्रीवासुदेवानंद सरस्वतींच्या या काव्यरचनेत 'भक्ती' रसाला प्राधान्य दिलेले आहे. ते स्वतः दत्तभक्त होते. दत्तानुग्रही होते. श्रीदत्ताचे गुणवर्णन-माहात्म्य वर्णिण्यासाठीच त्यांनी काव्यरचना केलेल्या आहेत. रस परिपोष या काव्यातील महत्त्वाचा भाग आहे. काव्यनिर्मितीच्या मुळाशी असलेले कारण 'भक्ती' हेच आहे. भक्तीश्रेष्ठता असली तरी शोकरस, करुणरस, वीररसाचाही यात आविष्कार आहे.

'श्रीदत्तचम्पू' मध्ये या प्रमाणे साहित्यशास्त्रातील विविध गुणधर्मांचा संचय असल्याने हे काव्य मौलिक ठरले आहे. त्याचा अधिक सखोल अभ्यास होण्याची गरज आहे. चम्पूवाङ्मयात वासुदेवानन्द सरस्वती यांच्या या काव्याने मोलाची भर टाकली आहे.

**डॉ. सौ. सुनीता तांबे**
२, आसावरी, गणेशखिंड रोड,
औंध गाव, पुणे ७. दूरभाष : २५८८६८३३





# 'विवेकचूडामणि' आणि 'प्राकृत-मनन' यांतील काही साम्यस्थळे

डॉ. सौ. शुभदा शरच्चंद्र कोशे

एम.ए. पीएच.डी. विषय - 'भगवद् गीतेतील उपनिषदांचे आधार', गृहिणी.

श्रीमत् आद्यशंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रशरीरभाष्य, उपनिषदांवरील भाष्यग्रंथ, भगवद्गीतेवरील भाष्य इत्यादी अनेक गहन विषयांवरील ग्रंथांची रचना केली. त्याचप्रमाणे आध्यात्मिक विषयांवरील लहान लहान अशा अनेक ग्रंथांचीही रचना केली आहे. त्यातीलच एक 'प्रकरण' म्हणता येईल असा ग्रंथ म्हणजे 'विवेकचूडामणि' होय. ५८२ श्लोकांनी युक्त अशा या ग्रंथामध्ये मुख्यत्वेकरून आत्मा-अनात्मा, सत्-असत्, सत्य आणि असत्य, जीवाचा बंध, मनाविषयीचे विवेचन, नित्य आणि अनित्य वस्तूचा विवेक अशा अनेक विषयासंबंधीचे विचार मांडले आहेत. साधकाला विवेकी होण्यास मदत करणारा, मार्गदर्शन करणारा हा तत्त्वज्ञानातील 'विवेकाचा मुकुटमणी' म्हणता येईल असा हा ग्रंथ 'विवेकचूडामणि' या सार्थ नावाने प्रसिद्ध आहे. यामधील निवेदनशैली ही सरळ, रसाळ व सुबोध असून यातील विचार यशस्वीपणे साधकाच्या मनावर आपला, खोलवर ठसा उमटवतात असे निश्चितपणे म्हणता येईल. आचार्यांनी या ग्रंथामध्ये केलेल्या विवेचनातून; त्यांची संन्यस्त वृत्ती, त्यांचे योगविषयक ज्ञान, आत्मज्ञानप्राप्तीनंतर त्यांना आलेल्या अनुभूति इ. गोष्टी ठिकठिकाणी डोकावताहेत असे अभ्यासकाच्या अनुभवास येते.

त्याचप्रमाणे हा ग्रंथ म्हणजे उपनिषदे आणि भगवद्गीता यांचे सार आहे असेही म्हटले जाते. ही झाली या ग्रंथाची थोडक्यात ओळख.

आता दुसरा ग्रंथ म्हणजे 'प्राकृत मनन' होय. हे एक लहानसेच प्रकरण असून याची रचना केली आहे ती, परमपूज्य 'वासुदेवानंदसरस्वती' ऊर्फ टेंबे स्वामी यांनी. वास्तविक पाहता स्वामींचे बरेचसे वाङ्मय हे देववाणी - संस्कृत भाषेत रचलेले आहे. असे असले तरी त्यांनी सद्‌गुरू भगवान दत्तात्रेयांच्या प्रेरणेने आणि लोकांना समजण्यास सुलभ व्हावेत म्हणून काही थोड्या ग्रंथांची रचना मराठी भाषेतूनही केली आहे. प्रस्तुत प्रकरण हे त्यातीलच एक आहे. याची रचना गद्यमय आहे. याची भाषा सोपी असली तरी वेदांतपरिभाषेतील अनेक शब्दांचा वापर यात सढळ हस्ते केलेला दिसून येतो.

यातही, 'मोक्ष' हा श्रेष्ठ पुरुषार्थ असल्याचे सांगून त्याच्या अनुषंगाने सृष्ट्युत्पत्ती, अनुबंधचतुष्ट, साधनचतुष्ट, आत्मानात्मविवेक, आवरणशक्ती व तिचे कार्य, कर्माची चिकित्सा इत्यादी वेदांताशी संबंधित अशा अनेक विषयांचा विचार थोडक्यात पण प्रभावीपणे मांडला आहे असे दिसून येते.

अशा या दोन ग्रंथांना समोर ठेवले असता, यांमध्ये काही साम्यस्थल असल्याचे लक्षात येते. याचे कारण म्हणजे, या दोन्हींना पायाभूत आहे ते एकच तत्त्वज्ञान; आणि ते म्हणजे औपनिषदिक तत्त्वज्ञान होय. या दोन्ही ग्रंथातील विविध विचार, विविध संकल्पना या उपनिषदातील सिद्धांतांच्या भक्कम पायावर उभ्या आहेत.

सकृत दर्शनी पाहता या दोन्ही ग्रंथांमध्ये बाह्यतः फारसे साम्य असल्याचे आढळून येत नाही. आचार्यांचे कथन हे गीर्वाणवाणीत असून श्लोकबद्ध केलेले आहे. याला पार्श्वभूमी लाभली आहे ती सातव्या-आठव्या शतकातील कालखंडाची. तर स्वामींचे निरूपण हे १९-२० व्या शतकातील कालखंडाला अनुसरून झालेले. शिवाय गद्यमय. भाषाही मराठी. आचार्यांची रचना सलग, श्लोकांनी युक्त तर स्वामींचे प्रकरण बारा अध्यायांमध्ये विभागलेले. असे असले तरी दोन्हीची मनोवेधकता सारखीच आहे. दोन्हीतील विवेचनाचे स्वरूप गुरू-शिष्य संवादात्मकच असून दोनहीमधून साधकाला मिळणारा बोधही विवेकपूर्णतेचाच आहे.

अशा सर्व कारणांमुळे या दोन्ही ग्रंथांमध्ये अनेक साम्यस्थळे आहेत असे दिसून येते. त्यापैकी काही मुख्य अशा विषयांचाच विचार करणे योग्य ठरेल.

## १) साधनचतुष्ट

ज्याच्या मनामध्ये ब्रह्म जाणून घेण्याविषयी जिज्ञासा उत्पन्न झाली आहे अशा मनुष्याचे साधकाचे ठिकाणी त्याविषयीचा विशिष्ट अधिकार असावा लागतो. असा अधिकार - अशी पात्रता शिष्याजवळ आहे किंवा नाही, याची परीक्षा करूनच सद्‌गुरू, त्यांची ब्रह्मजिज्ञासा पुरवीत असतात. याविषयी 'विवेकचूडामणि'त आचार्य सांगतात की

*"विवेकिनो विरक्तस्य शमादिगुणशालिनः ।*
*मुमुक्षोरेव हि ब्रह्मजिज्ञासायोग्यता मता ॥" (१७)*

आत्मानात्मविवेक जाणणारा; संसारातून विरक्त झालेला; शम, दम, इत्यादी गुणांनी युक्त व मोक्षप्राप्तीसाठी उत्सुक अशा पुरुषालाच ब्रह्मजिज्ञासेचा अधिकार आहे.

याविषयी ज्ञानी, विचारी अशा सिद्ध पुरुषांनी चार साधने सांगितलेली आहेत. जसे -

*"आदौ नित्यानित्यवस्तुविवेकः परिगण्यते ।*
*इहामुत्रफलभोगविरागस्तदनन्तरम् ॥ (१९)*
*शमादिषट्कसंपत्तिर्मुमुक्षुत्वमिति स्फुटम्" (२०/१)*

अर्थात् प्रथमतः नित्य व अनित्य म्हणजेच अक्षय्य व नाशवंत वस्तूचा विचार करणे आवश्यक आहे. नंतर इहलोकीच्या व परलोकीच्या फलभोगांचे ठायी विरक्तता मानलेली आहे. त्याचप्रमाणे शम-दम-आदी सहा साधनांची संपत्ती व मोक्षप्राप्तीविषयी असलेली तीव्र इच्छा. ही चार साधने ब्रह्मजिज्ञासूसाठी आवश्यक मानलेली आहेत.

यापुढील काही श्लोकांमधून आचार्यांनी या साधनांचे स्पष्टीकरण केलेले आहे. ते असे -

१) **नित्यानित्यवस्तुविवेक** - ब्रह्म हे सत्य अर्थात अविनाशी - नित्य होय. तसेच हे जग मिथ्या - विनाशी - नाशवंत - अनित्य होय. अशा पद्धतीने मनाचा निश्चय करणे, त्यालाच नित्यानित्यवस्तुविवेक अशी संज्ञा आहे. नित्य आणि अनित्य असे वेगळेपणाचे ज्ञान म्हणजेच हा विवेक होय.

२) **वैराग्य** - यामध्ये या देहाला इहलोकी प्राप्त होणारे सुखोपभोग आणि मृत्यूनंतर परलोकी प्राप्त होणारे - स्वर्गप्राप्ती, अमृतपान इत्यादीसारख्या सुखांचा उपभोग, अशा दोन्ही प्रकारच्या फलांचा नाश-त्यांच्याविषयी उदासीनता - अपेक्षित आहे. म्हणूनच याला 'इहामुत्रार्थभोगविराग' असेही म्हणतात.

३) **शमादिषट्क** - शम - विषयांमध्ये काही ना काही दोष आहेत असे वारंवार मनात आणून विषयवासनांचे ठायी वारंवार विरक्ती उत्पन्न होते व आत्मवस्तूच्या ठिकाणी हळूहळू निश्चित अशी स्थिती उत्पन्न होते त्याला 'शम' असे म्हणतात. **दम** - ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये यांना विषयांपासून मागे फिरवून त्यांची त्यांच्या गोलकाचे ठिकाणी -मूल स्थानी- स्थापना करणे, याला 'दम' म्हणतात. **उपरति** - मनुष्याच्या चित्तवृत्ती या नेहमी बाह्य विषयांकडे धाव घेत असतात. त्यांना बहिर्मुख होऊ न देणे याचे नांव 'उपरति' ! **तितिक्षा** - आपल्या वाट्याला येणारे दुःख निवारण व्हावे यासाठी काही उपाय न करता ते धीरगंभीरपणे सहन करणे, त्याचप्रमाणे आपली वृत्ती चिंता आणि शोक यांनी रहित ठेवणे, अशा मनोवृत्तीलाच 'तितिक्षा' असे म्हणतात. **श्रद्धा** - शास्त्रातील सिद्धांत आणि सद्गुरूंची वचने, हीच सत्य आहेत असा मन-बुद्धीचा निश्चय होणे, त्याला ज्ञानवंत साधुजन 'श्रद्धा' असे म्हणतात. या श्रद्धेनेच आत्मवस्तू प्राप्त होते. अर्थात आत्मज्ञानाची प्राप्ती होते. **समाधान** - अंतःकरणाला अपेक्षित असा विषय प्राप्त करून देऊन त्याला संतुष्ट ठेवणे, हे खरे समाधान नव्हे. तर दोषांपासून रहित अशा परमात्म्याचे ठिकाणी बुद्धी सदैव निमग्न राहण्यासाठी योग्य असे प्रयत्न सातत्याने करणे याचे नाव 'समाधान' होय.

४) **मुमुक्षता** - अहंकारापासून तो देहापर्यंत जी जी बंधने अज्ञानाने कल्पिलेली आहेत, त्या बंधनांपासून मुक्त व्हावे अशा विचाराने स्वस्वरूपाचा बोध करून घ्यावा अशी जी इच्छा उत्पन्न होते ती 'मुमुक्षुता'

अशा या साधनचतुष्ट्याविषयी स्वामींनीही आपल्या शिष्याला, 'प्राकृत मनन' या ग्रंथातून बोध केला आहे. अर्थातच आचार्यांच्या 'विवेकचूडामणि' या ग्रंथाची व्याप्ती मोठी असून स्वामींचा ग्रंथ मर्यादित स्वरूपाचा आहे. त्या कारणाने बहुतेक सर्व विवेचन हे, आचार्यांच्या विवेचनाशी तुलना करता सीमित स्वरूपात आहे. परंतु त्याचा परिणाम म्हणजे स्वामींच्या विवेचनात अधून-मधून थोडीशी सूत्रमयता आली आहे. लहान लहान वाक्यांमधून खूप मोठा आशय समाविष्ट झाला आहे असे आढळून येते. साधनचतुष्ट्याविषयी स्वामी सांगतात ते असे -

या विश्वात ब्रह्मावाचून काही नाही व ते ब्रह्म मी आहे, असे अनुभवाने जाणून घेऊन, जीवन्मुक्त होणारा अधिकारी साधक हा अनुबंधचतुष्ट्यांना उत्तम रीतीने जाणणारा असावा. असे स्वामींचे निवेदन ऐकल्यावर शिष्याच्या मनात जिज्ञासा जागृत होऊन तो विचारतो की, हे अनुबंधचतुष्ट्य कोणते?

१) विषय – ब्रह्म हाच वेदांतशास्त्राचा विषय. २) प्रयोजन - मोक्ष हेच प्रयोजन. ३) संबंध - बोध्यबोधकभाव हाच संबंध. (बोध्य - जाणून घेण्यास योग्य व बोधक म्हणजे जाणून घेणारा.) ४) साधनचतुष्ट्यसंपन्न प्रमाता अधिकारी. हे चार अनुबंध होत.

आचार्यप्रमाणेच येथेही स्वामींनी ब्रह्मजिज्ञासू हा अधिकारी व साधनचतुष्ट्यसंपन्न असावा असे सांगितले आहे. पुढे या चार साधनांविषयी शिष्याने विचारलेल्या प्रश्नांचे उत्तर देताना स्वामी सांगतात -

नित्यानित्यवस्तुविवेक (विचार) इहामुत्रार्थभोगविराग (वैराग्य) शमादिषट्क व मुमुक्षा (मोक्षाची इच्छा) ही चार साधने होत. त्यातून ब्रह्म सत्य आणि जग अनित्य (मिथ्या) असा, श्रवणाने होणारा विचार, हे पहिले साधन होय. या लोकातील स्त्रीभोगादी व स्वर्गी अमृतपानादी ही सर्व अनित्य जाणून कुत्र्याच्या ओकीप्रमाणे, त्या विषयांचा वीट मानणे हे दुसरे साधन (वैराग्य) होय. १) शम २) दम ३) उपरति ४) तितिक्षा ५) श्रद्धा व ६) समाधान हे शमादिषटक. (यापुढे लगेच स्वामींनी या सर्वांचे स्पष्टीकरण केले आहे.) १) विषयांकडून मनाला वळवून स्वरूपी ठेवणे तो शम (शांती). २) बाह्येंद्रियांचा निग्रह करणे (स्वाधीन ठेवणे) तो दम. ३) उपरति म्हणजे संन्यास. तो न घडेल तर निष्काम कर्मानुष्ठान किंवा व्यवहारलोप करणे. (अर्थातच कर्माचे अनुष्ठान करताना निष्काम असावे. अथवा व्यवहारातही तटस्थ - उदासीन असावे.) ४) प्रारब्धाने प्राप्त झालेले शीतोष्ण - दुःखादि सहन करणे ती तितिक्षा. ५) गुरूवाक्यावर विश्वास ठेवणे ती श्रद्धा. ६) श्रवणादिक (श्रवण - मनन-निदिध्यासन इ.) होत असता मनाचे समाधान करणे हे समाधान. ही सहा मिळून शमादिषटक होय.

पुढे दृष्टान्तपूर्वक स्वामींनी समजावून सांगितले आहे की चोहो बाजूंनी घर जळत असता; धन, धान्य, स्त्री, पुत्रादिकांना सोडून घरधनी स्वतापोपशांत्यर्थ आपणच बाहेर पडून तापशांतीची जशी इच्छा करितो, तशी सांसारिक तापत्रय शमन करण्याची जी तीव्र इच्छा होणे ती मुमुक्षा होय.

अत्यंत सुंदर दृष्टान्त देऊन स्वामींनी सोपे करून सांगितले आहे. एखाद्या घराला चारी बाजूंनी आगीच्या ज्वाळांनी वेढलेले आहे. त्या आगीत घराच्या मालकासह त्याची सर्व संपत्ती, धान्य, पत्नी-पुत्र वगैरे आप्त अडकले आहेत. अशा वेळी त्या मालकाच्या मनात एकच विचार येतो की, या अग्नीच्या दाहापासून मी कसा वाचेन ? या आगीचा ताप न होता मी सुखरूप कसा बाहेर पडेन ? मग त्याला बाकी काही सुचत नाही व तो सर्व गोष्टींकडे पाठ फिरवून आगीमधून बाहेर पडतो. त्याचप्रमाणे, मनुष्याला प्राप्त होणाऱ्या अधिभौतिक, अधिदैविक आणि आध्यात्मिक अशा तीन प्रकारच्या तापापासून स्वतःला वाचवण्यासाठी संसाराकडे, या प्रपंचाकडे, या अनित्य अशा सुखोपभोगांकडे पाठ फिरवून अखंड शांती प्राप्त करून घेण्याची अतिशय प्रबल इच्छा होणे म्हणजेच मोक्षप्राप्तीसाठी उचललेले पहिले पाऊल म्हणता येईल.

हे ऐकून शिष्याच्या मनात प्रश्न निर्माण झाला आहे की, साधकाच्या ठिकाणी, या चारी साधनांची एकाच वेळी, एकत्रितपणे, खरोखरच आवश्यकता आहे का ? एखादे कमी असेल तर चालणार नाही का ? यासाठी स्वामींनी या सर्व साधनांची उपयुक्तता थोडक्या शब्दांमध्ये पण चांगल्या रीतीने पटवून दिली आहे. स्वामी सांगतात -

कित्येकाला नित्यानित्यविचार जाहला तरी विषयाभिलाषा असते. म्हणजेच एखाद्या साधकाचा नित्य व अनित्य अशा गोष्टींविषयीचा निश्चय झाला तरी, कदाचित तो विषयांपासून दूर गेलेला नसतो. ही विषयांची

अभिलाषा ज्ञानप्राप्तीच्या-आत्मज्ञानाच्या-आड येते. ज्ञानाला प्रतिबंध करते. म्हणून त्या साधकाजवळ वैराग्यसाधन असणे अत्यंत आवश्यक आहे. हे वैराग्य साध्य करूनही कोणी साधक आपला क्रोध आवरू शकत नाही. मग त्याला कोपताप होतो. यासाठी शम-दम वगैरे सहा गोष्टींची आवश्यकता आहे. काही वेळा एखादा जो उत्तम सगुणोपासक असतो, त्याच्याजवळ ही तिन्ही साधने उपस्थित असतात. परंतु बऱ्याच वेळा असे दिसते की, सगुणोपासकाजवळ मोक्षाची इच्छा नसते. परंतु असे होऊन चालणार नाही. म्हणून मुमुक्षुताही पाहिजे. (अ.२)

येथपर्यंत साधनचतुष्ट्यसंपन्न प्रमाता अधिकारी पुरुष हा आत्मज्ञान प्राप्त करून घेऊन मोक्षाच्या वाटेचा वाटसरू होण्यासाठी योग्य असा, शिष्य-साधक म्हणून सिद्ध झाला असे म्हणता येईल.

## २) गुरुकृपा

यापुढे अशा मुमुक्षूला आवश्यकता असते ती, योग्य मार्गदर्शनाची. हे मार्गदर्शन मिळावे यासाठी सद्गुरु प्राप्त व्हावा लागतो. या सद्गुरुविषयी आचार्यांनी 'विवेकचूडामणि' ग्रंथात व स्वामींनी 'प्राकृत मनन' मध्ये जे विचार मांडले आहेत त्यांचा थोडक्यात मागोवा घेण्याचा प्रयत्न करता येईल. आचार्यांनी म्हटले आहे की -

*'उक्तसाधनसंपन्नस्तत्त्वजिज्ञासुरात्मनः ॥३३/२*
*उपसीदेद्गुरुं प्राज्ञं यस्माद्बन्धविमोक्षणम् ॥ ३४/१*

वर सांगितलेल्या साधनांच्या योगाने आत्म्याचे तत्त्व जाणण्याची इच्छा जो पुरुष करतो, त्या पुरुषाने, विद्वान सद्गुरुला शरण जावे. म्हणजे त्याची, या संसाराच्या बंधनापासून मुक्तता होईल.

हा गुरु; वेदांचा ज्ञाता, निर्दोष, निरिच्छ, ब्रह्मज्ञानी, जनांमध्ये श्रेष्ठ, ब्रह्माचे ठायी लीन झालेला, शांत, दयासागर व नम्र सत्पुरुषांचा बांधव असावा. अशा गुरुला शरण जाऊन त्याची भक्तीने, नम्रतेने, प्रीतीने व सेवेने आराधना करावी व गुरु प्रसन्न झाले असता, आपणाला जाणण्यास योग्य असे जे 'आत्मज्ञान' त्याविषयी विचारावे. ते असे -

हे स्वामी - गुरो, हे करुणासागर ! मी जो या संसाररूपी समुद्रात पडलेला आहे, त्या माझ्या, आपल्या सरळ आणि करुणामृतवृष्टिकारक कटाक्ष दृष्टीने उद्धार करा...प्रापंचिक ताप हाच एक दावाग्नी असून त्याच्या ज्वाळांनी मी संतप्त झालो आहे... या भवसागरातून मी कसा तरू ? माझी काय गती होईल ? सद्गतीचा उपाय कोणता ? हे मी काहीच जाणत नाही. प्रभो ! कृपा करून माझे रक्षण करा, आणि माझ्या संसारासंबंधी दुःखांचा नाश करा.

अशा प्रकारे शरण आलेल्या आपल्या शिष्याला, उदार अंतकरणाच्या सद्गुरूने एकदम अभय द्यावे. केवळ दयापूर्णतेने त्याला ब्रह्मतत्त्वाचा उपदेश करावा.

आचार्यांप्रमाणेच स्वामींनीसुद्धा गुरुकृपेविषयी अगदी थोडक्यात सांगितले आहे -

साधनचतुष्ट्यसंपन्न अशा अधिकारी - योग्य - पुरुषाने हाती उपहार घेऊन गुरूंना शरण जावे. त्यानंतर प्रार्थना करावी की, हे भगवान्, जीव कोण ? ईश्वर कोण ? जग कसे ? हे त्रय कोठून उत्पन्न झाले व याचा उपशम (शांती) कसा होईल ? असा प्रश्न करावा.

पुढे याला आधार अशा श्रुति-स्मृतींमधील वचनांचा उल्लेख स्वामींनी केला आहे. - नाना लोकी, नाना योनी फिरता फिरता शेवट प्रारब्धवशे वैराग्य उत्पन्न होते - त्याने ज्ञानाकरिता श्रीगुरूला - शब्दज्ञान आणि ब्रह्मानुभव असणाऱ्या पुरुषाला - हाती समिधा घेऊन शरण जावे. (हे श्रुत्युक्त वचन मुंडक उपनिषदामध्ये आलेले आहे). पुढे स्मृतीमधील वचन आले आहे ते असे - तत्त्वदर्शी ज्ञानी जे, त्यांना नमून, प्रश्न करून, सेवा करून ते ज्ञान जाणावे. तेच उपदेश करतील. (भवगद् गीता अ. ४, श्लो. ३४)

अशा पद्धतीने आपल्या विवेचनाच्या पुष्ट्यर्थ श्रुति-स्मृतींमधील वचने उद्धृत केली आहेत. पुढे स्वामी सांगतात की -

असा (योग्य) शिष्य शरण आल्यावर गुरु; सत्त्व, रज, तमोगुणे ईश्वर, जीव आणि जगदुद्भव प्रकार सांगून करतळामलकवत् आत्मबोध करतात. अशा अधिकाऱ्याला अशी साधने व तो गुरू मिळणे हा ईश्वरानुग्रह आणि याला पूर्वपुण्योदयच पाहिजे. हे ज्ञान देणारा गुरु ईश्वरच जाणावा. त्याच्या प्रसादे जो जीवात्म्याचा आणि ब्रह्माचा भेद निरसून टाकतो, तो मुक्त होतो. (अ. २ रा)

## ३) पंचकोश - विवरण

आपल्या या देहामध्ये पाच कोश आहेत असे मानले जाते. या कोशांविषयीचे विवेचन वरील दोनही ग्रंथांमधून कशा पद्धतीने केले आहे ते पाहणे अतिशय महत्त्वाचे आहे.

*"कोशैरन्नमयाद्यैः पञ्चभिरात्मा न संवृतो भाति ।*
*निजशक्तिसमुत्पन्नैः शैवलपटलैरिवाम्बु वापिस्थम् ॥" (१५१)*

जसे विहिरीतील पाणी, आपोआप उत्पन्न झालेल्या शेवाळ्यांच्या जाळ्यांनी वेढल्यामुळे लक्षात येत नाही त्याचप्रमाणे आपल्याच शक्तींपासून (मायेपासून) उत्पन्न झालेल्या अन्नमयादिक पाच कोशांच्या योगाने वेढलेला आत्मा लक्षात येत नाही.

आचार्यांनी वरील श्लोकात केलेल्या वर्णनाशी मिळते-जुळते व वेगळ्या दृष्टांतांनी युक्त असे वर्णन स्वामींनी केले आहे. ते म्हणतात -

खड्गाला कोश (म्यान), शिवलिंगाला संपुष्ट, आंब्याला साल, व पुरुषाला अंगरखा आच्छादून ठेवितो, त्याप्रमाणे हे कोश आत्म्याला आच्छादून ठेवतात.

आत्मतत्त्वाची सूक्ष्मता जाणून घेत असताना, या पंचकोशांचे विवेचन उपनिषदांमधून आले आहे. त्याचेच विशेष रूपाने स्पष्टीकरण करण्यासाठी व सर्वांना समजण्यास सुलभ व्हावे यासाठी या पंचकोशांचे विवरण आचार्यांनी 'विवेकचूडामणी'मध्ये आणि स्वामींनी 'प्राकृत मनन' मध्ये केलेलें आहे. अर्थातच दोघांचीही विवेचनाची पद्धत त्या त्या कालमानाला अनुसरून असली तरीही मांडणी वैशिष्ट्यपूर्ण आहे. आचार्य सांगतात -

*"देहोऽयमन्नभवनोऽन्नमयस्तुकोश -*
*श्चान्नेन जीवति विनश्यति तद्विहीनः ।" (१५६/१ व २)*

हा देह अन्नापासून झालेला आहे. अन्नानेच तो वाढतो-जगतो. आणि जर अन्न मिळाले नाही तर तो नष्ट होतो. म्हणून हा (देह) अन्नमय कोश होय.

पाच कर्मेंद्रियांनी युक्त जो प्राण तोच प्राणमय कोश होय. हा कोशच अन्नमय कोशाचे ठायी, सर्व क्रियांसाठी प्रेरणा देणारा आहे. (१६७). पाच ज्ञानेंद्रिये आणि मन मिळून मनोमय कोश होतो. हा कोशच 'मी आणि

माझे' अशा प्रकारची कल्पना होण्यास कारण आहे. नामादिक भेदांच्या रचनेने युक्त असा हा बलवान कोश आपल्यापेक्षा पूर्वीच्या कोशाला व्यापून वृद्धि पावत असतो.(१६९). ज्ञानेंद्रिये, वृत्ति आणि बुद्धी ही सर्व मिळून **विज्ञानमय** कोश होय. हा जीवाला संसार प्राप्त होण्याचे कारण होय. चैतन्याचे प्रतिबिंब ज्याच्या बरोबर येत असते, असा हा विज्ञानमय नावाचा प्रकृतीचा विकार (कार्य) देह, इंद्रिये इ. चे ठायी, 'ज्ञानरूप क्रिया करणारा मी आहे' असा अतिशय अभिमान निरंतर मानीत असतो. मीपणाचा अभिमान बाळगून, व्यवहार चालवणारा जो, अनादिकाळचा विज्ञानमय कोश त्यालाच जीव म्हणतात. (१८६,१८७) पुण्यवान लोकांना, पुण्याचा अनुभव घेत असता आणि स्वतःची प्रिय वस्तू मिळाली असता जी वृत्ती तमोगुणाने व्यापलेली असून, प्रिय मोद आणि प्रमोद या गुणांनी युक्त असते तिला **आनंदमय** कोश म्हणतात. या वृत्तीमध्ये प्राणिमात्र यत्न केल्यावाचून स्वतः आनंदरूप होऊन आनंदाचा अनुभव घेत असतो.

पंचकोशांविषयीचे विचार 'प्राकृत-मनन' मध्येही आलेले आहेत. स्वामी शिष्याला समजावून सांगतात की - (१) अन्न विकार जे शुक्रशोणित याने झालेला व अन्नाने वाढलेला, षड्भावविकारही स्थूलदेह हा **अन्नमय** कोश. २) कर्मेंद्रिये पाच आणि प्राण पाच हे मिळून **प्राणमय** कोश. ३) ज्ञानेंद्रियांसहित मन (बहिर्वृत्तिक) हा **मनोमय** कोश. ४) ज्ञानेंद्रियांसहित बुद्धी (अंतर्वृत्तिक) हा **विज्ञानमय** कोश. ५) प्रिय इष्टवस्तुदर्शनाने मोद (त्याच्या लाभाने होणारा आनंद), प्रमोद (त्याचा अनुभव किंवा भोगाने होणारा आनंद) यांसह कारण शरीरस्थ सत्त्व हा **आनंदमय** कोश. या प्रमाणे हे पाच कोश होत. (अ. १० वा)

आत्मा व कोश यांचा संबंध हा रज्जुसर्पवत् अध्याससंबंध होय. कोशाचे आणि आत्म्याचे एक प्रत्ययविषयत्व होते, म्हणून अन्योन्याध्यास जाणावा. जेव्हा अन्नमयाचा अध्यास होतो, तेव्हा मी देव, मनुष्य, स्त्री, पुरुष; मी जाहलो, मी आहे, मी मरेन; मी बाल, तरुण, वृद्ध; मी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र; मी ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी; मी दीक्षित इत्यादी अन्नमय कोशाचे विकारधर्म आपल्यावर व आपले सच्चिदानंद धर्म अन्नमयावर आरोपित करतो. प्राणमयाशी तादात्म्य जाहल्यावर मी भुकेलो, तान्हेलो, मी बलवान, बोलका, गंता (गमन करणारा), दाता, विसर्ग करणारा, मूक, पंगू, षंढ इत्यादी प्राणमयाचे धर्म आपल्यावर व आपले प्राणमयावर आरोपित करतो. मनोमय तादात्म्याने मी संकल्पविकल्पवान्, शोकमोहवान्, कामी, लोभी, श्रोता, स्प्रष्टा (स्पर्श करणारा), रस घेणारा, हुंगणारा, बहिरा, आंधळा, इत्यादी मनोमय धर्म आपल्यावर व आपले सच्चिदानंद मनोमयावर आरोपित करतो. विज्ञानमयतादात्म्याने मी कर्ता, बुद्धिमान, ऊहापोहकुशल, अवधानी, रागी, द्वेषी, श्रोत्रिय, पंडित, विरक्त, भक्तिमान, उपासक, ज्ञानी इत्यादी विज्ञानमय धर्म आपल्यावर व आपले विज्ञानमयावर लोटतो. आनंदमयाशी तादात्म्य होता मी भोक्ता, सुखी, संतुष्ट, सात्त्विक, राजस, तामस, मूढ, दुष्ट, शून्य, मोहित, अविवेकी, भ्रांत इत्यादी आनंदमयाचे धर्म आपणावर व आपले आनंदमयावर आरोपित करतो. हे सर्व होते याचे कारण म्हणजे मी आत्मा निराळा व पंचकोश माझ्याहून निराळे, असा विचार न केल्यामुळेच.

परंतु जेव्हा मृत्तिकेवर आरोपित घटाचे नामरूप बाधित केल्यावर मृत्तिका मात्र राहते. तसेच पंचकोश ज्ञानाने बाधित केल्यावर केवळ सच्चिदानंद आत्मा अवशिष्ट राहतो.

### ४) आत्मानात्मविवेक

साधकाने प्रथम आत्मा आणि अनात्मा यांविषयी चिंतन व मनन करून जाणून घेतले पाहिजे. यासाठी 'अनात्मा' विषयाचे विवेचन करताना आचार्य सांगतात -

*''देहेंद्रियप्राणमनोऽहमादयः सर्वे विकारा विषयाः सुखादयः ।*
*व्योमादिभूतान्यखिलं च विश्वमव्यक्तपर्यन्तमिदं ह्यनात्मा ॥१२४*
*माया मायाकार्यं सर्वं महदादि देहपर्यन्तम् ।*
*असदिदमनात्मकं त्वं विद्धि मरुमरीचिकाकल्पम् ॥१२५॥''*

देह, इंद्रिये, प्राण, मन आणि अहंकार इत्यादी सर्व विकार, सुखादिक विषय, आकाशादिक भूते आणि अव्यक्तापर्यंत सकल जगत् हे सर्व अनात्मा होय. तसेच माया आणि महत्तत्त्वापासून देहापर्यंत सगळे मायेचेच कार्य, ही अनात्मा असून निर्जल प्रदेशातील मृगजळाप्रमाणे मिथ्या आहेत.

आत्म्याविषयी आचार्यांनी खूपच सविस्तर सांगितले आहे. येथे आत्म्याचे वर्णन कोणकोणत्या शब्दात केले आहे ते थोडक्यात पाहता येईल. आत्मा हा असंग, साक्षीभूत, सदानंदरूप, आनंदरूप, बुद्ध्यादिकांना चेतना देणारा, जगद्व्यापी-विभु, प्रेरक, नित्यज्ञानस्वरूपी, अंतर्यामी, अखंड सुखरूप, अनुभवरूप, सदा एकरूप, ज्ञानरूप, अक्रियन अविकारी, अविनाशी असा आहे.

यानंतर आत्मानात्मविवेकाविषयीचे स्वामींचे विचार जाणून घेऊ. स्वामी सांगतात की - प्रपंच हा आत्मा आणि अनात्मा असा दोन प्रकारचा आहे. पैकी अनात्मा (मूळ माया) एकच असून कार्यरूपाने अनेकरूप झाला. (शिष्याने विचारलेल्या प्रश्नावरून अनात्म्याच्या व आत्म्याच्या अनेकत्वाविषयी दृष्टान्त देऊन स्वामींनी विवरण केले आहे.)

आत्म्यासंबंधी स्वामी सांगतात की - हा आत्मा साक्षी, निर्विकार; कूटस्थ; आकाशवत् असंग; सर्वव्यापी; अविकारी; नित्य; अतींद्रिय; निरंश; अद्वितीय; अवस्थासाक्षी; सच्चिदानंदरूपी; अज; अविनाशी; सद्रूप; चिद्रूप; निरूपाधिक, निरातिशय असून नित्य असणारे जे सुख तो आनंद हे आत्मस्वरूप होय.

### ५) आवरणशक्ती

*''एषावृतिर्नाम तमोगुणस्य शक्तिर्यया वस्त्ववभासतेऽन्यथा ।*
*सैषा निदानं पुरुषस्य संसृतेर्विक्षेपशक्तेः प्रवणस्य हेतुः ॥'' ११५*

एक प्रकारची वस्तु असता, दुसऱ्याच प्रकारची आहे असे जिच्यापासून दिसते, अशी जी आवरणशक्ती, ती तमोगुणाची होय. आणि हीच पुरुषाला संसार प्राप्त होण्याचे व विक्षेपशक्तीच्या आधीन होण्याचे कारण होय.

या आवरणशक्तीच्या कार्याविषयी शिष्य प्रश्नाला उत्तर देताना स्वामी म्हणतात - ईश्वर आणि ब्रह्मज्ञानी यांना सोडून सर्व जीवांचे पंचकोश आणि आत्मा यांचा परस्परभेद असताही तो भेद; अंधकाराप्रमाणे जी आवरून ठेवते ती आवरणशक्ती. ही असत्वावरण आणि अभानावरण या दोन रूपाने कार्य करते. त्यातून ब्रह्म वस्तू मुळीच नाही, असा व्यवहार होतो, ते असत्वावरण आणि ब्राह्मवस्तू मला भासत नाही, असा व्यवहार होतो ते अभानावरण. हे आवरणशक्ति-कार्यच संसाराला कारण होते. हे आवरणपरोक्ष आणि अपरोक्ष अशा दोन प्रकारच्या तत्त्वज्ञानाने नष्ट होते. (अ. १ ला)

## ६) अध्यास अथवा अध्यारोप

एका वस्तूवर दुसऱ्याच वस्तूचा भास होणे म्हणजेच अध्यास होय. जसा रज्जूवर होणारा सर्पाचा भास.

*"सम्यग्विचारतः सिद्धा रज्जुतत्त्वावधारणा ।*
*भ्रान्तोदितमहासर्प - भयदुःखविनाशिनी ॥"* १२

चांगल्या विचाराच्या योगाने सिद्ध झालेल्या रज्जूच्या-दोरीच्या-सत्य स्वरूपाचा निश्चय - जसा भ्रांती पावलेल्या अविचारी जनांनी मानलेल्या सर्पभयरूपी दुःखाचा नाश करतो, तद्वत् सुविचाराने जन्ममरणरूप संसाराचा नाश होऊन मोक्ष प्राप्त होतो.

*"अध्यासदोषात्पुरुषस्य संसृति-रध्यासबन्धस्त्वमनैव कल्पितः ।*
*रजस्तमोदोषवतो विवेकिनो जन्मादिदुःखस्य निदानमेतत् ॥"* १८१

अर्थात् - अध्यासरूप दोषाने जीवाला संसार प्राप्त होतो आणि अध्यास हे बंधन मनाचेच कल्पिलेले आहे. म्हणून रजोगुण आणि तमोगुण हे दोष ज्याच्या अंगी आहेत अशा अविवेकी जीवाला जन्मादिक दुःखाचे कारण मनच आहे.

वरीलप्रमाणेच स्वामींचे विचारही पाहण्यासारखे आहेत. जसे - मोक्षप्राप्तीसाठी ब्रह्मज्ञानाची आवश्यकता सांगितली आहे. ते ब्रह्म कसे जाणावे ? यावर गुरु उत्तर देतात की, ते ब्रह्म, अध्यारोपवादाने सर्व संग सोडून जाणावे. आता प्रश्न असा की अध्यारोप म्हणजे काय ?

ज्याप्रमाणे शिंपला चकाकला असता रजताचा - चांदीचा भास होतो, अर्धवट अंधारात दोरी वेडीवाकडी होऊन पडली असता सर्पाचा भास होतो किंवा अंधारात दगडालाच भ्रमाने चोर मानणे, असे हे भास. त्याप्रमाणे निष्प्रपंच अशा ब्रह्मस्वरूपावर प्रपंचाचा आभास होणे हाच अध्यारोप होय. त्यालाच अविद्या, तम, मूलप्रकृती, प्रधान, गुणसाम्य, अव्यक्त आणि माया असे म्हणतात.

या मायेविषयी आचार्य सांगतात की, जसे रज्जूचे ज्ञान झाल्याने तिच्यावर झालेली सर्पभ्रांती दूर होते, त्याचप्रमाणे शुद्ध आणि अद्वितीय अशा ब्रह्माच्या ज्ञानाने या मायेचा नाश होतो.(११२)

येथपर्यंत आपण आद्यशंकराचार्यविरचित 'विवेकचूडामणि' आणि प. पू. वासुदेवानंदसरस्वती विरचित 'प्राकृत मनन' या दोन्ही ग्रंथांमधील उपनिषदांमधून विशद केलेल्या तत्त्वज्ञानाशी जवळीक साधणारी काही साम्यस्थळे पाहिली. यावरून दोन्हीचे श्रेष्ठत्वही ध्यानात येते. शेवटी एकच महत्त्वाचा उल्लेख करून हे अभ्यसन समाप्त करता येईल.

स्वामींनी आपल्या या प्रकरणाच्या शेवटच्या म्हणजे बाराव्या अध्यायाचे अंती आद्यशंकराचार्यांचे वचनच प्रमाण मानून त्याचा उल्लेख केला आहे -

हे ज्ञान (अपरोक्ष) ज्याला जाहले तो कृतकृत्य होऊन नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सत्य, परमानंदाद्वयरूप जाहला असे जाणावे. "हे ज्ञान ज्याला प्रथम जाहले तो चांडाळ असो अथवा द्विज असो (सः गुरुरित्येषा मनीषा मम) या प्रमाणे भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्यवचनाने कुटीचक, बहूदक, हंस, परमहंस, संन्याशाहून तो अधिक पूज्य आहे." त्याचे योगाने कुल पावन होते, कृतार्थ होते.

- इति -


**डॉ. सौ. शुभदा शरच्चंद्र कोशे**
१२६२ ब, वसंत वैभव, फ्लॅट नं. ४०१,
शिवाजी रोड, पनवेल, जि. रायगड ४१०२०६



# श्रीवासुदेवानंद सरस्वती टेम्बे स्वामी आणि ज्योतिषज्ञान

**श्रीमती डॉ. कमलताई वैद्य**

*प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींच्या अंतरंग शिष्या. पति निधनानंतर मॅट्रीकपासून एम.ए.पीएच.डी. पर्यंत शिक्षण 'एकनाथी भागवतावरील प्रबंधास' वाङ्मय चर्चा मंडळ बेळगावचे पारितोषिक. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती व गोस्वामी तुलसीदास ही चरित्रात्मक पुस्तके प्रकाशित.*

सावंतवाडीच्या सीमेवरील एका लहानशा खेड्यात श्री. हरिभट टेंबे यांचे पूर्वज राहात. टेंभ्यांवर घर करून राहणारे म्हणून टेम्बे उपनाव पडले. श्री. हरिभट भिक्षुकी करीत. लहान गांवात भिक्षुकी चालेना म्हणून हरिभट प्रथम माणगावी आले. त्यांचा नातू म्हणजे श्रीगणेशपंतांचा मुलगा वासुदेव यांचे शिक्षण प्रथम आजोबांचे जवळच झाले. वासुदेव पाच वर्षांचा झाला आणि त्याच्या शिक्षणास सुरुवात झाली. त्यांनी वासुदेवाला समासचक्र, शब्दरूपावळी, अमरकोश, अष्टाध्यायी, संस्कृत स्तोत्रे वगैरे शिकविण्यास सुरुवात केली. वासुदेव मुळातच कुशाग्र बुद्धीचा व एकपाठी होता. त्याची तीव्र धारणाशक्ती पाहून हरिभटांनाही आश्चर्य वाटे. या अभ्यासाने संस्कृतचा पाया दृढ झाला.

वासुदेवाची मुंज झाल्यावर श्री. भास्कर भट ओळकरांनी काही दिवस त्यास ऋग्वेद शिकविला, पण ते एकाएकी घर सोडून निघून गेल्यामुळे भटवाडी येथे राहणाऱ्या श्री. विष्णुभट उकिडवे शास्त्र्यांच्याकडे हरिभटांनी वासुदेवास ऋग्वेद संथा देण्याची विनंती केली. ती त्यांनी मान्य केली व त्याप्रमाणे त्याचे शिक्षण सुरू झाले. वासुदेव दहा वर्षांचा असताना आजोबा निवर्तले. वासुदेवाचे ऋग्वेदाचे व उपग्रंथाचे शिक्षण या वेळेपर्यंत पूर्ण झाले होते. श्री. गणेशपंत बहुतेक गाणगापुरीच असत. यामुळे कुटुंब पोषणाची जबाबदारी वासुदेवावर पडली.

श्री. उकिडवेशास्त्री यांच्याकडील अभ्यास पूर्ण झाल्यावर वासुदेव श्री. शंभूशास्त्री साधले यांच्याकडे संस्कृत आणि ज्योतिष शिकावयास जात असे. पण हे शिक्षण एकाएकी बंद पडले. एकदा श्री. शंभुशास्त्री यांच्याकडे एक गृहस्थ घर बांधण्यासाठी मुहूर्त विचारावयास आले. श्री. शास्त्रीबुवांनी पंचांग काढून आणि गणित मांडून एक मुहूर्त काढून दिला. वासुदेव बाजूलाच बसला होता, तो कधी मधे बोलत नसे, पण त्या वेळी तो म्हणाला की मध्ये बोलण्याचे धाडस करतो म्हणून क्षमा असावी. आपण आत्ता जो मुहूर्त काढून दिला आहे त्याचे गणित पुन्हा तपासून पहावे. श्री. शास्त्रीबुवा आश्चर्यचकीत झाले. आपण काढलेला मुहूर्त चूक असणे शक्य नाही अशी त्यांची खात्री होती तरी पण त्यांनी गणित पुन्हा तपासून पाहिले. तेव्हा खरोखरच अनवधानाने गणित मांडताना चूक झाली होती. प्रथम त्यांनी काढलेल्या दिवशी कुयोग होता. म्हणून त्यांनी मग दुसरा मुहूर्त काढून दिला. ते गृहस्थ गेल्यावर श्री. शंभुशास्त्री वासुदेवास म्हणाले, "वासुदेव, उद्यापासून तू आमच्याकडे शिकावयास यावयाचे नाही. आज तुझे येथील शिक्षण संपले !" याप्रमाणे ते शिक्षण तेथेच थांबले. नंतर कधी अडचण आली तर वासुदेव सावंतवाडी येथे जाऊन श्री. विष्णुभट अळवणी यांच्याकडून समाधान करून घेई.

श्री. वासुदेवशास्त्री असेच आता म्हणू या, यांची ज्योतिषशास्त्र व वैद्यकशास्त्र यांत खूपच प्रगती झाली होती. समोर आलेल्या व्यक्तीच्या भूत आणि भविष्याचे ज्ञान त्यांना होत असे एवढेच नव्हे तर पूर्वजन्मांतील कर्मेही कळून येत. तसेच व्याधीचे मूळ काय आहे याचे अचूक ज्ञान होत असे. त्यामुळे उपचाराने तात्काळ गुण येई. त्यांचे धाकटे बंधु सीताराम यांची पत्रिका पाहून त्याचा विवाह करू नये असे त्यांनी आईला सांगितले होते. त्याप्रमाणे सीतारामाने बाराव्या वर्षीच गृहत्याग केला. फलज्योतिषी म्हणून माणगावात त्यांची चांगली प्रसिद्धी झाली होती.

एकदा ते गोव्यात पेडणे या गावी गेले असता ते उत्तम ज्योतिषी आहेत हे कळल्यावरून एका श्रीमंत माणसाने विद्वत्तेची पारख करण्याच्या उद्देशाने म्हटले की 'आपण ज्योतिषशास्त्रात पारंगत आहात तर सांगा बरे की माझ्या मुठीत काय आहे ?' व आपली मूठ त्यांच्यासमोर धरली. आपल्या ज्ञानाला हे आव्हान आहे हे समजून श्री. वासुदेव शास्त्र्यांनी कुलदेवतेचे स्मरण करून तेथेच मातीत प्रश्नकुंडली मांडली. थोडावेळ विचार करून ते म्हणाले, "श्रीमंत, आपल्या हातात एक नाणे आहे !" तो खरोखरच नाणे होते. त्यांचे ज्ञान पाहून यजमान प्रसन्न झाले आणि त्यांनी गोव्यातील त्या काळातील प्रसिद्ध ज्योतिषि श्री. नीळकंठशास्त्री पधे यांच्याजवळ ज्योतिष विद्येतील अधिक अध्ययनाची सोय करून दिली. श्री. स्वामींच्या दृष्टीने ही पर्वणीच ठरली. या वेळी ६ महिने गोव्यास मुक्काम झाला.

माणगावी श्री. वासुदेवशास्त्री यांच्याकडे शास्त्राध्ययनासाठी तसेच प्रश्न विचारण्यासाठी खूप लोक येत. एक मांत्रिक आणि ज्योतिषि म्हणून त्यांची खूप प्रसिद्धि झाली होती. एक दिवशी तालुक्याच्या गावचे फौजदार श्री. शास्त्रीबुवांकडे सरकारतर्फे आले. आजऱ्याच्या गोविंद राणे नावाच्या इसमाचा १५ दिवसापूर्वी आदावतीवरून खून झाला होता. खुनी कोण हे कळले होते पण तो फरारी झाला होता. खात्याने जंग जंग पछाडले पण खुन्याचा पत्ता लागला नाही. खुनी टोळीतील इतर लोक पकडले गेले होते पण मुख्य आरोपी हाती लागत नव्हता. तेव्हा तो कोठे सापडेल ते आपण सांगा अशी फौजदारांनी विनंती केली.

श्री. शास्त्रीबुवांनी प्रश्न कुंडली मांडली व ते विचारमग्न होऊन म्हणाले की आरोपी दक्षिणेच्या बाजूस गेला आहे. तो आठ दिवसांनी अनायासे तुमच्या हाती येईल. अधिक शोधाचे कारण नाही. त्याप्रमाणे आरोपी दूरच्या गावी मित्राकडे जाऊन राहिला होता. त्या गावी रात्री तो

चोरून हिंडत असता तेथील पोलिसांनी त्यास पकडून जेथे गुन्हा घडला होता तेथील पोलिसांच्या स्वाधीन केले. याचा परिणाम असा झाला की गुन्हेगार सापडेनासा झाला की अधिकारी श्री. शास्त्रीबुवांकडे येत.

शेजारच्या गावी सारख्या चोऱ्या होऊ लागल्या. काही लोक संघटितपणे डाका घालत होते. वासुदेव शास्त्र्यांनी चोरीचे वर्णन करून कितीजण आहेत, ते कोठे राहतात, केव्हा बाहेर पडतात वगैरे सांगितले. तेव्हा सर्व चोर पकडले गेले.

सावंतवाडीच्या श्री. विष्णुपंत आणवकरांना मुलगा झाला तेव्हा त्या मुलाची जन्मपत्रिका श्री. वासुदेवशास्त्र्यांना करण्यास सांगितले गेले. त्या मुलाचे आयुर्मान अगदी अल्प म्हणजे महिनाभर असे आढळून आल्याने शास्त्रीबुवांनी गणित मांडलेली पाटी पालथी घातली. तेव्हा श्री. आणावकरांच्या अंगात समंधाने प्रवेश करून सांगितले की आपण गणित करताना लिहिलेला दिनमान बरोबर नाही. मी सांगतो त्याप्रमाणे जन्मवेळचे दिनमान लिहून परत गणित करा. त्याप्रमाणे परत गणित मांडले तेव्हा महिनाभर क्लेश होते पण मृत्युयोग नव्हता असे आढळले.

श्री. रामभाऊ सबनीस (सावंतवाडी) यांच्या मुलाची पत्रिकाही श्री. शास्त्रीबुवांनीच बनवली होती व त्याबद्दल अडीच रुपये श्री. सबनीसांनी दिले होते असा उल्लेख आहे. श्री. सबनीसांचा मुलगा एकदा बराच आजारी झाला तेव्हा त्यांनी श्री. शास्त्रीबुवांना त्याची पत्रिका पहावयास दिली. पत्रिकेप्रमाणे मुलाचे ग्रहमान चांगले नव्हते म्हणून शास्त्रीबुवांनी त्यांना दोष निवारणार्थ मुलाच्या नावाने सत्पात्र ब्राह्मणास गोप्रदान करण्यास सांगितले. श्री. सबनीस यांनी शास्त्रीबुवांचे बंधु सीतारामपंत यांनाच गाय दान केली. तेव्हा त्यांना सपाटून ताप भरला. श्री. शास्त्रीबुवांनी ओळखले की त्याने दान घेतले त्याचा हा परिणाम आहे. म्हणून त्यांनी ती गाय दुसऱ्या ब्राह्मणांस दान देऊन श्रीदत्त प्रभूंची करुणा भाकली तेव्हा सीतारामपंतांचा ताप उतरला.

एकदा एका ब्राह्मणाच्या द्वितीय विवाहाच्या वेळी त्याच्या आईवडिलांनी मुलीची पत्रिका न बघताच त्याचा विवाह ठरवला पण आईला चुटपुट वाटू लागली. तेव्हा तिने श्री. वासुदेवशास्त्र्यांना प्रश्न पहाण्यास सांगितले. ते म्हणाले की मुलीला मंगळ आहे पण आता विवाह ठरला आहे तर मंगळाचा जप करून तांबडा बैल दान करून ब्राह्मण-सुवासिनी भोजन घाला म्हणजे सर्व ठीक होईल तेव्हा त्यांनी श्रद्धेने हे सर्व केले व अरिष्ट टळले.

इ. सन १८९८ मध्ये तिलकवाडा येथे चातुर्मास झाला तेव्हा श्री. मणिशंकर या गुजराती गृहस्थास संतति नव्हती म्हणून त्याची जन्मपत्रिका मागून घेतली आणि पूर्वजन्मी सर्प हत्या झाली असल्याने नागपंचमीव्रत करून त्यास नारायण नागबळी करावयास सांगितले. त्याप्रमाणे त्याने केल्यावर त्यास पुत्ररत्नाचा लाभ झाला. या प्रमाणे अनेक हकिगती आहेत. 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायाने यावरून वाचकांना श्री. वासुदेव शास्त्री ज्योतिष विद्येत किती पारंगत होते याची कल्पना येईलच.

हरिः ॐ तत् सत्


**श्रीमती डॉ. कमलताई वैद्य**
प्राध्यापक निवास, ब्लॉक नं. ३,
सरकारी वैद्यकीय महाविद्यालय,
मिरज ४१६४१०



# प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये) स्वामीमहाराज विरचित अक्षयवाङ्मयमाला (प्रकाशन योजना)

### संस्था परिचय

श्रीदत्तसंप्रदाय, श्री नाथसंप्रदाय आणि श्री भागवत संप्रदाय यांचे अध्वर्यू विसाव्या शतकातील लोकोत्तर विलक्षण व्यक्तिमत्त्वाचे थोर अधिकारी संत प. पू. श्री. श्री. द. (मामा) देशपांडे महाराज यांनी, १९८३ साली त्यांचे सद्‌गुरू योगिराज प. पू. श्रीवामनरावजी गुळवणी महाराज यांच्या नावाने 'श्रीवामनराज प्रकाशन' या संस्थेची स्थापना केली. त्यावेळी सर्वप्रथम 'श्रीवामनराज' या नावाने 'शक्तिपातयोग व गुरुभक्ती' या विषयांना वाहिलेले एक मराठी त्रैमासिक साधकांसाठी सुरू करण्यात आले. आजतागायत ते अखंड चालू असून दिवसेंदिवस वर्धिष्णू आणि अतिशय आकर्षक रूपात प्रसिद्ध होत आहे. याखेरीज प. पू. श्री. मामा असताना त्यांच्या मार्गदर्शनानुसार आणि त्यांच्या पश्चात १९९० पासून त्यांचे उत्तराधिकारी प.पू. सौ. शकुंतलाताई आगटे आणि प. पू. श्री. शिरीषदादा कवडे यांच्या देखरेखीखाली दीडशेच्यावर पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. ही पुस्तकेही प्रामुख्याने शक्तिपातसाधना, अध्यात्म आणि देव-गुरू-भक्तिपर आहेत.

### श्री थोरले महाराज आणि संस्था

परमहंस परिव्राजकाचार्य सद्‌गुरू श्री वासुदेवानंदसरस्वती स्वामी महाराजांच्या (थोरले महाराज यांच्या) आशीर्वादाने प. पू. सद्‌गुरू श्रीमामांचा अवतार झाला. प.पू. सद्‌गुरू श्री. गुळवणीमहाराज हे थोरल्या महाराजांचे अंतरंग सच्छिष्य आणि प. पू. श्री. मामांचे सद्‌गुरू. म्हणून थोरले महाराज हे श्री. मामांचे परमगुरू होत. तसेच श्री. मामा हे श्रीस्वामीमहाराजांचे अवतार मानले जातात. अशा रीतीने श्री थोरल्या महाराजांचा आणि श्री. मामांचा तिहेरी संबंध आहे. याखेरीज आपल्या संप्रदायाचा मूळ आधार आहे श्रीदत्तसंप्रदाय. श्रीदत्तसंप्रदायाचा 'कलौ श्रीपादवल्लभः' या उक्तीप्रमाणे संपूर्ण भारतभर भ्रमण करून प्रचार आणि प्रसार करण्याचे काम श्री. थोरल्या महाराजांनी आजीवन केले. किंबहुना त्यासाठीच त्यांचा अवतार होता. त्यांनी श्रीदत्तभक्तिपर विपुल वाङ्मयनिर्मिती केली. संप्रदायाच्या स्थैर्यासाठी वाङ्मयाची अत्यंत आवश्यकता असते. म्हणूनच श्रीस्वामीमहाराजांनी ही अक्षय साहित्याची निर्मिती केली.

१९५१ च्या विजयादशमीला 'शिक्षात्रय' नावाचे श्रीमहाराजांचे पहिले पुस्तक प्रकाशित करून श्री. गुळवणीमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांच्या उपलब्ध समग्र वाङ्मयप्रकाशनकार्याचा श्रीगणेशा केला. पुढे यथावकाश श्रीस्वामीमहाराजांच्या शुभसंकल्पाने, पं. दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर, पं. श्रीपादशास्त्री जेरे, पं. आत्मारामशास्त्री जेरे इत्यादी पंडितांच्या सहकार्याने आणि इंदूरच्या राणीसाहेब इंदिराबाई होळकर इत्यादी धनिकांच्या अर्थसहाय्याने तो प्रकल्प तडीस गेला. याचे १२ खंड असून पृष्ठसंख्या सुमारे ५००० आहे. या वाङ्मयाच्या मुद्रित सर्व प्रती संपून गेलेल्या आहेत. श्री. गुळवणीमहाराजांचा आपल्या सद्‌गुरूंचे समग्र वाङ्मय प्रकाशित करण्याचा हा पहिला प्रयत्न होता. हस्तलिखिते गोळा करणे, त्यांचे संशोधन करणे, कागदाची टंचाई, मुद्रणसुविधांचा अभाव अशा सर्व अडचणीतून मार्ग काढत हे कार्य पुरे झाले, ते केवळ श्रीस्वामीमहाराजांच्या सत्यसंकल्पामुळे आणि श्री. गुळवणीमहाराजांच्या गुरूनिष्ठेमुळेच म्हटले पाहिजे.

असाच एक प्रयत्न श्री. ब्र. यो. सीतारामदहाराज टेंब्ये संस्थान, दत्तमंदिर, झिरी, (बडनेरा), यांनी सुरू केला आहे. त्यांच्याकडील द्विसाहस्री गुरूचरित्राची संशोधनपर परिशिष्टयुक्त प्रत पाहण्यात आली. पण त्यांच्याकडील प्रतीही संपलेल्या आहेत.

प. पू.सद्‌गुरू मामांचा, वामनराज प्रकाशनाचा आणि श्री. थोरल्या महाराजांचा घनिष्ठ संबंध लक्षात घेऊन प.पू. श्री मामांच्या आज्ञेने वामनराज प्रकाशनाने श्री स्वामीमहाराजांच्या समग्र वाङ्मयाचे प्रथम मराठी अर्थासह आणि नंतर उपलब्धतेनुसार अन्य भाषांतही भाषांतर करण्याचा संकल्प केला आहे.

### श्रीस्वामीमहाराजांचे वाङ्मय

श्री स्वामीमहाराजांचे समग्र वाङ्मय सार्थ प्रकाशित करण्याचा संकल्प पूर्ण करण्याचा विचार हा लहानशा होडक्याच्या साह्याने महासागर पार करण्याच्या विचारासारखा आहे. श्री महाराजांच्या मनात असले आणि त्यांनीच आशीर्वाद दिला, तर हे शक्य आहे. कारण १) ते विपुल असल्यामुळे एकट्या-दुकट्याकडून होण्यासारखे नाही. २) कित्येक ठिकाणी ते गूढार्थाने भरलेले आहे. अल्पबुद्धीला त्याचे आकलन होण्यासारखे नाही. ३) ते समाधिस्थ प्रज्ञेतून श्रीदत्तप्रेरणेने निर्माण झाले आहे. शब्दकोशातून अर्थ पाहून लिहिणाऱ्या मंदबुद्धींना त्याचे आकलन कसे व्हावे? तथापि त्यांनाच शरण जाऊन त्यांच्या कृपेच्या आश्रयाने त्यांची ही सेवा करावी, असे मनात आणून हा संकल्प सोडलेला आहे. त्यांच्या वाङ्मयाची नामावळी अशी आहे -

अ) संस्कृत - १) श्रीगुरुसंहिता २) दत्तपुराणम् ३) श्रीगुरुचरितम् ४) दत्तचंपूः ५) त्रिशती-गुरुचरितम् ६) कुमारशिक्षा ७) युवशिक्षा ८) वृद्धशिक्षा ९) पंचपाक्षिकम् १०) योगरहस्य ११) बोधरहस्य (यातील काही ग्रंथ सटीक आहेत.)

ब) मराठी - १) दत्तमहात्म्य २) दत्तलीलामृताब्धिसार ३)सप्तशतीगुरुचरित्र सार ४) माघमाहात्म्य ५) प्राकृत मनन ६) स्त्रीशिक्षा ७) आत्मचिंतन ८) पत्रसंग्रह ९) संस्कृत - मराठी ४०० हून अधिक स्तोत्रे.

या संपूर्ण वाङ्मयाची अनेक वैशिष्ट्ये आहेत. १) दत्तभक्तिपरता.

२) कित्येक जागी मंत्रगर्भता ३) भावमयता ४) परब्रह्मस्वरूपता ५) प्रापंचिक दुःखनिवारण क्षमता ६) वेदशास्त्रपुरोणक्तता ७) याशिवाय आशयगर्भता, मौलिकता, अर्थसौंदर्य, रचनासौष्ठव, रसात्मकता, व्याकरणशुद्धता हे अभिजात साहित्याचे गुणही यात आहेत.

## प्रकाशित व संकल्पित

श्रीमहाराजांच्या या विविध वाङ्मयापैकी आवश्यकतेनुसार व शक्यतेनुसार आजपर्यंत अनेक प्रकाशनसंस्थांनी काही ग्रंथांचे, काही स्तोत्रांचे एकदा किंवा अनेकदा प्रकाशन केलेले आहे. श्रीवामनराज प्रकाशनतर्फे प. पू. श्री. मामांनी पत्रसंग्रह, श्री दत्तमालामंत्रविधान आणि सप्तशतीगुरुचरित्रसार ही प्रकाशित केलेली होती. यांच्या सुधारून वाढविलेल्या नव्या आवृत्त्या आता प्रकाशित झालेल्या आहेत. याशिवाय श्रीदत्तलीलामृताब्धिसार, सार्थ शक्तिस्तोत्रे, श्रीदत्तात्रेयांची सार्थ सोळा अवतार चरित्रे, सार्थ श्रीदत्तस्तोत्रे (निवडक १६), प्राकृत मनन आणि आत्मचिंतन हीही आता प्रकाशित झालेली आहे. याशिवाय सार्थ वेदान्तस्तोत्राणि हे लवकरच प्रकाशित होत आहेत. याखेरीज वामनराज त्रैमासिकात प्रातःस्मरण, आरती, योगरहस्य यासारखे वाङ्मय सार्थ सविवरण प्रकाशित झालेले आहे.

नजिकच्या काळात 'दत्तमाहात्म्य' हा ग्रंथ सटीप व सुलभ गद्यरूप प्रकाशित केला जाणार आहे. तसेच द्विसाहस्री गुरुचरित्र हा ग्रंथ अनुवादासह व आवश्यक टीपांसह प्रकाशित केला जाणार. याखेरीज या ग्रंथांना आवश्यक ती परिशिष्टेही दिली जाणार आहेत. तसेच श्रीस्वामीमहाराजांचे एक सविस्तर चरित्र प्रकाशित करण्याचा मानस असून त्याची आवश्यक ती तयारी झालेली आहे.

## इदं न मम

श्रीमहाराजांनी इतके विपुल वाङ्मय रचून ते कधीच आपण रचले असे म्हटलेले नसून श्रीदत्तप्रभूंनी आपल्याकडून लिहवून घेतले, असेच म्हटले आहे. एकदा श्री. उकिडवे यांनी माणगावात श्रीमहाराजांना द्विसाहस्री लिहिताना विचारले होते, 'शास्त्रीबोवा, (या वेळी संन्यास घेतला नव्हता.) आपण इतक्या जलद ही रचना कशी करू शकता ?' त्यावर त्यांनी उत्तर दिले - 'ही रचना मी करीत नाही म्हणून. मी लिहायला बसतो, तेव्हा मला कागदावर जी अक्षरे दिसतात, तीच मी गिरवतो.' 'आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत बोलविता धनी वाचा त्याची ।' या श्रीतुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे 'श्रीदत्तप्रभूच सर्व कार्ये आपल्याकडून करवून घेतात' ही त्यांची नितांत श्रद्धा होती. या विषयी दत्तलीलामृताब्धिसाराच्या अंती श्रीमहाराज म्हणतात -

'वासुदेवानंदसरस्वतींमुखे मालवदेशी हा निजलीलासिंधू गुरु वदले ।' याच प्रकारचे उल्लेख ठिकठिकाणी करून सर्व कर्तृत्व त्यांनी 'इदं न मम' म्हणून श्रीदत्तार्पण केलेले आहे.

श्रीस्वामीमहाराजांचे सर्वच वाङ्मय साधकांना का अभ्यासण्याजोगे आहे, या विषयी सांगताना प. पू. शिरिषदादा कवडे 'प्राकृत मनन आणि आत्मचिंतन' या प्रकरण ग्रंथाच्या भूमिकेतून म्हणतात -

'प्रस्तुत दोन गद्य प्रकरणे त्यांनी करुणापूर्वक प्रकट करून सर्व अभ्यासू साधक जनांवर महद् उपकारच करून ठेवले आहेत. महाज्ञानी महासिद्धांची भाषा, ही केवळ 'भाषा' नसून तो 'बोध' असतो. त्यामुळे श्रद्धापूर्वक आणि नियमाने या दोन प्रकरणांचा अभ्यास घडल्यास साधक 'ब्रह्मनिष्ठ' होतो.

प. पू. सद्गुरू श्री. मामा, या दोन्ही प्रकरण ग्रंथांचा सतत अभ्यास करण्यास अनेकांना सांगत असत. काही अधिकारी मुमुक्षूंना त्यांनी आत्मचिंतन प्रकरणाचे चिंतन-निदिध्यासन करण्याची आज्ञाही केलेली होती. ही दोन्ही प्रकरणे त्यांची अतिशय आवडीची होती, हे मी वेळोवेळी अनुभवलेले आहे. प. प. श्री. थोरल्या स्वामी महाराजांचे 'सांगणे' हे अत्यंत मार्मिक, सूत्रबद्ध आणि निःसंशय निर्भीडतेचे असे. त्यांचा उपदेश हा साक्षात् भगवान् श्रीदत्तप्रभूंचाच उपदेश मानून त्याप्रमाणे वागल्यास, साधकाला परमकल्याणाची सहजप्राप्ती होईल, हे त्रिकालाबाधित सत्यच आहे.

'स्त्रीशिक्षा' ग्रंथात प. प. श्रीस्वामीमहाराजांनी एका 'फटक्यातून' केलेला उपदेश या संदर्भात अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याचा विचार करून साधकांनी त्याप्रमाणे विवेक ठेवला पाहिजे. ते म्हणतात की,

*निजधर्माला दवडुं नको । सत्याला कधिं सोडुं नको ।*
*उगिच कुटाळ्या करोनि टाळ्या पिटोनि काळा दवडुं नको ॥१॥*
*मर्यादेला टाळुं नको । आचारा कंटाळुं नको ।*
*आल्या भोगा होउनि सावर बोल कुणावर ठेवुं नको ॥४॥*
*ह्या उपदेशा दवडुं नको ।*
*दत्तात्रेयें वासुदेव हे कधि यातें उल्लंघुं नको ॥५॥*

या लघुग्रंथाचा अशीच निष्ठा ठेवून अभ्यास आम्हा सर्वांकडून घडो, हीच प. प. सद्गुरु स्वामीमहाराजांच्या पावन श्रीचरणीं वारंवार मस्तक ठेवून कळकळीची प्रार्थना आहे.'

वरील प्रार्थनेप्रमाणेच 'श्रीवामनराज प्रकाशनाच्या' सर्व संबंधितांची मनोमन अशीच प्रार्थना आहे की, 'हे परमेष्ठिगुरो, श्रीस्वामीमहाराज ! आपल्या 'अक्षय' वाङ्मयाच्या प्रकाशनाचा आपणच प्रस्फुरित केलेला संकल्प आपल्याच सामर्थ्याने आणि आशीर्वादाने 'इदं न मम' या बुद्धीने परिपूर्ण होवो.'


**विनायक गोविंद देसाई**

४९, साने गुरुजी वसाहत, राशी रोड, कोल्हापूर - ४१६०१२ फोन - २३२२६९२


## परमहंस वासुदेव यति

धन्य नर्मदे । कुशीत विसावे संन्यासी थोर
परमहंस वासुदेव यति गरुडेश्वरी विख्यात ॥१॥
भागवताचे सार काढुनि सकलजना वाटती
उद्धाराया भवजलधितुनी पारायणे करिती ॥२॥
कवित्व स्फुरतां स्तोत्रे गाती गीर्वाणी भाषा
स्मर्तृगामी 'दत्तमहात्म्य' हे तारील जीवन कोणा ॥३॥
अज्ञानाचा नाश करुनी उजळो जीवन भव्य
अद्वैताचे ध्यान स्मरणी दिसे मार्ग दिव्य ॥४॥
अखंड सेवा दत्तप्रभूंची घडतां, दुरित पळे
श्रीपादांची साक्ष 'वाडी'ची अजूनहि भाषा कळे ॥५॥


**नंदकुमार प्रभुणे**

ई ६०२ शेफालिका हाईटस्, बलवन्तपुरम्,
शिवतीर्थ नगर, पौड रस्ता, पुणे ३८.



# ॥ श्रीवासुदेव दत्तलीलामृत सार अर्थात नारोपंतांची बखर - एक संग्राहय ग्रंथ ॥

**श्री. रोहन विजय उपळेकर**

पंचम दत्तावतार भगवान श्रीमत् वासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये) स्वामी महाराज - थोरले महाराज हे श्रीदत्तसंप्रदायाचे अध्वर्यू. श्रीदत्तसंप्रदायाचे आजचे स्वरूप, तत्त्वज्ञानाची, उपासनांची सुबद्ध ग्रंथरूप मांडणी ही सर्व थोरल्या महाराजांचीच कृपाकृती आहे. आसेतु हिमाचल अखंड पदभ्रमण, अत्यंत कर्मठ, शास्त्राचार आणि प्रचंड ग्रंथनिर्मिती हे त्यांच्या अवतार लीलेतील दिव्य चमत्कारच म्हणावे लागतील.

श्रीमत् थोरल्या महाराजांच्या जीवन चरित्रावर अनेकांनी ग्रंथ लिहिले आहेत. त्यांच्या लीलाकथा अनेक सद्भक्तांच्या पठण-चिंतनात आहेत. श्रीमत् थोरल्या महाराजांच्या माणगांव वास्तव्यातील त्यांचे एक कृपापात्र शिष्य प. पू. नारायण गोविंद उपाख्य नारोपंत उकिडवे यांनीही श्रीस्वामी महाराजांच्या काही लीला, दृष्टांत, वृत्तपत्रांतील लेख, स्तोत्रे इत्यादी साहित्य एकत्र करून शके १८४० च्या (इ. स. १९१८) श्रीदत्त जयंतीच्या मुहूर्तावर छोट्या प्रमाणात 'श्रीवासुदेव दत्तलीलामृतासार' या नावाने एक ग्रंथ प्रकाशित केला. याच ग्रंथाची सुधारित आवृत्ती म्हणजे 'नारोपंतांची बखर'.

श्रीमत् थोरले महाराज हे भगवान श्रीदत्तप्रभूंचे पूर्णावतार होते. हे त्यांच्या परमदिव्य, विलक्षण चरित्रकथांवरून सहजी ध्यानात येते. या बखरीत देखील असे काही विलक्षण प्रसंग आलेले आहेत. पान ४९ वरील 'अनाकलनीय शक्ती' शीर्षकाचा प्रसंग काय किंवा पान ५०-५१ वरील 'बुडालेले पातेले' आणि 'चराचरावर सत्ता' काय सारेच विलक्षण. श्रीस्वामी महाराज योगशास्त्रात पारंगत होते. उदाहरणादाखल एक प्रसंग - श्रीदत्तसंप्रदायामध्ये एक गूढ परंतु प्रभावी अशा 'हिरण्य योग' नावाच्या योगाची पद्धती प्रचलित आहे. स्वप्नांपासून सुरू होणाऱ्या महायोगाच्या विभागाला हिरण्ययोग म्हणतात. या योगाच्या साहाय्याने अनेक अकल्पनीय गोष्टी प्रत्यक्षात आणता येतात. या बखरीत पान ५९ वर नारोपंत आपल्या घरच्या दत्तमंदिरात घडलेला प्रसंग सांगतात. एके दिवशी त्यांच्या दत्त मंदिराच्या दारात सुरेख संगमरवरी पादुका काकड्याच्या वेळी आढळल्या. हे कसे घडले यासंबंधी चर्चा चालू असतानाच त्यांच्याच घरातील एक माणूस धावत आला व नुकतेच पडलेले स्वप्न सांगू लागला. त्याला स्वप्नात श्रीमत् थोरले महाराज दिसले व त्यांनी दत्तमंदिरात संगमरवरी पादुका ठेवल्याचे त्या इसमाने पाहिले. प्रत्यक्षात श्रीमत् थोरल्या महाराजांनीच त्या पादुका तेथे नेऊन ठेवलेल्या होत्या. हे हिरण्ययोगाच्याच अवलंबनाने घडले होते.

बखरीतील आणखी एक महत्त्वपूर्ण संदर्भ म्हणजे शृंगेरीपीठाधीश श्रीमत् सच्चिदानंद शिवाभिनव श्रीनृसिंह भारती शंकराचार्यांनी श्रीमत् थोरल्या महाराजांविषयी काढलेले उद्‌गार. हे शंकराचार्यही अत्यंत थोर अधिकारी होते आणि श्रीमत् थोरल्या महाराजांना श्रीविद्येची दीक्षा याच पीठाकडून होती. श्रीमत् शंकराचार्यांनी श्रीमत् थोरले महाराज हे प्रत्यक्ष भगवान श्रीदत्तप्रभूच आहेत, असे स्पष्ट म्हटले आहे. प्रत्यक्ष आद्यशंकराचार्य भगवानच श्रीमत् टेंबेस्वामी महाराजांच्या रूपाने पुन्हा धर्मसंस्थापनार्थ आणि संन्यास आश्रमाची महती वाढवण्यासाठी प्रकटले आहेत अशी त्यांची धारणा आहे. 'अंतर्निष्ठांच्या खुणा अंतर्निष्ठ जाणती ।' हेच खरे.

बखरीत श्रीमत् स्वामी महाराजांनी रचलेले 'मंत्रगर्भ श्रीदत्तात्रेयाष्टोत्तर शतनाम स्तोत्र' दिलेले आहे. या चोवीस श्लोकांच्या स्तोत्रात श्रीस्वामी महाराजांनी एकूण १४ मंत्र ग्रंथित केले आहेत. काव्यशास्त्रातील हा विलक्षण चमत्कारच म्हणावा लागेल. या बरोबरच श्रीमहाराजांनी रचलेली षोडशोपचार पूजा पद्धती आणि श्रीस्वामींच्या श्रीदत्तपुराणातील 'वेदपादस्तुती' दिलेली आहे. ही वेदपादस्तुती सर्व वेदोपनिषदांचे सारच असून अभिषेकासाठी रुद्राप्रमाणे वापरली जाते.

बखरीतील 'श्रीगुरुमहाराजांच्या तोंडचे नाममाहात्म्य' आणि 'श्रीगुरु महाराजांच्या तोंडचे आत्मज्ञान' ही दोन्ही प्रकरणे अतिशय बोधप्रद व नित्य चिंतनीय अशीच आहेत. यातील आत्मज्ञानाचे प्रश्नोत्तररूप प्रकरण तर श्रीस्वामी महाराजांच्या प्रत्यक्ष स्वप्नादेशामुळेच समाविष्ट केलेले आहे. या १९ प्रश्नांच्या उत्तरादाखल श्रीमत् स्वामीमहाराजांनी सारा वेदान्तच सोपा करून सांगितला आहे. ज्ञानेच्छू साधकांनी आवर्जून चिंतनात ठेवावे असेच हे प्रकरण आहे.

बखरीत शेवटी श्रीस्वामीमहाराजांची दंड परंपरा, शिष्य परंपरा आणि वाङ्मय संपदेची आणि चातुर्मास स्थलांची सूची आहे. श्रीस्वामींच्या हस्ताक्षरातील काही पत्रे ग्रंथास वेगळेच वैभव प्रदान करतात. मलपृष्ठावरील 'सर्व उपदेशाचे सार' ही श्रीमत् स्वामी महाराजांच्याच मुखातील अमृतवाणी आहे. या अमृतवाणीस 'या प्रमाणे जो वागेल तो शेवटी पूर्ण सुखी होईल' असा सार्थ आशीर्वादही आहे.

भगवान श्रीमत् टेंब्ये स्वामी महाराजांच्या सर्व भक्त मंडळींसाठी तसेच ज्ञानपिपासू साधकांसाठी हे पुस्तक सर्वथा चिंतनीय व संग्रही ठेवावे असेच आहे.

**रोहन विजय उपळेकर**
द्वारा श्रीकांत श्रीखंडे,
४७८/अ, पर्वती, सौख्यदा सोसायटी,
पुणे ४११००९. फोन : २४२२१८६५

*(गुरुतत्त्व प्रकाशन २११४ ए, वांगी बोळ, कोल्हापूर ४१६०१२.
किंमत रु. ५०/-)*



# दत्तस्थानांचे महत्त्व

श्री. गणेश दिगंबर आपटे

प्रमुख दत्तस्थाने २१ असून प. पू. श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी यांनी या दत्तस्थानांना भेटी दिल्या आहेत. त्या स्थानांची माहिती खाली दिली आहे.

## १) कुरवपूर

हे प्राचीन दत्तक्षेत्र आंध्र प्रदेशात आहे. कृष्णा स्टेशनपासून ते १८ मैलांवर असून ते एका बेटावरच वसलेले आहे. गुरुचरित्रात वर्णन केलेल्या श्रीपाद वल्लभ या दत्तावताराचे हे तपस्थान होते. त्यामुळे तिथे एका गुहेत त्यांच्या पादुका व शिवलिंग आहे. गुरु द्वादशीस येथे मोठी यात्रा भरते. या ठिकाणी श्रीवासुदेवानंद सरस्वती महाराजांनी एक चातुर्मास केला होता. हे ठिकाण रायचूर जिल्हा व तालुका या मध्ये मोडते. बेटावर श्रीपाद दत्त मंदिर आहे व एक ग्रंथालय असून त्यामध्ये श्री गुळवणी महाराजांनी प्रकाशित केलेले श्री टेंबे स्वामींचे सर्व ग्रंथ ठेवलेले आहेत.

## २) नृसिंह वाडी

हे स्थान कृष्णा पंचगंगेच्या संगमावर आहे. येथे दत्ताचे दुसरे अवतार श्रीनरसिंह सरस्वती स्वामी यांनी १२ वर्षे तप केले तेव्हापासून हे ठिकाण फार पवित्र व सिद्धक्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. महाराष्ट्रातील सर्व दत्तभक्तांना ते परिचित आहे. विष्णूरूप कृष्णा नदी व शिवा, भद्रा, भोगावती, कुंभी व सरस्वती या पांच नद्यांची मिळून झालेली पंचगंगा अशा दोन पुण्य नद्यांचा येथे संगम आहे. श्रीनृसिंह सरस्वती यांनी गाणगापूरला जाण्याचे ठरविले तेव्हा योगिनींच्या प्रार्थनेने प्रसन्न होऊन आपल्या पादुकांची त्यांनी येथे औदुंबर वृक्षाखाली स्थापना केली व येथे नित्य वस्तीस राहीन असे सांगितले. त्या प्रमाणे भक्तगण त्याचा प्रत्यय घेत असतात. ज्या महात्म्यांनी सर्वसंग परित्याग करून तपश्चर्या केली त्यामध्ये प. पू. श्रीवासुदेवानंद सरस्वती यांचे प्रमाणे श्रीनारायण स्वामी, श्रीगोविंद स्वामी, श्रीमौनी स्वामी इत्यादी महात्मे होते. येथे गुरुद्वादशी, मार्गशीर्ष पौर्णिमा, पौष व माघ या महिन्यांमध्ये उत्सव होत असतात.

## ३) औदुंबर

हे स्थान भिलवडी स्थानकापासून चार किलोमीटर अंतरावर आहे. श्रीनरसिंह सरस्वती स्वामींच्या तपश्चर्येच्या तीन ठिकाणांपैकी हे एक होय. श्री जनार्दन स्वामी व संत एकनाथ महाराज येथे येऊन गेले आहेत. त्यांना तेव्हा इथे श्रीदत्तगुरुंचे दर्शन झाले होते. येथे राहिलेल्या सत् पुरुषामध्ये श्रीब्रह्मानंद स्वामी व श्री नारायणानंद तीर्थ हे दोघे प्रसिद्ध आहेत. श्रीनारायणानंदतीर्थ यांनी येथे श्री शिवशंकरानंद आश्रम नावाचा मठ स्थापन केला आहे. येथे दर शनिवारी व पौर्णिमेस पालखी सोहळा असतो.

## ४) गाणगापूर

हे स्थान सोलापूर व गुलबर्गा या स्थानका दरम्यान गाणगापूर रोड या नावाचे दक्षिण पूर्व रेल्वेस्थानक आहे. तेथून क्षेत्र गाणगापूर १४ मैलांवर आहे. याला पुराणात गंधर्व पूर असे म्हटले आहे. येथे भीमा व अमरजा या नद्यांचा संगम आहे. श्रीनरसिंह सरस्वती यांनी येथे दोन तपे निवास केला. त्यामुळे दत्तपंथीयांचे हे आवडते क्षेत्र आहे. प. पू. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी व दत्तभक्त वासुदेव बळवंत फडके यांचा गाणगापुराशी खूप संबंध होता. गुरु चरित्रामध्ये येथे घडलेल्या पुष्कळ कथांचे व सत् पुरुषांचे उल्लेख आहेत. त्यापैकी कलेश्वराशी नरहरी कवी संबंधित होते तर तंतुकेश्वराशी संबंध स्वामींच्या बरोबर श्रीशैल्य यात्रा करणाऱ्या तंतुकाशी आहे. दर गुरुवारी येथे पालखी निघते. गुरु चरित्रामध्ये उल्लेख असलेली सर्व स्थाने इथे दर्शवली जातात.

कित्येक दत्तभक्त इथे श्रद्धेने गुरुचरित्राचे पारायण, निर्गुण पादुकांची उपासना व दुपारची भिक्षा मागण्याचे व्रत करतात.

## ५) कारंजा

यालाच करंज नगरी असे म्हणतात. दत्तावतारी श्रीनरसिंह सरस्वतींचे हे जन्मस्थान विदर्भातील अकोला जिल्ह्यामध्ये मूर्तिजापूर-यवतमाळ या रेल्वे रस्त्यावर हे गाव आहे. सन १९०५ मध्ये प. पू. श्रीवासुदेवानंद सरस्वती हे येथील राम मंदिरात उतरले होते. तेव्हा सध्याच्या गुरु मंदिराशेजारी असलेल्या घुडे यांच्या वाड्यामध्ये श्रीमद् वासुदेवानंद सरस्वती स्वामींना श्रीनरसिंह सरस्वती स्वामींच्या वास्तव्याचा बोध झाला. माझे वास्तव्य येथेच आहे असा दृष्टांतही झाला. श्री. अण्णासाहेब पटवर्धन व श्री ब्रह्मानंद सरस्वती यांनाही गुरुमंदिर उभारण्याची प्रेरणा झाली व १९३४ च्या सुमारास हे दत्तक्षेत्र उभे राहिले. मूर्ति बालसंन्यासी रूपातली आहे. कारंज्यास बिंदूमती उर्फ बेंबळानदी आहे.

या व्यतिरिक्त खालील दत्तस्थाने पण प्रसिद्ध आहेत.

१) गिरनार पर्वत - सौराष्ट्रात जुनागड जवळ दत्त पादुका आहेत.

२) भटगाव - नेपाळात (श्री दत्तात्रयांची जन्मभूमी) (चित्रकूटाजवळील अनुसूया पहाड).

३) केडगांव - बेट (श्रीनारायण महाराजांचे)

४) पीठापूर - श्रीपाद श्रीवल्लभांचे जन्मस्थान मद्रास राज्यात गोदावरी जिल्ह्यामध्ये.

५) कोल्हापूर - श्री दत्तात्रयांचे भिक्षास्थान.

६) अक्कलकोट - श्री समर्थांची लीलाभूमी.

७) माणिकनगर - श्रीमाणिक प्रभूंचे लीलास्थान

८) सूचींद्रम् - कन्याकुमारीचे अलीकडे ८ ते ९ कोस तिरुतीवल्ली स्टेशनवरून एस.टी.ने नागरकोईलहून जाता येते.

९) माहूर - श्री दत्तप्रभूंचे निद्रास्थान. गुरुचरित्रात याचा मातापूर म्हणून उल्लेख आहे.

१०) धोम - श्रीनाथाचे दत्तस्थान - सातारा जिल्ह्यामध्ये वाई तालुक्यात.

११) खामगांव - संत पाचलेगांवकर महाराजांचा मुक्तेश्वर आश्रम येथे आहे. विदर्भातील बुलढाणा जिल्ह्यात खामगांव शहर आहे.

१२) नारेश्वर - गुजराथेत मुंबई-अहमदाबाद मार्गावर मियांमाम कर्जण स्टेशनपासून एस.टी.ने नारेश्वरला जाता येते. ही श्रीरंगावधूत महाराजांची तपोभूमी आहे.

१३) जनार्दन स्वामींचा दत्त - देवगिरी येथील देवगड किल्ल्यावर औरंगाबादपासून जवळ आहे.

१४) श्री दत्तसंस्थान बाळेकुन्द्री - हे स्थान बेळगांवच्या पूर्वेस आठ मैलांवर बेळगांव-बागलकोट मार्गावर आहे.

१५) गरुडेश्वर (श्री टेंबे स्वामींचे समाधी स्थान) - गुजराथेत बडोद्याहून एस.टी.ने. जाता येते. राजपिपला मार्गावर आहे.

१६) श्री दत्तक्षेत्र दत्तवाडी साखळी (गोमंतकातील गाणगापूर) पणजीपासून सुमारे २०/२५ मैलांवर आहे.

ही माहिती श्रीदत्तात्रेय ज्ञानकोश या डॉ. प्र. न. जोशी संपादित ग्रंथ व श्रीदत्त उपासना अशी करा या पं. आनंद घनराम यांनी लिहिलेल्या पुस्तकावरून संकलीत केली आहे.

**श्री. गणेश दिगंबर आपटे**

६ गुरुवैभव सोसायटी, रामबाग वसाहत, पौड रोड, पुणे ४११०३८.

## परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद् वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांची आरती

जय जय श्रीमद्गुरुवर स्वामिन् परमात्मन् हंसा ।
वासुदेवानंद सरस्वति आरति तदहंसा ॥ ध्रु. ॥

सोऽहं हंसः पक्षाभ्यां संचरसि ह्याकाशे ।
वासस्ते खलु लोके सत्ये क्रीडा तव मानसे ॥१॥

मुक्ताहारो ब्रह्मवाहको वैराङ्रूपधर ।
भक्तराजहृत्ध्वांततमोहृत्त्वीकुरु मां च हर ॥२॥

पक्षस्यैके वातेनैते भीताः काकाद्याः ।
पलायितास्ते द्रुतं प्रभावाद् भवन्ति चादृश्याः ॥३॥

एवं सति खलु बालस्तेहं ग्रसितः कामाद्यैः ।
मातस्त्वरया चोद्धर कृपया प्रेषितशांत्याद्यैः ॥४॥

दासस्ते नरसिंहसरस्वति याचे श्रीचरणम् ।
भक्तिश्रद्धे वासस्ते हृदि सततं मे शरणम् ॥५॥